श्री ज्ञानेश्वरमाउ [illegible] समर्थ.

तस्मात्सर्वप्रयत्नेन मत्प्रिया शरणं व्रजेत ।
आश्रित्य मत्प्रियां रुद्र मां वशीकर्तुमर्हसि ॥

—पद्मपुराण—

# श्रीज्ञानेश्वरकन्यापदपांसु.

अथवा

वऱ्हाडांतील सुप्रसिद्ध सत्पुरुष

## श्रीगुलाबराव महाराज यांचें चरित्र

पूर्वखंड.

**प्रकाशक व प्रकाशनाचें ठिकाण.**

नारायण रघुनाथ केकरे बी. ए. एल. एल. बी. [illegible]

**मुद्रक.**

शंकर नरहर जोशी, चित्रशाळा सदाशिव पेठ ८१८, पुणे [illegible]



**किंमत ३ रुपये.**

श्री ज्ञानेश्वरमाऊ समर्थ.

तस्मात्सर्वप्रयत्नेन मत्प्रियां शरणं व्रजेत् ।
आश्रित्य मत्प्रियां रुद्र मां वशीकर्तुमर्हसि ॥

—पद्मपुराण—

# श्रीज्ञानेश्वरकन्यापदपांसु.

अथवा

वऱ्हाडांतील सुप्रसिद्ध सत्पुरुष

## श्रीगुलाबराव महाराज यांचें चरित्र



### पूर्वखंड.

प्रकाशक व प्रकाशनाचें ठिकाण.
नारायण रघुनाथ केकरे बी. ए. एल्. एल्. बी. प्लीडर हरदा सी. पी.

मुद्रक.
शंकर नरहर जोशी, चित्रशाळा सदाशिव पेठ ८१८, पुणें सिटी.



किंमत ३ रुपये.

# समर्पण.

श्रीमहाराजांच्या प्रणतजनबुद्धिवर्धनादि अनुपम वात्सल्यास लुब्ध होऊन व त्यांचा वेदपुराण प्रसिद्ध चरणरजमाहिमा अंतःकरणांत नित्य भरून राहो अशी याचना करून नारायण पंडितादि समस्त मिलिंद-वृंद आपल्या लेखकादि सांप्रदायिक बंधुगणांसह प्रस्तुत चरित्ररूपी आपल्या चित्तवृत्ती त्या मधुर चरणपंकज-परागांत समर्पण करीत आहे.





हरदा ( मध्यप्रांत ) येथील प्रसिद्ध जमीनदार.

## रा० रा० रघुनाथराव वामन केकरे.



यांनीं श्रीमहाराजांच्या चरित्रप्रकाशनाच्या कार्याला १०० रुपयांची स्तुत्य देणगी देऊन महाराजांविषयीं आपली प्रेम-बुद्धि व्यक्त केली व आपल्या समान स्थितीच्या धर्मजिज्ञासु गृहस्थांस उत्तम उदाहरण घालून दिलें.

# प्रस्तावना.

(पांगारकरांची)

१. सत्पुरुषकथेला मोरोपंतांनीं कामधेनूची उपमा दिली आहे. जो जो ज्याचा मनोरथ तो तो सत्कथा पुरविणारी आहे. अगदीं अज्ञ कथापरांपासून तों रहस्यपर तज्ज्ञांपर्यंत सर्वांना तो मनोहर व बोधप्रद वाटते. संतकथा तत्वज्ञानापेक्षां गूढ, इतिहासापेक्षां प्रौढ, कवितेपेक्षां रसिकजनमनोहारिणी व कादंबरीपेक्षांही उन्मादक आहे; आणि तिच्यांत तत्वज्ञान, इतिहास, काव्य व कादंबरी ही सर्व समुच्चयानें आढळतात. धर्माचें अत्यंत मोहक स्वरूप सत्कथेंत दिसतें. संत हे धर्माचें मूर्त स्वरूपच आहेत. धर्मतत्वाची ओळख सामान्यजनांना संतांच्या चरित्रांवरूनच पटते. देव आणि संत यांच्या उपदेशापेक्षांही त्यांच्या चरित्रांत विलक्षण जादू असते. गीता आणि भागवत दोन्ही ग्रंथ भगवंताचेच पण त्यांतल्या त्यांत लोकांच्या प्रीतीचा कांटा गीतेपेक्षांही भागवताकडेच अधिक झुलतो! गीतेंत श्रीकृष्णांचें धर्मरहस्य व्यक्त झालेलें आहे आणि भागवतांत प्रत्यक्ष श्रीकृष्णच आहेत. अमूर्त ज्ञानापेक्षां मूर्ताची प्रीति स्वाभाविकपणें अधिक असते. या न्यायानें श्रीगुलाबराव महाराजांचे खास असे १०।१२ ग्रंथ जरी प्रसिद्ध झालेले आहेत तरी त्यांपेक्षां त्यांच्या ह्या चरित्राची गोडी रसिक भाविक प्रेमळांस अधिक वाटेल अशी मला खात्री वाटते. माझा स्वतःचा तरी हा अनुभव आहे.

२. प्रस्तुत चरित्रग्रंथ महाराजांचे प्रियशिष्य चांद्याचे रा० राजेश्वरराव त्रिपुरवार यांनीं लिहिला आहे. असा सुंदर ग्रंथ महाराजांच्या समागमामुळेंच रा० त्रिपुरवार यांस लिहितां आला. महाराजांच्या चरित्राची गोडी सगतीमुळेंच चरित्रकाराच्या अंगीं उत्पन्न झाली आणि व्युत्पन्न पंडिताच्या हातूनही जें काम होणें दुरापास्त तें गुरुभक्तीच्या योगानें साध्य झालें.

महाराजांच्या चरित्रांतील गोष्टी संगतवार पण अत्यंत प्रेमवश स्थिर त्यांनीं वर्णिल्या आहेत. कदाचित् अर्वाचीन लेखनपद्धती रा० त्रिपुरव यांस माहीत नसेल, ते मागासलेल्या प्रांतांतील आहेत, त्यांची मोडण सर्वच ठिकाणीं शास्त्रशुद्ध नाहीं असेंही कोणास वाटेल, पण गुरुभक्तीच्या जिव्हाळ्यानें त्यांच्या वाणींत जो सतेजपणा आला आहे, सत्संगानें धर्मरहस्यांचा प्रकाश अंतर्यामीं पडल्यामुळें त्यांत निःसंदेहतेचा जो आवेश आहे, स्वतः पाहिलेल्या अनुभवलेल्या, व विश्वसनीय पुरुषांच्या तोंडून ऐकलेल्या अनेक गोष्टी त्यांत ज्या अनुपम प्रेमानें वर्णिल्या आहेत त्यांचा विचार करितां हा ग्रंथ बहुतांशीं प्रासादिक उतरला आहे असें म्हणण्याचा मला मोह पडतो. रा० त्रिपुरवार यांची गुरुभक्ति डोळस आहे कां अंध आहे असें मी म्हणूं ? मला डोळसभक्ति आणि अंधभक्ति यांत भेदच कळत नाहीं ! अंधभक्ति हा शब्द अर्वाचीन दिसतो, व तो बहुधा ज्यांना भक्तीची ओळख नसते त्यांच्या परिभाषेंतला असावा ! डोळसपणाशिवाय भक्तिच कशी उत्पन्न होईल ? ती खरोखरीची उत्पन्न झाल्यावर अगदीं क्षुल्लक बाबींकडे लक्षच जाईनासें झाल्यामुळें तिला अंधभक्ति असें नांव पाहिजे तर द्यावें, पण मी तरी तिला निष्ठा, विश्वास, दृढश्रद्धा, प्रीति असेंच म्हणतों. आणि भक्ति अशी अंध न होईल तर तिचें भक्तित्वच कोठें राहिलें ? गोपींची श्रीकृष्णावर जी अलोट भक्ति होती ती डोळस होती कां अंध होती ? मी तर डोळस भक्तीची परिपूर्णता म्हणजेच अंधभक्ति असें समजतों !

डोळसभक्ति=अंधभक्ति=निष्ठा.

असें मी गणित करितों. पूर्णांतून पूर्ण काढून घेतलें म्हणजे पूर्णच बाकी उरतें ( पूर्णमेवावशिष्यते ) हा हिशेब एखादा गणिती चुकीचा समजेल तर समजो, पण हें गणित श्रुतिमाउलीनें केलें आहे ! अध्यात्माचे हिशेब अध्यात्माच्या गणितपद्धतीनेंच पाहिले पाहिजेत. असो. त्रिपुरवार यांचा हा ग्रंथ उत्कट गुरुभक्तीनें अत्यंत प्रेमळ झाला आहे. थोरांच्या लहान लहान गोष्टीही मोठ्या चित्तवेधक असतात आणि चरित्रकार त्यांचा संग्रह न करील तर त्याचें तें चरित्र फिकेंच होईल. थोरांचा थोरपणा

त्यांच्या लहान लहान गोष्टींतूनही लोपत नाहीं. थोर ते सर्वांगानें सर्वकाळीं थोरच असतात. संप्रदायाबाहेरचे किंवा परमार्थानभिज्ञ लोक काय म्हणतील याचा विचार न करितां गुलाबराव महाराजांच्या सर्व लहान मोठ्या गोष्टींचा रा० त्रिपुरवार यांनीं यांत संग्रह केला आहे आणि म्हणूनच महाराज जसे होते तसेच या चरित्रांत दिसतात. शिष्यांशीं, विद्वानांशीं, खेडवळांशीं, नास्तिकांशीं व प्रेमळांशीं महाराज जसे वागले व जें जें बोलले तें तें प्रामाणिकपणानें यांत ग्रथित केलें आहे, आणि म्हणून या चरित्राच्या सत्यत्वाविषयीं शंका घेण्यास जागा राहिली नाहीं. महाराजांचा लहरी व स्वच्छंदी स्वभाव, महाराजांचा तापटपणा, या ग्रंथांत—जसा तो मूळ स्वभावांत दृष्टीस पडे—तसाच दाखविला आहे. ‘ क्रोधोपि निर्मलधियां रमणीय एव ’ असेंच असल्या पुरुषांच्या कथा पाहिल्या म्हणजे वाटते. महाराजांच्या चरित्रांत त्यांच्या पूर्वार्जित अत्युत्कट श्रीकृष्णभक्तीचा जो प्रचंड झोत सूर्यप्रकाशासारखा निरंतर तळपत असे त्यामुळें त्यांच्या माहात्म्याविषयीं कोणाचीही संगतीनें खात्री पटत असे. प्रकृतिगत गुणदोषांचा विचार गौण आहे, जीवात्म्याची योग्यता काय होती हा मुख्य विचार आहे; आणि या दृष्टीनें पाहतां गुलाबराव महाराज हे ‘ योगभ्रष्टोऽभिजायते ’ या उच्च कोटीची विभूति होती या विषयीं शंका उरत नाहीं. हें समग्र चरित्र दुरभिमान सोडून जो कोणी वाचील त्याचीही अशीच खात्री झाल्याशिवाय रहाणार नाहीं.

३. इ० स० १९०६ सालीं मी उमरावतीस होतों तेव्हांपासून श्रीगुलाबरावमहाराजांचा सहवास मला पुष्कळ झाला. त्यांच्या संगतींत होणारा आनंद रा. त्रिपुरवार यांनीं वर्णन केला आहे तो सर्व यथार्थ आहे. महाराज बोलूं लागले कीं भक्तिप्रेमामृताचा नुस्ता पाऊस पडे, ते चर्चा करूं लागले कीं त्यांची निर्दोषवादसरणी, विलक्षण ज्ञान व युक्तिवाद पाहून मन कुंठित होई, ते प्रेमानें गाऊं लागले कीं मुलाच्या माधुर्यालाही लाजविणारी त्यांची अत्यंत मधुरवाणी ऐकून चित्त नागासारखें डोलूं लागे. पूजादि कर्मे ते इतक्या सशास्त्र रीतीनें व सद्भावानें तासचे तास करीत कीं ती त्यांची कर्मनिष्ठा पाहून कर्मठालाही धन्यता वाटे.

कर्मज्ञान उपासना या तीनही बाबतींत त्यांचें अंतःकरण व आचरण इतकें बिनतोड असून अव्याज मनोहर होतें कीं ही साधुमूर्ति लोकांना मार्ग दाखविण्यासाठींच अवतरली आहे असें भाविकाऱ्याच काय पण सुबुद्ध तार्किकाऱ्याही मनाला वाटे. ते आस्तिकाशीं व नास्तिकाशीं निर्विकारपणें वाद करायला हवे तेव्हां सिद्ध असत, पण कोणी छलबुद्धीनें, परीक्षा पाहण्याच्या हेतूनें कांहीं कपट मनांत धरून आला कीं ते तत्काळ ओळखीत व मग आपल्या हृदयांतली सारी कोमलता आच्छन्न करीत व त्याशीं अशा रीतीनें बोलत कीं त्यांच्या स्वतःविषयीं अनादर व्हावा! पुण्यांतील कित्येक विद्वानांना त्यांनीं अशाच रीतीनें धुडकावून लावलें व हें ते एकदां मजपाशीं स्पष्ट बोललेही होते. गोपाळराव आगरकरांसारखा ऋजुस्वभावी सुधारकवीर व नास्तिक पण हाडाचा सज्जन पुरुष त्यांच्या सहवासांत येता तर त्यांनीं त्याला स्वधर्माचें वेड लावलें असतें असें उभयतांची मला माहिती असल्यामुळें वाटतें. युक्तिवादांत व माहितीच्या बाजूनें त्यांनीं टिळक समोर येते तर त्यांनाही हार खायला लावली असती याविषयीं मला तरी शंका वाटत नाहीं. टिळकही लोकोत्तर बुद्धिमत्तेचे व स्वच्छ अंतःकरणाचे पुरुष आहेत, पण गुलाबरावमहाराजांपाशीं परोक्षाच्या पलीकडचें कांहीं होतें त्यामुळें त्यांची छाप अधिक पडली असती. तें त्यांना पूर्वजन्मीच्या तपोबळानें प्राप्त झालेलें असो, दृढतर उपासनाबळानें सिद्ध झालेलें असो किंवा दुसऱ्या कोणत्याही कारणानें मिळालेलें असो. अव्यंग कर्म, विशुद्धज्ञान, अलोट भक्ति, ह्या तिहींचें एकीकरण सत्पुरुषांवांचून अन्यत्र कोठेंही दिसत नाहीं, तें महाराजांत होतेंच, पण याशिवाय अर्वाचीन चिकित्सक दृष्टीलाही ज्याचा उलगडा होत नाहीं अशा कित्येक गूढ ( mystic ) गोष्टी त्यांजजवळ होत्या. त्यांच्या सहवासानें एक लोकोत्तर विभूति आहे असें कोणाही पूर्वग्रहविमुक्त पुरुषास कबूल करावें लागे.

४. उमरावतीस असतांना मी कात्यायनीव्रताच्या समाप्तीसाठीं महाराजांच्या दर्शनास गेलों तो भेटीचा पहिला प्रसंग. ( पृ. २११–२१२ ) बरोबर १०।१५ माणसें होतीं. प्रत्येकाची नाडी पाहून हे ‘ कोण ’ असें

ते विचारीत व कोणी तरी नांव सांगे. असें होतां होतां मध्येंच कोठें तरी मी आलों, पण माझ्या नाडीवर बोटें ठेवतांच 'हे पांगारकर' असें म्हणून त्यांनीं मला बाहेर काढले! मी यानंतर 'महाराज! आपणांस नाडीत पांगारकर कसा सांपडला?' असें एकदां विचारलें तेव्हां उत्तर कांहींच केलें नाहीं, 'मी चुकलों तर नाहीं' एवढेंच म्हणून हंसले. महाराजांची या प्रथम भेटीपासून मजवर अखेरपर्यंत अत्यंत ममता असे. दुसरे दिवशीं हवनानंतर माझा हात धरून त्यांनीं मला लांब एका हेमाडपंती देवळांत नेले. बरोबर ४०।५० माणसें होती. आंत शिरतांच मला म्हणाले, 'तुम्ही द्याल त्या विषयावर आज तुम्हांला पुराण ऐकवायचें आहे.' मी 'हे विश्वचि माझें घर । ऐसी मती जयाची स्थिर । किंबहुना चराचर । आपण जाहला' ही ज्ञानेश्वरींतील ओवी म्हणालों. त्यावर त्यांनीं तत्काळ स्वरचित हजार ओव्यांत निरूपण केलें! दुसरे दिवशींही दुसऱ्या एका ओवीवर ८०० ओव्यांचें निरूपण केलें. ओवी प्रौढ व प्रासादिक. सर्व अर्वाचीन कवि यांच्या पायांवर घालावे असें मला तत्काळ वाटलें! ज्ञानेश्वर महाराज हे तात, श्रीकृष्ण (वासुदेव नामक) हे पति व आपण गोपी अशी यांची उपासना पाहून कित्येक नवीनांस आश्चर्य वाटलें, तथापि त्यांच्या अत्युत्कट भक्तिप्रेमाचा जिव्हाळा पाहून मी त्यांतच दंग झालों. भोजनप्रसंगाचा आनंदही अनुपम होता. मी श्लोक म्हणावा व त्याचें त्यांनीं तत्काळ व त्याच वृत्तांत रचलेल्या श्लोकानें उत्तर द्यावें असें सारखें चाललें होतें. ती अद्भुत काव्यशक्ति, ती पराकाष्ठेची मधुरवाणी, ती अलोट कृष्णभक्ति, तो नांव घेण्याचा अपूर्व समारंभ—या सर्वांनीं माझें मन मोहून गेलें. देवाच्या दयेनें मला सत्संगति आणिकही घडली आहे, पण गुलाबराव महाराजांच्या संगतींत जो 'अद्भुतं रोमहर्षणं' असा भक्तिप्रेमानंद भोगायला सांपडला तसा मात्र अन्यत्र कोठेंही मिळाला नाहीं. ते नुस्ता 'ज्ञानेश्वर माउली' अशा साध्या नाममंत्राचा पूजापुराणोत्तर जो मंजुळ घोष करीत तो अजून माझ्या कानांत घुमत असतो, इतकें मधुर नामस्मरणही कोठें ऐकायला मिळायचें नाहीं.

गेल्या आठवड्यांत गोभक्त चौंडे महाराज यांच्याशीं माझें भाषण चालले असतां त्यांच्याही तोंडून असेच उद्गार निघाले.

५. महाराजांच्या संगतींत जे प्रकार पाहिले त्यासंबंधानें वेळोवेळीं मी आपल्या 'मुमुक्षू'त लेख लिहिले आहेत व त्यांतील अवतरणेंही ह्या ग्रंथांत उद्धृत केलेलीं वाचकांस आढळतील. सबब त्यांची पुनरुक्ति न करितां कित्येक अनुभवाच्या आठवणी येथें नवीनच देतों. महाराज नंतर उमरावतीस आले तेव्हां त्यांचा समागम ८।१५ दिवस पुन्हां झाला. एके दिवशीं माझे बिऱ्हाडीं महाराज व मी बोलत बसलों असतांना श्री. दादासाहेब खापर्डे यांजकडील बोलावणें आल्यावरून आम्हीं त्यांजकडे गेलों. नित्याप्रमाणें दादासाहेबांच्या भोंवती ५।५० मंडळी बसली होती. 'मेल्यावर जीवाचें काय होतें ? तो कोठें जातो ?' असा त्यांनीं प्रश्न केला. त्यावर महाराजांनीं यावर थिऑसफीचें मत काय आहे व आपल्या धर्माचे सिद्धांत काय आहेत हें सप्रमाण सांगितलें. सर्व भाषण ऐकून खापर्डे आश्चर्यचकित झाले व 'Oh! he is at least an Intellectual phenomena' असें उद्गारले. महाराजांचे मॅडम ब्लॅव्हाट्स्कीबद्दल अनुकूल मत होतें, पण बेझंटबाईविषयीं तसें नव्हतें याविषयीं त्यांचे माझ्याशीं अनेकवार बोलणें झालें आहे. थिऑसफीविषयीं त्यांचा ग्रह अनुकूल नव्हता.

६. इ० स० १९११।१२ सालीं महाराज आळंदीस जाण्याकरितां पुण्यास आले तेव्हां चार दिवस त्यांचा माझे बिऱ्हाडीं मुक्काम होता. बरोबर ४।५ मंडळी होती. एके रात्रीं गोष्टी सांगत आम्ही निजायचे तयारींत होतों तों तेथें एक सर्प आला. महाराज डगमगले नाहींतच; पण त्यांनीं कोणासही त्याला मारूं दिलें नाहीं. दुसरे दिवशीं आम्ही सर्व आळंदीस गेलों. तेथें ज्ञानेश्वरमहाराजांच्या पादुकांना पंचामृतस्नान घालून महाराजांनीं पूजा बांधली. स्नानविधि चालला असतांना माझ्या हातांतील सहले पादुकावर किंचित् खरखरले. तो ध्वनि इतका सूक्ष्म होता कीं त्यांच्याशिवाय कोणाला ऐकू आलाच नाहीं, तथापि तो कानावर पडतांच त्यांच्या अंगावर रोमांच उभे राहिले व 'महाराजांच्या पायाला तुमचे

सल्ले बोचतात म्हणून ते स्नान संपेतों काढून ठेवा ' असें त्यांनीं मला सांगितले. उपास्याविषयीं उपासकाच्या मनाची किती कोमलता असते व असायला पाहिजे हें मला ह्याप्रसंगीं समजून आनंद वाटला. सायंकाळीं तेथील वाचनालयांत ज्ञानेश्वरमहाराजांनीं जिवंत समाधि कां कशी घेतली याचें त्यांनीं योगशास्त्रांतील अनेक वचनें सांगून दीड तास निरूपण केलें, तें बहुधा त्यांच्याशिवाय दुसऱ्या कोणासही समजलें नाहीं ! तिसरे दिवशीं तळेगांवची कांचशाळा पाहून येण्याची महाराजांना इच्छा झाल्यावरून आम्ही तेथें गेलों. तेथील विद्यार्थ्यांनीं महाराजांचा सप्रेम सत्कार केला व ' आम्हांला कांहीं परमार्थ सांगा ' असें म्हणाले. त्यावर महाराजांनीं उत्तर केलें, ' रोज १०८ वेळां ज्ञानेश्वरमाउली एवढ्यान्न नाममंत्राचा जप करायचा असा निश्चय करून त्याप्रमाणें जो वर्षभर वागेल त्याला मी पुढच्या वर्षी सांगेन. उगीच चावटी करण्यांत मतलब काय ?' यानंतर कांच तयार करण्यास अवश्य लागणारा कच्चा मसाला जमीनींत कसा कोठे शोधावा यावर ते वराहमिहिरादि प्राचीन ग्रंथकारांच्या आधारें दीड तास बोलले ! तळेगांवाहून परत येतांना वाटेंत गाडींत ४।५ लावण्याही त्यांनीं मजेनें म्हणून दाखविल्या. चौथे दिवशीं स्नानाला पाणी उपसलें होतें, चार दोन स्वयंसेवक पाणी देण्यांत गुंतले होते, दर्शनास आलेल्या शेंपन्नास लोकांचा भोंवती गराडा पडला होता-अशा वेळीं मी महाराजांस सहज प्रश्न केला कीं ' आपल्या अध्यात्माच्या तोडीचें पाश्चात्य तत्वज्ञानांत काय आहे ? ' यावर त्यांनीं प्लेटो, सॉक्रेटीस, डिसकार्टेस, कँट, हेगेल, स्पेन्सर, मिल्ल इ० अनेक तत्वज्ञान्यांच्या ग्रंथांचें विहंगमदृष्ट्या विवेचन करून म्हटलें कीं " कोणी कोणी लोंबून चांचपडणारे सांपडतात, पण सूर्यप्रकाशासारखें आत्मज्ञान स्वच्छ झालेले महात्मे भरतखंडांतच उपजले आहेत. Plotinus हा कांहींसा जवळ जवळ गेलेला दिसतो " कोणी लघुलिपी लेखक जवळ असता तर कोण बहार झाली असती ? पाश्चात्य तत्वज्ञानावर इतकें उत्कृष्ट व्याख्यान देणारा प्रोफेसर कोणत्याही कॉलेजांत मिळायचा नाहीं असे उद्गार श्रोत्यांच्या तोंडून निघाल्यास नवल काय ? ह्या चारही दिवसांत माझ्या ' मोरोपंतांचें

चरित्र व काव्यविवेचन' ह्या ग्रंथाचीं बहुतेक प्रकरणें महाराजांनीं वाचवून ऐकिलीं व ग्रंथासंबंधानें अत्यंत प्रशंसापर उद्गार काढले. याप्रमाणें हे चार अहोरात्र महाराजांच्या संगतींत ज्ञानानंदांत गेले.

७ पुन्हां इ. स. १९१३ सालीं मुंबईच्या सरदारगृहांत मला महाराजांचा सहवास १८ दिवस झाला (पृ. २६२). ह्या प्रसंगाचें वर्णन मी मुमुक्षूच्या ता. २।१०।१३ च्या अंकांत दिलें असून त्याचें अवतरण ह्या ग्रंथांत पृ. २६५।२६६ मध्यें आलें आहे. त्यांत न आलेल्या १।२ गोष्टी येथें सांगतों. मुंबईस 'रॉयल एशिआटिक सोसायटी'ची 'मुंबईची शाखा' नांवाचें एक सुप्रसिद्ध ग्रंथसंग्रहालय आहे. तें पाहण्याची महाराजांस इच्छा झाली. महाराज, मी व त्यांचे दोन शिष्य असे चौघेजण ही संस्था पाहण्यास गेलों. तेथें आधुनिक कवि मोगरे यांची गांठ घेऊन मी त्यांस महाराजांची संक्षिप्त माहिती सांगितली. पण त्यांस कांहीं विशेष आदर न वाटतां एका कारकुनास संग्रहालय दाखविण्यास सांगून ते आपल्या कामास गेले. संग्रहालय बराच वेळ पाहिल्यावर 'येथें संस्कृत हस्तलिखित ग्रंथ कोठें आहेत ते मला दाखवा' असें महाराज म्हणाले व आम्ही एका विस्तृत खोलींत गेलों. संस्कृत हस्तलिखित ग्रंथांचें नोंदबुक मी आपल्या हातीं घेतलें व क्रमानें एकेक नांव वांचूं लागलों. ग्रंथाचें नांव वाचल्याबरोबर हा ग्रंथ कोणी लिहिला, हा जैनांचा आहे कां बुद्धांचा आहे, न्यायशास्त्राचा आहे कां वैशेषिकांचा आहे हें सर्व माहित असल्याप्रमाणें महाराज बिनचूक सांगूं लागले व ही यादी तयार करणाऱ्यानें कशा चुका केल्या आहेत तें त्यांनीं दाखवून दिलें. याच समयास रा. मोगरे जवळच उभे राहून हें सर्व ऐकत होते तेही महाराजांचें बोलणें ऐकून आश्चर्यचकित झाले व निरोप देतांना 'बुवा अत्यंत विद्वान् दिसतात' असें म्हणाले. मी लगेच उत्तर केलें, 'बोवा शूद्र व बालांध आहेत हें लक्षांत आणा म्हणजे त्यांची विद्वत्ता एका जन्मांतली नाहीं हें आपल्यास उमगेल' तसेंच सरदारगृहांत एके रात्रीं एक गृहस्थ महाराजांचे दर्शनास रात्रीं ११ चे सुमारास आला. तो दारांतून दोन वाक्यें बोलला तोंच महाराज म्हणाले, 'हा इसम दारू पिणारा आहे. याला

हाकून द्या.' तो गेल्यावर मी म्हणालों 'हा दारू पिणारा आहे हें आपणांस इतक्या अंतरावरून कसें कळलें ?' महाराज म्हणाले, 'त्याच्या आवाजावरून'. महाराजांचें अंतरिंद्रिय किती सूक्ष्म होतें हें ध्यानांत येऊन मला आश्चर्य वाटलें. सत्पुरुषाचीं सर्व ज्ञानेंद्रियें अत्यंत सूक्ष्म असतात व म्हणून सामान्यत: स्थूल जीवांना अगम्य अशा अनेक गोष्टी त्यांना सहज गम्य होतात. पुष्कळ चमत्कारांचें बीज याच गोष्टींत आहे.

महाराजांच्या माझ्या खाजगी बैठकींत उपासना, पूर्वजन्म इ० संबंधानें पुष्कळ गोष्टी झाल्या पण त्या उघड सांगणें प्रशस्त वाटत नाहीं.

यानंतर ता. १४।११।१३ रोजीं मी महाराजांस एक पत्र पाठविलें. त्यांत प्रथम पुढील दोन आर्या लिहिलेल्या माझे रोजनिशींत सांपडल्या:—

आर्या

नमितों सद्भावें मी प्रथित श्रीमत् गुलाबरायातें ।
नारायण पदपद्मीं सुप्रेमा दाविला बरा यातें ॥ १ ॥
श्रीराधारमणाच्या विश्वस्तुत चरणकमलिंचा भृंग ।
यद्वैराग्य स्मरवी दशरथजामात विप्र तो शृंग ॥ २ ॥

× × × × ×

८ रा. त्रिपुरवार यांनीं प्रेमाग्रहानें या चार ओळी लिहिण्याची मला संधि दिली याबद्दल त्यांचे आभार मानून पुरें करितों.

पुणें, मुमुक्षु कचेरी.
श्रीकृष्णजन्माष्टमी, शके १८४१ } लक्ष्मण रामचंद्र पांगारकर.

श्रीज्ञानेश्वर माउली समर्थ.

# चरित्रपरिचय.

तस्मात्सर्वप्रयत्नेन मत्प्रियां शरणं व्रजेत् ।
आश्रित्य मत्प्रियां रुद्र मां वशीकर्तुमर्हसि ।।

—पद्मपुराण—पातालखण्ड—

प्रयत्न आणि प्रेम या दोन दिव्य चक्रांच्या रथांत आरूढ होऊन जीवांनीं नराचा नारायण बनावें हें अनादि श्रुतिसंतांच्या उपदेशाचें बीज आहे. " यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः " हें सातशें श्लोकांचें सारभूत तत्व जें श्रीकृष्णांनीं अर्जुनाच्या हातीं दिलें त्याचाही अभिप्राय हाच आहे. अगदीं जंगली स्थितींतल्या अडाणी मनुष्यापासून विद्यादेवीच्या साम्राज्यांत वावरणाऱ्या विद्वानापर्यंत सगळे आपआपले व्यवसाय या दोनच तत्वांवर यशस्वी करूं पहात असतात. प्रापंचिक जनांची, आपला संसार सुखसमाधानानें करण्याची खटपट, समाज सुधारकांची कळकळीची समाजसेवा, थोर पुरुषांचे देशकार्यार्थ निःशेष स्वार्थत्यागाचे उद्योग हे सगळे प्रयत्न आणि प्रेम यांच्या आधारावर चाललेले असतात. पंचमहाभूतांस आपल्या अंकित करूं पाहणाऱ्या अचाट विश्वशोधकांचीही स्थिति ह्याच आधारावर असते. देवादिकांचे स्वर्गभोग, दैत्यांचे पाताळांतील ऐश्वर्य, प्रयत्न आणि प्रेम ह्यांच्याच बलावर संपादलेले आहेत. सारांश, भौतिक किंवा दैवी कोणत्याही प्रकारचा अभ्युदय संपादन केला जातो तो ह्या दोघांच्याच बलावर. आतां तिसरा जो आध्यात्मिक अभ्युदय किंवा निःश्रेयस सिद्धि तिच्याकडे जर या चक्रांची गती वळविली तर कल्पनातीत सुखसर्वस्वाची कशी प्राप्ति होते याविषयीं संपूर्ण उपनिषदादि भाग व योगवासिष्ठासारखे ग्रंथ अत्यंत प्रमाणभूत होऊन बसले आहेत व युगीं युगीं अवतरणाऱ्या संतमंडळाची चरित्रें त्याविषयीं आदर्शभूत आहेत. त्या सर्वांचें सारभूत तत्व पाहिलें असतां सत्संग व प्रणिपात, परिप्रश्न आणि सेवा हे प्रपत्तित्रयपूर्वक सद्गुरुसेवन हेंच सर्व धर्मांचें, सर्व प्रयत्नाचें व

र्व प्रेमाचें आद्यमूळ होय असें दिसून येतें, व आरंभीं दिलेलं पद्मपुरा-णांतील भगवद्वचनही याच तत्वाचें कंठरवानें प्रतिपादन करीत आहे.

नाथ संप्रदायांतील संतमंडळाच्या चरित्रांकडे जरा सूक्ष्म दृष्टीनें अवलो-कन केलें तर, त्यांच्या आचरणांत भक्तिज्ञान वैराग्याचें मूर्तिमंत स्वरूप, त्यांच्या हृदयांत करुणामृताचा अखंड निर्झर, त्यांच्या चित्तांत व्रजगोपिकांचें माधुर्यप्रेम, त्यांच्या वाणींत भाविकांचें प्रतिबंध दूर करून त्यांचें कोटकल्याण करणारी वेदाची मंत्रशक्ति व त्यांच्या उपदेशांत प्रेम आणि प्रयत्न यांची योग्य दिशा दाखवून साधकास हळू हळू बुद्धि-योगाच्या भूमिकेवर चढविणारी शास्त्रीय, पद्धतशीर व सुसंगत शिक्षण-पद्धति, इत्याद्यनेक गोष्टींचा अपूर्व मिलाफ दृष्टीस पडतो.

वऱ्हाडांतील अलौकिक संतविभूति श्रीगुलाबराव महाराज हे नाथपरं-परेंतले असून त्यांचें चरित्र वरील योग्यतेचें असल्यामुळें त्याचा हा पूर्व-खंड आज आम्ही प्रेमळ वाचकवृंदास सादर करीत आहोंत. प्रेम आणि प्रयत्नविषयक शिक्षण महाराजांच्या चरित्रांत किती कळकळीचें व प्रबल स्फूर्तिदायक भरलेलें आहे याची कल्पना पुढें दिलेल्या त्यांच्या हिंदी पद्यां-वरून सहज करतां येतें. तीं पद्यें अशीं:——

सवैया——सद्गुरुकी करुणा मन केवल राखि अयत्नन वृत्ति फले है ।
यत्नहिते जन कर्म करे अरु यत्नहिते मुनि ब्रह्म मिले हैं ।
यत्नहितें बनि आवत साधन यत्नहितें गुरुग्यान खुले है ।
यत्न बिचार सहाय करे अरु यत्नहितें श्रुतिबाग फुले है ।
जो न बनीहि बनावत है हरिकेबिन सत्यवती हरिमाया ।
फेरि प्रयत्नहि एक समर्थ न कारजकारि दुजा कोइ पाया ।
यत्नहिते बर दैवत दे अरु यत्नहिते मुनिशाप न लागे ।
यत्नहिते बलि काल हटे अरु यत्नहिते चितिमें मति जागे ॥
कोउको जीव भया जगमें निज यत्नहिते गिरिजापति शंभू ।
कोउको जीव भया निज यत्नहिते हरि कोउको जीव स्वयंभू ।
यत्नहिते चिरजीवन लब्ध भुशुंड मुनी करि कंचन काया ।
ब्याज करी रघुनंदनकी निजग्रंथ वसिष्ठजु यत्नहि गाया ॥

वस्तुत: श्रीमहाराजांचें चरित्र—त्या दीनवत्सल सद्गुरुमाउलीचें चरित्र—त्यांचीं दिव्य जन्मकर्में, श्रुती शेषासही अतर्क्य होत. अशा चरित्राचें यथार्थ वर्णन लेखकासारख्या मंदबुद्धि पामरास अत्यंत अगम्य असूनही केवळ प्रेमाच्या आवडीसाठीं त्यानें हा एक मूढ प्रयत्न केला आहे. ह्याच दृष्टीनें आपल्या कृतीला त्यानें श्रीज्ञानेश्वरकन्यापदपांसु हें नांव देऊन नऊ भागांत महाराजांचें चरित्र अल्पमतीनें वर्णन केलें आहे. प्रत्येक भागाला ' रज ' ही संज्ञा आहे. प्रथम रजांत ( अवतरण प्रकरणांत ) महाराजांच्या मधुराद्वैतमताचें दिग्दर्शन करून, दुसऱ्या तिसऱ्या व चवथ्या रजांत ( माधान. सिरसगांव व उमरावती या प्रकरणांत ) महाराजांच्या जन्मापासून त्यांच्या एकदर चरित्राचा ऐतिहासिक भाग गोवलेला आहे. हे चार रज मिळून चरित्राचा पूर्वखंड झालेला आहे. पांचव्या रजांत ( सुहृत्प्राप्ति प्रकरणांत ) भाविकांस परमार्थशिक्षण देऊन महाराजांनीं त्यांच्या उन्नतीचा जो प्रयत्न केला त्याचें वर्णन आहे. सहाव्या रजांत ( अलोक प्रकरणांत ) महाराजांच्या अलौकिक शक्तीचें किंवा योगसामर्थ्याचें सोपपत्तिक दिग्दर्शन असून केवळ आपल्या भक्तांचें प्रतिबंध दूर करण्यांतच त्यांनीं आपलें योगसामर्थ्य कसें खर्च केलें याचें वर्णन आहे. सातव्या रजांत ( वाङ्मय प्रकरणांत ) महाराजांच्या वेदतुल्य दिव्यवाणींतून मधुराद्वैत शास्त्राचा उपदेश किती साहाजिकपणें प्रगट झाला ह्याचें दिग्दर्शन आहे. आठव्या रजांत ( स्वभाव विवेचन प्रकरणांत ) " सर्वभूतेषु यः पश्येद्भगवद्भावमात्मनः " या उत्तम भागवत लक्षणाप्रमाणें स्तुति करणारे व निंदा करणारे, भक्त व अभक्त, संप्रदायप्रविष्ट व संप्रदायबाह्य, भाविक व अभाविक ह्या सर्व प्रकारच्या जनांशीं अधिकारानुरूप वागणूक ठेवून आपली समबुद्धि न ढळूं देतां मधुराद्वैत प्रसाराचें कार्य महाराजांनीं कसें केलें तें दाखविलें आहे व अंतिम रजांत (उपसंहार प्रकरणांत) सद्गुरुरूपानें महाराजांचें वात्सल्य व्यक्त करून त्यांच्या चरणीं ह्या अल्प कृतीचें समर्पण केलें आहे. हे पांच रज किंवा प्रकरणें ( ५ ते ९ ) मिळून चरित्राचा उत्तर खंड व्हावयाचा आहे.

ही कृति श्रीमहाराजांच्या करुणासावलींत सुरू होऊन बराच भाग

त्यांस वाचून दाखविला गेला आहे व महाराजांच्या वात्सल्यप्रेमजीवनानें त्या कृतीचें सर्वतोपरी पोषण झालें आहे, होत आहे व होणार आहे. चरित्राची माहिती सांगणारे, लेखनकार्यास मदत करणारे, परोपरीनें लेखन-साहित्य पुरवून व लेखकाचें संगोपन करून त्याला प्रोत्साहन देणारे, मुद्र-णार्थ द्रव्यसहाय देऊन चरित्र प्रकाशनास हातभार लावणारे इत्यादि विविधद्वारांनीं —महाराजांच्या अनंत हस्तांनीं—प्रेमजीवन मिळून प्रस्तु-तचें हें पूर्वखंडरूपी मधुर फल पाडास आलेलें आहे. भाविकजन त्याचें सेवन करूं लागतात तोंच उत्तरखंडही त्यांना लवकरच सादर करण्याचा विचार आहे व त्याचें पहिलें सुहृत्प्राप्ति प्रकरण यापूर्वीच छापून वाच-कांच्या अवलोकनार्थ गेलेंही आहे. बाकीचीं चार प्रकरणेंही लवकरच तयार होतील. चरित्राचा हा उत्तरखंड वाङ्मयप्रधान—विशेष विचार प्रधान—असल्यामुळें प्रगमनशील अशा पारमार्थिक जिज्ञासूजनांस अनेक दृष्टींनीं उपकारक व मनोरंजक आहे. याकरितां प्रेमळ भाविकांनीं पूर्व-खंडास आश्रय देऊन उत्तर खंड लवकर मुद्रित करण्यास उत्तेजन द्यावें एवढीच प्रार्थना आहे.

चरित्र लिहिण्यास आरंभ केल्यापासून तें छापून प्रसिद्ध होत पावेतों संप्रदायबंधूंचें व प्रेमळ धार्मिक सज्जनांचें सर्वप्रकारें सहाय झालेलें आहे. गुरुस्थानीं पूज्य असलेले श्रीबाबाजी महाराज, हरिभाऊ कवले, दत्तोपंत खापरे, व्यंकटराव देशपांडे, नानाजी कविमंडन, रा० रा० लक्ष्मणराव सराफ ( परलोकवासी ), रा०रा० तात्याजी कविमंडन यांनीं वेळोवेळीं साह्य केलें, रा० रा० वासुदेवराव मुळे यांनीं कार्याचें महत्त्व ओळखून लेखनसामुग्रीसहित साहित्य पुरविलें व लेखकाची सर्वतोपरी व्यवस्था ठेविली, वेद० शा० सं० श्रीनिवासशास्त्री हरिदास यांनीं अनेक प्रकारें मनःपूर्वक उत्तेजन दिलें, रा० रा० विठ्ठलराव कक्रे, निळकं-ठराव काठीकर, रामचंद्र गंगाधर भागवत यांनीं स्वानुभव प्रेमपूर्वक लिहून पाठविले, रा० रा० केशवराव बापूजी देशमुख यांनीं आपला अमोल वेळ खर्च करून स्वतः विषयींची आद्योपान्त हकीकत लिहून पाठविली, मुद्रण कार्यारंभीं चांद्याचे श्रीगणेशभक्तिपरायण दाजीसाहेब देवईकार वकील

यांनीं सर्वांच्या अगोदर लेखकाचें अभिनंदन करून व सक्रिय सहानुभू दाखवून निर्विघ्नतासूचक मंगल शकुन दिला, हरदा येथील प्रसिद्ध जमी दार रा० रा० रघुनाथराव वामन केकरे ज्यांचें घर श्रीमहाराजां संचारक्रमांत पुनीत झालें, व महाराजांच्या प्रतिवार्षिक उत्सवप्रसंगांत त्यांच्या भजनकीर्तनादि गजरांत जेथें सदोदित आनंदी आनंद भ राहिला—त्यांनीं चरित्र प्रकाशनार्थ ३०० तीनशें रुपयांची देणगी दे सहायक मंडळांत अग्रस्थान मिळविलें, त्यांचेच चिरंजीव रा० नाराय राव केकरे यांनीं वर्षप्रतिपदेच्या शुभ मुहूर्तावर मुद्रणकार्यास आरंभ क वून सर्व प्रकारानें चरित्रप्रकाशकाचें उत्तम कर्तव्य बजाविलें, त्यांचे ज्ये बंधु रा० गणपतराव केकरे व सहाध्यायी रा० दिनुभाऊ गोखले यांनीं तत्परतेनें हातभार लावून चरित्रविषयक प्रेम व्यक्त केला, पुढें पु मुक्कामीं मुद्रणकार्य चालू असतांना हरिभक्तिपरायण लक्ष्मणराव पांगा कर मुमुक्षुकर्ते यांनीं चरित्राची हस्तलिखित प्रत वाचण्याची तसदी घेऊ पुष्कळ उपयुक्त सूचना केल्या व चरित्राला प्रस्तावना लिहून महाराजांविषय आपलें निस्सीम प्रेम व्यक्त केलें, रा० रा० गणेश गोपाळ रांगणकर यांनं स्वतःची अडचणीची परिस्थिति असतांही लेखकाला स्वकुटुंबीय समज उत्तम बरदास्त राखली व रा० ज्ञानेश्वर उद्धव मांढरे यांनीं उत्कट भक्ति भावानें शरीर झिजवून चरित्राची उत्कृष्ट सेवा केली; या सर्वांच्या उप कृतिपरंपरेंत लेखक प्रेमबद्ध आहे. तसेंच ज्या प्रेमी मंडळींनीं सक्रि सहाय करून चरित्रमुद्रणकार्य यशस्वी केलें, त्यांचेही अनंत उपकार आहेत व त्यांचा नामनिर्देश दुसरीकडे वेगळा केला आहे. आणखी चरित्राची माहिती गोळा करण्याच्या प्रसंगांत पुष्कळ प्रेमळ मंडळींचें अंतःकरणपूर्वक सहाय झालेलें आहे. या सर्वांचाच लेखक समान ऋणी असून अशीच महाराजांची निरंतर सेवा घडविण्याबद्दल सर्वांचें कृपादान मागत आहे व स्थलाच्या व कालाच्या अडचणीमुळें ज्यांचीं नांवें प्रसिद्ध करतां आलीं नाहींत त्यांची क्षमा मागत आहे.

या सर्व मंडळींनीं आपल्या प्रेमाचा व प्रयत्नाचा प्रवाह श्रीमहाराजांच्या चरित्रभक्तीकडे वळवून त्याला जें आज दृश्य स्वरूप दिलें आहे ही

परमात्म्याची उत्तम सेवा होय व परमात्मप्राप्तीचा हा निष्कंटक राजमार्ग होय. याविषयीं आरंभींचें पद्मपुराणांतील वचन व " ये तु धर्म्यामृतमिदं यथोक्तं पर्युपासते । श्रद्धधाना मत्परमा भक्तास्तेऽतीव मे प्रियाः ॥" हें श्रीमद्भगवद्गीतेचें वचन प्रमाण आहे.

याच दिशेनें आपणा सर्वांनीं मिळून प्रयत्न चालू ठेवला व आपल्या स्वभावांत सद्गुणांची भर टाकीत राहिलों तर शुद्ध प्रेमाचा मार्ग आपल्यास अधिकाधिक स्पष्ट दिसत जाऊन जसजसा आपल्या प्रेमाचा व प्रयत्नाचा वेग वाढत जाईल तसतसें आत्मसार्थकतेच्या सोपानांवर चढून सद्गुरुकृपाबलानें परमात्मरूपी प्रेमाचें शिखर आपणांस सहज गांठतां येईल.

अशा योग्य प्रयत्नाचें अवलंबन करून प्रेमळ सज्जनवृंदांनीं महाराजांच्या चरित्रपठणश्रवणानें कृतार्थ व्हावें व त्यांतील सद्बोधामृताचें यथेच्छ सेवन करून आपल्या इष्टमित्रांसह तुमीचा लाभ घ्यावा अशी प्रार्थना करून हा अल्प परिचय पुष्पपंकोलिकान्यायानें श्रीमहाराजमाउलींच्या चरणीं समर्पण करतो.

मु० पुणें, गणेशवसतिगृह,
मिती--गुरुपूर्णिमा. शके १८४१.

महाराजांचा अज्ञ बालक,
लेखक-- मिलिंद.

---

श्रीज्ञानेश्वर माउली समर्थ.

# पूर्वखंडाची अनुक्रमणिका.



---

## मुख्य मुख्य गोष्टींचें टिपण.

## विशेष प्रासंगिक गोष्टी.

## पत्र—व्यवहार.

---

श्रीज्ञानेश्वर माउली.

# वाचकांस विनंती.

प्रस्तुत पुस्तक छापण्याच्या वेळीं ज्या कांहीं किरकोळ चुका झालेल्या आहेत त्या पुस्तक वाचतांना सहज लक्ष्यांत येऊन अर्थानुसंधान सुटत नाहीं म्हणून त्यांची यादी देण्याची आवश्यकता व उपयोग वाटत नाहीं. महत्त्वाच्या व ठळक चुका मात्र पुढें दिल्या आहेत तेवढ्या अवश्य सुधरून घेण्याची वाचकांस विनंती आहे:—

पृष्ठ ३१ तिसरी ओळ. इ. स. ११८९ पडलें आहे, तेथें इ. स १८९१ असें वाचावें.

,, १६५ शेवटली ओळ. " वरच्या लौकिक रस्त्यानें " असें वाचावें.

,, २०६ आठवी ओळ. "श्रीसद्गुरु ज्ञानेश्वर माउली. " येथून खालचा सर्व मजकूर टीपेंतला समजावा.

पृ० ४५२ ओळ १३ 'पमर' च्या ठिकाणीं 'परम' वाचावें.

,, ,, ,, १८ 'समापाधी' ,, ,, 'समोपाधी' ,,.

श्री ज्ञानेश्वरमाउली समर्थ.

# श्रीज्ञानेश्वरकन्यापदपांसु.

अथवा

## वऱ्हाडांतील सुप्रसिद्ध सत्पुरुष
## श्रीगुलाबरावमहाराज

यांचे चरित्र.

## अवतरण प्रकरण रज. पहिला.

मंगलाचरण—श्लोक.

श्रीमज्ज्ञानेश्वरार्यायाचार्यवर्याय विष्णवे ।
वंदेऽलंदीविहाराय सच्चिदानंदरूपिणे ॥ १ ॥
अखंडानंदकंदाय मधुराद्वैत रूपिणे ।
अर्धनारी नटेशाय आदिनाथाय ते नमः ॥ २ ॥
प्रेमांबुज मिलिंदाय गोपीवृंदविहारिणे ।
रासहासविलासाय मुकुंदाय वयं नुमः ॥ ३ ॥
श्रीमज्ज्ञानेश्वराचार्य कन्यका चारुभाषिणी ।
गोपालश्यामचिन्मूर्तिप्रेमपर्यंक शायिनी ॥ ४ ॥
मधुराद्वैतपीयूषसंप्रदानयशस्विनी ।
शरण्या सर्व भूतानां जननी मे प्रसीदतु ॥ ५ ॥





हे विलासानुगामिन् वृंदावनविहारिन् गोपीरमण गोपालकृष्ण भगवन्! ज्या सुखाकरितां भगवान् आदिनाथ शंकर आपलें रम्य कैलासभुवन सोडून सदा गोपीरूप धारण करून व्रजांत राहूं लागले, ज्या सुखाकरितां व्यासपुत्र शुकाचार्य तपोवनाचा त्याग करून गोपी रूपानें आपली परिचर्या करीत होते, ज्या सुखाकरितां महान् महान् तपोधन ऋषि आपली तपःसामग्री वेंचून गोपी झाले, ज्या सुखाकरितां साक्षात् ब्रह्मविद्या तीव्र तपश्चर्या करून गोपीमंडळांत आली, ज्या सुखाच्या लालसेनें प्रत्यक्ष श्रुति गोपी झाल्या, ऋचा गोपकन्या झाल्या व देवकन्या स्वर्गसुखाला तुच्छ करून गोकुळांत आल्या, ज्या सुखाकरितां मुनि आपले एकांतवास सोडून गोपाळ झाले, प्रत्यक्ष कल्पवृक्ष जेथें कदंबरूपानें राहूं लागला, सिद्धसाध्यगंधर्व कोकिळ होऊन ज्या सुखाचा अनुभव घेऊं लागले, ब्रह्मादिक देव व इंद्रादिक सुरगण हतगर्व होऊन ज्या सुखाकरितां अजूनाहि लाळ घोटीत आहेत, अर्जुनासारख्या तुझ्या सख्यांनाहि जें सुख मिळविण्याकरितां कठीण तप करून गोपी व्हावें लागलें, जेथलें

सुख केवळ हरिहरभक्त्यैकगम्य आहे, तें तुझें विस्तीर्ण मथुरामंडळ, ती पुण्यपावन व्रजभूमि, तेथलें तें कुसुम नामक सरोवर, त्यावरील सर्वकाल पुष्पित वनराजी व त्या पुष्पांचा सर्व दिग्व्यापि सौरभ, तेथली ती अशोकलता व मध्यरात्रीं तिच्या मुळाशीं होत असलेला मधूत्सव, तें पूर्णामृतनिधीमधील ज्योतिर्मयद्वीप, त्यावरील वृंदावन नामक वन व द्रुमवल्लींचें आवरण, सभोंवतीं असलेला कालिंदीचा वेढा, ती मनोहरस्मितशोभा, मत्तमयूरांचें व कोकिलांचें नृत्यगायन, भृंगांचा गुंजारव, मध्यभागीं विलसणारा तो महान् पारिजातक वृक्ष व त्याच्या शाखोपशाखांचा शतयोजन विस्तार, त्याच्या खालचें तें धेनुमंडल, त्याच्या आंतील वेणुशृंगधारी गोपबालांचें मंडल, त्याच्या आंतील शुभ्रवस्त्र धारण करणाऱ्या, नाना प्रकारचीं उपायनें घेऊन हस्तपुटें जोडलेल्या व प्रेमविव्हल अंतःकरणांनीं प्रेमळ वचनें बोलणाऱ्या व्रजवनितांचें व श्रुतिकन्यांचें रुचिर मंडल, त्याच्या आंतील दिव्यप्रभाकिरणमालिनी रत्नवेदी, तिजवर विराजमान झालेली महामाधुर्यवर्षिणी दिव्यांगी चतुर्दशाद्बवयसा राधिका, तिच्या मनोहर मुखचंद्राकडे आपले विकसित नेत्रकमल लावून मुरलीसहित हात तिच्या गळ्यांत घालून व हनुवटीला स्पर्श करून मस्तकावर मयूरपिच्छांचा सुंदर मुकुट, कानांत मकराकार कुंडलें, कुरळ केश व कस्तुरीतिलकयुक्त भाल, कंठांत मुक्तमालादि रुचिर रत्नभूषणें, गळ्यांत आपादलंबिनी नवकोमल तुलसीमाला, कंकणांगणादि बाहुभूषणें, कटिला दिव्य तडित्प्रभ पीतांबर, पायांत नूपुरादि झणत्कारयुक्त अलंकार, अशा अपूर्व छबियुक्त विचित्र नटवेशानें महामोलाचें दुकूल पांघरून तिच्या (राधिकेच्या) मांडीवर शयन केलेली आपली ती हरिचंदनचर्चित सांवळी सुकुमार किशोर मूर्ति, तेथल्या गोपगोपिकादिवृंदांच्या त्या माधुर्यप्रेमानें उचंबळणाऱ्या चित्तवृत्ति व तेथला तो नित्य नूतन रासमहोत्सव यांचा सर्वदा विजय असो.

हे भगवन्, तुझें माधुर्यप्रेमधन ज्याच्या अंतःकरणपेटिकेंत विपुल असेल त्यालाच तुझा रासमहोत्सव नित्य पहावयास मिळतो. हरिहरांचाहि विसावा, सर्व सुखाचें स्थान, हृद्यपरमानंदाची खाण, अनेक दुर्गम

संकटांत अढळ धैर्यबल देणारी संजीवनी, कैवल्यसुखाचा कळस व जीवन्मुक्तीचें सौभाग्य अशी ही तुझी माधुर्यभक्ति होय. माधुर्यदीक्षा घेऊन तुझें चरणदास्य करण्याइतकें भाग्य ज्यांना लाभतें, रासोत्सव-प्रसंगीं एकवेळ तुझा अंगसंग मिळून ज्यांचा कामानिवृत्त होतो व तुझ्या चुंबनालिंगनानें व अद्वितीय मदनमनोहर स्वरूपामृताच्या पानानें तुंद होऊन तुझ्या स्मित हास्यांत जे एकतान होऊन जातात त्यांची स्थिति हे भगवन् काय वर्णन करावी? त्यांचे समस्त मानसव्यापार शिथिल होतात, लोकव्यवहाराला तिलांजुलि मिळते, आश्रमधर्म प्रेम-सागरांत बुडून जातात, " संध्यावंदन भद्रमस्तु भवते भो स्नान तुभ्यंनमो। भो देवाः पितरश्च तर्पणविधौ नाहं क्षमः क्षम्यताम् ॥ यत्र क्वापि निषद्य यादवकुलोत्तंसस्य कंसद्विषः । स्मारंस्मारमघं हरामि तदलं मन्ये किमन्येन मे " ॥ अशा स्वैर व लोकबाह्य भगवत्कथालापाच्या भरांत त्यांच्या नियमबद्ध पूजाध्यानजपाला बहुतेक फांटा मिळतो. पाप व पुण्य हीं दोन्ही त्यांच्या खिसगणतींत नसून एक तुझा प्रेम त्यांना पाहिजे असतो. हे भगवन् तूंच एक प्रियकर त्यांना उरल्यामुळें तुझें व त्यांचें अत्यंत ऐक्य असतांहि आपणच देव आहोंत असा ज्ञानाभिमान त्यांना शिवत नसून आपला प्रियकर फार दिवस आपल्याला अंतरला आहे किंवा तो आपणांपासून फार दूर असून त्याची विरहव्यथा आतां आपल्याला सहन होत नाहीं. अशा व्याकुल चित्तानें तुझ्या उज्वल यशोगायनांत आवडी गुंगून अंतःकरण प्रेमभरित होऊन उच्च स्वरानें कधीं हांसत, कधीं स्फुंदत, कधीं मनाशींच गुणगुणत, कधीं गात, कधीं उन्मत्तवत् नाचत तुझ्या लीलांचें गायन करीत ते पृथ्वीवर संचार करूं लागतात व आपल्या पदधूलीनें भुवनत्रयाचा उद्धार करितात. हे भगवन्, ज्या तुमच्या माधुर्यप्रेमांत सात्विक कर्मांसहि रीघ मिळत नाहीं, तेथें राजसतामस विधिविधानांची कथाच काय? हे माधुर्यकलानिधे, जीवांची चित्तवृत्ति जोंपर्यंत तुमच्या प्रेमांत रंगत नाहीं, तोंपर्यंतच कामादिक चोरांची धाड, घराचा बंदिवास व मोहाची जड बेडी, यांची भीति असते. हा स्त्रीपुत्रादि पसारा, कृतत्रेतादि कालविभाग, सुखदुःखादि द्वंद्वें व शुभा-

शुभादि भेद हे वस्तुतः मुळींच नसून ते विपरीत भावनेच्या तीव्रतेमुळें भासतात. पण हे भगवन्, तुम्ही भक्तकामकल्पद्रुम असल्यामुळें ज्याच्या त्याच्या इच्छेसारखें होतां. हे भगवन्, तुमचे चरणकमल संपूर्ण जीवांना सारखेंच निवासस्थान असून कोणी भाग्यवान् तेथील भक्तिपराग सेवन करितात तर कोणी मूढ पुरुष त्यालाच आपल्या दृष्टिदोषानें स्वर्ग-संसारनरकरूप चिखल बनवून यातना भोगतात. जीवन्मुक्ति व संसार हे भेद वस्तुतः नसून तुमच्या अखण्डैकरसस्वरूपाचे ठिकाणीं अन्यथा भावना म्हणजेच संसृति होय.

हे भगवन् जोंपर्यंत तुमचा अनुग्रह होत नाहीं तोंपर्यंत ही विपरीत भावना नाश पावून नित्यानंद मिळणें शक्य नाहीं. तुमच्या भक्ति-वांचून ज्ञानियालाही जर मोह पडतो तर मग इतर जीवांची कथाच काय ? त्यांच्याच भावनेप्रमाणें तुम्हीं त्यांना संसाररूप भासून नित्य-नूतन भ्रांति उत्पन्न करिता. त्यामुळें अत्यंत प्रेमास्पद वस्तूंची आपण परमसीमा आहांत व देहसुखाची सगळी खटपट, पति-पत्निबंधु आदिकरून नात्यांच्या भावना, आदरातिथ्यांचे मायिक व्यवहार व मुलाबाळांचे लाडसंगोपनादि प्रकार ह्या सगळ्या मनस्तरंगांच्या उड्या सर्वांतर्यामित्वामुळें आपल्या प्रीत्यर्थच खर्ची पडतात हें त्यांना उमजत नाहीं. म्हणून अशा भक्तिविमुखांना श्रुति स्पष्ट चोर म्हणते. ह्या प्रेतवत् जड शरीरालाच आत्मा मानणें, पुत्रकलत्रादि पसाऱ्यासच स्वकीय मानणें, जलाशयांसच तीर्थ मानणें व पाषाणादि प्रतिमा म्हणजेच ईश्वर मानणें म्हणजे श्वानसूकरांच्या पंक्तिसच बसणें होय.

हे भगवन् भक्तिहीन पुरुष कितीही वर्षें जगले तरी त्यांचें जगणें झाडांसारखें व्यर्थ, श्वासोच्छ्वास भात्यांसारखे मोघ व त्यांचे खानपानादि व्यवहार ग्रामपशूंसारखे निरूपयोगी होत. खराखुरा मनुष्यपणा हे भगवन् तुझ्या भक्तीतच आहे. तुझ्या गुणकथा वर्णनावांचून जो क्षण गेला तो अनेक कल्पांच्या दुःखपरंपरेस कारण झाला व केलेली वटवट सगळी बेडकांच्या शब्दांप्रमाणें

व्यर्थ गेली. तशींच आपआपल्या स्वभावानुरूप विषयांचें तुला अर्पण करून तुझी सेवा न करणारीं कानादिक इंद्रियेंही केवळ घातुक श्वापदांसारखींच होत. तुझ्या शीतल चरणोदकाचे बिंदु ज्यांतून गळत आहेत अशा कोमल तुलसीचा गंध घेऊन तुझ्या व तुझ्या भक्तांच्या कथा ऐकून ज्यांच्या चित्तांत अष्ट सात्विकभाव दाटत नाहींत ते कोणीही असोत जीवंत प्रेतच होत व त्यांचें हृदय पाषाणाचें आहे असें समजावें. वेदपठणादि धर्म, यज्ञयागादि क्रिया, स्नानदानादि कर्में, तीर्थाटणादि तपें, व्रतोपवासादि नियम, शास्त्रादिकांचें पठन ह्या सगळ्या गोष्टी एका तुझ्या प्रेमावांचून चोरवाटा होत. तुझ्या श्यामसुंदर नवमेघरंग चरणाची आवडी असणें हाच एक प्रसिद्ध राजमार्ग होय. तुझ्या भक्तिवांचून वैकुंठ स्वर्गादि स्थानें केवळ नरकभोग होत व प्रत्यक्ष नरकलोकांतही तुझी भक्ति जर अंतःकरणांत आहे तर तो वैकुंठादिकांहूनहि श्रेष्ठतम होय. हे श्रीहरे ! तुझ्या भक्तीचा जिव्हाळा थोडा जरी मनांत असला तरी तो दैवी संपत्तीचा सोपानच होय. परंतु भक्तिवांचून इतर कर्मोपासनाज्ञानादि केवळ आसुरीसंपत्तीचे विवरमार्ग असून अधम गतीला पोंचविणारेच होत. हा भक्तीचा जिव्हाळा जेथें नाहीं तो संशयपिशाचिकेनें पछाडला म्हणून समजावें. हे भगवन् ! केवढाही पुण्यकर्मा म्हणून लोकांत गाजो पण तुझी भक्ति नाहीं तर तो पापकर्माच होय. पण अत्यंत दुराचारी असूनही एकदां का त्याच्या मनवाणिला तुझ्या रूपागुणांचा चाळा लागेल व तुझ्या चरणीं तो सानन्यदीन होईल तर मोक्ष तत्काळ त्याच्या अंकित झालाच म्हणून समजावें. तात्पर्य, तुझी भक्ति हाच परम पुरुषार्थ असून हाच जीवांचा सनातन धर्म होय. ऊंच नीच, उत्तम अधम, चांगला वाईट, पंडित मूर्ख इत्यादि भेदाभेद व यातायातीधर्म यांची अवगणना करून केवळ शुद्ध भावनेच्या बलावर रस्त्यांतलि तुटक्या वाहणेला उत्तम मोरचेल, पाण्याच्या चुळीला गंगांबु, उच्छिष्ट मांसकवलाला साजुक उपहार, इत्याद्यनेक ग्राम्य उपचारांचें दिव्य पूजासाहित्य बनवून एका वन्य द्विपाद पशूला आपल्या पदांची प्राप्ति

करून देऊन त्याला घटकेंत भक्तशिरोमणी करून सोडणाऱ्या भक्तिजननीला शतशःप्रणाम असोत.

भगवन् ! ही तुझी परमप्रेमस्वरूपिणी भक्ति कोणत्याही परिस्थितींत सुलभ आहे. पण आवडी मात्र खरीखुरी पाहिजे. भक्तियोगाहून अधिक सुलभ योग जगांत नाहीं. आपल्या भक्तीचे अनेक सुंदर व सरळ मार्ग हे भगवन् आपण आपल्या उपनिषदाख्य नगरींत तयार करून ठेविले आहेत. व युगीं युगीं अवतार घेऊन भक्तीचा प्रादुर्भाव करण्याकारितां तेच मार्ग आपण प्रगट करीत असता. श्रीकृष्णावतारीं अर्जुनाच्या निमित्तानें तेच मार्ग आपण लोकहितार्थ गीतारूपानें प्रगट केले. ह्या श्रीमद्भगवत्गीतेचे अर्थ कोणी कर्मसांख्य योगादि मतवादी आपापल्या मतानुसार ओढून घेवोत पण निर्मल चित्तानें विचार करणारास गीताशास्त्र हें भक्तिप्रधानच आहे असें दिसून येईल. ह्याविषयीं अल्प स्पष्टीकरण बालभाषितन्यायानें हे भगवन् आपणच शिकविलें तसें आपल्या पुढें करून दाखविण्याचें मी धैर्य करितोंः—

गीतेच्या बाराव्या अध्यायाच्या दुसऱ्या श्लोकांत हे तात, आपण भक्तीला मुख्यत्व सांगून भक्तिविषयीं प्रवृत्ति सांगितली आहे. म्हणून गीतेचा मुख्य विषय भक्तीच ठरतो. तो कल्प्य आहे किंवा सत्य आहे असा संशय दूर करण्याकारितां त्याच अध्यायाच्या पांचव्या श्लोकांत निर्गुणोपासकांनां आपण दुःख निरूपण केलें आहे म्हणून गीतेंत भक्ति हा विषय कल्प्य नसून सत्य आहे असें सिद्ध होतें. मग कर्मज्ञानादिक कशाला निरूपण केलेत ? या प्रश्नाचें उत्तर देण्याकारितां ' यत्करोषि यदश्नासि ' इत्यादि कर्मार्पणपर श्लोक ' चतुर्विधा भजंते माम्.........ज्ञानीच भरतर्षभ ' इत्यादि ज्ञानार्पणपर श्लोक सगळे सहायक म्हणून गणल्या जातात असें आपण दर्शविलें. कारण भक्ति नसली तर यांचें महत्व नाहीं असें अव्यक्तोपासकांनां गौणत्व दाखविल्यामुळें पवनरजन्यायानें सिद्ध होतें. भक्ति नसली तर कोणताच साधक उपयोगी नाहीं असें ' त्रैविद्या माम् ' इत्यादि श्लोकांत आपण निरूपण केलें आहे. आणि ' स्वधर्मे निधनं श्रेयः '

इत्यादि श्लोकांत कर्माला वर्णाश्रम पाहिजेत ' तांस्तितिक्षस्व भारत ' इत्यादि श्लोकांत सांख्याला वैराग्य पाहिजे ' शुचौ देशे प्रतिष्ठाप्य ' इत्यादि श्लोकांत योगाला देशत्याग पाहिजे ' तद्विद्धि प्रणिपातेन 'इत्यादि श्लोकांत ज्ञानाला शास्त्राभ्यास पाहिजे; पण ' मां हि पार्थ व्यपाश्रित्य' इत्यादि श्लोकांमध्यें भक्तींत कांहींही नसलें तरी चालण्यासारखें आहे असें आपण प्रतिपादन केलें आहे. म्हणून गीतेचा मुख्य विषय भक्तिच ठरतो. ' ते प्राप्नुवंति मामेव ' इत्यादि पदांनीं अर्जुनाला अन्यथा निषिद्ध मार्गात जाण्याची आवश्यकता नाहीं असें सांगून ' ते ऽपि यांति परां गतिम् ' ' योगक्षेमं वहाम्यहम् ' भवामि न चिरात्पार्थ ' ' ददामि बुद्धियोगं तं ' न मे भक्तः प्रणश्यति ' इत्याद्यनेक पदांनीं आपण आश्वासन दिलें आहे. तसेंच ' अनन्याश्चिंतयंतो माम् ' ' भक्त्या मामभिजानाति ' मामुपेत्य पुनर्जन्म न विद्यते '' श्रद्धावांल्लभते ज्ञानं '' योगिनामपि सर्वेषांमद्गतेनांतरात्मना ' ' अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः '' अथैतदप्यशक्तोऽसि कर्तुं मद्योगमाश्रितः '' मांऽच योऽव्यभिचारेण भक्तियोगेन सेवते.........ब्रह्मभूयाय कल्पते ' 'तस्याहं सुलभः पार्थ ' इत्यादि पदांनीं व श्लोकांनीं उक्त सप्त विषय साध्य असोत वा नसोत भक्तीनेंच सर्व कार्य होतें असें आपण दर्शविलें. इत्याद्यनेक कारणावरून हे भगवन्, श्रीमद्भगवद्गीता ही आपण भक्तिमार्गाचा उत्कर्ष करण्याकरितां भक्तिप्रधानच निर्माण केली यांत संशय नाहीं.

पुन्हा कलीचा उत्कर्ष होऊन भक्तितत्वाचा लोप झाला असतां मंदबुद्धीच्या मुमुक्षूंना गीतारहस्य विशद करून सांगण्याकरितां हे भगवन् आपण श्रीज्ञानेश्वरतातरूपानें प्रगट होऊन श्रीक्षेत्र आळंदी येथें पुण्य-पावन इंद्रायणीचे तीरीं मधुराद्वैतदर्शनाचें मुख्य पीठ स्थापन केलें व भावार्थदीपिका नामक गीतेची टीका लिहून तींत ठिकठिकाणीं माधुर्य प्रेमांत चित्तवृत्ति तल्लीन करून टाकणारा वत्सलसंमित मधुर वाक्सुधा-प्रवाह सोडून गीताशास्त्राच्या साहायावांचून इतर शास्त्रें अविद्या-नाशाला स्वतंत्रपणें समर्थ नाहींत असें सिद्ध करून आपल्या रसाळ मराठ्या बोलानें अमृतालाही पैजेनें जिंकण्याची प्रतिज्ञा खरी करून दाखविली.

## श्री ज्ञानेश्वरमहाराज.



यद्वस्तुतस्साच्चिदकापकारि भक्त्यर्थमेवावयववि भूतम् ।
ज्ञानेश्वराचार्यपदं हृदब्जे विभ्राजते तन्मुनयोविशांति ॥ १ ॥

पुन्हा इंद्रियांचे कोड पुरवून त्यांच्या तृप्तींतच स्वतः
मानण्याची प्रवृत्ति विपरीत प्रयत्नाच्या अनिवार गतीनें लो
सनातन भक्तितत्वाचा विसर पडूं लागला, नाना मतांतेंर उ
कुत्तरश्रद्धेचें प्राबल्य होऊन असत्तर्कांच्या बलावर लोक
सुशिक्षित म्हणवूं लागले व परधर्म सुखावह मानूं लागले,
युक्तीनें धर्मतत्वांची मीमांसा इष्ट वाटूं लागली तर कोणी
ज्ञानेश्वरी जननी विषयींच नाना वाद घालूं लागले. अशा वेळ
दृष्टिवांचून नुसती चर्मदृष्टि मयूरपिच्छनयनांप्रमाणें व्यर्थ
कर्माचे डोळे जें ज्ञान तें चोख पाहिजे हा सिद्धांत आपल्या
जगास पटवून देण्याकरितांच की काय अंधत्व पतकरून
सिद्धप्रज्ञ अस्खलित छंदोमय व प्रासादिक वाणींतून ज्ञानदेवींच्य
गत अर्थाचें विवेचन, वेदांत आणि भक्तीचा समन्वय
आणि अर्वाचीन शास्त्रांचें होईल तेवढें ऐक्य करून मधुराद्वै
उत्कर्ष व लोकांना सुसंस्कारांचें दान करण्याकरितां
नरनारीशरीरानें आपण हा श्रीज्ञानेश्वर कन्याअवतार
केला आहे.

ह्या अवतारांत आपण ' मधुराद्वैतदर्शन ' स्वतंत्र नि
असल्यामुळें त्याचें आचार्यत्व आपल्या कडेसच येत
शांकर वेदान्तांत भक्तीचा समन्वय करून ' अनध्यस्तविव
संज्ञा नवीन केल्यामुळें या दर्शनाला पृथकत्व आलें आहे. या
मंतव्यें काय आहेत व नवीन मताचा आचार्य होणाराला
नसलेल्या कोणकोणत्या गोष्टी स्वमतपुष्ट्यर्थ आवश्यक आहेत
माहिती हे भगवन् वाङ्मय प्रकरणांत आपल्या चरणीं अर्पण क
यत्न करीन.

आपल्या मन्तव्याप्रमाणें स्वतः आचरण करून दाखाविणें हें अ
आद्य कर्तव्य ठरत असल्यामुळें डोक्यावर काळ्या कुळकुळी
कलापाची वेणी, कपाळास कुंकुमाचा भव्य सौभाग्यतिलक,
मंगळसूत्र, स्कंधावर शुभ्र यज्ञोपवीत, आंगास विभूति, कमरे

श्रीगुलाबराव महाराज.



तुका म्हणे अर्धनारी । ऐसीं धरी रूपडीं हा ॥

धौत वस्त्र, हातांत सुवर्णकंकणें व पायांत जोडवीं अशा विचित्र नरनारी वेशानें आपण भगवान् दक्षिणामूर्तीच्या ध्यानाप्रमाणें आम्हांमध्यें संचार करीत असून श्रीकृष्णजन्माष्टमी व कात्यायनीव्रतोत्सवादिप्रसंगीं माधुर्य दीक्षेनुसार संपूर्ण स्त्रीवेश धारण करीत, हरिहरोपासनेचें आपल्या संप्रदायांत समानत्व दर्शविण्याकरितां माघ कृष्ण चतुर्दश्यादि शिवाविष्णु व्रतांत त्या त्या दीक्षेनुसार वस्त्रें भूषणें धारण करीत, अगाध योगबल, श्रुतिसंमत गुरुत्व, शिशुजनान्यायसहनक्षमत्व, अचल शांति आदिकरून गुणांनीं मुमुक्षूंस लुब्ध करीत, परोपरीच्या बालचेष्टांनीं स्त्रीजनांत वात्सल्य उत्पन्न करीत व कधीं कधीं मुद्दाम लोकविरुद्ध आचरणाचा आविर्भाव दाखवून भाविकांस कौतुक व अभाविकांस व्यामोह उत्पन्न करीत हरिहरभजनानें कळिकाळास जिंकण्याचा निर्मत्सर संतांचा विगतकैतव मार्ग दाखवित आहांत.

हे मनोहारिन् ह्या संपूर्ण जगांत तूंच एक पुरुष असून इतर जगत स्त्रीरूप आहे असें प्रतिपादन करणारी श्रुती, भगवान् वेदव्यासकृत बाराहसंहिता, पद्मपुराणांतर्गत वृंदावनमहात्म्य, कलियुगांतील नरसीमेहते चरणदासादि संतांनीं गाइलेली व्रजलीला इत्यादि इतिहास, व भगवान् आदिनाथ शंकर, श्रीविष्णु, ब्रह्मनंदन, श्रीशुकाचार्य, अर्जुन, नरसीमेहते, चरणदास, श्रीकृष्णचैतन्य, भगवान् रामकृष्णपरमहंस इत्यादि महात्म्यांचा स्त्रीवेश घेऊन आपल्या परम प्रियकरास आळविण्याचा परिपाठ इत्यादि गोष्टींवरून आपला स्त्रीवेश शास्त्रविहित, शिष्टसंप्रदायाला अनुरूप व परंपरागत ठरत असून मथुरामंडळस्थ नित्यरासमहोत्सवदर्शन हें त्याचें परम प्रयोजन सिद्ध होतें.

तें मथुरामण्डल सामान्य प्राकृत मनुष्यांना दिसणें शक्य नाहीं. याचें करण चरणदास महाराज असें सांगतातः—

---

१ चरणदास महाराज इ० स० १६३४ त शहाजहान बादशाहाचे वेळेस होऊन गेले.

मथुरामण्डल परगट नाहीं, परगट है सो मथुरा नाहीं ।
मथुरामण्डल यही कहावे, दिव्य दृष्टिबिन दृष्टि न आवे ॥

ही दिव्यदृष्टि हरिहरप्रेमैकसाध्य असल्यामुळें तिच्या अभावीं देहादि दृश्य प्रपंचच ज्यांना सत्य वाटतो त्यांना प्रत्यक्ष हरिहरांनींही परस्पर पति पत्नि व्हावें असा ज्याचा जातिस्वभाव त्या देहातीत शुद्धसत्वमय मधुर भावाची कहाणी न रुचून आपल्या स्त्रीवेषाविषयीं अनादर वाटावा व कदाचित् तो शास्त्रविरुद्धही वाटावा यांत नवल काय ?

हे निजजनार्तिहन्, वेळोवेळीं अवतार घेऊन आपण ज्या ज्या लीला करतां त्या संपूर्ण वर्णन करूं पाहणें म्हणजे भूमीचे परमाणूच मोजण्याचा यत्न करणें होय. ह्या अवतारांत तर त्रैलोक्यजननीत्वाचा व ब्रह्मदेवाच्या ? गुरुत्वाचा पूर्णाधिकार आपल्याकडे असल्यामुळें आपलें सामर्थ्य वर्णन करणं सर्वज्ञालाही अशक्य आहे. कारण प्रज्ञेच्या जोरावर श्रीगुरूचें सामर्थ्य वर्णन करूं म्हणणें हें मोत्याला जिल्हई देण्यासारखेंच आहे असें श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात. मग जेथें सर्वज्ञाचीही अशी दशा होते तेथें मूर्खाचा प्रयत्न म्हणजे आकाशाला गवसणी घालण्या इतकाच शहाणपणाचा होय.

स्वत: माझी स्थिती विचारशील तर हे जननी विद्वत्ता, भक्ति, सेवानुराग इत्यादि सद्गुणांचा मला गन्धही नाहीं. मग सर्वज्ञता कोठली ? मूर्खपणांत तर केवल ' पतितांमाजी प्रतापी ' अशा अधिकाराचा मी पडलों. परंतु आईग मी केवढाही पातकी असलों तरी तुझा म्हणवितों. सर्व पावन करणारांतही तूं पावन आहेस, त्वां मला पदरांत घेतलें आहेस व तुझी कृपादृष्टि सर्वदा मजवर परिपूर्ण आहे. आतां मी अपराधपरंपरेनें कितीही बद्ध असलों तरी माझी उपेक्षा करावी असें तुझ्या नित्य प्रेममय अंत:करणांत कधींही यावयाचें नाहीं. उलट माझ्या अपराधांकडे उपेक्ष्य दृष्टि करून आपल्या नेहमींच्या शीलाप्रमाणें सुसंस्काररूपी दुग्धपानानें मला नियमादृष्टरूपी पुष्टि आणण्याचाच तूं यत्न करीत राहशील. अशा अहेतुक दयाशील माउलीचें अगाध चरित्र लेखन करणें मला अत्यंत

दुष्कर असूनही केवळ तुझ्या अनुपम वात्सल्याला लुब्ध होऊन, गेल्या २५ वर्षांच्या चर्यंतील तुझ्या संचारक्रमांतले जे थोडेसे पदपांसु माझ्या हातीं लागले आहेत तेवढेच संकलित करून बालस्वभावाप्रमाणें शिरसीं धारण करण्याची मी एक आळ घेतली आहे. ती पुरविणें किंवा न पुरविणें तुझ्या इच्छेवर आहे. परंतु माय, एवढें तरी करशील काय ?

म्हणोनि अंबे श्रीमंते । निजजन कल्पलते ।
आज्ञापीं माते । ग्रंथनिरूपणीं ॥

॥ अवतरण प्रकरण समाप्तः ॥

---

श्रीज्ञानेश्वरमाउली समर्थ.

# माधान प्रकरण. रज २ रा.

## पूर्वपीठिका.

श्लोक—माधुर्यामृत कल्लोलं सच्चिदानंदाविग्रहम् ।
पांडुरंगगुरुं वंदे मोढवंशसमुद्भवम् ॥ १ ॥
" देशमुत्सृज्य गच्छंति सिंहास्सत्पुरुषा गजाः
तत्रैव निधनं यांति काकाः कापुरुषाःमृगाः ॥ "




ऱ्हाडांत उमरावतीच्या उत्तरेस २३ मैलांवर इलिचपूर तालुक्यांत माधान नांवाचें एक खेडें आहे. येथें मोहोडांची वस्ती फार असल्यामुळें याला मोहोडाचें माधान असें म्हणतात. येथील मोहोड घराण्याच्या मूळ पीठिकेसंबंधानें एक पुरातन हस्तलेख फार परिश्रमानें उपलब्ध झालेला आहे. त्याचें छायाचित्र येथें दिलें आहे. त्यांतील मोडी लिपीचे शद्ब बऱ्याच ठिकाणीं दुर्बोध असल्यामुळें ते वाचकांचे सोयीसाठीं बाळबोध लिपींत येथें देतोः—

" गोत्र वचीष्ट कुलदेवी दुरगा निशान लाल दर्यावी सूरवंसी. कैफीयत वनशावळी मोहले मकान गुनेरगड सुभे लखनर ( लखनऊ ) सरहद हिंदुस्थान तख्त दिल्ली सन ८०५ फसली. मुळ पुरस बनाम उदेसिंग राने रजपुत याचा पुत्र नामे देवासिंगजी याचा पुत्र नामे मनासिंग याचा पुत्र नामे लालसिंग याचे घोडे मुकरा २०० हमरा बंदे बादशाह गाजी महमदशाह आलम बाहादुर मुकरा तहनाती सुभे दख्खन बमुकाम अवरंगाबाद सरफराज बंदे बादशाह हुकम मुकरा तनखा १२९४१० टके मुकरा देहात मौजे मधान प्रगणे सीरजगांव सरकार गावेल सुभे वराड पायाघाट सन ९१२

फसली मुकदम तुब गवळी वलद मान गवळी सरकार तनखा आदा न करदय. सबब वतन फरोक्त. मय काळी व पांढरी वगैरे मामुल खरीद करदय बनाम दुरगाजी मोहोड ( लालसिंगचा पुत्र ) याचा पुत्र इरभानजी याचा चंदाजी याचा अभिमानजी याचा दावजी याचा पुत्र आवजी याचें पुत्र २ बयाजी ( व ) हुरजी " *

बयाजीचा दत्ताजी
दत्ताजीचा मानाजी.

हुरजीचा नगाजी
नगाजीचे पुत्र
भिवाजी व सुभाजी

वरील लेखावरून असें दिसतें कीं पांचशें वर्षांपूर्वी इ. स. १३९५ च्या च्या सुमारास लखनऊच्या सुभ्यांत गुनेरगड येथें उदेसिंग नांवाचे सूर्यवंशी वसिष्ठ गोत्री राणेरजपूत जातीचे एक गृहस्थ रहात होते. त्यांच्यापासून चवथ्या पिढीला लालसिंग नांवाचे पुरुष झाले. हे लालसिंग दक्षिणेंत महंमदशाह ब्राह्मणी ( १४६३ ते १४८२ ) याच्या लष्करांत तीनशे घोडेस्वारांचे नायक होते. अवरंगाबाद हें त्यावेळीं यांच्या छावणीचें मुख्य ठिकाण होतें. पुढें, इ० स० १५०२ च्या सुमारास माधान येथील मुकदम नामें तुब गवळी हा सरकारी मुकरर १ सारा देईनासा झाल्यामुळें माधानचें वतन फरोक्त झालें. ते लालसिंगाचा पुत्र नामें दुर्गाजी मोहोड यांनीं खरीद केलें. हे दुर्गाजी मोहोड माधान येथील मोहोड घराण्याचे मूळ पुरुष व पहिले पाटील होत. यांचे पुत्र इरभानजी त्यांचें चंदाजी. चंदाजींचे अभिमानजी. अभिमानजींचे

---

* पुढील शब्द फोटोंत आले नाहींत. ते फोटोच्या मूळ हस्तलेखावरून घेतले आहेत.

१. टके १३९४१८ म्हणजे ३४८५ रुपये. हल्लींचें सरकार देण येणेप्रमाणें आहे:—माधान ४४६३।=९, दिलालपूर १६२७॥=६. अलिपूर ४२४ ।।।= एकूण रु० ६५१६८-३ हे तिन्ही गांव पूर्वी एकत्र होते हल्लीं दिलालपूर निराळें आहे.

पुत्र दावजी व दावजीचे पुत्र आवजी आवजीचे पुत्र दोन बाळाजी व हुरजी यांच्याच वेळीं माधानचे दोन * खेल झाले असावेत असें वंशवृक्षावरून दिसते. हुरजीपासून ६ वे पुरुष सरणाजी नांवाचे झाले. सरणाजीचे पुत्र राणोजी.

राणोजीराव हे निस्सीम शिवभक्त, मोठे मुत्सद्दी, शूर, कर्तृत्ववान व करारी स्वभावाचे होते. यांचा जन्म इसवी सन १८०० च्या सुमारास झाला. दहा अकरा वर्षांचे होतपर्यंत ह्यांना लिहिणें वाचणें मुळींच येत नव्हतें. सारावेळ खेळण्यांत व दांडगाईत जात असे. एके दिवशीं यांच्या वडील बंधूंनीं यांना शेतांत डौरा करावयास बरोबर नेलें होतें. परंतु तें काम त्यांना न रुचल्यामुळें सगळ्यांची नजर चुकवून शेताच्या नालींतून ते सिरसगांवास पळून गेले. तेथें बारा महिनेपर्यंत बहिणीच्या घरीं राहून लिहिणें वाचणें शिकले व नंतर माधानास परत आले. माधानास त्यावेळीं सखारामपंत पांडे होते. त्यांजजवळून पांडेपणाचें काम बारा महिन्यांत शिकले. सखारामपंताला गुरु मानून त्यांच्यावर राणोजीराव फार प्रेम करीत असत. एकवेळ सखारामपंतावर पैसे खाल्ल्याचा आरोप आला. व जयाजीराव म्हणून राणोजीरावाचे चुलत चुलते पाटील होते त्यांनीं त्यांच्या मागें हिशेबाचा तगादा लावला. हें पाहून राणोजीराव सखारामपंतांचें दप्तर घेऊन नानोरीस एकाएकीं निघून गेले. पाटीलबोवा न्यावयास आले असतां राणोजीराव त्यांस म्हणाले कीं सखारामपंतांचा निकाल केल्याशिवाय मी घरीं येत नाहीं. अर्थातच पाटीलबोवास तो नाद सोडून द्यावा लागला. ह्या गोष्टीमुळें प्रसन्न होऊन सखारामपंतांनीं राणोजीरावास आपली जमाखर्चे लिहिण्याची विद्या सांगितली. व शिवलीलामृताची पोथी प्रसाद दिली. ही पोथी अझूनहि राणोजीरावांचे थोरले चिरंजीव व हल्लींचे पाटील रा. रा. रघुजीराव यांच्या नित्य पठणांत आहे. वरील जमाखर्च कागदाच्या एका बंदावर लिहीत असत. व तो लिहिण्याची पद्धति फारच विलक्षण होती असें सांगतात. परंतु हल्लीं तो प्रकार उपलब्ध नसल्यामुळें त्याविषयीं कांहींच

* खेल = पाती, विभाग.

महाराज

पत्नि- सौ. मनकर्णिकाबाई

रघुजी ३

श्रीरामजी २

भरसा भाऊ ३

गोंदुजी

राणोजी २

बाळाजी ४

रावजी २

जयाजी २

मोरोजी १

सरणाजी

जयमलजी २

उदाजी

विसनाजी ३

मुकुजी २

सोगाजी २

सकुराजी

त्रिंबकजी ५

सयाजी १

रायमलजी १

दत्ताजी २

हिराजी ४

तानजी ५

भिकाजी ४

बुगाजी ३

सुभाजी २

उदाजी

सुलतानजी ३

शिवाजी २

नगाजी उर्फ नागपाटील

खेल खालची (लहान)

ऊतूजी २

आळाजी १

हुरजी २

दत्ताजी ३

खेल वरची (मोठी)

आवजी

दावजी

अभिमानजी

चंदाजी

इरभानजी

दुर्गाजी मोहोड

लालसिंग

मनसिंग

देवसिंग

मूळपुरुष - उदेसिंग

श्री
ज्ञानेश्वर माउली समर्थ
श्लोक -

माधुर्यामृत कल्लोलं
सच्चिदानंद विग्रहम्।
पांडुरंग गुरु वंदे
मोढ वंश समुद्भवम्॥

मौजा माधान प्रगणे
इलिचपूर जि. उमरावती
येथील मोहोड घराण्याच्या
मूळपुरुषापासून श्री
गुलाबराव महाराजांपर्यंत
वंशपरंपरा दाखविणारा
वंशवृक्ष

चित्रशाळा प्रेस, पुणें.

कल्पना चालत नाहीं. तो उपलब्ध न राहण्याला जें कारण घडलें तें पुढें सांगितलें आहे.

ह्या नंतर राणोजीरावास सुरळीचें पांडेपण मिळालें. तें त्यांनीं सुमारें २० वर्षेपर्यंत केलें. त्यांचा विवाहही सुरळीसच झाला. कुटुंबाचें नांव सौ० सकवार बाई असें होतें.

इकडे सखारामपंताला त्यांचे इष्टमित्र नेहमीं बोलत कीं तुम्ही जमाखर्चाची पद्धत शूद्राला सांगितली हें चांगलें केलें नाहीं. ह्या किटाकिटीला कंटाळून ते एके दिवशीं राणोजीला म्हणाले तुम्ही आमची गुरुदक्षिणा दिली नाहीं. राणोजी म्हणाले मागा. तेव्हां हा जमाखर्च दुसऱ्या कोणास शिकविणार नाहीं अशी सखारामपंतांनीं त्यांच्याकडून शपथ घेवाविली.

सुरळीच्या पांडेपणांत राणोजीरावांची बुद्धिमत्ता व इतर सद्गुण लोकांच्या नजरेस येऊन त्यांचा लौकिक वाढत चालला. परंतु हा त्यांचा उत्कर्ष तेथील देशमुखास सहन न होऊन कांहीं कारणावरून एके दिवशीं ते त्यांस म्हणाले कितीही झालें तरी तुम्ही आमचे आसामीच कीं नाहीं ? हे शब्द राणोजीरावास सहन न होऊन त्यांनीं पांडेपणाचा राजीनामा दिला. व इ० स० १८३२ च्या सुमारास आपल्या वयाच्या ३२ व्या वर्षी माधानास परत आले.

ह्या वेळीं वऱ्हाड प्रांताची राज्यपद्धति विलक्षण अंदाधुंदीची होती. दो[1] अमली सत्ता नाहींशी होऊन प्रांत नवीनच निजामाच्या ताब्यांत गेला होता. यामुळें अव्यवस्थेस नवीन बहर येऊन लोकांची जीवनयात्रा जास्त बिकट झाली होती. मालकाळी वसुलाचे तालुकदारांना मक्ते मिळत. मक्त्यांची मुदत ठरलेली नसे. जो जास्त पैसे देईल त्याला केव्हांही मक्ता मिळे. या मक्त्याला ' ताहुत ' म्हणत. जमीनधारा ठरलेला नसे. तालुकदारानें मनमानेल तशी लुटालुट करावी. देशमुख पाटील

1 दो अमली सत्ता—पेशवे व दक्षिणेचे मुसलमानी बादशाहा हे दोघेहि कांहीं काळपर्यंत एकाच वेळीं जमिनीचा सारा वसूल करीत होते. म्हणून इतिहासांत याला दो अमली सत्ता म्हटलें आहे.

यांनींही तोच कित्ता गिरवावा. शेतांतील पीक आपल्या हातीं लागेल असा शेतकऱ्याला भरंवसा वाटेना म्हणून त्यानेंही शेती सोडून आपल्या भाऊबंदास लुबाडावें. अशा रीतीनें शेती बुडाली. सारांश, ज्याचा हात चालेल त्यानें मिळवावें व मनगटांत जोर असेल त्यानें राखावें अशी स्थिति होऊन "तुरतुरंफुरफुरं तीन मासं" असा प्रकार झाला होता.

अर्थातच माथानही या परिस्थितींतून सुटलें नव्हतें. शिवाय राणोजीराव माथानास आले त्या सालीं भयंकर दुष्काळ पडला होता. तो अझूनही 'बांडीचें साल' या नांवानें प्रसिद्ध आहे. राणोजीराव माथानास आल्यानंतर लौकरच जयाजीराव संपले. पाटीलकीचा कारभार शिवाजीराव पहात होते. शिवाजीराव हे जयाजीरावचे भाऊबंदच होते व हे दोघे मिळून दोन दोन वर्षांच्या फेर पाळीनें पाटीलकीचा कारभार पाहात असत. आतां शिवाजीराव नुकतेच आपल्या पाळीवर आले होते. ह्यांचें आचरण तत्कालीन परिस्थितीला अगदीं अनुरूप किंवा त्याहून कांकणभर जास्त असेंच होतें. ह्यांची पत्नीही घोड्यावर बसणें, पट्टा खेळणें, इत्यादि गोष्टींत प्रवीण होती असें सांगतात. शिवाजीरावानें प्रत्यक्ष राणोजीरावालाच लुटून आपली करामत दाखविली. राणोजीरावासारख्या तेजस्वी पुरुषाला हा उपमर्द अर्थातच सहन झाला नाहीं. ते लगेच उमरावतीस जाऊन २२०० रुपयांस ताहुत करून आले, शिवाजीरावाचें घरदार लुटून त्यांना सुरळीस घालवून दिलें व स्वतः पाटीलकीचा कारभार स्वतंत्र रीतीनें चालवूं लागले. ही हकीकत इ० स० १८३४ तली आहे.

राणोजीराव हे मोठे शंकरउपासक, विष्णुभक्त व देवब्राह्मणांची सेवा करणारे होते. सखारामपंतांनीं शिवलीलामृताची पोथी दिल्यापासून त्याचें नियमाने पठन करीत. विष्णूचीं व शिवाचीं व्रतें, एकादशी, सोमवार, प्रदोष हीं फार कडक रीतीनें पाळीत. त्यामुळें कधी कधी तीन तीन उपोषणें त्यांना पडत. महाशिवरात्रीच्या नवरात्रांत अकरा दिवसपर्यंत रानशेणीचें भस्म खाऊन शिवलीलामृताचें पारायण करीत.

नवरात्रांतील पूजाअर्चा व पारण्याचे दिवशीं ब्राह्मणभोजन वगैरे द्रव्यशाठ्य न करितां मनोभावानें करीत. एकदां हे पंढरपूरच्या यात्रेस गेले होते. तेव्हां २१ दिवस रानशेणीच्या राखेवरच राहिले होते. माधान येथील स्वयंभू शिवलिंगाची हे नित्यनेमानें पूजाअर्चा करीत असत. विरूळचे प्रसिद्ध सत्पुरुष विश्वनाथ बाबाजी यांचा त्यांनीं अनुग्रह घेतला होता. देवब्राह्मणांच्या ठिकाणीं यांची भक्ति मोठी. हे अतिथींना कधीं विन्मुख दवडीत नसत. हरप्रयत्नानें ब्राह्मणांस ह्यांनीं उत्तम भोजन घालावें. एकवेळ तर ब्राह्मणासाठीं तूप आणण्याकरितां स्वतःची पत्नी गहाण ठेवण्यास ते तयार झाले होते म्हणतात. याप्रमाणें देव, गुरु व अतिथी यांच्या सेवेविषयीं त्यांचा करारीपणा दिसून येत असे. " तुझ्या कुळांत एक महात्मा पुरुष उत्पन्न होणार आहे " असा यांना दृष्टांत झाला होता. याप्रमाणें प्रपंचांत व परमार्थांत समतोलपणा राखून सन १२७४फसलींत चैत्र शुद्ध प्रतिपदेचे दिवशीं अरुणोदयीं राणोजीराव शिवगतीला गेले. त्यावेळीं त्यांचें वय सुमारें ६५ वर्षांचें होतें.

राणोजीरावाला पुत्र चार. रघुजी, बकारामजी, नरसाभाऊ व गोंदुजी. रघुजीराव हे सर्वांत वडील असून तीर्थरूपांच्या पश्चात तेच माधानचे पाटील झाले. हे हल्लीं विद्यमान असून ह्यांचें वय सुमारें ७५ वर्षांचें आहे. दुसरे बकारामजी. हेही हल्लीं हयात आहेत. नरसाभाऊ बऱ्याच वर्षांपूर्वी संपले. तिघांनाही संतती नाहीं. सर्वांत धाकटे गोंदुजी. हे इ० स० १८९७ सालांत संपले. हे मोठे दानी, शिवभक्त व ब्राह्मणभक्त होते. यांच्या पहिल्या पत्नीचें नांव सौः अलोकाबाई होतें. ही लोणी टाकळी येथील पाटील विठोबा सवाई यांची कन्या. ह्याच पुण्यशील साध्वीच्या उदरीं आमचे चारित्रनायक अवतरून कलिदावानलानें होरपळून गेलेला मोढवंशवृक्ष त्यांनीं अंकुरित केला व राणोजीरावांस झालेला दृष्टांत सार्थ केला.

## कुळाच्या चाली रीति वगैरे.

मोहोड कुळांतील स्त्रियांचा जुना पेहराव लहेंगे, कचवे व उरफाटे

शेव असा असे. गायीनें सवा घडाभर दूध द्यावें हें एकंदर ज्ञातीचें द्रिव्य असे.

या घराण्यांत भारद्वाज गोत्र, व आंगिरस, बार्हस्पत्य व भारद्वाज हे प्रवर चालत आलेले आहेत. पाट, घाट, झाट, रहाट व काशाचें ताट असे पांच टकार याच्यांत वर्ज्य आहेत.

यांच्या जुन्या लग्नविधीला भोवरी म्हणत असत. तो विधी असा:— नवरीमुलीला हळद लागण्याचे दिवशीं आंब्याचें लांकूड हळदकुंकु लावून मंडपांत रोवायचें. लग्नाचे दिवशीं सात होम करून सातव्या होमाचे वेळीं लग्न पक्कें ठरवावयाचें व उभय पक्षाकडील मंडळीनें होमास प्रदक्षिणा करावयाची. परदेशी ब्राह्मण मंत्र सांगणारे असत. लग्नांत बहुलें नसे. हा भोवरीचा प्रकार अलीकडे चालू नाहीं. सांप्रत अवशिष्ट राहिलेला लग्नविधि असा आहे:—

देवकप्रतिष्ठेच्या दिवशीं वरपक्षाकडे घोडाराउताचें चित्र भिंतीवर काढून त्याची, कात्यारीच्या टोंकाला निंबू टोंचून तिची व कुळदेवीची पूजा करितात. मुलाचें उपनयनही लग्नाच वेळींच होतें व तेव्हांपासून जानवें घालतात. राशी काढण्याचे वेळीं मुलगा प्रथम पांढऱ्या किंवा लाल घोड्यावर बसून मारुतीच्या दर्शनास जातो व नंतर मेण्यांत किंवा पालखींत वरात जाते. वरातीचे वेळीं नवऱ्या मुलाजवळ कट्यार असते व त्याच्या डोक्यावर पांढरें चवर धरतात. महाराष्ट्र ब्राह्मण पुराणोक्त मंत्रांनीं लग्न लावतात. लग्नांत बहुले असतें. हे शेवटले दोन प्रकार आधुनिक आहेत.

मोहोडांचा श्राद्धविधि भाताच्या पिंडांनीं होतो. कणकीचे पिंडांचा यांच्यांत विटाळ पडतो. मावानचे हल्लींचे पाटील रघुजीराव हे एकदां प्रयागास गेले होते. तेव्हां तीर्थविधीचे वेळेस त्यांचा व तेथील पंड्याचा वाद झाला. पंड्यानें कणकीचे पिंड करावयास सांगितलें असतां पाटीलबोवा बोलले कीं आम्हांला कणकीच्या पिंडाचा विटाळ पडतो. आमच्या कुळांत भाताचे पिंड करण्याची चाल आहे. तूं आपल्या बापास विचार. त्यानें आपल्या बापास बोलाऊन आणलें.

याचें नांव रामनारायण पंड्या चापेवाला. तो म्हणाला कीं मोहोड हे राणे रजपूत आहेत. व यांच्या कुळांत भाताचे पिंड करण्याची चाल आहे. तसेंच वसुगण रुद्रगण वगैरेही यांच्यांत आहेत.

प्रश्न—वरील रूढि यद्यपि रजपुतांच्या चालीरीतीशीं बहुतेक जुळत असल्या तथापि त्या द्वेषमूलक असण्याचा संभव असल्यामुळें ज्ञातिनिर्णया-करितां त्यांचें कारण शोधण्यापासून उपयोग नाहीं.

उत्तर—ही भीति फक्त अप्रच्छन्न रूढि विषयींच असूं शकते म्हणून त्यांचें कारण शोधूं नये. परंतु वरील मोहोड ज्ञातीची ऐतिहासिक माहिती क्षत्रीय वंशाचा संबंध दाखवीत आहे व प्रच्छन्न रूढिचीं कारणेंही बहुतेक जुळतात म्हणून त्यांचा शोध करणें इष्ट आहे.

प्रश्न—राजस व तामस प्रच्छन्नरूढि द्वेषानें किंवा ईर्षेनें उत्पन्न होत नसतात मग त्यांचेंही कारण शोधावें काय ?

उत्तर—त्या रूढि द्वेषानें किंवा ईर्षेनें उत्पन्न होत नसल्या तरी कामनेनें उत्पन्न होत असतात म्हणून त्यांचें कारण शोधण्यांत हांशील नाहीं.

प्रश्न—सात्विक रूढिही कामनेनेंच उत्पन्न होतात मग त्यांचें तरी मूळ कां शोधावें ?

उत्तर—सात्विक रूढि कामनेनें उत्पन्न होत असल्या तरी त्यांचे मूळ चांगलें शास्त्रीय असलें पाहिजे. व त्या ईश्वरार्पणबुद्धीनें पाळल्यास त्यांपासून अवश्य चित्तशुद्धि होते. शिवाय प्रच्छन्न सात्विक रूढिकडे मनुष्याची प्रवृत्तीही जात नसते म्हणून अशा रूढिचें कारण अवश्य शोधलें पाहिजे.

मोढ नांवाचे क्षत्रीय पुराणकालीं आपल्या आर्यावर्तांत होते याविषयी स्कंद पुराणांत उल्लेख आढळतो. परंतु परंपरेनें संस्कारलोप होतां होतां कलियुगांत त्यांना शूद्रत्व आलेलें आहे. संस्कारलोप झालेला कोणताही वर्ण शूद्र होत असतो म्हणून श्रीगुलाबराव महाराज आपणास शूद्र म्हण-वून घेत असत. याविषयीं स्वत:महाराजांनींच एके ठिकाणीं म्हटलें आहे:—

" आमच्या कांहीं मंडळींनें क्षत्रिय लिहिण्याचा प्रचार नवीन पाडला आहे. यापूर्वी आम्ही आपल्यास तिरोळे कुणबी लिहीत होतों. तें कांहीं असलें तरी स्वत:ला मी क्षत्रिय लिहीत नाहीं. शूद्र लिहितों. घटकाभर खोटी कल्पना करून मी द्विज आहे असें जरी घेऊन चाललों तरी अनंत कालापासून संस्कारविच्छिन्न झाल्यामुळें कलियुगाच्या शेवटीं होणाऱ्या मरु व देवापी या दोन महात्म्यांशिवाय मला क्षत्रियत्व देणें दुसऱ्याच्या हातीं नाहीं हें वैदिक धर्मावर विश्वास असल्यामुळें मला ठाऊक आहे. बरें वैदिक धर्मावर माझा विश्वासच नसला तर मग मला द्विजत्वच कशाला हवें आहे ? काय इतर लोकांना कलाकौशल्य साधतां येत नाहीं ?"

संस्कार-विच्छेद होण्याला सदाचारलोप व ब्राह्मणांचा अतिक्रम हे दोन मोठे दोष आहेत असें "शनकैस्तु क्रियालोपादिमा क्षत्रियजातयः। वृषलत्वं गता लोके ब्राह्मणातिक्रमेण च ॥" या मनुवचनावरून दिसून येते. म्हणून सदाचार व देवद्विजभक्ति वाढवीत राहिल्यानें युगाच्या अंतीं भगवान् देवापि व मरु यांच्या हातानें संस्कारलोप झालेले वर्ण पुन्हां शुद्ध होण्याचा संभव आहे अशी जाणीव आपल्या ज्ञातिबांधवांस करून देण्या-करितां महाराज स्वत: कायावाचामनानें कसे वागले व सुशिक्षणाच्या अभावीं अंतःकरणांत वाढत जाणाऱ्या ब्राह्मणद्वेषासारख्या वृत्तींस थारा मिळूं नये म्हणून त्यांस संस्कृत भाषेचें शिक्षण वगैरे देण्याची त्यांनीं किती खटपट केली हें आगामी वृत्तांतावरून दिसून येईल.



## श्रीमहाराजांचा जन्म, बालपण व लग्न.
## शके १८०३ आषाढ ते १८२१ कार्तिक.



श्लोक—तव जानिर्न गुणास्तव तत्वतो जगदनुग्रहणाय भवादिकम्।
तवपदं खलु वाङ्मनसातिगं श्रुतिवचश्चकितं तवबोधकम्

—शांकरदिग्विजय.—

परानंदाय शांताय चित्सुखाय चिदात्मने ।
लोकलालनलीलायालोकातोकाय ते नमः ॥ १ ॥

—मिलिंद—

वऱ्हाडांत उमरावतीच्या दक्षिणेस १२ मैलांवर लोणी टाकळी म्हणून एक लहानसें खेडें आहे. हें महाराजांचें आजोळ होय. हें पूर्वपीठिकेच्या शेवटीं सुचविलेंच आहे. येथें शके १८०३ वृषभनाम संवत्सरांत आषाढशुद्धांत श्रीमहाराजांचा जन्म झाला. महाराज सुमारें पांच सहा महिन्यांचे झाल्यावर त्यांची आई सौः अलोकाबाई ही त्यांना घेऊन माधानास आपल्या सासरीं आली. त्यावेळीं मोठे पाणीदार डोळे, सांवळा वर्ण, सरळ नासिका, पुष्ट व गोंडस हातपाय असें महाराजांचें बालध्यान असून मूर्ति फार लोभस " सुंदर नारायणा " सारखी होती असें सांगतात. पुढें सुमारें तीन महिन्यांनीं त्यांचे डोळे आले असतां

त्यांत एका दायादानें चिंचेच्या पाल्याचा उपटा घातला व पाळण्यावर दुपवलेली एक अप्रवासीन बाई बसली यामुळें तनि महिने पावेतों यांनां डोळे उघडतां आल नाहींत व शेवटीं दोन्ही डोळे आंधळे झाले. कोणी या आंधळेपणाचें कारण कांहीं निराळेंच सांगतात. कसेंहि असो; याप्रमाणें अर्भक दशेंतच हें बालक नेत्रसुखाला आंचवलें हें मात्र खरें.

बाह्यदृष्टि नाहींशी झाली असतांही या बालमहात्म्याची चिन्मयदृष्टि निर्मल व सतेज असल्यामुळें त्याची चित्तवृत्ति नेहमीं आनंदित दिसे. बोलतां येऊं लागणाऱ्या पूर्वीपासूनच मान व हात हालवून टाळ्या वाजवाव्या व खेळावें. पुढें उत्तरोत्तर अल्लडपणा वाढत चालला व पळणें, चुटक्या वाजवीत चक्राकार फिरणें, मोठ्यानें ओरडणें यांतच या मुलास मौज वाटूं लागली. अशीं चार वर्षे आईच्या सहवासांत गेलीं असतां यांच्या पाठीं रंगी नांवाची एक बहीण होऊन ती लौकरच संपली. तेव्हांपासून यांच्या आईला बाळंतरोग लागला. ते वेळीं देऊरवाड्यास एकोबादादा म्हणून प्रसिद्ध वैद्य होते. त्यांच्या लौको-

त्तर व अद्भुत वैद्यक गुणांविषयीं या प्रांतांत पुष्कळ गोष्टी प्रसिद्ध आहेत. त्यांच्याकडे पाटीलबोवा ( रघुजीराव ) गेले व वर्तमान कळाविलें. तेव्हां दादा म्हणाले ह्या मुलीस मी औषध देतों परंतु तळलेल्या पदार्थांची पथ्य कडकरीतीनें पाळली पाहिजे. पुढें ह्या मुलीला माहेरीं जाण्याचा प्रसंग येणार तर तिला तुम्हीं पाठवूं नका. पण माहेरचीं माणसें तिला नेतील तर तळलेले पदार्थ तिला खाण्यास देण्याची अगदीं मनाई करा. ते पदार्थ खाऊन ती वांचणार नाहीं. इतकें सांगून दादांनीं दहा वर्षांचें तरोट्याचें बीं आणाविलें व त्यांत औषध दिलें. आईची प्रकृतीहि चार महिनें चांगली राहिली. पुढें दादांनीं सांगितलेला प्रसंग आला. शके १८०७ च्या कार्तिक महिन्यांत माहेरच्या माणसांनीं तिला लोणीस नेलें व मनाई केली असतांही अनारसे खाण्यास दिले. झालें. एकदम प्रकृति बिघडली. निरोप समजल्याबरोबर पाटीलबोवा दादाकडे गेले. दादा म्हणाले मी पाहिलेच बोललों होतो. तसा प्रसंग आला. आतां तुम्ही एकदम गाड्या जुंपून लोणीस जा. तुम्ही तेथें पोहचेपर्यंत मुलीच्या तोंडांत दहीं घालतील. ( अगदीं शेवटली वेळ ) पाटीलबोवा माघानास आले व घरची मंडळी घेऊन एकदम लोणीस गेले. तेथें पोहचल्यावर पाहतात तों खरोखरच सौ० अलोकाबाईच्या तोंडांत दहीं घालून अगदीं प्राणोत्क्रमणाची वेळ आली होती. थोड्या वेळानें ती संपली. महाराजांच्या आईचें माहेरचें नांव अनुबाई होतें. ही फार सुशीलस्वभावाची व साध्वी होती. तिच्या मरणामुळें तिच्या पित्यास विशेष दुःख झालें. गुळया आहे तर तुमची अनु कायमच आहे असें समजा; याप्रमाणें बोलून महाराजांच्या आजीनें त्यांची ( पतीची ) समजूत घालावी. तें पाहून महाराजांना फार आश्चर्य वाटे. ते वेळीं महाराजांचें वय ४ वर्षांचें होतें. यांच्या मातामहींचें नांव सौ० सावित्रीनानी होतें. तिला हे बाई म्हणत. बाईचा महाराजांवर फार प्रेम होता तो आतां विशेष झाला व महाराजांनाहीं तिचा लळा लागला. बाईनें परोपरीनें नातवाचे कोड पुरवावे व कोणत्याही प्रकारें त्याचें कमी पडूं देऊं नये. महाराजांना बाई म्हणजे

सुखाचें सर्वस्व वाटे. तिला भातकें मागावें. आपली भूक, तहान तिला सांगावी. हट्ट करणें किंवा लडीवाळपणानें कांहीं बोलणें असल्यास तिच्या जवळ बोलावें. महाराजांचा बाजीराव म्हणून एक मामा लोणीस होता. त्यास हा प्रकार आवडत नसे. व या पोराच्या एवढा लाड कशाला करतेस ? असें तो बाईला म्हणे. बाईनें म्हणावें " त्याले कोन आहे ? मी त्याच करणार नाहीं तर कोन करन ? " बाईवांचून इतर घरच्या माणसांना महाराजांचा विशेष प्रेम नव्हता. सखारामजी म्हणून यांचा दुसरा एक मामा होता. त्यांची पत्नी पैसेवाल्याची मुलगी असल्यामुळें ती महाराजांचा तिरस्कार करी. तिच्या सातरीवर स्वच्छ चादर रहात असे. व त्यावर ती यांस बसूं देत नसे. यांना शेंबूड शिंकरण्याची व मान व हात हालविण्याची फार संवय. त्यामुळें घरच्या माणसांना हा मुलगा पिसा आहे असें वाटे. मामीचीहि अर्थात तशीच समजूत असावी. एके दिवशीं रात्रीं मामीनें सातरी टाकली असतां महाराज मुद्दामच तिच्या सातरीवर जाऊन बसले. ती म्हणाली गुलाबराव बसूं नका, जवळ चिमणी आहे तिला तुमचा हात लागून ती पडेल व सातरी पेटेल. तें ऐकून बाई म्हणाली " त्याच्या आंगचा मळ तुझ्या आंथरुणाला डिकते काय ? तुझें आंथरुण झिजते काय ? बसरे गुह्या." गुलाबराव बसले. व लगेच हात हालवूं लागले. हाताचा धक्का लागून चिमणी पडली, सातरी पेटली व मामीचें लुगडेंहि पेटलें. महाराज घाबरल्यासारखे उठून गेलें. बाई संतापून मारायला आली. महाराज म्हणाले मी नाहीं पाडली, तिचाच धक्का लागला असेल. मला मारू नको. तिचें आंथरुण जळत नाहीं. तेल तेल जळल. कपडे जळणार नाहींत. कपडे जळतील तर मला मार. परंतु कपडे जळाले नाहींत व बाईलाही मारण्याचा प्रसंग आला नाहीं. याप्रमाणें उत्तरोत्तर खेळण्या फिरण्यांत स्वच्छंदीपणा, धाडस, खोडकरपणा वगैरे गुण दिसूं लागले. घरांतून दणदण धांवत बाहेर आंगणांत जावें व व ' डोयाले दिसत नाहीं पडशीलनारे ' असें बाई म्हणत असतांही पळत बाहेर निघून जावें. दोनप्रहरीं मांडवांत फिरावें, घरीं चौकांतच

विहीर आहे. त्या विहिरीजवळ जावें. कदाचित् विहिरींत पडेल म्हणून बाईनें म्हणावें ' डाव्या हात होत जाय, उजव्या हातान इहिरींत पडशील. ' तिचें न ऐकलेंसें करून यांनीं मुद्दामच विहिरीकडे जावें आजीनें पुन्हां म्हणावें ' इहिरींत पडशील तर मरशीलनारे ' यांनींहि ' इहिरीत पडशील तर मरशीलनारे, गुल्लया लेका इहिरींत पडशील डाव्या हातान जा ' अशी तिच्याच शब्दांची नकल करावी.

घरांत खाऊ असला तर मडक्यावर खडा मारून काढून खावा. एकदां आजीनें झोळण्यांत बारा आणे पैसे ठेविले होते. यानीं घरांत जाऊन आंतून दाराला कडी घातली, पैसे काढून घेतले, कोणास न कळतां बाहेर नेऊन मिठाई घेतली व पोरांना वाटून देऊन स्वतः आपण खाल्ली. इकडे बाईनें सुनेचा संशय घेऊन तिला घराबाहेर घालविलें. तेव्हां महाराज हांसून म्हणाले,सुनेचा तुला संशय येतो व माझा येत नाहीं ! मामा म्हणतील माझ्या बायकोला काढून दिलें व नातवास घरांत ठेविलें. हिचा नातवावर जास्त लोभ आहे. असें म्हणून तुलाहि काढून देतील. इतकें बोलून उगीच राहिले. पुढें पंधरा दिवसांनीं सगळी हकीकत स्वतः बाईजवळ सांगितली व पैसेहि मीच घेतले असें म्हणाले.

कोणाच्या झाडावर जांब दिसले तर घरधनिणीस मागावे. तिनें दिले नाहींत तर घरावर गोटे फेंकावे व मडके फोडतो म्हणावें. शेजारची गंगानानी रहाट कातत असे. महाराजांनीं तेथें जाऊन रहाटाच्या कोनीला कान लाऊन नाद ऐकत बसावें. व चाताला बोट लावावें. बोटाचें रक्त निघालें तरी बोट काढूं नये. गंगानानीनें गालगुच्चा घेऊन दूर लोटावें. महाराजांनीं पुन्हां जवळ यावें व गंगानानी आतां हात लावत नाहीं, पण येथें बसूं दे, असें म्हणून थोडा वेळ स्तब्ध बसावें व पुन्हां तसेंच करावें.सायंकाळचे वेळीं कधीं कधीं आंगणांत बाजा (खाटा) टाकाव्या व एका ठाव्यावरून दुसऱ्या ठाव्यावर हात ठेवीत चालावें.

पावसाळ्यांत निघणारीं बारीक बारीक तरोट्यांचीं रोपें, बामळीचा पाला वगैरे गोळा करून समवयस्क मुलांनीं यांना आणून द्यावा. तसाच

आणखी कांहीं वस्तु जमा करून यांनीं बाजार मांडावा. व मातीच्या ढेंकळाचा गूळ, तेलाच्या पिंपावरील वाख्यांची तागडी वगैरे करून विक्रीची नक्कल करावी. गांवां तला कोणी ओळखीचा मनुष्य बाजारास जात असला तर त्याला म्हणावें मला भातकें आणाल काय ? त्यानें काय आणूं ? म्हणून विचारल्यावर ' लष्करची खबरमात ' आणा म्हणावें. लष्करची खबरमात म्हणजे संतरें.

एखादे वेळीं लहर लागली म्हणजे लहान लहान नांगरवखर वगैरे घेऊन शेतकीचा खेळ खेळावा व आपल्या बाळमित्रांस शेतकीसंबंधी माहिती सांगावी. लोखंडाची लहानसी फास,- लांकडाचे बैल, एक जूं वगैरे शेतकीच्या खेळाचें टोपलीभर सामान होतें. त्यांतले कांहीं अझून आहे.

खेळतां खेळतां भूक लागली म्हणजे महाराजांनीं आजीला " पुलावा " मागावा. तिनें जबारीच्या भाकरीचा वरचा पोपडा ( पापुद्रा ) काढून मगजावर तेलमीठ घालावें व मुठकुळें करून यांच्या हातीं द्यावें. तें घेऊन माझ्या बाईनें मला " पुलावा " दिला म्हणत महाराजांनीं नाचावें. इतर पोरांनींहि तें पाहून आपआपल्या घरीं जावें व पुलावा मागवा. परंतु हा प्रकार त्यांच्या घरीं माहित नसल्यामुळें पुलावा मिळूं नये व पोरांनीं रडावें.

आजीचें जेवण झाल्यावर महाराजांनीं चंदनाच्या खोडानें तिच्या पायाच्या पोटऱ्या ठोकाव्या. तिला बरें वाटे. शेजारच्या बाया यांच्या विहिरीवर पाण्यास येत, तेव्हां या लहान प्रज्ञाचक्षु मुलाची त्यांना मोठी मौज वाटे. त्यांनीं अगदीं पाऊलहि न वाजवितां यऊन यांच्या मागें चुपचाप उभें रहावें, परंतु यांनीं मागें न पाहतां पटापट त्यांचीं नांवें सांगावीं, तेव्हां त्यांनीं हांसावें व तुला नांवें कशीं कळलीं म्हणून विचारावें. यांनीं म्हणावें जोडव्यांच्या व बांगड्यांच्या नादावरून. जोडवीं व बांगड्या तर सगळ्यांनाच आहेत त्यांवरून तूं नांवें कशीं ओळखलींस ? असें पुन्हां पुसलें म्हणजे त्यांचा नाद निरनिराळा येतो

असें उत्तर द्यावें. तसेंच कोणी कितीहि सावधगि
किंवा बांगड्या न वाजूं देतां नकळत यांच्या बाजूल
उभें राहिलें असतां पटकन हात लावावा.

जेवणाचे वेळीं हातावर चंदन घेऊन बोटानें इकड
घांस करून अगोदर निरनिराळ्या दिशांकडे ठेवावे
आरंभ करावा. जेवण चाललें असतांना मध्येंच प
पुढें करावे व असें कां करतोस म्हणून विचारलें अर
एक सुंदर लेकरूं आलें होतें. त्याला चार हात
कपाळास केशरी गंध व कानांत कुंडलें होतीं. जे
गोष्टी बोलत व विनोदपर भाषण करीत जेवावें
पुलावा गोड झाला. गंगानानीला हांक मारावी व
तुझा आवाज गोड आहे. गाणें म्हण. मात्र हा
प्रकार आजी वाढत असतांना चालत असे. मामी
वाढायला आले कीं या गड्याची मर्जी जात असे.
कराव्या. ही मला शिकोरीनें वाढते. दगडीनें
ती शिकोरी, असें म्हणावें. चाटू, सराव, f
वाढलेलें यांना खपत नसे.

बाईनें ताट वाढून आणलें म्हणजे काय काय
कशाची आहे ? म्हणून विचारावें. मग आपल्या
कायरे गड्या; ही भाजीवरण जेवत काय ? पुन्ह
माझा सोबती जेवतो म्हणतो. भाजी वाढ. f
भाजी जेवत नाहीं म्हणतो तर मीहि जेवत नाहीं,
काढून न्यावयास सांगावें.

रात्र झाली म्हणजे माजघरांत जाऊन आंतून व
उड्या माराव्या, निजून रहावें किंवा समाधी लावून
दारांतून पाहण्याची मनाई असे. कोणी पाहील तर
असें म्हणावें.

आजोळचीं सगळीं माणसें मानभावांचे अनुयायी असतांही यांची उपजत प्रवृत्ति वैदिक धर्माकडेच होती. यांची आजीही मानभावाचीच शिष्यीण होती. तिला हे म्हणत बाई तूं मानभावाचा मंत्र सोडून दे. ती पूजा करीत बसली म्हणजे यांनीं तिच्याजवळ जाऊन बसावें. व तूं देव करतेस मी काय म्हणूं ? मला तुझा मंत्र सांग असें म्हणावें. असा फारच हठ पाहून एके दिवशीं बाई म्हणाली " आरी करू बारी करू " असें तूं म्हणत जा. महाराज म्हणाले " आरी करू बारी करू । विद्या घरीं पाणी भरू । ठेंग मारू फते करू । " असें मी म्हणत जाईन. दुसरे दिवशीं यांनीं तिचा खरा मंत्र खरोखर म्हणून दाखविला. ती म्हणाली कसारे ऐकला ? हे म्हणाले मलाच तो येतो.

पोथी पुराण ऐकणें, पाळणें आरत्या वगैरे म्हणणें, समाधी लाऊन बसणें, प्रहर प्रहर चक्कर फिरणें, इत्यादि गोष्टींत यांचें मन सहजच रमत असे. श्रीकृष्णअवतारावर विशेष प्रेम दिसून येई. " वैद्यराज आम्ही निर्गुण पुरीचे औषध घ्याना कोणी "हें गाणे यांनीं पाठ केलें होतें तें कधीं कधीं म्हणावे. बसावयाचें तें बहुत करून दोन्ही गुडघ्यांत मान घालून बसावें. कपड्यांची वगैरे जरूर लागत नसे. उघडेच फिरत. लग्नाचें नांव काढलें तर माझें लग्न करूं नका, लग्नांत मोठा वारा व पाऊस येणार आहे म्हणावें. कधीं कधीं जीभ बाहेर काढून भीती दाखवावी. व जिभेवरला काळा डाग दाखऊन म्हणावें माझ्या जिभेवर सरस्वती आहे.

पुढें होणाऱ्या गोष्टी महाराजांनीं बाईजवळ आधींच बोलून दाखवाव्या. कोणी बाया घरीं आल्या म्हणजे कोणाला मुलगा मुलगी जें काय होणार तें सांगावें. एकदां एका बाईला जुळें होणार म्हणून सांगितलें होतें तिला जुळेंच झालें. एकदां यांच्या घरीं एक मनुष्य आला व स्वतःच्या लग्नासंबंधानें कांहीं बोलत होता. तेव्हां खेळतां खेळतां महाराज सहज म्हणाले लग्नाहून

---

१ ह्याला योगशास्त्रांत सिंहासन म्हणतात. अद्यापहि कधीं कधीं महाराज हें करीत असतात.

येतांना तुला सर्प डसेल व तूं मरशील. बाई रागाऊन म्हणाली तूं बोलतोस तसें होते. लोक तुला बोन्हारा काळजिभ्या म्हणतात. व आजीच्या लाडानें वायां गेला म्हणतात. महाराज म्हणाले मला दिसतें तसें बोलतों. मी कांहीं द्वेषानें म्हणत नाहीं. पुढें तो मनुष्य सर्प डसूनच मेला.

बाजीराव म्हणून महाराजांचे जे मामा होते त्यांची पहिली स्त्री मेल्यामुळें त्यांनीं दुसरें लग्न केलें होतें. या दुसऱ्या पत्नीचें नांव जनाबाई. ही चालूं लागली म्हणजे महाराज आजीला म्हणत बाई मामी पहा कशी चालते. हिच्या जोडव्यांचा आवाज बरा नाहीं. तूं ऐक कसा आवाज येतो तो. ही विधवा होणार आहे. ही बाई पुढें खरोखरच विधवा झाली. ही हल्लीं लोणीला असून तिनेंच ही हकिकत सांगितली आहे. एके दिवशीं महाराज बाईला म्हणाले बाई लहान बाबा[1] अगोदर मरतील व मागाहून तूं मरशील. तुला मरणाचे वेळीं खांडुक होईल व बीस विंचवांची व्यथा होईल. लहान बाबा विहिरींत पडून किंवा सर्प डसून मरतील. ह्या गोष्टी पुढें जशा घडून आल्या तशा योग्यस्थळीं सांगण्यांत येतील.

एवढ्याशा वयांत यांचा स्वभावही मोठा चौकस असे. हल्लीं छापून निघालेल्या ग्रंथांपैकीं 'मणिमंजूषा' अथवा 'सुबोध वचनें' यांत 'खेकू खेकू खेकडी'चा एक दृष्टांत आहे तो ह्याच वेळचा आहे. एकदां आजी व राजारामजी मामा यांच्याबरोबर हे माहुरला गेले होते. तेथल्या देवांविषयीं नाना प्रकारचे प्रश्न व मूळापासून सर्व माहिती यांनीं विचारली. आजीनें ऐकली होती तेवढी सगळी माहिती सांगितली व सगळे देव हात लाऊन दाखविले.

अशीं यांचीं सहा वर्षे लोणीला गेलीं. इतक्या अवधींत नानाप्रकारच्या बाललीलांबरोबरच यांच्या ठिकाणीं ईश्वरभक्ति, मनाचा सरळ-

---

१ हे महाराजांचे मातामह होत. यांचें नांव विठोबा. महाराज यांना लहान बाबा म्हणत.

ा, अतींद्रिय ज्ञान, नीतिधैर्य आदिकरून दैवी गुणांचा उदय दिसूं लागला. या सहा वर्षांत मधून मधून यांनीं चार दोन दिवसांकरितां माधानासही जात असावें. पुढें शके १८१२ त ( इ० स० ११८९ च्या प्रारंभीं ) यांना माधानास येण्यास एक कारण घडलें. यांचे चुलते रघुजी यांची पत्नि सौ० मुक्ताबाई ही फार अत्यवस्थ झाली होती. तिच्या भेटीकरितां यांना आणलें. तेव्हांपासून यांचें वास्तव्य मुख्यत्वेंकरून माधानासच झालें. लोणी सोडतेवेळीं तेथील कांहीं आप्तेष्टादि मंडळींचें वाईट आचरण यांच्या डोळ्यांसमोर होतें. त्यामुळें त्यांचा विनाश लवकरच होईल असे उद्गार यांच्या मुखांतून निघाले. व थोड्या दिवसांत तशीच स्थिति झाली.

इकडे माधानास सौ० मुक्ताबाई अत्यवस्थ झाली होती, ती लिंगोजी नींगाडे देऊरवाडा येथील प्रसिद्ध वैद्य यांच्या औषधानें वाचली. तो प्रकार असाः—मुक्ताबाई अत्यवस्थ झाली हें पाहून पाटीलबोवा ( रघुजी ) लिंगोजीकडे देऊरवाड्यास गेले. लिंगोजीनें औषध दिलें व म्हणाले कीं तुम्ही होईल तितक्या लवकर घरीं जा. तिचें प्राणोत्क्रमण झाल्यावर मग औषधाचा काय उपयोग ? तुम्हांला अतित्वरेनें गेलें पाहिजे. म्हणजे तोंडांत दहीं घालण्याच्या वेळेस तरी पोहचाल. या औषधाचा नुसता धुंका तोंडांत गेला तरी ती वाचेल, असें म्हणून लिंगोजीनें आपली घोडी देऊन रघुजीस रवाना केलें. घरीं पोहचेपर्यंत खरोखरच बाईला खालीं निजवून तोंडांत दहीं घातलें होतें. जवळचीं माणसें म्हणालीं आतां औषध कशाला ? तिकडे लक्ष्य न देतां पाटीलबोवानें औषध काढ्यांत उगाळलें व काढा तोंडांत घातला. तो कफाच्या उचकीबरोबर थोडासा आंत जातांच कांहीं वेळानें बाई थोडी सावध झाली व मला खाटेवर निजवा म्हणाली. पुढें ती हळुहळु दुरुस्त झाली.

## माधान सर्वज्ञता

तस्मादयं वेद विनोपदेशं श्रुतीरनंताः सकलाः स्मृतीश्च ।
सर्वाणि शास्त्राणि परं च तत्वमज्ञातमेतेन न किंचिदस्ति ॥
शांकर दिग्विजय.

तूं बाला ऐसा वर्तसी । परी बालबुद्धि नाहीं तुजपाशीं ।
सर्वज्ञ सर्वथा होसी । ऐसें आम्हांसी दिसतसे ॥
एकनाथी भागवत. ७—२८

या वेळीं महाराजांना दहावें वर्ष चालू होतें. म्हणजे पौगंड अ
कैशोर या अवस्थांचा हा संधिकाल होता. घरांत रगुजी कर्ते ह
गोंदुजीबापूनें दुसरें लग्न केलें होतें व भागीरथी बुढीचें घरांत व
होतें. अशा परिस्थितींत कुटुंबाला शोभा आणणारें गृहरत्न घरांत ए
एकच होतें. व तें केवळ अद्वितीय होतें; परंतु त्यानें
अत्यंत निगूढ होतें. सगळ्यांनीं त्याला ' गुलब्या ' म्हणून हाक मारा
आंधळें पोर म्हणून त्याची हेळसांड करावी व अलंदुनियेवर कीर्तिसु
पसराविण्यास कारणभूत होणारा सापत्नमत्सरवायू तर मूळ नक्षत्रा
त्याचा जन्म कल्पून त्याला मानभावांच्या मेळ्यांत लोटण्याला एका पा
वर तयार होता. तथापि ह्या " गुलाबाची " जोपासना करण्याला ब
रामजीची पत्नि फार तत्पर असे. व स्वतःला मूलबाळ नसल्यामुळें
' गुलबावर' तिचा फार प्रेम असे. महाराज तिला ताई म्हणत व ति
" तान्ह्याग लेकराची माय गेली पाण्या । साखर दे गो बाण्या मा
गुलाबरायाला ॥ " इत्यादि पाळण्यांत निजवून म्हटलेली गाणीं त्यां
अझूनही आठवतात. बाहेरून येऊन भातकें मागणे, तिच्या पश्चात उत
डीवर खडे मारून भातके खाऊन उतरंड पूर्ववत करून ठेवणें न घ
येऊन ताईनें विचारलें असतां नाकबूल जाणें इत्यादि बालचेष्टा त्यां
ताईजवळ कराव्या, कोणी खाऊ दिला तर तो प्रथम ताईला दाखवू
खावा, व खाणें, पिणें, निजणें सर्व कांहीं ताई वांचून होऊं नये. जे
णाचे वेळीं गुलाबराव अडून बसले म्हणजे ताईनें लहान लहान घा
करून हा घास गोंदुजीचा, हा मामाजीचा असें म्हणून समजूत करा

ऊं घालावें. सारांश, लोणीला जशी ' बाई ' तशीच माधानला ही ई ' होती.

माधानास आल्यापासून महाराजांचे आंगची दैवीसंपत्कालिका अधिका- विकास पाऊं लागली. दगडावर दगड रचून त्यांना वैकुंठ कैलास ावें. सर्वांत वरचा दगड तो महादेव; त्यावर पाणी टाकून तो लोट ल्या आंगावर घ्यावा व गंगा आली म्हणावें. प्रहरप्रहर पूजा करीत ावें. याप्रमाणें शिवभक्ति पाहून हा राणोजीच पुनः जन्मास आला से लोकांनीं म्हणावें. एकादशी, सोमवार हीं व्रतें नियमानें करावीं. ाण्यावर मंत्रानें फूक मारून तें तीर्थ घेऊन भोजन करावें. भोजनानंतर प्रहरप्रहर डोकें जमिनीवर टेकून नमस्कार करावा. रात्रौ सर्वांची निजा- निज झाली म्हणजे हातांत फडकें घेऊन जोरानें फडत्कार करावा. सग- ळ्यांना झोंप लागली अशी खातरी झाली म्हणजे तोंडावरून पांघरूण घेऊन दिवस निघेपर्यंत समाधी लाऊन बसावें. ते वेळीं श्वास बंद होऊन छाती अगदीं उडत नसे. एखादे वेळीं कोणी पहाटेस उठून हाका मारल्या असतां अर्थातच महाराजांनीं बोलूं नये. एक वेळ आत्याबाईच्या (तुळजाबाईच्या) दृष्टोत्पत्तीस वरील गोष्ट आली असतांना ती रडूं लागली. तेव्हां धनुभाऊनें (घरच्या गड्यानें) तिला धीर दिला. मग थोड्या वेळानें महाराजांचा श्वास सुरू झाला. पाटीलबोवाला हें सारें ढोंग वाटून त्यांनीं महाराजांस मारपीट करावी. तरी त्यांनीं हूंकूं कांहींच करूं नये. मग बऱ्याच वेळानें श्वास सुरु झाल्यावर उठून जावें.

शास्त्रपुराणांवर यांची मोठी प्रीति होती. पुराणादिकांतील गोष्टी सांगाव्या. एक वेळ ऐकलेली कथा विसरत नसत. कोणी श्लोक वगैरे म्हटला असतां तसाच तत्काल म्हणून दाखवावा. लक्ष्मणभट जोश्याजवळ बसून श्लोक, शिवलीलामृताचा अकरावा अध्याय, व्यंकटेशस्तोत्र, मंग- लाष्टकें वगैरे पाठ करावीं. एक वेळ सांगितल्यानें पाठ होत असे. जशी पुराणावर तशीच कुराणावरही यांची आवड दिसून येई. चावडीवर कोणी मुसलमान आला म्हणजे कुराणांतले कलमे शिकावे, व नंतर ते म्हणून दाखवावे. भिंगरी, कोयाळ इत्यादि मुलांचे खेळ व फुगड्या,

पिंगा इत्यादि मुलींचे खेळ महाराजांनीं खेळावे. एका गंजांत पाणी घालून व त्या पाण्यांत पेरकुंड घालून त्याचें सुस्वर वाद्य करावें. हातांत कांबटाचें धनुष्य घेऊन-राम लक्ष्मण आले युद्ध करतों असें म्हणावें व बाण सोडावे. दोनही हातांनीं चुटक्या वाजवीत आपल्या समोंवतीं गरगर फिरण्याची तर नेहमींचीच करमणूक होती.

ह्या स्वैरचरिताचें रघुजीला ( पाटीलबोवाला ) कौतुक वाटत नसे. त्यांनीं ह्या मुलाचा हात धरून शाळेंत न्यावें व तोंडी हिशेब, पाढे वगैरे त्याला शिकविण्याविषयीं पंतोजींस सांगावें. ह्या मुलानें तेवढ्यापुरतें शाळेंत बसून पुन: पुर्ववत् आपला क्रम चालू द्यावा व शाळेंतही खोडया करून पंतोजीच्या हातचा मार खावा. ह्या गोष्टीचा उल्लेख महाराजांनीं पुढें प्रसंगविशेषीं आपल्या ग्रंथांत दृष्टांतादाखल केलेला आहे. अशा खोडया वगैरे करण्याची व दोनही गुडघ्यांत मान घालून बसण्याची संवय मोडण्याकरितां पाटीलबोवानें यांना मारहाण करावी. महाराजांनीं मात्र उलट त्यांच्याविषयीं आदर बाळगून सर्व प्रकार निमुटपणें सहन करावा. मनांत त्यांच्याबद्दल प्रेम ठेवावा व त्यांना पितृवत् मानून ' कोणाचा मुलगा ' असें लोकांनीं विचारलें असतां बापाचें नांव न सांगता चुलत्याचें नांव सांगावें.

सापत्न आई तर या मुलास कसेंही करून दृष्टिआड करावयास पहात होती. चांदुरबाजार येथें रूपचंदजी म्हणून एक गुजराथी ब्राह्मण रहात असे. तो ज्योतिष वगैरे सांगत असे. त्याजकडून ' हा मुलगा मूळ नक्षत्रावर जन्मला आहे ह्मणून याला मानभावास देऊन टाका ' असें म्हणविण्याचा तिनें एक वेळ घाट आणला होता. रूपचंदजी भला मनुष्य होता. त्यानें भलतेंसलतें सांगण्याचें साफ नाकारलें व खरें होतें तें सांगितलें. या सरळ स्वभावामुळें व संस्कृत ग्रंथ वगैरे वाचण्याच्या अभिरुचीमुळें पुढें महाराजांचा व त्याचा चांगला परिचय जुळला.

दुसऱ्या एका वेळीं तिनें महाराजांस राजगिऱ्याचा लाडू खावयास

---

१ साधुबोध पृ० १७५ पहा. किंवा सुहृत्प्राप्ति प्रकरण पृ० ११५ पहा.

दिला होता. तो यांनीं आपल्या ताईस दाखविला. खाण्याची कोणतीही वस्तु असो ती ताईस दाखवून खाण्याचा यांचा स्वभाव होता. ताई म्हणाली स्नान करून शंकराचें दर्शन घेऊन नंतर खा. परंतु नंतर संशय घेण्यासारखें कांहीं कारण घडल्यामुळें महाराजांनीं तो लाडू खाल्ला नाहीं.

असा क्रम चालला असतां एके दिवशीं खेळतखेळत महाराज यदृच्छेनें सितारामजी भुयार यांच्या शेजारच्या घरीं गेले. तेथें सितारामजीची आई मैनाबाई आपल्या लहान नातीला घेऊन आली होती. ती म्हातारी महाराजांस विनोदानें म्हणाली, एका बुक्कीनें नारळ फोडशील तर ही पोरगी तुला देऊं. महाराजांनीं एका बुक्कीनें नारळ फोडले व म्हणाले आतां पिच्छा पुरवून पोरगी घेईन. याच मुलीशीं पुढें यांच्या लग्नाचा योग जुळून आला तो असाः—

वरील गोष्टीनंतर सुमारें दीड वर्षानें महाराजांचे तीर्थरूप गोंदुजी-बापू हे त्यांचें लग्न करण्याच्या विचारास लागले व वरील भुयाराची मुलगी त्यांनीं पसंत केली. रघुजीच्या मनांतून या मुलीची धाकटी बहीण पसंत करावयाची होती. परतु गोंदुजीचा आग्रह वडील बहिणीविषयींच पडला मुलीचे आईबापही वडील बहिणीच्या अगोदर धाकट्या बहिणीचें लग्न करण्यास कबूल नव्हते, म्हणून शेवटीं रघुजीनींही वडील मुलगीच पसंत केली. या मुलीचा बाप गणाजी भुयार म्हणून एक गरीब गृहस्थ होता. हा माधानापासून चार मैलांवर आखतवाड दत्तापूर येथील राहणारा. यांची संतती वांचत नसल्यामुळें यापुढें होणारें अपत्य पाळण्यांत घालून पूर्णा नदींत सोडण्याचा यांनीं नवस केला होता. पुढें ही मुलगी इ० स० १८८४ ता० २८ मार्च रोजीं शुक्रवारीं जन्मली. नवसाप्रमाणें हिला पाळण्यांत घालून पूर्णा नदींत सोडलें व पूर्णा असें नांव ठेविलें. ही मुलगी रंगानें काळसर असूनहि हिची आकृती मोठी पाणीदार व लोभसवाणी दिसे. मानकरबोवा म्हणून एक मानभाव महंत होता. त्यानें ही सहा महिन्यांची असतांना हिचा हात पाहून ही मोठी भाग्यवान् असून हिला पुढें चांगले दिवस येतील असें सांगितलें होतें.

शके १८१४ फाल्गुन वद्य ५ हा महाराजांचे लग्नाचा दिवस ठरला.

या दिवशीं भयंकर पर्जन्याची व गारांची वृष्टि होऊन
यांस बसण्यास देखील जागा राहिली नाहीं. शेवटीं जा
टाकून त्यांस बसवावें लागलें. वधूवरांच्या आंगावर पाऊ
त्यांच्या डोक्यावर सुपांचें आच्छादन धरावें लागलें. अ
दिवस निभावला. ह्या पावसाचें भाकीत महाराजांनीं
सांगून ठेविलें होतें.

लग्नाचे दिवशीं सोमवार होता म्हणून महाराजांनीं
दहींअनारसा खाल्ला नाहीं. न्हाण्याचे वेळीं उखाणा घ
गुरळा टाकणें वगैरे प्रकार योग्य रीतीनें व चतुराईनें
मंडळीच्या भोजनसमारंभांत महाराजांनीं श्लोक म्हणावे व
तीच्या वेळांत वागुल, अभंग, पदें वगैरे म्हणून सर्वां
बीद् काढावयाचे दिवशीं जावयानें रुसावयाचें असतें. पं
मागावयाचें आहे " असें म्हणून महाराज रुसले नाहींत.
समारंभ आटपला. मुलीचें नांव सौ. मनकर्णिकाबाई ठे

ग्रंथवाचनाची अभिरुची महाराजांची उत्तरोत्तर व
विद्याव्यासंग वाढत चालला तसतसे ग्रहणधारणादि[१] गु
प्रगट होऊं लागले. गांवांत लक्ष्मणभट जोशी, पांडुरंगपं
पांडे वगैरे जी चारदोन मंडळी साक्षर होती त्यांच्याज
होऊन मिळतील तितके ग्रंथ महाराज वाचून घेत. ग्रंथ
रितां काळ, वेळ, श्रम व द्रव्य यांची कांहींच पर्वा करूं
न कळत ताईनें ज्वारी, गहूं वगैरे यांच्या ओट्यांत घाल
देऊन पुस्तकें वाचून घ्यावीं. एक वेळ पांडुरंगपंताजवळून
व त्यांना हातांतील चांदीचें कडें काढून देऊन टाकलें.
तीर्थरूपांचे मित्र असल्यामुळें महाराज त्यांना काका म्ह
काका एकदां थंडीनें कुडकुडत होते तें पाहून यांनीं

---

१ शुश्रूषा श्रवणं चैव ग्रहणं धारणं तथा । ऊहापोहोऽर्थ
धीगुणाः ॥ हेमचंद्र.

त्यांना नेऊन दिली. कोणाजवळून थोडेंसेंहि कांहीं शिकले तरी त्याला गुरु म्हणून मोठेपणा द्यावा व त्यानें सांगितलें त्याहून जास्त म्हणून दाखवावें. विशेषेंकरून महादेवाच्या देवळांत लक्ष्मणभटाजवळ यांचें बसणें फार असे; त्यांच्याजवळून महिम्न वगैरे शिकले. त्यांनीं डोळे येण्याकरितां म्हणून यांना एक मंत्र सांगितला होता. तो इच्छा नसतांनाहीं यांनीं मोठ्या निष्ठेनें जपला. लक्ष्मणभटानें काशीखंड वाचून दाखवावा. महाराजांनीं त्याचा अर्थ सांगावा. आपल्याला पाठ येत असलेले श्लोक वगैरे गावांत महाराजांनीं लोकांजवळ म्हणून दाखवावे. हा मुलगा मोठा चपळ बुद्धीचा जाणून सर्व लोक प्रेम करीत. लोकांस एक-एक पैसा मागून यांनीं हरिविजय, पांडवप्रताव वगैरे ग्रंथ बोलाविले होते.

कोणाच्या घरीं दळण चाललें असलें म्हणजे महाराज तेथें जात, जात्यात मुठीनें जोंधळे भरीत व देवादिकांचीं गाणीं म्हणून त्यांना दळूं लागत. खेळतांना मुलांमुलींचीं लग्नें लाऊन आपण मंगळाष्टकें म्हणत.

दिवसा व रात्रीं हिंडण्याफिरण्याकरितां यांना कोणाचें साह्य लागत नसे. डोक्यावर पुस्तकांची पेटी घेऊन गांवांत व जवळच्या चांदूरबाजार वगैरे गांवांत वाटेल तिकडे बेधडक एकटें जावें यावें. स्वभावही फार खेळकर, स्वच्छंदी व विनोदी असे. चांदूरबाजार येथें रूपचंदजी म्हणून एक गुजराथी ब्राह्मण राहत असत. ह्यांना ज्योतिष वगैरे समजत असल्यामुळें माधान वगैरे गांवांतले लोक ह्यांच्याकडे मुहूर्त वगैरे विचारण्याला येत असत. ह्यांचा व महाराजांचा प्रेम जुळण्याचें कारण मागें आलेंच आहे. रूपचंदजी यांचे चिरंजीव कुर्याभाई हेही आपल्या पित्याजवळ ज्योतिष, संस्कृत वगैरेचा अभ्यास करीत असत. महाराजही ग्रंथपरिशीलन करण्याकरितां माधानाहून भलत्याच वेळीं रात्रींअपरात्रीं एकटेच यांच्या घरीं येत. बरोबर कोणीही नसे. कधीं कधीं कुर्याभाई निजले असतांना महाराजांनीं त्यांच्या दाराबाहेर उभें राहून विनोदानें भिकाऱ्यासारखें ओरडून भाकर वाढा म्हणावें; तें ऐकून कुर्याभाईंनीं दार उघडून महाराजांस घरांत घ्यावें.

या खेळकर व विनोदी स्वभावाला अंतर्निष्ठपणा, विदेही वृत्ति, द्वंद्व-सहिष्णुता इत्यादि गुणांचें साह्य उपजतच असल्यामुळें यांची चर्या मोठी विचित्र बनली होती. खाण्यापिण्याची बेपर्वा, भजनपूजनाची आवड, शास्त्रमर्यादेचें पालन, विद्येचा हव्यास, विनय व सौजन्य इत्यादि गोष्टी या बालमहात्म्याला खरोखरच शोभा आणीत होत्या. रात्रभर जागणें, अभंग-पदें वगैरे म्हणणें, झाडावर चढून भिनाईचें गाणें ऐकणें, एकदम उठून बाहेर वाटेल तिकडे जाणें, दोन्ही टोंगळ्यांच्या मध्यें मान घालून बसणें, मान व हात फिरविणें, वारंवार थुंकणें, उगीच ओरडणें इत्यादि प्रकारांचें मिश्रणही त्यांत मजेदार दिसे. पण हे प्रकार पाहून पाटील-बोवांना व गांवांतील अज्ञ लोकांना महाराजांचे ठिकाणीं वेडेपणाचा आभास होत असे. एके रात्रीं महाराज अभंग व पदें म्हणत असतां घरांत कांहीं वाजलें. महाराजांनीं कोण आहे असें मोठ्यानें विचार-तांच घरांत चोर शिरला होता तो पळून गेला. ते दिवशीं सरकारी साऱ्याचे रुपये घरांत होते ते वांचले.

गोंदुजी बापू व त्यांची मित्र मंडळी भिकाभाऊ, केशवरावकाका वगैरे यांचा रात्रौ भजनाचा नित्यक्रम असे. भिकाभाऊचें घर महाराजांच्या घराच्या अगदीं शेजारींच असे. एके दिवशीं भिकाभाऊ भजनाहून आले व निजून राहिले. ते वेळीं रात्रींचे १२ वाजले होते. कांहीं वेळानें भिका भाऊ उठून पाहतात तों गुलाबराव तोंडावर पांघरून घेऊन बसले आहेत. हाका मारल्या तरी बोलले नाहींत. नाकाजवळ हात नेऊन श्वास पाहिला तों श्वास बंद होता. तेव्हां घाबरले व चावडीवर जाऊन पाटीलबोवास जागें करून म्हणाले, गुलाबराव कसें करतो पहा. पाटीलबोवा दोनचार माणसें बरोबर घेऊन आले. हा अदृष्टपूर्व प्रकार पाहून पाटीलबोवाही घाबरले. कारण श्वास बंद होत असतो हें त्यांना हा वेळपर्यंत माहीत नव्हतेंसें दिसतें. बरोबर आलेल्या माणसांपैकीं एक दोघे म्हणूं लागले कीं धैर्य धरा व पाहात बसा. पहाटेचे सुमारे तीन चार वाजतां श्वास सुरू झाला. पाटीलबोवा रागावून म्हणाले "हें काय ढोंग मचविलें.?" महाराज कांहींच न बोलतां तेथून उठून गेले. दिवस उजाडल्यावर भिका

भाऊनें खुलासा विचारला असतां महाराज म्हणाले, मी रात्रीं प्राणायाम करीत असतो; तेव्हांपासून माडीवर जागा नेमून दिली.

इकडे महाराजांची असामान्य घटना पाहून व त्यांच्या गुणांस लुब्ध होऊन रामचंद्र व विश्राम मोहोड, तुकाराम मोहोड, बळीराम व यादो ठाकूर वगैरे तरुण मंडळी महाराजांचे खेळगडी बनले. सगळ्यांत रामचंद्रा प्रमुख होता. त्यांच्याबरोबर महाराजांनीं रात्रौ भजन करावें. कंठमाधुर्यही उत्तम होतें. केव्हां केव्हां फुगड्या, पिंगा वगैरे खेळ खेळावे व प्रसंगविशेषीं खेळगड्यांस माती कपाळास लावावयास सांगून हा बुक्का आहे म्हणावें. त्याला खरोखरच बुक्क्याचा सुवास येत असे. परंतु शेजारीं भिकाभाऊची आई पार्वतीबाई रहात असे. ती महाराजांस लेंकरू समजून शिव्या देत असे. तिच्या समक्ष एके दिवशीं महाराजांच्या सांगण्यावरून खेळणाऱ्या मुलांनीं कपाळास माती लावली व बुक्क्याचा सुवास येतो म्हणून सांगूं लागले. तेव्हां ती बाई संतापली व हें सगळें ढोंग आहे म्हणून महाराजांस शिव्या देऊं लागली. महाराजांनीं तिलाही कपाळास माती लावावयास सांगितलें. ती ऐकेना. व अधिकच शिव्या देऊं लागली. शेवटीं कांहीं मुलेंही संतापलीं व बाईस म्हणूं लागलीं कीं, तूं कपाळास माती लावून पहा व मग वाटेल तर शिव्या दे. तेव्हां तिनें कपाळास माती लावतांच उत्तम बुक्क्याचा सुगंध आला. तेव्हांपासून तिनें शिव्या देणें सोडून दिलें.

खेळगड्यांस बरोबर घेऊन महाराजांनीं कांहीं ढोंगी बायांचीं ढोंगें बाहेर काढलीं. माधानास एक बाई आगांत देव आणून घुमत असे. महाराज म्हणाले, तिच्या आंगास काचकुयरी लावा. काचकुयरी लावल्यावर तिचें ढोंग उघडकीस आलें. मग महाराजांनीं दोनदोन तास तिच्यासारखें घुमावें व तिची नक्कल करावी. तें पाहून लोकांना मौज वाटे.

यापूर्वी एक वेळ सापत्न आईबरोबर महाराज तरोड्यास गेले होते. तेथें जेवणाचे वेळीं कांहीं कारणावरून सापत्न मामा महाराजांचा छळ करून म्हणाले कीं, हा साधु आहे तर गोठ्यांत बसून शेण खाईल काय ! हें ऐकतांच महाराज उठले व गोठ्यांत जाऊन शेण भक्षण केलें. त्यावेळीं " तुझ्या घरीं शेंपूटही राहणार नाहीं " अशी महाराजांची शापवाणी

निघाली व तेथून माधानास परत आले. या वेळेस महाराज कविता करीत होते व या वेळेपासूनच त्यांना ज्ञानेश्वरनामस्मरणाचा छंद लागला. पुढें लवकरच सापत्न मामाच्या घरचीं सगळीं गुरेंमाणसें मेलीं व घराचा नाश झाला. माधानासही एकानें महाराजांच्या देवावरील गळती फोडल्या-मुळें " तुझें नुकसान होईल " असें महाराज त्याला म्हणाले. त्याप्रमाणें पुढें तिन्ह्ंयाच्या[1] बिमारींत त्याच्या घरचे सर्वजण मेले.

महाराजांच्या आंगीं हूडपणाही मोठा होता. घराजवळ एक मोठी विहीर होती व तींत एक मोठा भुजंग होता. त्या विहिरींत दगडाला धरून महाराजांनीं लोंबकळावें. एके दिवशीं त्याच विहिरींत पडून महाराजांचा हात मोडला. सुदैवानें भुजंग मात्र डसला नाहीं. यांची तितिक्षा एवढी जबर होती कीं, आंगांतील कपडयांत व गळ्याभोंवती असलेल्या दोऱ्यांत असंख्य लिचोड पडले होते तरी यांना त्यांची परवा नव्हती. ताईनें काढले तेव्हां म्हणाले कीं, हे मला डसत नाहींत कशाला काढले ? तसेंच निजावयाच्या बिछान्यांत ढेंकूण असले तरी तसेंच पडून रहावें उठूं नये.

शके १८१६ च्या फाल्गुनांत (इ० स० १८९५ च्या मार्च महिन्यांत) महाराज काकडा येथें मन्याजी मामाचे लग्नास गेले होते. ते वेळीं ते काकड्यास सुमारें दोनतीन महिने राहिले. महाराजांच्या आजीची (बाईची) बहीण एकदां गांवास जाऊं लागली. बाई म्हणाली, गुलाब्या कांहीं बोलूं नको. महाराज म्हणाले आज नाहीं गेली तर होणार नाहीं ? बाई म्हणाली जावो न जावो. तूं कांहीं बोलूं नको. महाराज ह्मणाले तिला आज नको जाऊं म्हणून सांग. गेली तर कांहीं तरी नुकसान होईल. हें म्हणणें कोणी ऐकलें नाहीं. म्हातारी गेली. रस्त्यानें गाडी उलटली व म्हातारीच्या पायाला जखम झाली. काकड्यास असतांना महाराज आखरावर शौचेकडे जात असत. सखु मांगीन त्यांना रस्ता दाखवीत असे. एके दिवशीं एका घराकडे बोट दाखऊन महाराज म्हणाले, इकडे एक घर पेट-

---

१ तीन दिवस येणारा ताप.

णार आहे.दुसऱ्याच दिवशीं तें घर पेटलें. सखु मांगीनचें घर जवळच होतें. शेजारची गवताची गंजी पेट घेतांच ती रडूं लागली. महाराज म्हणाले, तूं रडूं नको. झोंड्या पेटल्या तरी तुझें घर जळत नाहीं. तिचें घर जळालें नाहीं.

लग्नाच्या बिदेची हकीकत:—

बीद काढावयाचे दिवशीं नवऱ्यामुलास घरीं आणण्याची गडबड चालली होती. इकडे महाराजांचें जानवें तुटलें किंवा कोणी पोरानें तोडलें. महाराज बाईस म्हणाले, स्नानास पाणी दे. नवऱ्यामुलास घरीं आणण्याची व महाराजांस स्नानास पाणी देऊन जानवें घालण्याची गडबड एकत्र झाली. नंतर बीद निघणार म्हणून महाराजांस समजलें. महाराज म्हणाले, एका प्रहरानंतर बीद काढावयास बाईस सांगा. तिकडे कोणी लक्ष दिलें नाहीं. बीद निघाली. बंदुकीची दारू ज्या भांड्यांत होती त्यांत मशालीची ठिणगी पडून दारूचा भडका झाला, त्यांत दोन माणसें मेलीं. दुसरे दिवशीं सर्व वऱ्हाडी गांवोगांव गेले. ते दिवशीं सकाळीं महाराज म्हणाले, आज कोणी तरी विहिरींत पडणार आहे. पूर्व दिवशीं यांच्या बोलण्याचा प्रत्यय आल्यामुळें घरचीं माणसें घाबरलीं. महाराज म्हणाले, घाबरण्याचें कारण नाहीं. आपल्यापैकीं कोणी पडणार नाहीं. बाहेरचें माणूस पडेल व जीवंत निघेल. तेच दिवशीं तिसरे प्रहरीं चार वाजतां गोरल्याची पोरगी विहिरींत पडली. पण जीवंत निघाली. दुखापत अगदीं झाली नाहीं.

मन्याजीचे लग्नानंतर दहाबारा दिवसांनीं महाराज बाई व बाजीरावमामा यांजबरोबर लोणीस गेले व तेथून माधानास परत आले. घरगुती कामकाजाकडे महाराज लक्ष देत नसल्यामुळें पाटीलबोवा नेहमीं जळफळ करीत, नाना प्रकारें बोलत व महाराजांस मारीत. एक वेळ महाराज जेवायला बसले व देवाच्या नैवेद्याकरितां पुरणाची पोळी मागितली. पाटीलबोवा संतापले व लत्ताप्रहार केला. महाराजांनीं तेव्हांपासून उदास वृत्ति धारण केली. कोणाच्याहि ओट्यावर, नाहीं तर झाडाखालींच पडून रहावें. घरची दिशा पाहूं नये. दोन अडीच महिनेपर्यंत हिंगण-

बेटाचा गीर खाऊन राहिले. पुढें निंबाचा पाला खाऊन रहावें
वाटलें तर काशीबाईच्या घरीं जेवावें. मागितल्याबरोबर मिळालें
तर जेवूं नये. स्वच्छंदपणानें वागावें. एके दिवशीं बाळिराम भाट
घरापुढें गाडीवरच रात्रभर बसून राहिले. दिवस निघून पाहिलें तर
लेच होते.

" लहानबाबा ( महाराजांचे मातामह ) विहिरींत पडून किंवा
डसून मरतील. " असें एक भविष्य महाराजांनीं मागें लोणीस अस
' बाई ' जवळ सांगितलें होतें. तो प्रसंग आतां घडून आला.
राजांचे राजारामजी मामा यांची एक गया नांवाची मुलगी आहे. तिचें
जुळलें होतें. लग्नाला दहा दिवस असतां महाराजांचे आजे (लहानबा
हे अकस्मात विहिरींत पडून मरण पावले. इकडे महाराजांस अन्न
लागत नसे. वारंवार लोणीस जाण्याची आठवण काढीत. तशांत
गयाच्या लग्नाचें बोलावणेंहि आलें होतें. परंतु लहान वय असल्या
महाराजांची गोष्ट कोणी मनावर घेईना. गोंदुजीबापू व तुकारामजी य
तर महाराजांस लोणीस जाऊं देण्याची अगदींच इच्छा नव्हती. शे
महाराजांची फार उत्कंठा पाहून पाटीलबोवानें (रघुजीनें) त्यांस गाडी
देऊन लोणीस रवाना केलें. महाराजांस पहातांच ' बाई ' रडा
लागली. तेव्हां झालेला सर्व प्रकार महाराजांच्या ल
आला. पुढें १५ दिवसांनंतर गयाचें लग्न झालें. त्यानं
राजारामजीचा भाचा वामन याचें लग्न जुळलें, तेव्हां महाराज ब
जवळ हळूच म्हणाले, लग्नाहून येतांना नवरा मरेल किंवा तीन महिन्यां
आंत तीन जीव जातील. पण ही गोष्ट तूं कोणाला कळवूं नकोस. म्ह
तील कीं लग्नाला मोडा घातला. पुढें लग्नानंतर तीन महिन्यांत घर
तीन माणसें मेलीं.

महाराजांच्या आजोळच्या सगळीं माणसें मानभावाचीं अनुयायी हो
हें मागें सांगितलेंच आहे. त्या वेळीं महाराज लोणीस असतां
कारंजकरबोवा म्हणून मानभावांचे महंत तेथें आले होते. हे वयो
असून पूर्वाश्रमांत चांगले विद्वान ब्राह्मण होते. महाराजांनीं धर्मजिज्ञासे

ा मंत्र घेतला व मानभावांचा नवप्रकरण नांवाचा ग्रंथ दोन दिव-
ांत पाठ केला. गुरूला भिंगारकरी टीकेवरून गीतेचे दोन चार अर्थ
न दाखविले. सामवेदांतला कांहीं भाग म्हणून दाखविला व नाकांतून
ाचे सूर काढले. ही अद्वितीय मेधा पाहून कारंजकरबोवांना फार
तोष वाटला हें निराळें सांगावयास नकोच. ह्या वेळीं महाराजांचें वय
रें तेरा वर्षांचें होतें.

ह्याच वेळीं महाराजांनीं ख्रिस्ती धर्माचें एक पुस्तक पाद्री लोकांजवळून
वा रुपयाला विकत घेतलें होतें. यावरून त्यांची सर्व धर्मांचे ठिकाणीं
मानबुद्धि ठेवण्याची प्रवृत्ति पहिलेपासून दिसून येते.

इकडे माधानला महाराजांनीं मानभावाचा मंत्र घेतल्याची गोष्ट सम-
जली. पाटीलबोवा वगैरे सगळीं घरचीं माणसें मानभाव मताच्या पहिले-
पासूनच विरुद्ध. त्यांना हें खपलें नाहीं. लोणीच्या मंडळीवरहि त्यांचा
रोष झाला व पाटीलबोवा रागानें महाराजांस माधानास घेऊन आले.
महाराजांनीं येतांना मानभावाचे देव वगैरे बरोबर आणले होते व
मानभावाच्या मंत्राचा जप, त्यांच्या शास्त्राचें अध्ययन, हरिविजय ग्रंथाचें
श्रवण वगैरे मोठ्या निष्ठेनें चालू ठेवलें. बेडूक, सर्प वगैरे फिरत असत
अशा ठिकाणीं बसून पंधरापंधरा गाठ्या महाराज जपत असत. परंतु
पुढें बुद्धीला चूक दिसून आल्यामुळें एकट्या महाराजांनींच ह्या मताचा
मोड केला ती हकीकत पुढें येईल.

इकडे महाराजांच्या स्वच्छंदी वर्तनास आळा घालण्याविषयीं पाटील-
बोवांची खटपट चाललीच होती. सुमारें दीड वर्षापूर्वी माधानच्या
शाळेवर रामराव बळवंत म्हणून एक सुशील व सत्वस्थ गृहस्थ मास्तर
होऊन आले होते. त्यांच्याकडे एके दिवशीं पाटीलबोवा महाराजांस घेऊन
गेले व कांहीं तोंडी हिशेब, पाढे वगैरे शिकवा म्हणून म्हणाले. रामरा-
वांनीं महाराजांस कांहीं तोंडी हिशेब सांगितले ते यांनीं तेव्हांच पाठ
म्हणून दाखविले व आणखी सांगा म्हणाले. याप्रमाणें दोनतीन वेळ
झालें तेव्हां इतर मुलांचा खोळंबा होऊं नये म्हणून आज इतकेंच पुरें,
उद्यां आणखी सांगूं असें रामराव म्हणाले. दुसरे दिवशीं मोठ्या सका-

ळींच महाराज रामरावांकडे जाऊन तोंडी हिशेब शिकवा असें म्हणूं लागले. इतका तत्पर विद्यार्थी पाहून रामरावांसही संतोष वाटला व त्यांनीं तोंडी हिशेब, पाढे वगैरे महाराजांस शिकविले व त्यांच्या इच्छे-प्रमाणें शद्धरूपावळीही सांगितली. सांगितलेल्या सर्व गोष्टी एकदोन दिव-सांतच पाठ करून मग 'लघुव्याकरण' सांगण्याविषयीं महाराजांचा तगादा सुरू झाला. लघुव्याकरणासही आरंभ झाला. कांहीं नियम सांगि-तले कीं यांनीं ते तोंडपाठ म्हणून दाखवावे. ही असामान्य प्रज्ञा पाहून हा अवतारी पुरुष आहे असें रामरावांस वाटलें व लोभ जडला. महारा-जाहि त्यांच्या घरीं जाऊंयेऊं लागले.

असा क्रम चालला असतां इ० स० १८९७ चा मार्च महिना आला. या महिन्यांत गांवांत महामारीची सांथ येऊन लोक मरूं लागले. तिचा प्रवेश पाटीलबोवांच्या घरीं होऊन ८ तारखेस [illegible]राजांच्या सुखाची सावली सारजाताई निजधामास गेल्या. दुसरे दिवशीं सौ० मन-करणिका आई (महाराजांची पत्नि) बिमार झाली. ती तीन दिवस-पर्यंत तशीच राहिली. बाराव्या तारखेस महाराजांचे तीर्थरूप गोंदूजी बापू बिमार झाले व त्याच दिवशीं संपले. सौ० मनकरणिका आई दुरुस्त झाली.

गृहस्थिति आतां अधिक विस्कळित होत चालली. ती सुधारण्या-विषयीं महाराजांची प्रबळ इच्छा होती. परंतु सापत्नमातेचा मत्सर, पाटीलबोवांचा रोष व महाराजांचें लहान वय ह्या गोष्टी त्या इच्छेच्या आड येत होत्या. महादेवाच्या देवळांत लक्ष्मणभट्टजीकडे जाऊन बस-ण्याचा महाराजांचा क्रम होताच. तेथें एके दिवशीं पाटीलबोवानें घरीं आणून ठेवलेला ४० तोळे सोमल आणून महाराजांनीं भक्षण केला व निश्चेष्ट पडले. रामचंद्रबापूस ही गोष्ट कळल्यावर महाराजांस ते आपल्या माडीवर घेऊन गेले. पाटीलबोवासहि ही गोष्ट कळतांच ते रामचंद्र-बापूचे माडीवर आले व रात्रभर महाराजांजवळ जागत बसले. पहाटेचे चार वाजतां महाराजांनीं तूप प्यावयास मागितलें, व तूप पाजल्यानंतर महाराजांनीं कड परतला. पाटीलबोवा म्हणाले, एवढ्या अनर्थातून हा

चला त्याअर्थी हा सामान्य मनुष्य नव्हे. तेव्हांपासून पाटीलबोवा महा- जांस वाटेल तसें वागूं देत. सोमलाच्या भक्षणानें महाराजांस दाह फार त्यामुळें दोनदोन गुंड पाणी ते पीत असत.

रामराव मास्तरच्या येथें महाराजांचें जाणेयेणें आतां वारंवार होऊं गलें. रामरावांची पत्निही फार सुशील व साध्वी होती. एके दिवशीं ला रामराव म्हणाले, आपल्यास पुत्र नाहीं तर याच मुलास आपण पुत्र नल्यास काय हरकत आहे ? हा मुलगा मोठा लोकोत्तर दिसतो. हा आपल्या घरीं आला म्हणजे त्याच्या खाण्यापिण्याची चांगली व्यवस्था ठेवा. व तो जें मागेल तें त्याला करून देत जा. तेव्हांपासून उभयतांचा महा- राजांवर प्रेम जडला, महाराजहि रामरावांस ' तात ' व त्यांच्या पत्नीस ' आई ' म्हणूं लागले.

महाराजांची हरिहरोपासना आतां विशेष प्रादुर्भूत झाली होती. एकादशी, सोमवार तर पूर्वीपासून करीत होतेच. आतां माघवद्यांतील शिवरात्रीचे उपवास व श्रावणवद्यांतील श्रीकृष्णजन्माष्टमीचे उपवास वगैरे करूं लागले. शिवाराधन व श्रीकृष्णलीला यथासांग करण्याजोगा पुराण- प्रसिद्ध प्रदेशहि जवळच दोन मैलांवर देऊरवाड येथें होता. आसमंतांतील अपर जान्हवीच अशा पयोष्णीचा प्रवाह, नृसिंहमंदीर, सोमतीर्थ सिद्धेश्व- रादि स्थानें, जवळ दिसणारी विंध्यपर्वताची ओळ, भैरवाचा पहाड, काशीतलाव, इत्यादि निसर्गसिद्ध गोष्टींनीं त्याला शोभा आणली होती. व आतां सारखा, सामान्य जनतेच्या पायरवानें तेवेळीं तो रुळलेला नसल्यामुळें प्रतितपोवनच बनला होता. त्याठिकाणीं रात्रौ महाराजांनीं कधीं एकटें व कधीं रामचंद्रबापूस बरोबर घेऊन जावें, पूर्णवर धौति- बस्ति क्रिया कराव्या, व एकांतांत योगाचीं आसनें करावीं किंवा समाधी- सुखाचा अनुभव घ्यावा, अथवा स्तुतिस्तोत्रादिक म्हणावे किंवा सुस्वर कंठानें भजन करावें. केव्हां केव्हां इतर खेळगड्यांसहि महाराजांनीं बरो- बर न्यावें, 'एको' Echo म्हणावे, फुगड्या पिंगा वगैरे खेळ खेळावे, धरून सिदोऱ्या बोलवाव्या व काला वगैरे करावा.

महाराजांबरोबर फुगड्या किंवा पिंगा खेळणें ही सामान्य शक्तीची

गोष्ट नव्हती. खेळ प्रहर प्रहर सारखा चालत असे. व मध्यंतरीं महाराज हात सोडीत नसत. त्यामुळें जोडीदार थकून जाई. अशीं चाळीस चाळीस माणसें खेळतांना बसून जात. असो. याच सुमारास मानभाव शंकराची निंदा करून शंकर नपुंसक आहे असें म्हणत होते. महाराजांनीं त्यांचे सगळे ग्रंथ पाहिले व वादपूर्वक शंका घेऊन रामचंद्राच्या साह्यानें विषय लिहून काढला. त्याचें उत्तर मानभावांस देतां येत नसे. हा विषय पुढें पत्रांत येणार असल्यामुळें येथें त्याची पुनरुक्ति करीत नाहीं. याप्रमाणें मानभाव मताचें खंडन केल्यामुळें त्यांच्या विरुद्ध असलेले लोक महाराजांवर प्रेम करून त्यांची चिंता बाळगूं लागले.

वरील प्रसंगास महाराजांनीं कांहीं अभंगही केले होते. ते परवाच्या चैत्रांत ( शके १८३५ इ० स० १९१३ ) महाराज माधानला असतांना एका मनुष्यानें त्यांना सहज म्हणून दाखविले. ते पुढें मागें कोणी प्रमाण समजून फसूं नये म्हणून महाराजांनीं त्याच वेळीं त्यांवर एक यथार्थ अभिप्रायद्योतक सुचना लिहून ठेविली आहे ती अशीः—

" माधानचे माहादू काका जात मराठी न्हावी यांचे जवळ जे अभंग लिहून दिले आहेत ते मीं आपल्या वयाच्या पंधराव्या वर्षी केले होते. आनंद मार्गाचे त्वेपावरही एक अभंग त्यांत आहे. लहान असल्यामुळें त्या वेळीं मला कोणी कवी समजणार नाहीं म्हणून त्यांवर ज्ञानदेव, तुकाराम इत्यादिकांची छाप घातलेली आहे. ते अभंग असेः—

अभंग १ आधारीं त्या चार मातृका असती । देव गणपती स्थापियेला ॥ १ ॥ स्वाधिष्ठान चक्रीं मातृका त्या सहा । ब्रह्मदेव पहा तेथें असे ॥ २ ॥ मणिपूरावर लक्ष्मीचा पति । मातृका गणती दाहा तेथ ॥ ३ ॥ अनाहत चक्रीं ( कुणबाऊ पाठ—अनुहात ) वसे शूळपाणी । ( कु० पा० रुद्र तमोगुणी ) बारा होती स्थानीं मातृका त्या ॥ ४ ॥ विशुद्धीच्या खुणा सांगतों मी आतां । मातृका मोजतां सोळा होती ॥ ५ ॥ आज्ञा चक्रीं पाही मातृका त्या दोन । सांगितली खुण ज्ञानेश्वरें ॥ ६ ॥

अभंग २ आधार कमळीं (कु० पा० आधार चक्रीं) जप तो साहाशें।
धिष्ठानीं असे सहा हजार ॥ १ ॥

टीप—कुणबाऊ भाषेंत साहजार असें होतें. सहासहस्र तो मणिपूरीं पाहे।
ग्राणिक साहजार मणीपुरीं पाहे कुण० पाठ ) तितुकाची आहे अनाहतीं
२ ॥ ( अनुहात कु० पा० ) विशुद्धीचा जप सहस्र तो एक । आज्ञाचक्रीं
त्र द्विसहस्र ॥ ३ ॥ ( दोन हजार कु० पा० 'दोन हजार' कुणबी भाषेंत
ालीवर म्हणतां येते.) ज्ञानदेवपायीं सर्व हा पसारा। पाहे गुरुपुत्रा याच
हीं ॥ ४ ॥ ( देहावरी कु० पा० )

पुढील अभंगांत चुक्या अतीशय आहेत. पण त्या दुसऱ्याच्या
ग्रंथांतून भाषांतर करून हा अभंग म्हणणाऱ्याच्या आवडीसाठीं केल्या
आहेत:—

अभंग ३ आधारींची मुद्रा जाणावी खेचरी। पहावी भूचरी स्वाधि-
ष्ठानीं ॥ १ ॥ माणिपूरावर मुद्रा चराचरी । वसे अगोचरी अनाहतीं
॥ २ ॥ ( अनुहात कु० पा० ) विशुद्धीची मुद्रा अलक्ष्य देखावी (ओळ-
खावी. कु० पा०) असे स्वानुभवी आज्ञाचक्रीं ॥३॥ ज्ञानेश्वर कृपे आहे
किंवा नाहीं। शोधूनीयां पाहीं गुरुपुत्रा ॥४॥

टीप—स्वानुभवी नांवाची मुद्राच नाहीं. मुद्रा पांचच आहेत आणि त्या
एकाच ठिकाणीं करतां येतात. पण एका पायरीवर एक कांहीं तरी असलें पाहिजे
असें मूर्खपणाचें अनुमान करून एका एका चक्रावर त्या मुद्रा ग्रंथकारानें बस-
विल्या आहेत. या ग्रंथाचें नांव अभिलाख सागर. हा ग्रंथ उदासीकृत आहे.
पाखंडी आहे. चुकलेला आहे. हिंदुस्थानी भाषेंत आहे. माझे पुस्तकाल्यांत
आहे. ग्रंथकर्त्यास अनुभवही नाहीं. असें असूनही मी जो हा अभंग जोडून दिला
होता तो म्हणणाऱ्याला वाद करण्यासाठीं जोडून दिला होता. यावर एकनाथांची
छाप घातली होती. ती बदलून आतां तातांची घातली आहे. पण हा अभंग
माझ्या समोर किंवा माझ्या मागें कोणी प्रमाण समजूं नये.छापहीं विल्यच घातली
आहे. " ज्ञानेश्वर कृपे आहे किंवा नाहीं। शोधूनीयां पाही गुरुपुत्रा ॥ "

आनंद मार्गावर कडी करण्यासाठीं Idealistic non-booking

च
य
तो

पर्यंतरी महाराज दत्तात्रेय कृष्णाचें स्मरण करतो हें सिद्ध करण्याकरितां चाळीस लिहून दिला होता. ह्यांत अत्यंत विप्रलिप्सा आहे. पण तें शंकराची आहे. कारण आनंद मार्गांत भयंकर विप्रलिप्सा आहेत. त्यांचे अभंग ' वर्क्स ' मध्यें न आणतां वर्किंग चरित्रांत घ्यावा. विषय संवाद वगैरे खरा नाहीं. आनंद मार्गीयांना हा अभंग कबूल आहे तथापि छाप त्यांना आवडत नाहीं. ते म्हणतात कीं आमचेकडील माणसाची छाप असावी. हें महादकाका सांगतात. तो अभंग हाः—

यदूराजा म्हणे दत्तात्रयाप्रती । सांगा मजप्रती गुह्यज्ञान ॥ १ ॥ सत्य वस्तूचीया दावा मज खुणा । त्यानें माझ्या मना होईल शांती ॥ २ ॥ धन्य धन्य राया पुसीला प्रकार । सांगतो निर्धार एकाचित्तें ॥ ३ ॥ तुका म्हणे ऐसें दत्तात्रय बोलती । अजरामर सिद्धांतीं जाऊनि पाहे ॥ ४ ॥

' अजरामर ' यावर टीपः—

अजरामर सिद्धांत हा आनंद मार्गाचा एक ग्रंथ असून त्याचा प्रति-आयडियल विप्रलिप्सात्मक अशुद्ध संस्कृत ग्रंथ मी लिहिला होता. तो बाळिराम भाऊ ठाकूर यांच्या हातानें ब्राह्मणवाड्याच्या माधवरावानें ठेवून घेतला. पुन्हा दिला नाहीं. याप्रमाणेंच वरखेडाहून आलेली माझी जुनी उपनिषदाची लिखित वही करसगांवच्या गणपतराव मालक-कारानें मागून नेली. अझून दिली नाहीं. आणखी एक गोष्ट लक्ष्यांत ठेवावी. मानभाव लोकांनीं आपलें अन्यव्यावृत्ति प्रकरण संस्कृत करून वज्रसूचि उपनिषदांत घुसडून दिलें आहे. ते श्लोक छापील प्रतींत नाहींत. श्लोक व्याकरणानें अशुद्ध आहेत, ते त्या लिखित वहींत होते. आणखीही कोठें मानभावाचे लिखित वज्रसूचि उपनिषदांत सांपडतील. या उपनिषदांत जातीची निंदा असल्यामुळें मानभाव याला जवळ ठेवीत असतात. आणि त्यांत त्यांच्या शास्त्राचे केलेले श्लोकही घुसडलेले असतात. ते श्लोक येणेप्रमाणें:—

कर्मयोनी देवयोनी अंतरालं सुरालयं । सत्य वैकुंठ कैलासं क्षिरा

भैरवस्तथा ।। विश्वरूपंच चैतन्यं एतन्मायास्वरूपकम् । मायापरं भवे-
द्ब्रह्म तत्परं केवलं विभु ।।

ब्रह्माच्या पलीकडे कांहीं नाहीं हा सर्व उपनिषदांचा सिद्धांत असून
येथें भलतेंच सांगितलें आहे ह्मणून व मला माहीत असल्यामुळें येथें
क्षेपकवाद मी निर्धास्तपणें अंगीकार करतों. याचप्रमाणें " साजन
मजवर रुसून गेला हा जीव झाला वारा " इत्यादि पदें त्यांनीं आपल्या
शास्त्राप्रमाणें रचून त्यांवर सनातन कवींचीं नांवें प्रसिद्ध होण्यासाठीं
टाकलीं आहेत. अशींच चुकी आनंदमार्गाचेंहि हातानें झालीं आहे.
आणि कित्येक लोकांनीं तर तुकारामाचे अभंग घेऊन आपलीं नांवें
टाकलीं आहेत. तेव्हां या भयंकर प्रमादांत कोणी फसूं नये. "

उपनिषदासारख्या गहन विषयांत अकुंठित वावरणारी विशाल बुद्धि-
त्ता जवळ असूनहि मोठेपणाच्या वृत्तीचा या बालबृहस्पतीला स्पर्शही
ला नाहीं. बालवृत्तीची याला मोठी आवड. धावणें, पळणें,
रिडणें, कोयाळ भिंगरी खेळणें, फुगड्या पिंगा खेळणें इ० प्रकार
लूच होते. धर्मजिज्ञासेनें कोणत्याहि धर्माचीं व पंथाचीं मतें समजून
याचा महाराजांचा क्रमहि चालूच होता. त्यांतल्या चांगल्या गोष्टींचें
क अनुकरण करीत असले तर हरकत न घेतां वेदबाह्य गोष्टींचें मात्र
हाराजांनीं खंडण करीत चालावें. एकनाथपंत बाराहाते म्हणुन एक
आँसाफिष्ठ ब्राह्मणवाड्यास मास्तर होते. त्यांच्याशीं संभाषण करून
राजांनीं शंका प्रतिशंका कराव्या. व योगशास्त्र विषयक चर्चा करावी.
दूर बाजार येथील कुर्याभाई हे द्वैतवादी होते. त्यांस परमामृत,
दशी वगैरे सांगून महाराजांनीं अद्वैतमतांत आणलें. ' अमोघ
रूपण ' म्हणून जें प्रणवात्मक प्रकरण सूक्तिरत्नावलीच्या द्वितीय यष्टींत
लें आहे तेंहि याच वेळीं महाराजांनीं लिहून काढलें.

खेडवळ लोकांना सुधारण्याचा महाराजांचा प्रयत्नहि मधून मधून
चालूच होता. त्यांस वेदान्ताची कल्पना देण्याकरितां महाराजांनीं
ळीं " ब्रह्मसत्यं जगन्मिथ्या " ह्या विषयावर एक निबंध लिहिला होता
असा:—

हरिः ॐ तत्सत् श्रीगुरुज्ञानेश्वरप्रभु सच्चिदानंद सद्गुरवेनमः

हे सभासद मायबापांनों, आपण बुद्धिदायक होऊन हा लेख शे न्याल अशी आशा जाणून हा वेडावाकडा निबंध आपणासमोर म आहीं, त्याचे यशस्वी तुमचे तुम्हींच आहांत. आतां ' ब्रह्मसत्यं ' विवरण. सत्य म्हणजे नियमित. तें असेः—तिन्ही कालांचे ठायीं लेलें असून अक्षयीं असणारें सत्य हेंच ब्रह्म होय. परंतु त्याकडे लक्ष न देतां जगांतील अनियमित वस्तूंकडे जाऊन हें माझें माझी दारा, हें माझें शेत, त्यांकडे वळतो. परंतु हें माझें माझें म्हण असा विचार करीत नाहीं कीं हा माझा देह नियमित का अनियमि नियमित म्हणावा तर हा देह मातृगर्भात धारण होऊन जन्म दिवसेदिवस वाढ घेऊन शेवटीं वार्धक्याहि प्राप्त होते. असें हें त्मक शरीर तो माझें माझें म्हणत आहे. पण तें शरीरच वार्धक्य अनियमित ठरत आहे. तर जगांतील जेवढ्या वस्तु तेवढ्या निय कशावरून ? त्याहि अनियमितच होत. तसेंच वस्तूंचे नाम. हें पहा. जन्मतांच नाम ठेवतात. तें नाम घेतल्याबरोबर त्याचे मन हाक मारल्याची प्रवृत्ति होऊन 'ओ' देण्यास तयार असतो. तसेंच वर्षांनीं दुसरें नाम ठेविलें असतां मग त्या नामाची मनावर प्रवृत्ति हो ' ओ ' देत असतो व पहिल्या नामाचा विसर पडतो. म्हणून हें सत्य मानतां येत नाहीं. जर आपलें नांवच आपणास सत्य मानतां नाहीं तर जगांतील वस्तूंचीं नांवें तरी सत्य कशीं मानावीं ? मानतां नाहींत. म्हणून जगत् हें मिथ्या आहे. तर मिथ्या अगर अनियमित कडे लक्ष न देतां सत्य वस्तूकडे लक्ष द्यावें. सत्य वस्तूकडे लक्ष असतां आपण या भवसमुद्रांतून पार पडूं व जन्म घेतल्याचें सार्थ होईल. म्हणून सर्वांनीं गुरूला शरण जाऊन आज्ञा पाळून व वचना विश्वास ठेवून सत्य वस्तुविषयीं विचार विचारून त्याप्रमाणें वागावें. आपणाकडून झाल्यास दुसऱ्याचींही मनें वळवून सत्य वस्तूकडे लावा तेणेंकरून जनाला बोध होऊन परमार्थही घडण्याचा संभव आहे. हा लेख आपण बुद्धि देऊन मज अज्ञानाकडून करविला व तुमचा तुम्ही

झांत माझी बुद्धि ती कोणती ? ती तुमचीच होय. वेडा-
हला । परी तुमचा म्हणविला ॥ या अज्ञान बालकानें आपणा-
हा लेख ठेविला त्यांत वाक्यांच्या व अशुद्धांच्या व भलतेंच
पर्याच्या चुक्या पुष्कळच आहेत. हें कांहीं लिहिणें नको.
कधीं निबंध लिहिला नाहीं मग चुक्या असणारच.

ॐतत्सत श्रीगुरु ज्ञानेश्वरप्रभु सद्गुरुनाथार्पणमस्तु.

स गोपाळदास म्हणून एक बैरागी आहेत. त्यांचा अलीकडे
अनुग्रह घेऊन वारंवार त्यांच्या दर्शनार्थ जऊं लागले. व
या नवीन कवितांवर गोपाळदासांचा छाप देऊं लागले.

त्रय.पासून तों बायकांच्या पुशा आदित्यवाराच्या कहाण्या-
मगायनापासून तों शाहीरांच्या डफगाण्यापर्यंत महाराजांची
रखीच रंगत असे व शुद्धभाव, शुद्ध आचरण, वैराग्याचा
प्रमाची चटक, इत्यादि गोष्टींनीं त्या रंगेलपणाला भारदस्त-
दुसऱ्याच्या मनावर त्यांची छाप बसत असे. महाराजांची
र्तिही विलक्षण होती व अभंग, पदें, गाणीं वगैरे वेळोवेळीं
दिक वाणींतून निघत असत. कवितांवर छाप बहुतेक ज्ञाने-
रांचा असे. यावेळचे महाराजांचे दोन अभंग सांपडले आहेत.

तो ब्रह्मजिज्ञासा " या ब्रह्मसूत्रावरील अभंगः—विवेक वैराग्य
र । मोक्षइच्छासंग चतुर्थक ॥ १ ऐसीं चारी जेणें साधिलीं
तें वदणें अधिकारी ॥२॥ अधिकार पूर्ण आलियानंतर । ब्रह्म-
र्णे लागे ॥३॥ प्रयोजन हेतु कैवल्याची ठेव । स्वामी ज्ञानदेव

" जन्माद्यस्य यतः " यावर अभंग टीकाः—

उत्पत्ति स्थिति लय तिन्ही । होती ज्यापासूनि तेंचि ब्रह्म ॥ १॥
भृगूपनिषदीं । श्रुती अनुवादी होंचि तत्व ॥ २ ॥ ब्रह्म तें
सर्व जग । चैतन्य सुढग एकाएक ॥ ३ ॥ जाणुनी तयातें

हरी सर्व कामा । तरी आत्मारामा पावशील ॥ ४ ॥ जीवन्मुक्तिसु अद्वैतीं स्वानंद । ज्ञानदेवबोध गुरुमूर्ति ॥ ५ ॥

वऱ्हाडी भाषेंतही महाराजांनीं यावेळीं केलेली कांहीं कविता हो ती आतां सांपडत नाहीं. देवळांत लक्ष्मण भट्टजी जवळ बसण्याचा यां क्रम सुरूच होता. भट्टजींची इच्छा असल्यास फुरसतीच्या वेळांत मा राजांनीं त्यांना लावण्या म्हणून दाखवाव्या. पाटीलबोवांना हें आवडत न ते संतापून महाराजांस शिव्या देत. एक वेळ लक्ष्मण भट्टजींच्या आग्र वरून महाराजांनीं नवीन लावणी करून म्हटली व पाटीलबोवां भीतीनें शेवटील कडव्यांत अनंतफंदीचें नांव मोठ्या खुबीनें भासवि या लावणींत भगवत्प्रेमाच्या वियोगोपलालन दशेचें किंवा विरह दशे वर्णन आहे. ती लावणी अशीः—

सखुबाई मजविषयीं कसे कोपले गडे नारायण । चातकापरी स सखयाकडे रात्रंदिन ॥ जसा वाळुवरी मासा तळमळ करितो उदकाविण तशी गत मजला झाली कधीं भेटल गडे मनमोहन ॥चाल॥ सखयावांच जीव झाला पिसा । कधींरे भेटशील सख्या राजसा । नेत्रांतुनि अश्रु व पसपसा । धरणीवर लोळेरे ढसढसां ॥ टीप ॥ असा कसा वनवास म त्वां दिधला हो श्रीहरी । दुःखसागरामधें बुडाली बाई मी ग सर्वोपरी सखा नव्हे दुसमान होता पूर्वीचा दावेकरी । सण वर्षाचा नागपंच कां नाहीं आला घरीं ॥ १ ॥ सखुबाई मजला आतां ग धीर नाहीं धरव कोठवरी दम सोसावेग झाले दुःखाचे पर्वत । प्राणसख्याला कशी माझी पडली नाहीं मुरवत । रात्रंदिवस जैसा प्राणाला हा करवत ॥ चाल बाई मी झाली हो क्लेशांकित । हरणी पाडस चुके तद्वत । सखया कोणि कराना श्रुत । कांता मी तुमची हो असे भयभित ॥टीप॥ असें का जाउन सांगा देउनियां खबरी । असें वाटतें मला कीं जाऊन बस पंढरपुरीं ॥ सखा० ॥ २ ॥ तुझे स्मरणें वारंवार मन झालें ग चंचव जसा कोणाचा पैसा हारपतो मन होतें वीकळ । तशी गत मजला झा कधीं भेटल हा घननीळ । असें वाटतें मला कीं सखयाचे तुटलेसे त ॥ चाल ॥ मजला निजध्यास अवघा वेळ । सखयाची सय होते पळपळ

सखयाला कोणि धाडाना मुळ । मजला ठाऊक नाहीं ग याचें स्थळ ॥ टीप ॥ अशी सुंदरा हळहळीत उभी राहुन बंगल्यावरी । असें वाटतें मला कीं आतां उरीं मारावी ग सुरी ॥ सखा नव्हे ० ॥ ३ ॥ चिंताग्रस्त व्रत नारीनें देवावर भार घातला कसा । दृष्टि देखिला सखा तेव्हां नारीसी आला भरंवसा । पंचारती करून ववाळू मग आपुले हो राजसा । तिचा निश्चय हरिपायीं तिजला नें पावल कसा ॥ चाल ॥ जडो सुखशयनीं प्राणेश्वर । सुटले मग प्रेमाचे हो पाझर । तेव्हां ते अबला झाली स्थिर । सखयासंगें लोळावें क्षणभर ॥ टीप ॥ नागपुरीं छंद करी फंदी अनंत संगमतिरीं । पेशव्यानें पोशाख दिल्हा पुण्यामधीं भरजरी ॥ ४ ॥

महाराजांची सर्वज्ञता जसजशी दिसूं लागली तसतशी कांहीं मंडळीची जिज्ञासाही वाढत चालली. टाकळखेडचा एक गृहस्थ महाराजांजवळ नेत्रयोग शिकण्यासाठीं राहत असे. तो म्हणे हे वाटेल तसे चमत्कार दाखवितात. त्यामुळें रामचंद्रबापूसही योगजिज्ञासा उत्पन्न होऊन ते महाराजांजवळ पातंजल योग शिकूं लागले. सखाराम आपा वैद्यकी शिकूं लागले. वैद्यकीची एक पेटीच महाराजांनीं केली होती. लावण्या वगैरे शिकण्याकरितांही कांहीं मंडळी येत होती.

रामराव मास्तरचा व महाराजांचा घरोबा अधिकाधिक वाढत चालला. त्यांच्या घरीं जाऊन महाराजांनीं वृंदावन सारवून द्यावें, अभंगपदें म्हणावीं, आईला भातुकें मागावें व तिला प्राकृत गीतेच्या ओंव्या वगैरे सांगाव्या. आईनेंही महाराजांबरोबर फुगड्या खेळाव्या व देवनाथांची पदें वगैरे म्हणूं लागावें. रामरावही महाराजांबरोबर कधीं कधीं फुगड्या वगैरे खेळूं लागत. याप्रमाणें रामरावांचा व त्यांच्या पत्नीचा प्रेम महाराजांविषयीं उत्तरोत्तर वाढत चालला.

ताई व गोंदुजीबापू संपल्यावर सापत्न आईच्या मत्सराला अधिक जोर आला व ती आतां महाराजांस विषप्रयोग करण्याच्या खटपटीस लागली. ही तिची खटपट कानांवर आल्यामुळें या पुढें घरांत राहणें बरें नाहीं असें वाटून डोक्यावर पुस्तकांची पेटी घेऊन महाराज घराबाहेर पडले

व चावडीवर जाऊन पाटीलबोवास सर्व सांगितलें. नंतर रंगुबाईनें महा-राजांचा हात धरून घरीं नेलें व माझ्या घरीं राहून मीठभाकर अनुकूल असेल ती खा म्हणाली. तेव्हांपासून रंगुबाई, सावित्रीकाकू, रामचंद्रभाऊ किंवा काशीबाई यांतून कोणाच्याही एकाच्या घरीं महाराजांनीं जेवावें. काशीबाईची आई व महाराज एकाच ताटांत कधीं कधीं जेवीत असत.

पुढें चातुर्मास्याच्या एका एकादशीस रडकीनच्या ( हें एका बाईचें नांव आहे. ) आंगणांत चुलीपाशीं महाराज फराळ करीत बसले होते. तेथें रंगुबाई व कांहीं बाया आल्या व रंगुबाईनें " जनसंभाची गाडी सज-विली मनवारुलहरी । लाविली पङ्चक्रदोरी ॥ पंचरंगाचे पडदे सोडिले दशखिडक्यावरी । चांदवाशोभे जरतारी ॥ " इ० हें पद म्हटलें. ते वेळीं फराळ करतांना नेहमींच्या संवयीप्रमाणें महाराज हात हालवीत होते. ते बंद करून वरील गाणें महाराजांनीं पुन्हां रंगुबाईकडून म्हणविलें. व अर्थ तिला समजाऊन दिला. तेव्हांपासून हळूहळू परमार्थज्ञानाविषयीं रंगुबाईची अभिरुची वाढूं लागली. तेथून लवकरच वैशाखशुद्ध ९ मीस अरुणोदयीं रामचंद्रभाऊ, विश्रामभाऊ, रंगुबाई, वगैरे आठदहा मंडळीस महाराजांनीं मंत्र दिले. ज्याचें आचरण चांगलें असे त्यालाच महाराज मंत्र देत. हा वृत्तांत इ० स० १८९८ च्या आरंभींचा आहे.

मित्रमंडळीस देऊखाड्यास नेऊन काला वगैरे करण्याचा महाराजांचा क्रम चालूच होता. एकदां महाराजांनीं देऊखाड्यास विठ्ठल मंदिरांत काला केला. कांहीं मंडळी मागाहून सोमतीर्थावर जाऊन वाट भुलली व परत आली. पुढें कार्तिकांत महाराजांनीं एक मोठा काला सोमतीर्थावर केला. त्याची तयारी एका महिन्यापासून चालली होती. महाराज निरनिराळ्या पदार्थांचीं नांवें सांगत होते व रंगुबाई ते पदार्थ तयार करून ठेवीत होती. काला पहाटेच्या वेळीं सुमारे तीन चार वाजतां झाला. मंडळी नेहमींचीच सुमारे पांचसात जण होते. काल्याचे वेळीं नवीन अभंग वगैरे महाराजांनीं म्हटले. ते रामचंद्र बापूंनें लिहून घेतले.

१ रामराव मास्तरांची पत्नि. २ हे अभंग मिळाले नाहींत.

काला घरीं नेण्याची महाराजांनीं सर्वांस सक्त मनाई केली होती. दिवस उजाडतांच सर्व मंडळीसह महाराज माधानास निघून आले. सकाळीं गांवांतली ब्राह्मण व इतर मंडळी तेथें गेली तेव्हां पुष्पहार गुलाल वगैरे त्यांना दिसले व हा आनंद आपल्यास पहाण्यास मिळाला नाहीं म्हणून फार प्रस्तावले. पुढें या काल्याची कीर्ति आसपासच्या गांवांत पसरली.

असो. महाराज पुन्हां मधून मधून घरीं जाऊं लागले. महाराजांची पत्नि सौ० मनकरणिका आई ह्यावेळीं बारा तेरा वर्षांची होती. अजून वयांत आली नव्हती. तथापि सगळ्यांच्या समोर महाराज तिला " मन-करणिका " म्हणून मोठ्यानें हांक मारीत व पाणी वगैरे मागत. तिनें मात्र मुकाट्यानेंच पाणी वगैरे द्यावें व स्वयंपाक करून जेऊं घालावें तिच्या शिक्षणाची काळजी महाराज उत्तम घेऊं लागले. रामचंद्र भाऊ-कडून तिला लिहिणें वाचणें शिकविलें व व्यंकटेशस्तोत्र, शिवलीलामृत, वगैरे नित्य पठणाचा नियम लाऊन दिला. पुढें ज्ञानेश्वरीहि नित्य पठण कर-ण्यास सांगितलें.

महाराजांनीं सकाळीं थंड पाण्यानें स्नान करून भगवद्गीता, सप्तशती, तुळशी महात्म्य वगैरे म्हणावें. मानसपूजा करावी. मानसपूजा करते वेळीं बुक्क्याचा मधुर सुगंध सुटत असे. जेवणापूर्वी तीर्थ करून घेणें व भोजनोत्तर प्रहर प्रहर नमस्कार करणें वगैरे नियम पूर्ववत् होतेच. मान व हात हालविण्याचाहि प्रकार पूर्ववत् होताच. केव्हां केव्हां हात हालवितांना महाराज अगदीं तल्लीन होऊन जात. खांबाला, भिंतीला वगैरे भडाभड हात लागत. प्रसंगविशेषीं वस्त्रहि गळून पडे; तरी त्याची परवा नसे. घराजवळच एक निंबाचें झाड होतें. कधीं कधीं त्या निंबा-च्या खोडावर महाराजांनीं धोतर टाकून त्या खोडाला देव कल्पून रात्र-भर पायचेपी करीत बसावें. तें वेळीं कांहीं मंत्र वगैरे महाराज हळूहळू म्हणत असत. कधीं महाराजांनीं जंगलांत जाऊन धोतराचे कांठ फाडून झाडास बांधावे व त्यांवर बंगळीप्रमाणें दिवसभर झुलत बसावें. केव्हां केव्हां खोलींत समाधी लावून बसावें. ते वेळीं महाराजांच्या आंगांतून

घामाच्या धारा चालत व श्वासोच्छ्वास बंद रहात असे. दोन्ही हातांनीं चुटक्या वाजवीत गरगर फिरण्याचा क्रम तर विलक्षणच होता. प्रहर प्रहर फिरत राहूनहि थांबल्याबरोबर महाराजांनीं स्वस्थ उभें रहावें व सरळ चालूं लागावें. खेळकरपणा तर बहुरंगाचा होता. एखाद्या बोळांत महाराजांनीं उभें राहून कुत्र्यासारखें ओरडूं लागावें. म्हणजे पुष्कळ कुत्रीं तेथें जमा होत व तसेंच ओरडूं लागत. महाराजांचा पोशाख म्हटला म्हणजे आंगांत एक मळकट बंडी, डोक्यास मळकट टोपी व नेसावयास भलें जाड काळेकुश्चळ धोतर अशा प्रकारचा असे.

शके १८२१ ( इ० स० १८९९ ) च्या चैत्र महिन्यांत सौ० रंगुबाई, नामाभाऊ व सावित्री काकी ही मंडळी कांहीं घरगुती कामाकरितां मंचरपुर सावऱ्यास जाऊं लागली. त्यांजबरोबर महाराजहि गेले. तेथलें काम आटपून ही मंडळी आकोटास गेली. तेथें नरसिंग बोवाच्या मंदिरांत सर्वजण दर्शनास गेले होते. त्यांजबरोबर महाराजहि गेले. दर्शन घेऊन महाराज तेथेंच उभे होते. सोबतची कांहीं मंडळी देऊळ पहात फिरत होती व रंगुबाई महाराजांस तेथली एक श्रीकृष्णाची तसबीर दाखवीत होती. महाराज उभे होते त्याच बाजूस एक जटाधारी बैरागी अव्यवस्थित पडलेला होता. महाराज त्याच्याजवळ गेले. व त्याच्या दोन्ही पायांचे आंगठे हातांनीं धरून जमिनीवर दाबले व लगेच बाहेर निघून गेले; तो बैरागी पटकन् उठून बसला व ' कोन है ' ' कोन है ' म्हणून विचारूं लागला. इकडे रंगुबाई, महाराज महाराज म्हणून हाका मारूं लागली व इकडेतिकडे त्यांस पाहूं लागली. " कौन महाराज आये थे " असें तो बैरागी विचारितच होता. महाराज देवळाच्या बाहेर जाउन उभे होते. तेथून त्यांनीं हातानें खूण केल्याबरोबर रंगुबाई व बरोबरची मंडळी बाहेर पडली . " त्याचे आंगठे कां दाबले ? " असें रंगुबाईनें विचारलें असतां महाराज म्हणाले." त्याचा समाधी चुकत होता म्हणून." रंगुबाई म्हणाली त्याला आपण पुढें योग कां सांगितला नाहीं ? महाराज म्हणाले तो वाईट मनुष्य आहे.

आकोटाहून परत आल्यानंतर वैशाख महिन्यांत नृसिंह जयंतीच्या उत्सवाकरितां रामराव व सौ० रंगुबाई महाराजांस बरोबर घेऊन इलिचपुरास गेले होते. नवरात्रांत अण्णासाहेब देशपांड्यांच्या वाड्यांत आकोटकर हरिदासांच्या कीर्तनाला रामराव महाराजांस बरोबर घेऊन जात असत. एके दिवशीं कीर्तनांत महाराज झोंपल्यासारखें बसले होते. लोक हंसूं लागले. तेव्हां रामराव म्हणाले हंसू नका. हे ( महाराज ) मोठे विद्वान व सत्पुरुष आहेत. पुढें कीर्तन झाल्यावर हरिदासबुवाबरोबर महाराज कीर्तनांतील श्लोकार्थांचें विवरण करूं लागले व हरिदासबुवांनीं म्हटलेले श्लोक तोंडपाठ म्हणूं लागले तेव्हां यांच्या विद्वत्तेविषयीं लोकांची खातरी झाली.

पुढें आषाढ महिन्यांत रामचंद्र भाऊस बरोबर घेऊन दुसरे खेपेस महाराज पंढरपुरास गेले. तेथून परत आल्यानंतर आश्विन महिन्याच्या आरंभीं सौ० मनकराणिका आईला ऋतु प्राप्त झाला. महाराज स्वतः मुहूर्त पाहण्याकरितां चांदूरबाजारास कुर्याभाईकडे गेले. व वस्त्राचा रंग, वेळा वगैरे सर्व गोष्टींची सर्व प्रकारें शास्त्ररीत्या स्वतः चिकित्सा करून वटभरणाचा मुहूर्त माडीपूर्णिमेच्या दुसऱ्या दिवशीं ठरविला.

वटभरणाचे दिवशीं नहाणें झाल्यावर ओटी भरावी लागते. परंतु पुन्हां स्नान करावें लागेल म्हणून महाराजांनीं प्रथम देवपूजा आटपून नंतर ओटी भरली.

ते दिवशीं रात्रौ महाराज बाळिराम भाटाचे घरीं पोथी ऐकण्यास गेले होते. दोनप्रहर रात्रीं लोकांच्या टोंचणीमुळें घरीं आले व निजून राहिले. पाय धुण्याचे वेळीं बायांनीं उठविलें. तेव्हां महाराज म्हणाले, मी सांगतों तसें ही ( पत्नि ) प्रथम कबूल करील तर मी पाय धुवूं देईन. आई, बाप, घर हें सर्व सोडून परमार्थाकरितां माझीच केवळ हिला जरूर असेल तर तसें तिनें बोलून दाखवावें. हें ऐकतांच आई म्हणाली मला मायबापाची व घरादाराची जरूर नाहीं. परमार्थच पाहिजे. ती असे बोलल्यावर महाराज हंसले व पाय धुवून हार वगैरे घालूं दिला.

पुढें उत्तम पतिव्रताधर्म पाळून व पतीच्या आज्ञेंत तत्पर राहून बोलल्या प्रमाणें आईनें महाराजांस परमार्थांत कसें साह्य केलें व त्यांच्या गृहस्था श्रमास केवढी शोभा आणली हें आगामी वृत्तांतावरून दिसून येईल.

वटभरणाच्या अगोदर जोडा घालणें, विडा खाणें, पलंगावर बसणें वगैरे गोष्टी महाराज करीत नसत. त्या पुढें करूं लागले. वटभरण झाल्यावर दोन तीन महिन्यांनीं रंगुबाई एकदां सहजगत्या महाराजांच्या पलंगावर बसलेली त्यांस दिसली, तेव्हांपासून पुष्कळ दिवसपर्यंत महाराजांनीं पलंग वर्ज्य केला होता. असतु. याप्रमाणें हें मावान प्रकरण येथें संपूर्ण झालें.

हरिः ॐ तत्सत श्रीमत्सद्गुरु ज्ञानेश्वर महाराजार्पणमस्तु.

---

श्रीज्ञानेश्वरमाउली समर्थ.

# सिरसगांव प्रकरण रज ३ रा.



शके १८२१ मार्गशीर्ष. ते शके १८२५ मार्गशीर्ष.

## महाराजांचा गृहस्थाश्रम.

श्लोक—इहैवतैर्जितस्सर्गोयेषां साम्ये स्थितंमनः

निर्दोषंहि समं ब्रह्मतस्माद्ब्रह्मणि ते स्थिताः ॥

—श्रीमद्भगवद्गीता—

ओंवी—जैसी लेखणी करावी । तैसी आंगोळी चिरावी ।

ऐसी समता होआवी । तै प्रपंचीं परमार्थ ॥ १ ॥

—श्रीसमर्थ रामदास—



प्रपंचांत राहून परमार्थ करावा हें म्हणणें सामान्य दृष्टीनें सोपें दिसतें, परंतु त्याला केवढा प्रबल त्याग साधला पाहिजे हें वर निर्दिष्ट केलेल्या श्रुतिसंत वचनांत गर्भित केलेलें आहे. गृहस्थाश्रमांत दानाची फार प्रशंसा सांगितलेली आहे व द्रव्यदानापेक्षां प्रेमदानाची महती शास्त्रांत मोठी सांगितली आहे. परंतु दातृत्व हा गुण फारच दुर्मिळ आहे. शंभरांत एक शूर सांपडेल, हजारांत एक पंडित सांपडेल, दहा हजारांत एक वक्ता सांपडेल, परंतु दाता पुरुष सांपडेल किंवा नाहीं याची वानवाच आहे. कारण खऱ्या त्यागावांचून दातृत्व यावयाचें नाहीं. निस्सीम भगवत्प्रेमावांचून त्याग संभवत नाहीं व अंतःकरणांतून रागद्वेष समूळ गेल्यावांचून भगवत्प्रेमरस ठसावत नाहीं. म्हणून प्रपंचांत खरा गृहस्थ

सांपडणें अत्यंत दुष्कर आहे असें पर्यायानें ठरतें. पुन्हां " गृहस्थः स तु विज्ञेयो गृहेयस्य पतिव्रता " या पाद्मोक्त लक्षणाप्रमाणें पतिव्रता स्त्रीची-हि गृहस्थ म्हणविणाराला आवश्यकता आहे. परंतु सद्विद्याभांडार व पतिव्रता स्त्री ह्या दोन्ही गोष्टींची जोड महाराजांस मिळाल्यामुळें सद्गृहस्थ पदवी त्यांना ओघानेंच प्राप्त झाली. आतां त्यांचें वय १७–१८ वर्षांचें असल्यामुळें नुकतीच किशोरावस्था=संपून नवयौवनावस्थेला आरंभ झाला होता. या वेळीं सद्गृहस्थांस शोभणारें सद्विद्यादानाचें पवित्र कर्तव्य त्यांनीं मोठ्या उत्साहानें चालविलें. स्वजन असो किंवा श्वजन असो तो चांगला मात्र असला म्हणजे झालें, मग आपपरभाव मनांत न आणतां ते सढळ हातानें सद्विद्येचें दान करूं लागले. त्यांच्या घरीं ' झाब्या ' नांवाचा कुत्रा होता. तो आतां म्हातारा झाला होता. हा कुत्रा सोमवारीं व एकादशीचें दिवशीं कांहीं खात नसे. ही त्याची हरिहरभक्ति जाणून महाराज त्याच्यावर प्रेम करूं लागले होते. तो कुत्रा शके १८२१ च्या मार्गशीर्षांत दत्तजयंतीच्या दिवशीं मरण पावला. मरणसमयीं महाराजांनीं त्याच्या कानांत मंत्रोपदेश देऊन त्याला भाकर, दूध, पेढे खाऊं घातले, भगवद्गीतेचें त्याच्या सन्निध पठन केलें व कर्पूरार्ति ओंवाळून त्याला सद्गति दिली.

## शके १८२२ इ० स० १९००

सद्विद्यादानाच्या पवित्र कर्तव्यांत महाराजांस साह्य करण्याकरितां रामचंद्र बापू हे अत्यंत तत्पर रहात असत. घरीं खाण्यापिण्याची अडचण असतांना घरच्या माणसांचें बोलणें व लोकांचा अपवाद सहन करून त्यांनीं महाराजांबरोबर फिरावें व त्यांच्या खाण्यापिण्याची व्यवस्था ठेवावी. भाजीभाकर, भात किंवा शेवटीं चिवडा फुटाणे जें कांहीं वेळेवर मिळेल तें महाराजांस द्यावें. रात्रीं अपरात्रीं महाराज सांगतील तेथें जावें. महाराजांस शौचास स्वतः न्यावें. पावसाळ्यांत महाराजांस झाडाखालीं शौचास बसवून कधीं कधीं भर पावसाच्या झडींत स्वतः सगळा पाऊस आंगावर घ्यावा. कारण महाराज बास्तिविधि करीत असल्यामुळें त्यांना तीन चार

ास लागत. चांदूर बाजार, सिरसगांव, खराळ, ब्राह्मणवाडा इत्यादि ठिकाणीं डोक्यावर पुस्तकांची पेटी घेऊन खाण्यापिण्याची, झोंपेची उन्हा पावसाची परवा न करितां बहुतेक प्रसंगीं महाराजांबरोबर जावें. व गांवांत वटवृक्षाखालीं, ब्रनसोड्याच्या आंब्याखालीं, कवठीखालीं वगैरे त्यांच्याबरोबर फिरावें.

महाराजांची पुस्तकाची पेटी मोठी व्यवस्थेशीर असे व तीवरून पुस्तकांची महाराज केवढी काळजी घेत असत हें दिसून येतें. दाभण, सुया, वळलेले दोरे वगैरे आवश्यक वस्तू त्या पेटींत असत. पुस्तकांची फाटतूट होणें, डाग पडणें, मळणें वगैरे त्यांना अगदीं खपत नसे. शके १८३३ च्या कार्तिकांत महाराज व आम्ही माधानास असतांना मुंबईच्या हेमंत व्याख्यानमालेचीं कांहीं वर्षांपूर्वीचीं पुस्तकें एके ठिकाणीं टांचलेलीं मला एका पेटींत आढळलीं. त्यांतील कांहीं मजकूर मी महाराजांस वाचून दाखविला असतां ते म्हणाले 'मुंबईच्या हेमंत व्याख्यानमालेंतील अमुक गृहस्थाचे हे विचार आहेत. हीं पुस्तकें वळलेल्या दोऱ्यांनीं एके ठिकाणीं टांचलेलीं आहेत ना ? '' इतकी त्यांची पुस्तकांची जोपासना व ओळख असे. असो.

काशीबाईची मावशी सौ० तुळजा ही खराळ्यास राहात होती. अलीकडे तेथें महाराजांचें जाणें येणें होत असे. तुळजाच्या पतीनें हिरा नांवाची एक वेश्या ठेविली होती. कदाचित् महाराजांच्या योगानें आपल्यास येथून निघून जाण्याचा प्रसंग येईल म्हणून हिरा महाराजांस शरण आली व म्हणाली आपण जें कांहीं करतील तें योग्यच करतील परंतु पुढें माझी गती काय ? तेव्हां महाराज म्हणाले तूं ह्या मनुष्याला सोडून अन्याकडे जाऊं नकोस. ह्याला कशीही स्थिति प्राप्त होवो. ही गोष्ट तिनें आवडीनें मान्य केली, महाराजांचा अनुग्रह घेतला व श्रीज्ञानेश्वरमहाराजांची भक्ति करूं लागली. वेश्येचा पतिव्रता धर्म हाच उक्त होय. पद्मपुराणांत म्हटलें आहे " यदधीना यदा वेश्या तदा नान्येन संगता । पतिव्रतेति विख्याता ... ... । पातालखण्ड अ० १०३ श्लो० ७९. ह्याचें फलही तिला उत्तमच मिळालें. अंतकालीं तिनें श्रीज्ञानेश्वर-

महाराजांचें स्मरण केलें, कात्यायनीचा प्रसाद काशीबाईनें आणला होता तो ग्रहण केला, दोन्ही हात जोडून महाराजांस नमस्कार केला व श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या चिंतनांत तिचें प्राणोत्क्रमण झालें. ही गोष्ट श्रीमहाराजास कळली तेव्हां " अंतकालेच मामेव स्मरन्मुक्त्वा कलेवरम् । यः प्रयाति ...... नास्त्यत्र संशयः ॥ अपिचेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक् । ...... सम्यग्व्यवसितोहि सः ॥ " असे उद्गार त्यांच्या मुखांतून निघून डोळ्यांस पाणी आलें. पुढें तुळजालाही तिचा पती चांगल्या रीतीनें वागवूं लागला. याप्रमाणें महाराजांचें खराळ्यास येणें जाणें असतांना त्यांच्या एकपाठीपणाचें आणखी एक उदाहरण तेथें दिसून आलें तें असें:—

रामभट जवळेकर म्हणून एक ब्राह्मण तेथें येत असे. तो एकेदिवशीं सायंसंध्या करीत बसला होता. जवळ महाराज बसले होते. संध्या आटपल्यावर रामभटजींनें " सरस्वती नमस्तुभ्यं वरदे कामरूपिणी । विद्यारंभं करिष्यामि सिद्धिर्भवतु मे सदा ॥ " इ० शंकराचार्यकृत सरस्वाति द्वादशनामस्तोत्र म्हटलें. तें ऐकून महाराजांनीं तेंच स्तोत्र पुनः साग्र म्हणून दाखविलें. तें ऐकून रामभटजीस यांच्या एकपाठीपणाचें आश्चर्य वाटलें.

रामचंद्राला लेखक करून महाराजांनीं नारदभक्तिसूत्रांच्या प्रथमसूत्रांतील " अथ " शब्दावर ओवीबद्ध भाष्यलेखनाचें काम आरंभ केलें. तसेंच केशवरावकाकाला विचारसागर सांगणें, सौ० मनकराणिका आईला वेदांत, योग, व्याकरण शिकविणें, रंगुबाईला व रामचंद्रबापूला योगाभ्यास व वेदांत विषय शिकविणें, सखाराम आप्पालावैद्यकी शिकविणें अमृतानुभव, ज्ञानेश्वरी इत्यादि निरूपणें सांगून व भगवद्गुण वर्णनपूर्वक कीर्तनें करून गांवांतील इष्टमित्र मंडळीस सद्बोधामृत पाजणें इत्यादि सद्विद्याप्रसाराचें कार्य दृढ निश्चयानें चालविलें व आपली सर्वज्ञता हळूहळू व लोकव्यवहाराला अनुसरून प्रगट करूं लागले. म्हाताऱ्या माणसांस गोड व विनीत शब्दांनीं महाराज म्हणत कीं, " तुम्ही हा संसाराचा ख्याल सोडा, मजजवळ रहा, मुक्तीचा मार्ग पहा इ० "

एकदां महाराज सिरसगांवाहून आले व ताताला म्हणाले " मी भल्ल संस्कृत शिकून आलों. " असें म्हणून महाराजांनीं तें दिवशीं सारें कीर्तन संस्कृतांतच केलें. जमनाबाई म्हणून एक गरीब बाई उमरावतीला राहत असते. हिचें माधानास व खराळ्यास येणेंजाणें असल्यामुळें महाराजांची व तिची ओळख झाली होती. एके दिवशीं "तूं मला आपल्या घरीं ने." असें महाराजांनीं म्हटल्यावरून ती आतां त्यांना उमरावतीस घेऊन गेली. महाराजांचा अल्लड स्वभाव, स्वच्छंद विहार, बालचेष्टा, प्रेमळ वागणूक, व ईश्वरनिष्ठा पाहून तेथील मंडळीस मोठें कौतुक वाटलें. उमरावतीस जमनाबाईच्या आईच्या व मावशीच्या मांडीवर महाराजांनीं लोळावें, बोबडें बोलावें, भातकें मागावें, चुटक्या वाजवीत गरगर फिरावें, अभंग, पदें वगैरे म्हणावीं, ज्ञानेश्वरी अमृतानुभव यांचें निरूपण करावें, व जेव-ण्यापूर्वी प्रहर प्रहर समाधी लावून बसावें. याप्रमाणें विलक्षण वर्तन दिस-ल्यामुळें तेथील माणसांचा व महाराजांचा लौकरच प्रेम जुळला. तेव्हां-पासून महाराज मधूनमधून उमरावतीस जमनाबाईच्या येथें जाऊन आठ आठ दिवस राहूं लागले. ही जागा उताऱ्याची असल्यामुळें बाहेरगांवची मंडळीही तेथें येत असे. त्यांना अनायासेंच महाराजांच्या भजनादिकांचा लाभ होई. पुढें गांवांतली मंडळीही कांहीं येऊं लागली. याप्रमाणें जमना-बाईच्या माडीवर महाराजांजवळ रात्रभर मंडळी राहूं लागली.

याप्रमाणें सच्छास्त्र चावडीवर बसून भक्तिबीजाची वाढ करण्याकरितां हा अलौकिक क्षेत्रज्ञ, सद्वासना जागल्यास शिकवण देत, पापपुण्याच्या पिकाचा हिशेब पाहात, इंद्रियबैलांना युक्ताहारविहाराचा चारा यथायोग्य मिळण्याकरितां यमनियम गडीमाणसांस राबवीत, सनातन धर्माच्या शेती-वाडीचें कामकाज पाहूं लागला व आपल्या पवित्र आचरणानें व अत्यु-त्कट भक्तिप्रेमानें त्रिभुवनपति व्रजराज प्रभूची मनधरणी करूं लागला.

यद्यपि सापत्न आई महाराजांचा मत्सर करीत होती तथापि घरच्या मंडळीवरील प्रेमामुळें कौटुंबिक स्थिति सुधारण्याविषयीं महाराजांची मोठी खटपट चालली होती. परंतु गृहचालकत्व पाटीलबोवांकडे असल्यामुळें व महाराजांचें वय थोडें असल्यामुळें यांच्या बोलण्याकडे अर्थातच कोण

लक्ष्य दिलें नाहीं. शेवटीं तिकडे महाराजांनीं उपेक्षबुद्धि करून वरप्रमाणें जगत्कल्याणाचा मार्ग दृढ केला. ह्या वेळीं देशांत भयंकर दुष्काळ पडला होता. त्याची महाराजांस व त्यांच्या पत्नीस विशेष बाधा झाली नाहीं तथापि महाराजांची सासु व तिचीं मुलें यांच्यावर कहर गुजरला. महाराजांचा सासरा एकदोन वर्षांपूर्वी संपला होता म्हणून आलीकडे मुलांबाळांसह ती ( महाराजांची सासु ) माधानासच राहात होती. घरच्या अव्यवस्थेमुळें महाराजांकडूनही तिला मदत होणें शक्य झालें नाहीं. शेवटीं मुलांसह सुंगन्याचा पाला खाऊन ती प्राण वांचवूं लागली. पुढें रामराव मास्तरनें त्या सर्वांस दुष्काळ संपेपर्यंत आपल्या घरीं ठेऊन घेतलें. ह्या वेळीं ( भाद्रपद-आश्विन ) सौ० रंगुबाई बाळंतीण असल्यामुळें मारजाआजीनें ( महाराजांची सासु ) बाळंतपणाचें व घरचें इतर कामधाम करावें. तिचा मुलगा दत्तु हा शाळेंत शिकत होता. त्याची फीही रामरावांनींच द्यावी.

घरचीं माणसें महाराजांस व सौ० मनकरणिका आईस त्रास देतच होतीं. महाराजांस रात्रीं पाणी आणावयास सांगावें. उडप्यांतून गवऱ्या आण म्हणावें इत्यादि कामें सांगावीं. रामचंद्राचा बाप परशरामजी यांनीं तें एक वेळ पाहिलें व पाटीलबोवावर फार रागावले. पाटीलबोवा त्या वेळेस आपल्या पत्नीवर रागावले. सौ० मनकरणिका आईलाही फार त्रास होता. ती दुसऱ्या मनुष्याबरोबर पाट लावणार आहे असा आरोप तिच्यावर आणला होता. परंतु सद्गुणामध्यें महाराजांचा स्वतःपेक्षांही स्वतःच्या पत्नीवर जास्त विश्वास असल्यामुळें त्यांनीं तो आरोप मोठ्या युक्तीनें निवारण केला.

ही किटकिट टाळण्याकरितां व कांहीं अंतस्थ परिस्थितीला टोला देण्याकरितां महाराजांनीं एक कुरापत उपस्थित केली. मनकरणिका आई एकदां झोंपेंत असतांना तिच्या नाकांतील नथ गुपचुप काढून घेतली व दातांनीं चावून सोन्याच्या दांडीची घडी करून कागदाच्या पुडींत ठेवली. सकाळीं उठल्यावर नाकांत नथ दिसली नाहीं म्हणून आईनें काकीबाईला (रंगुबाईला) हाक मारली व नथ हारवली, कोठें ठेवल्याचेंही आठवत

नाहीं असें सांगूं लागली. ही गोष्ट घरांत कळल्यावर घरचीं माणसें म्हणूं लागलीं कीं तिची आई गरीब आहे म्हणून तिनें आईला दिली असेल व हरवली म्हणून खोटें सांगतें. अर्थातच हा आरोप महाराजांस सहन झाला नाहीं. व मीच कांहीं कारणाकरितां नथ काढून नेली असें सांगून घराबाहेर पडले. पुढें अकरा दिवस पर्यंत महादेवाच्या देवळांत लिंबाचा पाला खाऊन राहिलें व आंगांस भस्म फांसून, गळ्यांत व हातांत रुद्राक्षाच्या माळा घालून शिवदीक्षा घेतलीं. नंतर रामचंद्राच्या व इतर मंडळीच्या आग्रहास्तव ब्राह्मणसंतर्पण करून पारणें सोडलें व रामचंद्राच्या घरीं राहून त्याला हठयोगप्रदीपिका, योगदर्शन, कापिलगीता इ० योगविषयक ग्रंथांचें अध्ययन करवून योगाभ्यास सांगूं लागले व वेदान्तदर्शन, अपरोक्षानुभूति, अद्वैतमीमांसा, अष्टादशोपनिषत इ० वेदान्ताचे व रामायण, भागवत, ज्ञानेश्वरी इ० भक्तिविषयक ग्रंथांचें परिशीलन, त्यांतील रहस्य निरूपण व उत्तमोत्तम उक्तींचा संग्रह इ० ग्रंथाभ्यासंग अप्रतिहत चालू ठेवला. सौ० मनकर्णिका आई घरींच होत होती. व महाराज रामचंद्रबापूच्या घरीं असतांना तिनें त्यांच्याकरितां ताट वाढून न्यावें- महाराजांनीं इच्छेस वाटल्यास जेवावें किंवा चार चार दिवस जेऊंच नये.

पाटीलबोवा आतां अधिकच चवताळले व महाराजांस उद्देशून अस्स्मान्कारें बोलूं लागले. " हा चावडींत येत नाहीं. कामकाज पहात नाहीं, गांवांत सोळबांड हिंडते, याले खायले मिळनार नाहीं, अन्न अन्न करल, तूं आतां संत झालास, बायको संतीन होईल, तूं भीक माग, ती झोळी धरल. " इ० महाराजांची सासूहि त्यांच्या पाठीमागें "पोरीस लुगडं नाहीं, चोळी नाहीं" असें बोलून त्यांना दोष देई. पाटील बोवांचा आरोप ऐकून एकेदिवशीं महाराज त्यांना म्हणालें:—" मी भिक कशास मागूं ? मी अन्न अन्न करीत फिरणार नाहीं. लोक पंचपक्वान्नांचीं ताटें घेऊन माझ्या मागें धांवतील. बायकोला माझ्यासारखें वागणें असेल तर तिनें मजबरोबर यावें " असा क्रम चालला असतां महाराजांचे मेहुणी येथलि मामा बाजीराव हे कार्तिकांत माधानास आले. त्यांचे समक्ष

महाराजांस दोष देऊन पाटीलबोवा संतापून म्हणाले " हा कांहीं घरची फिकीर ठेवत नाहीं. हा जिंदगी काय चालवनार आहे ? मला तरी जिंदगीचें काय करावयाचें आहे ? आतांच मी घरदार, शेतीवाडी वगैरे ब्राह्मणांस दान करून देतों " ते वेळीं महाराज तोंड धूत बसले होते. पाटील बोवांचे असें बोलणे ऐकून ते एकदम उठले व " आतांच मी ब्राह्मणांस बोलावून आणतो. आपण घरावर तुळशी पत्र ठेवून खुशाल दान करून द्या. " असें म्हणून ब्राह्मणांस बोलाविण्यास जाऊं लागले. हें पाहतांच पाटीलबोवा बाहेर निघून गेले. यापुढें सगळा रोष पाटीलबोवा मनकरणिका आईवर काढूं लागले. ते तिला अनेक प्रकारें बोलत. " तो संत झाला तूं संतीण हो. तो भीक मागल, तूं झोळी धर " असें तिला नित्य ह्मणत. बिचारी आई हें सगळें निमूटपणें सहन करून संतोषवृत्तीनें वागत असे. असें होतां होतां शेवटीं पाटीलबोवानें तिला घरांतून काढून दिले. तेव्हां तीही रामचंद्र बापूच्या घरीं राहूं लागली. पाटीलबोवानें नित्य दोन पायल्या जवारी मात्र द्यावी. तेलमीठ कांहीं देऊं नये. आईने इकडून तिकडून मागून स्वयंपाक करावा व महाराजांस जेऊं घालावें. यावेळेस आईची स्थिती म्हणजे डोईस तेल नाहीं, नहाणे मांखणे नाहीं, धड लुगडें नाहीं, अशी कठीण झाली होती. तथापि ती साध्वी पतीच्या आज्ञेंत तत्पर राहून पतिसेवा हेंच सुखाचें सर्वस्व मानूं लागली.

इकडे भक्तिबीजाकरितां सुक्षेत्र शोधण्याचे व पेरलेले बीज वाढीस लागलें असतां त्याच्या संरक्षणार्थ कुतर्क सावजांची टेहळणी करण्याचें काम श्रीमहाराज मोठ्या आस्थेनें करूं लागले. ब्राह्मण ज्ञातीच्या विरुद्ध चळवळ करणाऱ्या ' सत्यशोधक ' समाजाची एक शाखा ह्या वेळीं करसगांवास निघाली होती व महाराजांना आपल्या मतांत ओढण्याचा त्यांचा प्रयत्न चालू होता. तो प्रकार महाराजांनीं एकेठिकाणी लिहून ठेविला आहे. तो असाः—

" सिरसगांवास मी नारायणजी तडस गाशीमाळी यांचे येथें असतां

ह्मणांच्या विरुद्ध नारोबा व धर्माजी या दोघां मराठे सत्यशोधकांनीं
ा केली. त्याच्या पूर्वी हे दोघे मला सोनोरीस भेटले होतें. करस-
चा अमृतराव माझा नातलग असल्यामुळें तो त्यांच्या मंडळीत होता.
यामुळेंच नारोबा धर्माजची व माझी गांठ पडली. त्यांनीं तुम्ही
शोधक होता काय ? असें मला विचारिलें. परंतु मी ब्राह्मणांच्या
रुद्ध नाहीं, असें त्यांना सांगितलें. आह्मीही खऱ्या ब्राह्मणांच्या विरुद्ध
, पण जे मूर्ख आहेत आणि आपली सुधारणा करीत नाहींत त्यांनीं
पली वेदविद्या शिकावी म्हणून आम्ही यत्न करीत असतों; असें
यांनीं मला सांगितलें. तेव्हां धर्मस्थापन व्हावा अशी माझी मूळची
त्ति असल्यामुळें ठीक आहे असें मी त्यांना म्हणालों. मग त्यांनीं
पल्या प्रतिज्ञापत्रावर मला सही करतां येत नाहीं, म्हणून आंगठा
गितला. पण तो मात्र मी दिला नाहीं. तथापि " बडोदावत्सल "
पत्रामध्यें ' पंडित गुलाबराव ' असें माझें नांव त्यांनीं छापून पाठ-
. त्याचे मला विशेषसें वाटलें नाहीं. पुढें सिरसगांवांत जेव्हां
झाली तेव्हां सरसकट ब्राह्मणांच्या विरुद्ध सत्यशोधकानें प्रतिपादन
. तें प्रतिपादन सर्व कुणब्यामाळ्यांस मानवलें. त्या
मेंत हल्लीं उमरावतीस असलेले उद्धवराव बंदे मास्तर हे हजर
. त्या सभेंत मीच एकटा विरुद्ध उठून माझ्याशीं पूर्वी कबूल
ाप्रमाणें तुमचे उद्देश नाहींत, असें म्हणून त्यांच्या मताला खोडून
यावर प्रश्न टाकले. परंतु त्यांनीं कांहीं उत्तर न देतां, याला ब्राह्म-
णांनीं शिकवून ठेविलें आहे, या पोराचें ऐकून आपल्या जातींचें काय
? पडणार आहे ? इतकें ते दोघे म्हणाले. तेव्हां सर्व मंडळींनीं टाळ्या
ल्या. ही गोष्ट विचारावयाची असल्यास उद्धवराव सध्यां उमरावतीस
हेत त्यांस विचारावी. मी राजाराम देशमुखाच्या येथें सिरसगांवांत
तरलों होतों. तोही मला म्हणाला कीं या सभा करणारांचें चांगलें
ललें आहे तें चालूं द्यावें. त्यांना अडथळा करणें योग्य नाहीं. तेव्हां
ऱ्या शहरांत जाऊन आपल्या वाणीचा परिणाम दाखविल्याशिवाय या
व लोकांवर आपलें वजन बसणार नाहीं असें मला वाटलें. असें न

केलें तर फुकट माझें नांव सत्यशोधकांत गणलें जाईल अशीही मला भीति वाटली. ''

वर निर्दिष्ट केलेली महाराजांची स्वभावसिद्ध ब्रह्मण्यता रामचंद्रबापू-जवळही केव्हां केव्हां प्रगट होऊन '' आपण एक घर बांधूं, ब्राह्मणांची तरुण मुलें आणूं, त्यांस संस्कृत वगैरे शिकवून विद्वान करूं, त्यांच्या खाण्यापिण्याची व्यवस्था करून आचारी, गुजराथी ठेऊं '' इत्यादि त्यांचे उद्गार निघत असत. स्वज्ञातीयांसही शिक्षण देण्याची यांची खटपट चालू होतीच.

याप्रमाणें मानभाव, आनंदमार्गी, सत्यशोधक, इत्यादि मतांचा मोड करण्याविषयीं महाराजांचा जसा प्रयत्न चालू होता तसाच आंगांत देव-देवी आणून भोळवट अडाणी लोकांस फसविणाऱ्या कांहीं बायामाणसांच्या ढोंगाचाही महाराजांनीं परिस्फोट केला. त्याचा उल्लेख मागें मागील प्रकरणांत आलेला आहे. तसेंच सिरसगांवीं म्हाल्याच्या येथें आंगांत देव आणून महाराजांनीं हावभाव करून दाखविले होते. एका माळणीच्या आंगांत माडीच्या नवरात्रांत देवी येत असे. महाराजांनीं तुळाई वगैरे सात बहिणी आंगात आणून हावभाव करून दाखविले. माघानास गंगाभारती म्हणून एक गोसावी होता. तो अनीतिमान होता. त्याचेंहि बंड महाराजांनीं मोडलें.

याप्रमाणें अशिक्षित समाजाच्या श्रद्धाजाड्याचा नाश करून आंग्ल-विद्याविभूषित सुशिक्षित मंडळीचेंही श्रद्धादार्ढ्य हरण करण्याकरितां गांवो-गांव फिरून पारकीय मतवाद महाराज समजून घेऊं लागले. डार-विनचा उत्क्रांतिवाद, व स्पेन्सरचा अज्ञेयवाद, ज्ञेयवाद इ० समजून घेण्याकरितां डोक्यावर पुस्तकांची पेटी घेऊन पायीं, अनवाणी, दिवस-रात्र न पाहतां, ऊन्ह, पाऊस, थंडी यांची परवा न करितां चांदूरबाजार, सिरसगांव वगैरे ठिकाणीं महाराजांनीं जावें व डार्विन, स्पेन्सर, सर विल्यम ह्यामिल्टन इत्यादि मतवाद्यांचे ग्रंथ व पदार्थविज्ञानादि जडशास्त्रांचे ग्रंथ वांचून घेण्याकरितां लोकांची आर्जवें करावीं. ह्याच सुमारास ग्वाल्हेर येथील श्रीमंत रामराव कृष्ण जटार यांचे अव्यक्तबोध व स्वानंदसाम्राज्य

ंथ निघाले होते. ते खराळ्यास आहेत असें समजल्यावरून मार्गशीर्ष
ाचे सुमारास महाराज तेथें गेले.

ह्यावेळीं सौ० तुळजाला दिवस होते. खराळ्यास असतांना महारा-
ीं हिराबरोबर गाणीं वगैरे म्हणावीं. तेथें एक रंगारी मास्तर महा-
ांची सेवा करीत असे. शौचास वगैरे त्यानेंच न्यावें. पुढें तीन
ठवडेपर्यंत महाराज निंबाचा पाला खाऊन राहिले. नंतर तुळजाबाईला
वा महिना लागला तेव्हां तिचें डोहळ जेवण झालें. ते दिवशीं
री मास्तरनें आग्रह करून महाराजांसही जेऊं घातलें. महाराजांनीं
प्रसंगीं तुळजाला झोंपाळ्यावर बसवून स्वतः गाणीं म्हटलीं व इतर
ांकडून म्हणविलीं. पुढें महाराजांस ताप येऊं लागला म्हणून दोन
महिने तेथेंच राहिले. माधानास रामचंद्रभाऊकडे मनुष्य पाठ-
सप्तशतीची पोथी बोलावली व प्रकृति सुधरल्यावर चैत्रांत उमरावती-
निघून गेले.

शके १८२३ इ० स० १९०१.

यावलीचे गणपतराव अवचित् हे उमरावतीस जमनाबाईचे येथें उतरत
ात. त्यांचा व महाराजांचा परिचय जुळला होता. गणपतरावच्या
ाची पोळी महाराजांना फार आवडत असे. त्यांचा स्वयंपाक झाला
णजे महाराजांनीं विचारावें " गणपतराव स्वयंपाक झाला काय?
ायला येऊं काय? " त्यांच्या बरोबर महाराजांनीं एकाच ताटांत जेऊं
वें. जेवतांना स्वस्थ मनानें गोष्टी बोलत, पोथी पुराणांतील कथा सांगत
खेळत जेवावें. जेवण झाल्यावर दोन विडे लागत असत. एक विडा
स द्यावा व दुसरा विडा महाराजांनीं खावा. नंतर वामकुक्षी करावी
वा बंगळीवर झुलत बसावें. एकंदर चर्या नियमित नव्हती. निजले
णजे तासचे तास निजूनच रहावें. किंवा झुलत बसले तर झुलतच रहावें.
पैतही " हां येतो जा. मला यावयाचेंच आहे " अशा प्रकारचे शब्द
वा पोथीपुराणांतलीं वाक्यें महाराजांच्या तोंडांतून निघत असत. रात्रीं
गणें, दिवसा निजणें, अभंग पदें वगैरे गाऊन भजन करणें, चुटक्या

वाजवीत गरगर फिरणें, नंतर साष्टांग नमस्कार घालणें, त्यानंतर दोन्ही हात जोडून जमिनीवर डोकें टेंकून बराच वेळपर्यंत हळूहळू मंत्र म्हणणें व शेवटीं "श्रीज्ञानेश्वर महाराजकी जय" म्हणणें इत्यादी गोष्टी नेहमींच्याच होत्या. जेवण्यापूर्वी प्रहर प्रहर समाधी लाऊन महाराज बसत असत हें मागें सांगितलेंच आहे. यावेळीं त्यांचा श्वासोछ्वास बंद होऊन "पोट अगदीं उडत नसे" ही गोष्ट जमनाबाईनें व तिच्या घरच्या माणसांनीं वगैरे पाहिलेली आहे. उमरावतीस आले म्हणजे महाराजांजवळ एक लहानसें दप्तर असून त्यांत पोथ्या पुस्तकें वगैरे असत. शिवाय नारायण तानबा बुकसेलर यांच्या दुकानावर जाऊन पोथ्या पुस्तकें वगैरे पाहण्याचा क्रम होताच. जमनाबाईची आई वगैरे महाराजांस "महाराज" म्हणूनच हाक मारीत असे. महाराज म्हणत "आजीबाई, मला महाराज नका म्हणूं, गुलाम्या म्हणत जा."

यावेळीं महाराजांच्या मस्तकावरील कुरळकेश, प्रसन्नमुख, विद्याविभूषित वाणी, प्रेमळचर्या इत्यादि गोष्टी त्यांच्या बालतेपाला फारच शोभवीत होत्या.

यावलीचे आकाजी बापू देशमुख यांचेंही जमनाबाईच्या येथेंच येणेंजाणें असे. महाराज तेथें असले म्हणजे आकाजीबापूला शिव्या देत. "देशमुख झाला तर आपल्या घरचा, मला त्याचें काय करावें लागतें?" असें म्हणत. पुढें याचवर्षी (शके १८२३) वैशाख महिन्यांत गणपतराव अनंचित हे महाराजांस यावलीस घेऊन गेले. त्यांच्या घरीं रात्रीं महाराजांनीं गीतापठन, भजन वगैरे चाललें होतें. शेजारींच आकाजी बापू राहात होते. आपल्या गांवांत इतकें गोड भजन करणारा कोण आला आहे हें पहावें म्हणून आकाजी येऊन पाहतात तों महाराज! दुसरे दिवशीं महाराज माधानास निघून गेले.

पत्नीसंबंधानें महाराजांची वागणूक खेळकर पद्धतीची होती. सगळ्यांच्या समक्ष मनकरणिका म्हणून मोठ्यानें हाक मारणें, पाणी मागणें हे प्रकार तर वटभरणाच्या आधींपासूनच चालू होते. नंतर आठ आठ वाजेपर्यंत तिला बिछान्यावरून उठूं न देणें, दोघांनीं मिळून गाणीं म्हणणें

इत्यादि प्रकार सुरूं झाले. लोकांनीं म्हणावें हे कसे नवराबायको आहेत कोण जाणे.

स्त्रियांना शाळेंतलें शिक्षण देणें मात्र महाराजांना नको होतें. सौ० मनकरणिका आईला त्यांनीं घरींच शिक्षण दिलें.

ह्याच वैशाखांत महाराजांचे गुरु गोपालदास महाराज हे माधानास आले होते. त्यांना महाराजांनीं मोठ्या समारंभानें मंगलस्नान घालून पालखींत मिरविलें व नंतर त्यांच्यापुढें कीर्तन केलें. कीर्तन चालू असतांना तिकडे एका खळ्यांत कडब्याचा गुढस पेटला. त्यामुळें श्रोते मंडळींत गडबड हो-ऊन लोक पळूं लागले. महाराज म्हणाले ''घाबरण्याचें कांहीं कारण नाहीं. एक गुढस जळल. खळ जळत नाहीं.'' तसेंच झालें. गोपालदास महाराजांचें एक गुरुस्तोत्र ह्यावेळीं महाराजांनीं आरंभ केलें होतें. त्याचा एकच समास झाला. तो असा:—

## गुरुस्तोत्र.

ॐनमो देवाधिदेवा । परब्रह्म स्वात्मानुभवा । गोपालदास करुणार्णवा । सोहंभावा सद्गुरु ॥ १ ॥ तूं ब्रह्मांडरूपी विशाळ । पिंडरूपी ढिसाळ । ब्रह्मांड पिंडातीत तेजाळ । परब्रह्म केवळ तुम्ही ॥२॥ स्वयें जाहले गजवदन । निरसावया शिष्यविघ्न । स्वानंद सुखाचें सदन । यदर्थ नमन पैं केलें ॥ ३ ॥ तरी विघ्नें निरसुनी समस्त । पूर्ण करावा हा ग्रंथ । गजानन रूपें यथार्थ । घातलें दंडवत प्रेमभावें ॥ ४ ।- तुमचे आंगीची चित्कळा । सोहं ध्वनी तूर्या वेल्हाळा । ती शारदा परब्रह्म बाळा । तियेसी केला नमस्कारू ॥ ५ ती तुमची अतर्क्य कीर्ति । निःशब्द ध्वनी निजात्ममूर्ति । तरी हेचि विनवणी चरणां प्रति । देई स्वस्फूर्ति ग्रंथातें ॥ ६ ॥ गणेश आणि सरस्वती । ते तुम्हीच कृपामूर्ति । ग्रंथास देऊनी निजस्फूर्ति । वर्णावी कीर्ति आपुली ॥ ७ ॥ संत तुमचेचि अव-तार । जे आनंदाचिद्घन निर्विकार । जे सद्रूपाचे भांडार । तयासी नमस्कार पैं केला ॥८॥ जयाचेनि कृपाबळें । निजात्मरूपें ब्रह्मांड उजळे । अहंसोहं-चेनि मेळें । तैं तो वेळे नमस्कारू ॥ ९ ॥ जितुकी जितुकी संतमूर्ति ।

तितुकी श्रीगुरु तुमची दीप्ति । कृपाकरोनि निजात्मस्फूर्ति । गुरुसंत ग्रंथीं व्हा एक ॥ १० ॥ ऐसा निमाला द्वैत ठावो । ग्रंथासी आला एकभावो । तेथें मीपण झालें वावो । गुरुत्व पहा हो संचलें ॥ ११ ॥ ग्रंथकर्ते सद्गुरुनाथ । ये नाहीं मद्वाच्यार्थ । गोपालदास प्रभु होवोनि सर्वार्थ । पुढें निमित्यार्थ मज केलें ॥ १२ ॥ शेखीं निमित्यही नेलें । मज माझेपणा आटविलें । सर्वही आपणामाजीं मिळविलें । करविलें अर्पण ॥ १३ ॥ श्रोत्रें जें जें ऐकावें । तेतें गुरुरूप स्वभावें । नेत्रीं जें जे पहावें । तें तें गोपालदास प्रभु ॥ १४ ॥ रसना जो जो चाखी रस । तो तो श्रीगुरु गोपालदास । जो जो स्पर्श पाहिजे त्वचेस । तो तो श्रीगुरु मृदुत्वें ॥ १५ ॥ पाणी जे करिती कार्यभाग । ते गोपालदास पदसेवा चांग । पाद जो जो क्रमिती मार्ग । तो निजमार्ग तुमचा ॥ १६ ॥ घ्राण जो जो गंध पाहे । तो तो गोपालदास आहे । सोहंस्वरूपीं शुद्ध वाहे । अनुभव होय सकळांसी ॥ १७ ॥ ज्ञानेंद्रिय विषय सेविती । ते ते गोपालदास स्थिति । मग तेही तैसेचि होती । स्वगोडीनें गुरुरूप ॥ १८ ॥ अळी जेवी धाक वाहे पोटीं । ते ध्यानेंचि होय भिंगोटी । निघोनि जाय भयकोटी । तैसीच गोठी येथींची॥१९॥भवभय दुस्तर कठीण।काळीं धाकें करून।इंद्रिय ध्याती गुरुचरण । तरी तेही गुरुचरण होती ॥२०॥ ऐसे ज्ञानेंद्रिय निमाले । कर्मेंद्रिय त्यांताचि आटले । आतां पंचतत्व कैसे आर्पिलें।गुरुचरणीं ॥२१॥भूनिरानल अनिलाकाश । हे एकत्वेंचि असती समरस । ते आकाश होतां अवकाश । सहजचि अर्पण गुरु चरणीं ॥२२॥ प्राण अपान व्यान उदान । पांचवा तो समान । नागकूर्म कृकल जाण । देवदत्त धनंजय ॥२३॥ ऐसी दशप्राणाची रीति । सोहं नादे देही विचरती । ते सोहंभावें अखंडस्थिति । आर्पिले निश्चिती गुरुचरणीं ॥ २४ ॥ जे जे कल्पना करी मन । तो तो विषय गुरुरूप पूर्ण । मग राहिलें मनाचें मनपण । जाहलें अर्पण गुरु चरणीं ॥ २५ ॥ निश्चय बाणला बुद्धीस । कीं अत्रयेंचि रूप गोपालदास । मग साह्य घेऊनि चित्तास । चिंतन मार्गे निवाली ॥ २६ ॥ चित्त करितांचि चिंतन । स्वयें पावलें सद्गुरुचरण । देहाहंकार पळाला भिऊन । झाला अर्पण गुरुचरणीं २७वाचा अनिर्वाच्य आर्पिली । सोहंभावें गुरुचरणीं निमाली । गुरुमूर्ति साक्षरूप झाली । अलिप्त टेली

व्यापकपणें ॥२८॥ जें होतें दृश्यादृश्य कांहीं। तें तें अर्पिलें सद्गुरुपायीं। मग बोलावयास ते ठायीं। दुसरें कोण ॥ २९ ॥ म्हणोनि सकळ व्यापक। जो निजात्म प्रकाशक। निजगुह्य ब्रह्म एक। गुरुत्वें ठेलें॥ ३०॥ ते तुम्हीच कृपामूर्ति। अंत:करणीं निर्विषयस्फूर्ति। ते निर्विषय झाले गुरुमूर्ति। गोपालदास रूप ॥ ३१ ॥ मग आपले आपण। वाढवावया निजात्ममहिमान। करिती स्वयें करुणास्तवन। प्रत्यया येऊन निजबोधें ॥ ३२ ॥ तो निजबोधें निमित्त करून। शिरीं ठेविला करचरण। निजस्फूर्ति करुणापूर्ण। वर्णन पुढिले समासीं ॥३३॥

इति श्रीगोपालदास कृपाप्रसादे गुरुस्तोत्रे ओवीछंद प्रबद्धायां अद्वैतस्तुति निरूपणं नाम प्रथम: समास: ॥

या स्तोत्रांतील अद्वैत प्रतिपादन, अर्थगांभीर्य, विचारसौष्ठवादि गुण व त्यावेळीं महाराजांजवळ असलेली ग्रंथसंग्रहादि अल्प सामुग्री यांचा विचार केला असतां त्यांच्या अलौकिक बुद्धिमत्तेची उत्तम साक्ष पटते.

पुढें लवकरच महाराजांस श्रीज्ञानेश्वर महाराजांचा [1]अनुग्रह झाला. त्यानंतर बारावर्षेंपर्यंत ते गोपालदासांकडे गेले नाहींत. त्याचें कारण एके ठिकाणीं त्यांनीं असें लिहिलें आहे:—

---

१ यासंबंधीं महाराजांचा पुढील अभंग व ओव्या पहा:—माझें तंव काज केव्हांचेंचि झालें। जैसे कानीं दिले वर्णचारी ॥ १ ॥ आतां तुझें तुज लागेल देखणें। कलंकीत होणें नोहे कुळीं ॥ २ ॥ पुढील समस्त नाहीं माझे हातीं। रहावें जागृतीं येऊनीयां ॥ ३ ॥ आळंदीशा तुम्हां निवृत्तीची आण। आपुले चरण लोपा जरी ॥४॥

ओव्या नित्यतीर्थांतील:—

माझा सद्गुरु करुणाघन। आळंदीपती कल्याणनिधान। जेणें आपुलिया नामामंत्र देऊन। कृतार्थ केलें मजलागीं॥कैवल्य कनकाचिया दाना। जो न कडसी थारसाना। द्रष्टयाचे दर्शना। पाठाऊ जो ॥ या साच करावया निजवचना। न देखोनी मम पात्रपणा। अंकीं घेवोनि खुणा। सांगितल्या खनामाच्या ॥

" तातांनीं अनुग्रह देण्याचे पूर्वीं उतावळीनें मी गोपालदास महाराजांचा मंत्र घेतला. त्यांनीं दत्तात्रेयाचा मंत्र दिला. तो मला न आवडून मी त्यांचकडे दहा बारा वर्षें गेलों नाहीं. माझी आवडी श्रीकृष्णाकडे होती. "

पुढें शके १८३६ त चैत्र वद्य ७ चे दिवशीं गोपालदासांची व महाराजांची परस्पर भेट उमरावती येथें होऊन गोपालदासांनीं त्यांस श्रीकृष्णमंत्र जपत जा म्हणून सांगितलें. या प्रसंगाचें वर्णन महाराजांनीं तीन अभंगांत केलें आहे. ते अभंग त्यांच्या गाथ्यांत छापले आहेत. त्यांतून एक येथें घेतों:—

काय सांगूं सये सुदीन महिमा । मिळालें तें आम्हां मनोबळ ॥ १ ॥ दत्तात्रेय मंत्र नावडला जीवा । गोपिनाथ ठेवा धरियेला ॥ २ ॥ शापभयें नाहीं गेलों भेटावया । मंत्रगुरुराया बारावर्षें ॥ ३ ॥ परी कृष्णनामीं धरियेला छंद । साह्य केलें शुद्ध ज्ञानदेवें ॥ ४ ॥ दिला अनुग्रह घेऊनि मांडीवरी । परी मतांतरीं भय होतें ॥५॥ म्हणोनी स्वामीनें बळें केला मेळ । पूर्व गुरुस्थळ दाखवोनी ॥ ६ ॥ वदविलें त्यांच्या मुखें कृष्णगाथा । मुखें न जपावा दत्तमंत्र ॥७॥ आळंदी वल्लभे तूं माझी माऊली । आळी जे घेतली पुरवीसी ॥८॥

असो. गोपालदासांस महाराजांनीं पालखींत मिरविलें त्यावेळीं तुळजाबाई माधानासच होती. ती ता० २८ मे १९०१ रोजीं प्रसूत होऊन मुलगा झाला. त्याची जन्मपत्रिका महाराजांनीं स्वत: केली.

ह्याच सुमारास तिवसेकर दामोदर शास्त्रींची व महाराजांची चांदूरबाजार येथें भेट झाली. त्यांच्याकरितां पाणिनीय व्याकरणानुसार नवीन सूत्रें रचून महाराजांनीं तीं त्यांस सांगितलीं.

---

१ या सूत्रांचा कांहीं भाग लेखकास माधान येथें मिळाला. त्यांतून चतुर्थ पादांतील कांहीं सूत्रें आरंभींच्या मंगलाचरणासह येथें देतों:—

अनुष्टुप् श्लोक । ज्ञानेश्वरं गुरुं नत्वा सच्चिदानंदमीश्वरं । शिक्षाशास्त्रं प्रवक्ष्यामि पाणिनीयमते यथा ॥

ग्रंथ लेखन, वाचन, प्राचीन व अर्वाचीन ग्रंथांचा शोध व संग्रह, ग्रंथ-निरूपण व कीर्तन वगैरे क्रम पूर्ववत चालू होताच.

पुढें लवकरच महाराज सौ० मनकरणिका आईसह सिरसगांवास जाऊन राजाराम देशमुख यांचे घरीं राहूं लागले. तेथेंही महाराजांची बाल-लीला, विद्याव्यासंग, भगवच्चर्या, अमृतानुभवाचें व ज्ञानेश्वरीचें निरूपण, कीर्तन, भजन वगैरे रात्रंदिवस चालत असे. ह्यांचें सरळ व स्वच्छंदी वर्तन, स्त्रीपुरुषांबरोबर फुगड्या वगैरे खेळणें; अभंग, पदें वगैरे म्हणणें; भाकरी, तेल भाजी वगैरे सर्वांनीं मिळून एके ठिकाणीं जेवणें इत्यादि गोष्टींचें तत्रस्थ लोकांस मोठें कौतुक वाटे व भाविक लोकांना नवीन उ-त्साह उत्पन्न होई. येथें गणपत आन्याजी घोटे नांवाचा एक तरूण मनुष्य ह्यावेळीं गुमास्ता पांडेपणाचें काम करीत होता. ह्याचीं गेलीं चार पांच वर्षे रा० रा० माधवराव खोलकुटे यांचे घरींच विद्यार्थी दशेंत गेलीं होतीं. पुढें यानें महाराजांच्या गुणांस लुब्ध होऊन त्यांचा मंत्र घेतला व फावल्या वेळांत लेखन वाचन वगैरे करून त्यांची सेवा करूं लागला. महा-राजही पुढें सिरसगांवीं आले म्हणजे याच्या घरींच उतरूं लागले. कधीं कधीं

---

भाषा––सत्यज्ञानसुखरूप परमेश्वर आणि श्रीसद्गुरु ज्ञानेश्वर महाराज यांना नमस्कार करून. भगवान् पाणिनी आचार्यांचे मताप्रमाणें वर्णोच्चार शिक्षा कथन करितो.

शिक्षा चतुर्विधा स्थानकरण प्रयत्नोत्थान भेदात् ।

भाषा—ही वर्णोच्चार शिक्षा ठिकाण, साधन, प्रयत्न आणि वायूचें उठणें अशा भेदानें चार प्रकारची आहे.

यत्रस्थाः वर्णाः उपलभ्यंते तत्स्थानं ।

भाषा—ज्या ठिकाणाहून वर्णाचा उच्चार कळतो त्याला स्थान म्हणतात.

येन निर्वृत्यते तत्करणं ।

भाषा—ज्या साधनानें वर्णांचा उच्चार करावा लागतो त्याला करण म्हण-तात. इ० इ०

महाराज एकटेच येत व कधीं कधीं सौ० मनकरणिका आईस बरोबर आणीत.

पुस्तकें वाचून घेण्याकरितां कधीं कधीं महाराज सिरसगांवच्या सरकारी शाळेंत जात असत. तेवेळीं सर्व शिक्षक मंडळी त्यांच्याजवळ जमत असत. एकानें पुस्तक वाचावें व इतरांनीं ऐकावें. महाराज पुस्तकांतील विषयाचें विवेचन करीत. याप्रमाणें सुमारें तासभर निरूपण होत असे. महाराजांस बाबागर्देकृत पंचदशीचें एक पुस्तक पाहिजे होतें. तें सर्व शिक्षकमंडळींनीं वर्गणी करून त्यांस बोलावून दिलें. तेव्हांपासून पंचदशीचें निरूपण होऊं लागलें.

रा० रा० उद्धवरावबंदे हे यावेळीं शाळेचे मुख्य शिक्षक होते. त्यांच्या येथेंही रात्रौ महाराज जात असत व बऱ्याच रात्रीपर्यंत श्रीमद्भगवद्गीतेचें वाचन व वेदांत निरूपण वगैरे चालत असे. तेथून गणपतरावांचे बिऱ्हाडावर परत आल्यावर अर्थातच घराचें दार बंद झालेलें असे. तेव्हां घरांतील माणसांची झोंपमोड होऊं नये म्हणून महाराजांनीं रात्रभर बाहेरच दाराशीं पडून राहावें.

रा० रा० काशीराव बापूजी देशमुख हे महाराजांच्या ज्ञातीचे एक प्रमुख गृहस्थ आहेत. हल्लीं त्यांची नोकरी गेल्यामुळें हे सिरसगांवासच राहत होते. ह्यांस महाराजांनीं हैदराबादेस जाऊन अपील करण्याकरितां आग्रहपूर्वक सांगितल्यावरून त्यांनीं तसें केलें व पुनः ते पूर्ववत नौकरीवर बहाल झाले. ती हकीकत त्यांनीं स्वतः लिहून दिलेली आहे ती जशिच्या तशीच खालीं देतोः—

इ० स० १९०१ सालीं श्रीमत्सद्गुरु गुलाबराव महाराज हे माधानाहून सिरसगांवास येत असत. या दोन गांवांत अंतर दोन कोसांचें आहे. तरी ते बहुतकरून एकटेच येत असत. सिरसगांवास आले म्हणजे त्यांनीं रा. गणपतराव घोटे गुमास्ते पटवारी यांचे घरीं उतरावें. गणपतरावही एकटेच होते. सबब स्वयंपाकाची व्यवस्था न जमल्यास दोघांनींही दाळवा मुरमुरे वगैरेवर कहीं कधीं दिवस काढावेत. पुढें थोडे दिवसांनीं महाराजांबरोबर परलोकवासी सौ० मनकरणिका मायबाईही

येत असत. याच वेळीं महाराजांसी माझी प्रथम भेट सिरसगांवास झाली. महाराज कधीं कधीं माझे घरीं येत असत. जो कोणी भेटेल त्याच्या ते पायां पडत असत. भलत्याच माणसाचे पायां पडण्याबद्दल त्यांना विरोधात्मक प्रश्न केला असतां त्यांनीं शांतपणें उत्तर द्यावें कीं श्रीज्ञानेश्वर-महाराज समजून कोणासही नमस्कार करणें चांगलें आहे. या वेळीं महाराजांचा व माझा सहवास साधारण बेताचाच होता व त्यांचे आंगचे सामर्थ्याची मला मुळींच कल्पना नव्हती. सबब अर्थातच त्यांचे विषयीं माझे मनांत आतां आहे तशी पूज्यबुद्धि नव्हती. आपले जातीचा एक आंधळा मनुष्य फारच विशेष बुद्धिमान आहे एवढेंच कायतें मला वाटत असे. व त्यामुळें मी त्यांच्याशीं बरोबरीचे नात्यानें वागत असे. दैव आणि प्रयत्न, ईश्वर आहे किंवा नाहीं, जीव आणि ईश्वर वगैरे विषयांवर त्यांचा माझा वादविवाद होत असे. हे विषय उत्तम प्रकारें महाराज समजून देत असत. एके दिवशीं रामरक्षास्तोत्र मी पाठ म्हणत असतांना त्यांत कांहीं अशुद्ध पाठ म्हणण्यांत आला. तो महाराजांनीं शुद्ध करून दिला. यापुर्वीची माझी हकीकत अशी आहे कीं इ० स० १९०० सालीं दर्यापूर तहसिलींत मी नायब तहसिलदार असतांना माझे हितशत्रूंनीं माझे विरुद्ध कांहीं कारस्थान रचून वरिष्ठ अधिकाऱ्यांचें मन माझे विषयीं कलुषित केलें. त्या संबंधांत माझेवर प्रकरण चाललें. या संकटाचे निवारण करण्याकरितां दर्यापुरास चंद्रभागा नदीचे तिरीं ब्राह्मणद्वारा मी अनुष्ठान करविलें. आणि सप्तशतीचा पाठ वगैरे करवून यथासांग होमहवन वगैरे करविलें. त्यांत अनुकूल दृष्टांत पुष्कळ झाले. त्यामुळें आतां माझें नुकसान होणार नाहीं असा भरंवसा वाटूं लागला. परंतु अखेरीस ता० १८ माहे फेब्रुवारी सन १९०१ इ० रोजीं दर्यापूरचे नायब तहसीलदारांचे जागेवरून माझे कायमचे एलिचपूर जिल्हाबोर्डाचे अकाउंटंटचे जागीं परत जाण्याबद्दलचा हुकूम मला मिळाला व त्याच दिवशीं अकाउंटंटचे जागेवरून मला बडतर्फ केल्याबद्दलचा जनाब डेप्युटी कमिश्नर साहेब बहादूर यांचा हुकूम दर्यापुरासच मला मिळाला. त्यामुळें मी आपले नौकरीचा चार्ज देऊन उमरावतीस येऊन राहिलों. जनाब कमिश्नर

साहेब बहाद्दूर प्रांत वराड यांचेकडे आपले नौकरीबद्दल अपील केलें. माझे दुर्दैवामुळें म्हणा अगर माझे हितशत्रूनें तेथेंही जोर दिल्यामुळें म्हणा पण माझें अपील नामंजूर झालें. लोकलबोर्डाचे कायद्याप्रमाणें जनाब कमिशनर साहेबांचा हुकूम अखेरचा मानला जातो. सबब त्यांचे हुकुमाविरुद्ध वरिष्ठ अधिकाऱ्याकडे मला अपील करतां येत नव्हते. सबब पुढें अपील करण्याचा नाद सोडून देणें मला भाग पडलें. अपीलाच्या खटपटींतून मोकळा झाल्यानंतर मी कधीं कधीं आपले वतनाचे गांवीं सिरसगांवबंड येथें जाऊं लागलों. तेथें आरंभीं सांगितल्याप्रमाणें महाराजांची व माझी प्रथम भेट झाली. व बोलणें चालणें होऊं लागलें.

थोडे दिवसांचे सहवासानंतर मी आपली नौकरीची हकीकत महाराजांस सांगितली. त्यावर वरिष्ठ अधिकाऱ्याकडे अपील करण्याविषयींची सल्ला महाराजांनीं मला दिली. परंतु कायद्याप्रमाणें आतां अपील करण्यास जागा नाहीं असें त्यांना मी उत्तर दिलें. " तरी तुम्ही अपील करा, यांत तुम्हाला यश येईल. मी तुमचेकरितां देवाची प्रार्थना करतों आणि तो तुम्हाला यश देईल " असें महाराजांनीं आग्रहपूर्वक सांगितलें. परंतु माझा त्यावर भरंवसा बसेना. कारण महाराजांस कायदा माहीत नाहीं अशी माझी पक्की समजूत होती. तरी महाराज म्हणतात म्हणून अपील करून पहावें, जमल्यास उत्तमच आहे, नाहींतर आपलें काय जाणार आहे ? अशा समजूतीनें अपील करण्यास मी तयार झालों. नकला घेतल्यावर अपीलाकरितां हैदराबादेस जावें किंवा नाहीं असा विचार पुनः माझे मनांत घोळूं लागला. इतक्यांत माझे एक मित्र रा० रामरावपाटील तळवेलकर हे मला उमरावतीस भेटले. पाटीलकीसंबंधानें अपील करण्याकरितां अलीशान् रेसिडेंट साहेबांकडे हैदराबादेस त्यांना जाण्याचें होतें. त्यांनीं हैदराबादेस माझे आपिलाकरितां चालण्याविषयीं मला फारच आग्रह केला. सबब अम्ही दोघेही हैदराबादेस जाण्याकरितां निघालों. * *

माझें अपील मंजूर होईल किंवा नाहीं याची मोठीच वानवा होती. सबब त्याची कारवाई जमविण्या करितां मी हैदराबादेस सरासरी दोन महिने राहिलों. श्रीराम माझी इष्टदेवता असल्यामुळें रामपंचायतनाचा

फोटो मी बरोबर नेला होता. त्याची पूजाअर्चा व ध्यान दररोज नियमानें दोन्ही सांज मी निष्ठापूर्वक करून रामरक्षास्तोत्राचा जपहि करीत असे. परमेश्वर कृपेवरच माझा सर्वस्वी भरंवसा होता. अखेरीस रामराव तळवेलकराचे अपील नामंजूर झालें. आणि माझें अपिल मात्र मंजूर झालें. माझी इच्छा इतकीच होती कीं माझा बडतर्फीचा कलंक धुवून निघावा आणि उजळ माथ्यानें मला घरीं जाण्यास मिळावें. म्हणजे मी लाख मिळविले. परंतु माझ्या कल्पनेपेक्षां शेंकडो पटीनें जास्त माझे फायद्याचा ठराव झाला. तो येणेंप्रमाणें:—

१. मला सन्मानपूर्वक निर्दोषी ठरविण्यांत आलें. २. मी १४ महिनेपर्यंत नोकरीवरून घरीं बसलों होतों तितके दिवसाचा पूर्ण पगार घर बसल्या मिळाला. ३. पहिली कायमची नोकरी मिळाली. ४. चवदा महिने घरीं बसल्यामुळें त्यापूर्वीची अकरा वर्षांची पेनशनेबल सरविस बुडाली होती तीही मिळाली. ५. आणि अशा प्रकारचा अन्याय पुढें होऊं नये म्हणून सरक्युलर हुकूम सोडण्यांत आला.

सदरहू ठराव सेक्रेटरी वऱ्हाडप्रांत निस्बत अलीशान् मे० रेसिडेंट साहेब बहादूर हैदराबाद यांजकडून मे० कमिश्नर साहेब हैदराबाद असाइन्ड डिस्ट्रिक्टस् यांना गेलेलें पत्र नंबर १२०३ ता० ८।४।१९०२ यांत नमूद केलेला आहे.

हा ठराव म्हणजे भक्तवत्सल प्रभू जो श्रीराम त्याच्या कृपाप्रभावाचेंच फळ होय. माझें स्वतःचें पुण्य जरी त्यावेळीं क्षीण झालेलें होतें तरी माझे तर्फे श्रीरामाच्या कोर्टांत लढत असलेले वकील श्रीमत्सद्गुरु गुलाबराव महाराज हे फार समर्थ होते. महाराजांची खरी ओळख जरी त्या वेळीं मजसारख्या पामरास पटली नव्हती तरी श्रीरामचंद्रास ती पूर्णपणें पटलेली होती. माझ्या हाका जगदीशास जरी कर्णकठोर वाटत होत्या तरी त्यांचा एक एक शद्ब झेलण्यास तो उत्कंठेनें तत्पर होता. मला मर्मस्थानीं ठेंचून ठेंचून मारण्याचा आटोकाट प्रयत्न माझे हितशत्रूंनीं जरी या वेळींही केलाच होता तरी मारणारापेक्षां तारणारा अथवा पाठीशीं घालणारा अगाध सामर्थ्यवान् होता. माझी अगदींच खालाव-

लेली बाजू महाराजांसारख्या समर्थ विभूतीनें उचलून धरल्यामुळेंच इतकी कल्पनेच्या बाहेर ती वर उचलली गेली व म्हणूनच माझे विरुद्धपक्षानें केलेली शिकस्त निर्फळ होऊन अखेरीस माझाच डाव सरसा पडला व ज्या कोर्टांत अपील करण्यास कायद्याप्रमाणें मला जागा नव्हती व जेथें आपणांस दाद मिळेल अशी तीळभरही आशा नव्हती त्याच कोर्टांत माझें अपील मंजूर होऊन अकल्पित यश मिळालें. असा हा ध्यानीं मनीं नस-लेला ठराव ऐकून माझें हृदय कृतज्ञतेनें भरून आलें व " अनंत हस्तें कमलावरानें । देतां किती घेशिल दोंकरानें ॥ " या श्लोकाचें स्मरण होऊन माझे नेत्रांतून आनंदाश्रू वाहिले. या ठरावाची हकीकत सिरसगां-वास परत आल्यावर महाराजांस मी कळविली. तेव्हां त्यांस फार आनंद झाला आणि त्यांनीं माझ्याकरितां जप केला होता त्याचें श्रेय मला दिलें. हल्लीं मी नोकरीवर असून पेनशन घेण्याचे तयारींत आहे. "

वरील ठरावांत अशा प्रकारचा अन्याय पुढें होऊं नये म्हणून जो सरक्युलर हुकूम सोडण्यांत आला तो सर्व लोककल्याणार्थ महाराजांचे प्रेरणेनेंच सोडण्यांत आला हें विशेष आहे.

वरील प्रसंगीं काशीरावबापू हे सिरसगांवीं असतांना दैव आणि प्रयत्न, जीव आणि ईश्वर वगैरे विषयांवर महाराजांचे व त्यांचें संभाषण होऊन हे विषय महाराज उत्तम रीतीनें समजाऊन देत असत असें वरील हकी-कतींत म्हटलें आहे. त्या वेळचे जीवेश्वरांविषयींचे महाराजांनीं काढलेले कांहीं प्रश्न गणपतरावाच्या वहींत लेखकाला आढळले ते असे:—

## ईश्वराविषयीं प्रश्न.

प्रश्न १. या अखिल जगताचा कर्ता कोणी आहे किंवा नाहीं ? आहे म्हणाल तर तो कोठें आहे ? नाहीं म्हणाल तर या सृष्टींत कार्य कारण भाव अनादि कोणाच्या सत्तेवर चालतो ? प्रश्न २. या अखिल जगाचा कर्ता अथवा नियंता जो कोणी असेल तो अव्यक्त किंवा व्यक्त आहे ? अव्यक्त म्हणाल तर त्यानें सृष्टि क्रमानें उत्पन्न केली किंवा एकदम उत्पन्न केली ? क्रमानें उत्पन्न केली म्हणाल तर प्रथम कोणता पदार्थ उत्पन्न

केला ? त्यापासून पुढें सृष्टि कशी निर्माण केली ? तिला साहित्य काय लागलें ? किती काल लोटला ? व कोठें निर्माण झाली ? एकदम उत्पन्न केली म्हणाल तर त्यांत त्या कर्त्याचा हेतु कोणता ? व त्याला निर्माण करण्याची आवश्यकता काय ? कर्ता व्यक्त म्हणाल तर देह पंचतत्वाचा असून तो दिसला पाहिजे. आणि तसें मानल्यास आमच्यांत व त्याच्यांत कांहींच भेद नसल्यमुळें त्याची आम्हाला जरूरी नाहीं. व आमची त्याला जरूरी नाहीं. प्रश्न ३ ईश्वर उपाधिरहित आहे किंवा उपाधिबद्ध आहे ? उपाधिरहित म्हणाल तर त्यानें सृष्टि उत्पन्न करण्याची उपाधि स्वीकारण्याचें कारण काय ? उपाधिबद्ध आहे म्हणाल तर उपाधि जनक ईश्वर-जन्य असा भावसंबंध आहे किंवा काय ? उपाधि नंतर झाली म्हणाल तर त्या निरुपाधिकाला उपाधि उत्पन्न करून आपणास बांधून घ्यावें ह्यांत सुख कोणतें ?

प्रश्न ४. ईश्वर एक आहे किंवा अनेक आहेत ? एक म्हणाल तर ब्रह्मा, विष्णु, शंकर, राम, कृष्ण, दत्तात्रय हे सर्व अवतार ईश्वराचे नव्हेत असें मानावें लागेल ? अनेक म्हणाल तर अन्योन्याश्रय दोष येतो. त्यामुळें बुद्धीचा निश्चय कोठेंच बसत नाहीं. प्रश्न ५. ईश्वर अद्वैतरूप आहे, किंवा द्वैतरूप आहे ? अद्वैतरूप म्हणाल तर ओतःप्रोत तोच असल्यामुळें साऱ्या सृष्टीलाच ईश्वर मानावें लागेल. आणि तसें जर म्हणावें तर जगाची स्थिती एकरूप अनुभवास येत नाहीं. सृष्टींत एकास सुख दुसऱ्यास दुःख, एकास मोक्ष दुसऱ्यास बंधन, एकास ज्ञान दुसऱ्यास मूर्खत्व, एकास क्षमा दुसऱ्यास क्रोध, एकास राज्य दुसऱ्यास दरिद्र, जड चैतन्य, स्थावर जंगम, गोड कडू, चांगलें वाईट, स्वर्गनरक, असे दोन प्रकार दृष्टीस पडतात ते कां ? द्वैतरूप आहे म्हणाल तर संतांनीं मागें जें अद्वैत स्थापन केलें तें मिथ्या होईल. आणि तसें मानावें तर सर्वांच्या शरीरांत पंचभूत सारखेच आहेत. आणि सर्व प्राणियांना अखंड सुखाची इच्छा आहे ती कां असावी ? दोहोंने मिश्रित म्हणाल तर सुखःदुःख, पुण्यपाप, मोक्ष बंधन, क्षमा क्रोध, स्वर्गनरक, चांगलें वाईट, खरें खोटें, यांचें मिश्रण होऊन सारा घोटाळा होईल. व खऱ्या स्थितीचा शोध न लागल्यामुळें चित्ताची

हळहळ क़ायम राहील. प्रश्न ६. ईश्वर सद्रूप आहे किंवा असद्रूप आहे ? सद्रूप म्हणाल तर त्याला कधींच बंधन नसलें पाहिजे. असद्रूप म्हणाल तर तो मिथ्या होईल. सुज्ञ संतगुरूंनीं आमचे प्रश्नाचीं उत्तरें श्रुती, युक्ती व अनुभवांनीं द्यावीं. यांतील एक न्यून असतां कामा नये.

## जीवाविषयीं प्रश्न.

प्रश्न १. जीव आहे किंवा नाहीं ? आहे म्हणाल तर तो कसा आहे ? नित्य आहे किंवा अनित्य आहे ? नित्य म्हणाल तर एक जीव व दुसरा ईश्वर अशा लहान मोठेपणाच्या भावामुळें कायमचें द्वैत उभें राहील. व अद्वैत सिद्धांत ढांसळेल. अनित्य म्हणाल तर तो कशाचा केलेला आहे व त्याला पापपुण्याचीं फळें कोठें मिळतात ? जीव नाहीं म्हणाल तर जगांत सुखदु:ख भोक्ता कोणी नसल्यामुळें अकृताभ्यागम व कृतप्रणाश हे दोन दोष येतील व ते दोष स्वीकारल्यास ईश्वराचे भजनाची जरूरी राहणार नाहीं. व तसें झाल्यास हिंदु धर्माची ग्लानी होईल. प्रश्न २. जीव ईश्वराचा अंश आहे किंवा त्यापासून कोणी निराळा पदार्थ आहे ? अंश म्हणाल तर ई-श्वरास सांशत्व असल्यामुळें स्वगत भेद आहे असें मानावें लागेल. आणि तसें मानल्यास दु.ख असतांही ईश्वरच होईल व स्वर्गनरक हेही ईश्वरा-चेच अंश होतील व पुण्यपाप हे ईश्वरालाच भोगावे लागतील. असा अतिप्रसंग करण्यापेक्षां या देहांतलें सुख कां भोगूं नये ? जीव निराळा प-दार्थ आहे असें म्हणाल तर तो निर्माण कोणी केला ? व कशास्तव केला ? अनादि सिद्ध आहे म्हणाल तर जीवाची व ईश्वराची साम्यता झाल्यामुळें जीवानें ईश्वरास भजलें पाहिजे अशी जरूरी राहणार नाहीं.

प्रश्न ३. जीव हा प्रत्यक्षगम्य आहे किंवा अनुमानगम्य आहे ? प्रत्यक्ष-गम्य म्हणाल तर तो डोळ्यांनीं दिसला पाहिजे व अनुमानगम्य म्हणाल तर मरणानंतर त्याची स्थिति कशी राहते हें कळलें पाहिजे. प्रश्न ४. संतांनीं मागें जो जाणीवरूप आत्मा ठरविला तो सत्य किंवा असत्य ? सत्य म्ह-णाल तर पदार्थवादीयांचें मत असें आहे कीं जाणीवशक्ति मेंदूंत राहते आणि तो मेंदु मरणानंतर नाश पावतो. असत्य म्हणाल तर मेंदूस जाणीव

शक्ति त्या सर्वज्ञाच्या संस्कारानें येतें आणि सुषुप्तींत अनुभवास येतें. दोहोंनीं मिश्र म्हणाल तर जन्ममरण, ज्ञानमूर्खत्व, वैरीमित्रत्व, निद्रा व जागृति या सर्वांचें मिश्रण होऊन सारा घोटाळा होईल. प्रश्न ५. ईश्वर जीवास जें मोक्षसुख देतो तें कसें देतो ? आपणांत मिळवून घेतो किंवा आपणारहित कोणी सुख देतो ? आपणांत मिळवून घेतो म्हणाल तर दोहों पदार्थांचें मिश्रण होऊन गंधक व सोन्याच्या मिश्रणाप्रमाणें एक तिसराच पदार्थ उत्पन्न झाला पाहिजे ? आणि तसें मानल्यास चक्रिकापत्ति दोष येतो. निराळें सुख देतो म्हणाल तर तें सुख परतंत्र होईल व तेथें सुखनाशाची भीति राहील. तर मग तसें सुख आम्हांस असून नसून सारखेंच. त्यापेक्षां आपलें विषयसुख बरें असें मानूं. या प्रश्नावर सुज्ञ सद्गुरूंचीं श्रुती, युक्ति व अनुभवाचें साह्यानें जर समर्पक उत्तरें येतील तर त्यांचे आम्ही आभारी होऊं. ॐ तत्सत्.

## शके १८२४ इ० स० १९०२.

नाना मतवाद्यांचे ग्रंथ, तसेच प्राचीन ग्रंथ मिळतील तितके बोलाविणें, ते वाचवून घेणें, अद्वैत सिद्धांताच्या शुद्ध कसोटीला ते किती अंशानें उतरतात हें शंका प्रतिशंका रूपानें स्पष्ट दाखविणें; इत्यादि महाराजांचा व्यवसाय आतां वाढत्या प्रमाणावर चालू झाला. निरनिराळ्या छापखान्यांशीं व ग्रंथकारांशीं पत्रव्यवहार वाढला. कोणतेंही नवीन पुस्तक पोष्टांतून आलें म्हणजे त्याच्यावर हात फिरवून ह्यांत अमुक मताचें प्रतिपादन आहे, असें महाराजांनीं एकदम सांगावें. व नंतर तें रामचंद्राजवळ देऊन अमुक पानांतला अमुक श्लोक काढ असें म्हणावें. ह्या अलौकिक सामर्थ्याबरोबरच " अलौकिक नोहावें लोकांप्रती " "जाणपणें फुगूं नये । अजाणपण सोडूं नये ॥ " इत्यादि संतपरंपरेची शिकवणही महाराजांच्या हातवटींत उपजतच होती व ती त्यांच्या नेहमींच्या भाषणांत, मान्य जनांच्या भेटींत, परिचित मंडळीच्या पत्रव्यवहारांत वगैरे अधिकाधिक दिसून येऊं लागली.

नाकानें दोन दोन तांबे पाणी पिणें व धौतिबास्ति वगैरे करणें ह्या योग-क्रियाही यथापूर्व चालू होत्या. यावेळींही त्यांस शौचेला तीन तीन तास बस्तीकरितां लागत असत. शौचेला महाराज गांवाबाहेर दोन दोन [illegible]मैल, धुण्याचा शब्द ऐकूं येणार नाहीं अशा ठिकाणीं एकटेच जेवण वगैरे आट[illegible]यावर जात असत. हिवाळ्यांत उन्हांत शौचेस बसत व उन्हाळ्यांत झाडाखाली [illegible] सावलींत बसत.

' गुलाब [illegible] हें यावनी नांव असल्यामुळें पांडुरंगनाथ हें दुसरें नाथसंप्र-दायदर्शक व पा[illegible]णिक नांव महाराजांनीं याच सुमारास घेतलें असावें असें रामचंद्रबापूंच्या पत्रव्यवहारावरून दिसून येतें.

आतांपर्यंत ज्या ज्या मत[illegible] महाराजांनीं समीक्षा केली होती त्यां-विषयींचा उल्लेख त्यांनीं [illegible] श्री० रामराव कृष्ण जटार स्वानंद-साम्राज्यकर्ते यांस ता० १६ [illegible] जून १९०२ ला पाठविलेल्या पत्रांत केला आहे. तो येणेंप्रमाणें:—

## मानभावमतसमीक्षा.

मळरचना नांवाच्या प्रकरणांतील मतवादः—जीव व परमात्मा दोन्ही भिन्न आहेत व नित्य आहेत. जीव हा अविद्येनें बद्ध आहे व ईश्वर हा मायेचा देह घेऊन जीवाला उद्धरण्याकरितां अवतार घेत असतो. ती अविद्या अनित्य आहे. तिचें निरसन झालें म्हणजे जीव परमेश्वराचे ठिकाणीं जातो. परंतु परमेश्वर होत नाहीं.

वरील मतांवर शंकाः—

प्रथम शंकाः—जीव नित्य आहे आणि अविद्या अनित्य आहे तर जीवाला अविद्या केव्हांपासून लागली ? आणि ती लागण्याचें कारण काय ?

अनादि आहे म्हणाल तर तिचें निरसन कसें होईल ? उत्पन्न झाली नाहीं

---

१ हें पत्र महाराजांनीं ब्राह्मण मंडळीला लिहिण्याच्या आपल्या नेहमींच्या परिपाठाप्रमाणें " गुरु " असें संबोधन देऊन उत्कृष्ट भावनेच्या शब्दांनीं गौरवून लिहिलें आहे.

परंतु तिचें निरसन होतें म्हणाल तर जी उत्पन्नच झाली नाहीं तिचें निरसन होणें म्हणजे वांझोटीचा पुत्र मेला असें म्हणण्यासारखें होय.

शंका २. ईश्वर हा मायेचा देह घेतो तर तो उपाधिबद्ध होईल. मग त्यास मुक्त म्हणतां येणार नाहीं.

शंका ३. ईश्वर मुक्त आहे परंतु तो जीवाकरितां मुद्दाम मायाबद्ध होतो असें म्हणाल तर त्याला एवढी उपाधी घेण्याची गरज काय ?

शंका ४. त्याला करुणाच तशी आहे म्हणून तो मायेचा देह घेतो असें म्हणाल तर करुणा हा गुण मायेचा आहे असें तुमच्याच महावाक्यांत सांगितलें आहे म्हणून ईश्वरही मायाबद्ध आहे काय ?

शंका ५. जीव जर परमेश्वर होत नाहीं तर त्याला स्वतंत्र सुख मिळणार नाहीं. त्यामुळें भीति कायम राहील मग मोक्ष कशाचा ? म्हणून परमेश्वरानें जीवाला परमेश्वरच केलें पाहिजे. आणि—

शंका ६. एक पदार्थ दुसरा कसा होईल असें म्हणाल तर ईश्वराच्या आंगीं अघटित सामर्थ्य नाहीं असें कबूल करा. आणि तसें म्हणाल तर तुमचें मत स्वीकारून अर्थ कोणता ?

ह्या शंकांचे उत्तर मानभावांस देतां आलें नाहीं.

## डार्विनमतसमीक्षा.

या मतांत मनुष्यांची उत्क्रांति मानली आहे. मनुष्यप्राणि हा पूर्वीचा मासा होता व नंतर माकड होऊन हळुहळु मनुष्य झाला. तशीच पृथ्वि वायुरूप होती व ती घनरूप झाली. या सर्वांचें कारण एक कांहीं तरी आहे. आशंकाः— डार्विन जें कारण मानतो तें उपादान मानतो कीं निमित्त मानतो कोण जाणे ? निमित्त मानत असल्यास तें जगदोपादानाहून भिन्न असलें पाहिजे. व त्याची उत्क्रांति न झाली पाहिजे, आणि तसें मानल्यास उत्क्रांतीचें उपादान कोणते ? बरें निमित्त कारणच नाहीं तर उपादानाचे ठायीं उत्क्रांतीचें सामर्थ्य कोठून आले ? अनादिच आहे असें म्हणेल तर सर्वच गोष्टी त्या कारणांत अनादि असल्या पाहिजेत. आणि एकाबरोबर सर्वांचीच उत्क्रांति झाली पाहिजे. परंतु तसें होत नाहीं. कांहीं गोष्टींची अपक्रांति ही होते. हल्लीं जे पृथ्वींत हाडांचे

अश्मीभूत सांपळे ( Fossils ) सांपडतात त्यांपेक्षां आपलें शरीर किती अंशानें कमी आहे ? बरें असो. त्याच मतांत एके ठिकाणीं म्हटलें आहे कीं मनुष्याची बुद्धि जास्त वृद्धिंगत होऊन स्तुतिप्रियत्व हा गुण हळुहळु नष्ट होईल. येथें एक शंका येते कीं स्तुतिप्रियत्व आणि कर्तव्यशक्ति हे दोन्ही धर्म चित्ताचे किंवा बुद्धीचे असून त्यांतच एका गुणाची उत्क्रांति व्हावी व एका गुणाची अपक्रांति व्हावी ह्याचें कारण काय ? आकाश हें स्वतंत्र सत्व असून त्याची उत्क्रांति कां होत नाहीं ? बरें दृश्य पदार्थांमध्यें तरी ज्ञानाची उत्क्रांति होते कीं शरीराची होते ? शरीराचीच होते म्हणाल तर ज्या पदार्थापासून ज्याची उत्क्रांति होत असेल त्या पदार्थाची हळुहळु अपक्रांति झाली पाहिजे. जसें माशाचा माकड झाला म्हणजे मासा नष्ट झाला पाहिजे. आणि माशाचें नष्ट होणें म्हणजे त्याची अपक्रांतिच होय. आणि असाच सिद्धांत मानला तर मग कारणाचें अनादित्व व अनंतत्व कोठें राहिलें ? अनंतत्व जें ठरवावयाचें तें एका नियमावरून किंवा एका उदाहरणावरूनच ठरत नाहीं. तर त्याला सर्व नियम, सर्व उदाहरणें, व सर्व आधार, सारखेच असले पाहिजेत. ज्ञानाची उत्क्रांति मानली तर माशांची व मनुष्याची जाणीवशक्ति एकच आहे. माशालाही स्वपोषक विषय व स्वविषयानंदाचें भान आहे. आणि मनुष्यालाही स्वपोषक पदार्थ व स्वविषयानंदाचें भान आहे. म्हणून दोघांचीही जाणीवशक्ति एकच आहे. त्यांत ज्ञानाची उत्क्रांति कोणती ? माशाचेपेक्षां मनुष्याचें ज्ञान उंच आहे, हीच त्याची उत्क्रांति हें म्हणणें संभवत नाहीं. कारण कीं दोघांच्याही विषयांची भिन्नता आहे. मनुष्याच्या विषयांचे ठायीं माशाला सुख होत नाहीं म्हणूनच त्यास मानवविषयांची प्रतीति नाहीं. जसें घृतानें मासा मरतो म्हणून त्यास घृत सुखकर नाहीं; व इच्छा नसल्यामुळें त्यास त्याची प्रतीति नाहीं. तसेंच माशांचे विषयानें मनुष्यास सुख होत नाहीं. जसें शेवाळादिक पदार्थ मासा भक्षितो व मनुष्य भक्षीत नाहीं, म्हणून त्यास शेवाळाची प्रतीति नाहीं. आतां दोघांचेही दृष्टी विषय एकच आहेत म्हणजे शेवाळ आणि घृत हे दोन्ही पदार्थ माशास व मनुष्यास सारखेच दिसतात मग विषय भिन्न कशाचे ? हें म्हणणें सम्यक् नाहीं. कारण कीं विषयाची दृश्यता दोघांसही समान घडते. तर मग विषयाचें रूपांतर, ज्ञानाची एकता, कांहीं शक्तींचें समानत्व,

कांहीं शक्तींचें पृथकत्व, आकृतींचें विलक्षणत्व, हे गुण माशांमध्यें व मनुष्यां-मध्येंही आढळतात. मग ह्याचेंच नांव का उत्क्रांति? बरें, मृत्तिकेपासून सर्वांची उत्क्रांति मानावी तर वृक्षादिकांची व्यवस्था कशी? वृक्षादिकांपासून हळुहळु जीव प्राणी झाले असें मानावें तर हें घडत नाहीं. कारण कीं हें परिणामी कार्य कारणांत न मिळालें पाहिजे. परंतु जगांत तर क्रिया अत्यंत भिन्न आढळतात. वृक्षाचे बीजाचा वृक्षच होतो आणि मनुष्याचे वीर्याचा मनुष्यच होतो. या-प्रमाणेंच अन्य गोष्टी. मनुष्याचे प्रेताची माती होते. आणि झाड तुटून पडलेल्या काष्ठाचीही माती होते. त्यांत कांहीं मातीचे, निमित्तकारण कुलालद्वारा घट होतात, कांहीं मातीमध्यें किडेही आढळतात. त्यांत कांहीं किडे नियमितकालीं असतात. जसे मृग, देवगायी, शिदोड इत्यादि. त्यांत शिदोडावर मीठ घातलें म्हणजे पाणी होतें. याप्रमाणें रसायनरीत्या कांहीं पदार्थ विरुद्धत्व पावतात. मग या नाना पदार्थांचीं कारणें निरनिराळीं मानावीं काय? असेंच दुसरें उदा-हरण. शेण आणि गर्दभमूत्र यांच्या मिश्रणानें विंचू उत्पन्न होतात. परंतु शेण आणि गोमुत्र हे तरी काय? तर अन्नाची व पाण्याची अपक्रांति. व विंचू हे काय? तर शेणाचें व गोमुत्राचें रूपांतर! असा दृष्टांत घेणें रूपांतराचा व सिद्धांत ठरविणें उत्क्रांतीचा. हें शोभेल तरी पण? बरें, निर्जीव पदार्थांचे सजीव पदार्थ होणें ह्याचें नांव उत्क्रांति. तर मग जें कांहीं कारण मूळ असेल तें अत्यंत निर्जीव होतें व हळुहळु आतां सजीव होत चाललें आहे असें मानावें लागेल. आणि तसें मानल्यास अत्यंत भाविष्य कालीं सर्व प्राणी सजीव झाले पाहिजेत. व त्यांच्या जातीही ठरवितां न आल्या पाहिजेत. पण असें होणें संभवनीय नाहीं. कारण कीं आतांच एकमेकांविरुद्ध क्रिया जगांत आढळतात. सजीव प्राणी सजीवांस विरुद्ध आहेत. म्हणजे नाशक आहेत. व निर्जीव पदार्थ निर्जीवांस नाशक आहेत. जसे सर्प, व्याघ्र हे मनुष्यादि सजीव नाशक; तसेंच अग्नि, जल हे कर्पूरलवणादि निर्जीवनाशक. आतां निर्जीव पदार्थही सजीवनाशक आहेत. जसें लवण शिदोडादि. सर्वांचा कारणमृत्तिकेचे ठायीं लय होतो म्हणाल तर कर्पूरादिकांचा लय मृत्तिकेचे ठायीं कोठें होतो? शिवाय धात्वादिकांचा विचार राहिलाच. आणि गुरुत्वाकर्षणशक्तीची उत्क्रांति कशी होते हें कळत नाहीं. तर कांहीं वस्तूंचें समानत्व, कांहीं वस्तूंची उत्क्रांति,

कांहीं वस्तूंची अपक्रांति, कांहीं वस्तूंचें रूपांतर, कांहीं वस्तूंचें अखंडत्व या सर्वांस उत्क्रांतीच नांव द्यावयाचें कीं काय ? हें वैविध्य एकाच कारणांत राहतें तर मग तेथें प्रतिबंध करणारी शक्ति कोणती ? व उत्क्रांति होण्याचें निमित्त काय ? बरें, उत्क्रांति कारणासहित होतें किंवा नुसत्या शक्तीची होते ? कारणासहित होते म्हणाल तर वरील गोष्टींप्रमाणें त्या कारणाची अपक्रांति होत होत त्यापासून होणाऱ्या कार्यांची हळुहळु उत्क्रांति झाली पाहिजे. असें मानलें असतां कारणाचें अनंतत्व नष्ट होईल; आणि तसें मानल्यास कारण सांत झाल्यामुळें अत्यंत भविष्यकालीं सर्वांचें कांहींतरी सजीव, निर्जीव, विरुद्ध, अविरुद्ध, एक कार्य झालें पाहिजे. तसें झालें म्हणजे उत्क्रांति वाद खुंटला. येथें कोणी अशी शंका करतील कीं उत्क्रांतिवाद खुंटला कशाचा ? कार्यांची आणखी उत्क्रांति होईल. तर त्यास मी विचारतो कीं अत्यंत भूतकालीं जें कारण मानतों तें देखील कोण्या भूतकालीन कारणाचें कार्यच असेल. असें जर मानलें तर कार्यच कार्यांचें कारण व कार्यच कार्यांचें कार्य असें मानावें लागेल. शक्तीची उत्क्रांति होते व कारण निराळें राहतें असें म्हणावें तर ही उत्क्रांति होण्याची शक्ति कारणांत आली कोठून ? स्वभावानें आली हें म्हणणें शोभत नाहीं. कारणाचा स्वभाव व कारणाची शक्ति त्याची उत्क्रांति म्हणणें म्हणजे वरील गोष्टीप्रमाणेंच. बरें, कोणी ती शक्ति कारणामध्यें आणून ठेविली व नंतर तो आणणारा तिची उत्क्रांति करूं लागला असें मानावें तर ती शक्ति आणणाऱ्यास किती काल लोटला ? व तें आणण्याचें निमित्त काय ? ही आणण्याची क्रिया आकाशरूप पोकळींतच घडली कीं आणखी कोठें घडली ? आकाशांतच घडली असें म्हणाल तर त्याची उत्क्रांति कां होऊं नये ? आकाश व काल ह्यांची उत्क्रांति होत नाहीं. केवल द्रव्यांचीच उत्क्रांति होते असें म्हणाल तर मग तें उपादान कारण अथवा त्याचेमध्यें शक्ति आणून ठेवणारा जो कोणी असेल तो निमित्त कारण हे दोघेही द्रव्यरूप मानावे कीं द्रव्यरहित मानावे ? द्रव्यरूप मानले तर त्या द्रव्याची उत्क्रांति कोण्या कारणापासून झाली ? द्रव्यरहित मानले तर त्यापासून द्रव्याची उत्क्रांति कशी संभवेल ? बरें एक कारण द्रव्यरूप मानणें व दुसरें कारण द्रव्यरहित मानणें हें सम्यक् नाहीं. कारण कीं जेथें द्रव्य आहे तेथें कोणत्याही द्रव्याची उत्क्रांति असली पाहिजे. आणि

द्रव्यरहित आहे त्यापासून तर द्रव्योत्क्रांति संभवत नाहीं. आणि द्रव्यच नित्य आहे त्याची उत्क्रांति होत जाते हें म्हणणें संभवत नाहीं. कारण कीं त्या द्रव्याचे परमाणू कोणत्या तरी शक्त्याश्रित असले पाहिजेत. आणि तसें मानावें तर त्या शक्तीलाही स्थान पाहिजेच. ही कल्पना बसवितां येत नाहीं म्हणून आग्रहानें द्रव्यच नित्य आहे, त्याची उत्क्रांति होते, असें म्हटलें तर पुन्हां वरील-प्रमाणें त्या द्रव्याच्या एका अवस्थेची अपक्रांति व दुसऱ्या अवस्थेची उत्क्रांति मानावी लागेल. आणि तसें केलें म्हणजे शेवटची जी अवस्था होईल तेथें तरी उत्क्रांतिवाद खुंटलाच पाहिजे. कोणी म्हणेल कीं उत्क्रांतीला शेवटची अवस्थाच नाहीं, कोणतीही अवस्था तिची पहिलीच आहे, तर मग कोणत्याच वस्तूची अपक्रांति न झाली पाहिजे. असो. अशा अनियमित सिद्धांतासच तुम्ही उत्क्रांति म्हणतां काय ? आणि आग्रहानें तसें मानत असाल तर डार्विन मताभिमानि-यांनो ! तुम्ही उत्क्रांति कोणत्या प्रत्यक्ष प्रमाणानें अथवा अनुमान प्रमाणानें सिद्ध करून दाखवितां ? ह्या सर्व प्रश्नांचीं उत्तरें डार्विनकृत उत्क्रांति मतांत मिळत नाहींत. असो. कोणत्याही बाजूंनीं पाहिलें असतां हें डार्विनचें मत अगदीं असिद्ध आहे. इति उत्क्रांति मतखंडन समाप्त.

## स्पेन्सर मत समीक्षा.

+ + नास्तिक मतापेक्षां हा गृहस्थ अंमळसा आंत शिरलेला आहे, अशी माझी खात्री झाली. म्हणून त्या मताचें येथें दिग्दर्शन करतो. स्पेन्सरचे दहा ग्रंथ उपलब्ध आहेत. त्यांत प्रथम ग्रंथ आदितत्व हा होय. त्याचे दोन भाग आहेत. पहिल्या भागाचें नांव अज्ञेयमीमांसा. व दुसऱ्याचें ज्ञेयमीमांसा. या दोन्ही भागांशीं अत्यंत विरोधच म्हटला पाहिजे. ज्ञेयमीमांसेमध्यें उत्क्रांति तत्वाचेंच अनुकरण केलें आहे. व आणखीही कांहीं गोष्टी सांगितल्या आहेत. त्यांमध्यें असेंही सांगितलें आहे कीं देहापुरतेंच ज्ञान असल्यानें आपलें भागत नाहीं. आणखीही कांहीं गोष्टींचें विशेष ज्ञान पाहिजे. हा मुद्दा ध्यानांत ठेवण्या-सारखा आहे. ह्यापेक्षां हा भाग वर्णन करण्याचें प्रयोजन नाहीं. अज्ञेयमीमांसा नामक प्रथम भागांत धर्म आणि शास्त्रांचे एकीकरण सांगितलें आहे व तें सर्वांशीं अगम्य आहे असें म्हणतात. आकाश, काल, द्रव्य, गती, शक्ति, मन,

जीव हे सर्वच पदार्थ अज्ञेय आहेत व त्यांच्या मुळीं कांहीं अज्ञेय अधिकरणहि आहे, अशी आपली भावना अनपेक्ष ज्ञानद्वारा आपणास शिकविते. हें अनपेक्ष ज्ञान म्हणजे भावनेचें अस्तित्व, दुसरें कांहीं नाहीं. या प्रतिपादनावरून मनांत बऱ्याच शंका येतात.

शंकाः—या सर्वांसच जर अज्ञेय मानावें तर ही एकदेशीय ज्ञानशक्ति कशी उत्पन्न झाली ? तिचेंही अंतःस्वरूप अज्ञेय आहे म्हणाल तर मग भावनाच नष्ट होईल. आणि तसें न मानलें तर बाह्य स्वरूप ज्ञानमय असणें व अंतःस्वरूप अज्ञेय असणें या प्रश्नाचा उलगडा कसा ? बरें जें कांहीं अज्ञेय आहे तें सर्वदेशीय आहे कीं एकदेशीय आहे ? सर्वदेशीय म्हणाल तर एकदेशाचे ठायीं ही ज्ञानशक्ति स्थित कशी झाली ? आणि एक देशीय म्हणाल तर सर्वदेशीय ज्ञेयाचे ठायीं एकदेशीय अज्ञेयत्व कसें राहिलें ? आतां बाह्य पदार्थांकडे वळूं. आकाश व काल हे आहेत किंवा नाहींत ? नाहींत म्हणावें तर त्यांचे अस्तित्वाची भावना करितां येते. बरें, शक्तीचें अंतःस्वरूप जरी सांगतां येत नाहीं तरी द्रव्यपरमाणूंशीं आणि तिजशीं बरेंच तादात्म्य आहे. आतां द्रव्याचें स्वरूप पाहूं. द्रव्यघटक परमाणूंला धरून भावना आंत गेल्यावर द्रव्यांतःस्वरूप नेणिवेमुळें परत येत असेल तर मी पृच्छा करितों कीं भावनेचें स्वरूप द्रव्यरहित काय राहतें ? द्रव्यरहित वस्तूचें स्वरूप आहे कीं नाहीं ? नाहीं म्हणाल तर तें बरोबर नाहीं. कारण कीं सर वुइल्यम् ह्यामिल्टन मताच्या अनुयायी यांनीं अशी एक क्लृप्ति बसविलेली आहे कीं त्याचें स्पेन्सरकडून उत्तर देवविल्या जात नाहीं. सर वुइल्यमचे अनुयायी म्हणतात द्रव्याचे जे अत्यंत सूक्ष्म परमाणू व त्यांचे तुकड्यांचे तुकडे जरी घेतले तरी ते कोणत्या शक्तीवर कायम राहणार ? संयोग शक्तीवरच कीं नाहीं ? येथें स्पेन्सरला होय म्हणावें लागतें. यावरून विचार करूं. सर वुइल्यम मतानुयायांनीं मानलेली जी ही संयोगशक्ति ती सर्वाधिष्ठानीं आश्रित असली पाहिजे. अधिष्ठानच नाहीं अशी जर कल्पना कराल तर तें बरोबर नाहीं. कारण कीं शक्तीला कोणत्या तरी पदार्थाचा आश्रय असल्यावांचून तिची स्वरूपसिद्धि व कार्यसिद्धि होत नाहीं. ही शक्ति परमाणूंचीच आहे असें कदाचित् म्हणाल तर ते कार्यरूपी परमाणू कशाचे बनले ? किंवा स्वयंभू

आहेत ? स्वयंभू मानल्यास नास्तिकांप्रमाणें विश्वांतील द्रव्य तेवढें स्वयंभू आहे असें कबूल करावें लागेल. स्पेन्सरनीं जीं धर्मांचीं मूलतत्वें विवरून दाखविलीं त्यांत नास्तिक, अद्वैत, एकेश्वरवादीआदिकरून सर्व धर्मांचें खंडन केलें. पण अद्वैतधर्मास त्यांनीं जो बाध आणला होता त्याची सिद्धि बरोबर केली नाहीं. कारण त्यांनींच पांचव्या प्रकरणांत एके ठिकाणीं म्हटलें आहे कीं आपणास विश्वांत जे दृश्यादृश्यरूप चमत्कार भासतात ते सर्व मिळून बनलेलें विश्व कोण्यातरी एका अज्ञेय कारणरूप महाशक्तीचा प्रादुर्भाव आहे. आणि ती शक्ति सर्वव्यापीही असेल. यावर एक शंका येते कीं नानाविध चमत्कारांनीं बनलेलें हें दृश्यादृश्य विश्व ज्या शक्तीचा प्रादुर्भाव आहे ती शक्ति पूर्वीं नानाविध चमत्कारांची एकत्र झालेली सांठवण असावी. आणि तसें मानलें तर नास्तिकाप्रमाणें विश्व स्वयंभू आहे असें कबूल करणें भाग पडतें. अद्वैतवाद्यांनीं तरी एका बीजाचें विश्व बनलें असें सांगितलें. आणि तुमच्या मतांत तर सर्वच पदार्थ त्या अज्ञेय शक्तिरूप कारणांत बीजरूपानें नित्य आहेत. मग तुमच्या मतांत व नास्तिकांच्या मतांत भेद तो काय ? तुम्ही अज्ञेयशक्ति मानलेली आहे व त्यांनीं परमाणू मानलेले आहेत. असेंच जर तुम्हाला विश्वाचें बीज कायम राखणें होतें, तर नास्तिकांचेंच अनुकरण केलें पाहिजे होतें. अस्तु. ती अज्ञेयशक्ति सर्वव्यापि असेल असें जें तुम्हीं संशयात्मक सांगितलें त्यावरून असें दिसतें कीं तुमचा निश्चय कोणत्याच मतावर झाला नाहीं. कारण सर्वव्यापित्वांत आपली ज्ञानशक्तीही आली. आणि संशय आणि निश्चय हे दोन्ही आपल्या ज्ञानशक्तीचे घटक आहेत. त्यांत कोणत्या घटकावर तुम्ही आहांत ? येथें कदाचित् असें म्हणाल कीं आम्ही संशयवादी नाहीं. तर हें सम्यक् नाहीं. कारण तुम्ही जें केवलाचें अस्तित्व मानतां तें अज्ञेय आहे असें म्हणतां तर मग आपली जी ही ज्ञानशक्ति ती नाहीं कीं आहे ? नाहीं म्हणाल तर तुम्हीच तुम्हाला अज्ञेय झाले. मग व्यवहार कसा चालणार ? आणि केवलाच्या अस्तित्वाचें ज्ञान तरी कसें होणार ? कारण जें अस्तित्व. मानावें लागतें तें कोण्यातरी पदार्थाचे आश्रित असलें पाहिजे. कारण जगांत कोठेंही अशी उपपत्ति आढळत नाहीं कीं वस्तूचा आहेपणा निराळा काढून वस्तु वेगळी करावी. वस्तूचा आहेपणा निराळा करणें म्हणजे त्या वस्तूला नाहींपणाच देणें

होय. तात्पर्य, जी वस्तु आहे ती मुळींच नाहीं असें म्हटलें म्हणजे झालें. मग असाच तुम्ही व्यवहार चालविणार कीं काय ? नाहीं म्हणाल तर हें कबूल करावें लागेल कीं अस्तित्व ज्या वस्तूचें मानावयाचें त्या वस्तूचा आभास आपल्या ज्ञानशक्तीस झाला पाहिजे. त्या वांचून अस्तित्वच ठरवितां येणार नाहीं. आणि आभास मानला तर ज्ञानशक्ति मानलीच पाहिजे. कारण अज्ञेयाचा अज्ञानांत आभास संभवत नाहीं. म्हणून ज्ञानशक्ति मानल्यावांचून गत्यंतर नाहीं. मग ज्ञानशक्ति जी मानली ती क्षणिक आहे कीं स्वयंभू आहे ? क्षणिक आहे म्हणाल तर ती कोण्या कारणापासून उत्पन्न झाली ? अज्ञेयापासून म्हणाल तर ज्ञेयानुसार ज्ञान असतें हा नियम आहे. मग तें ज्ञेय प्रत्यक्ष असो वा अनुमेय असो. यथारूप असो किंवा आभासरूप असो. पण ज्ञान म्हटलें कीं तेथें ज्ञेयाचें अस्तित्व पाहिजेच. अस्तित्व तर आभासावांचून होतच नाहीं. आतां एवढें मात्र खरें कीं, तुमची भावना अज्ञानविषयिणी असल्यामुळें त्याचे गुणधर्म तुम्हांस कळत नाहींत. म्हणून इतक्यानेंच ज्ञानशक्तीचें क्षणिकत्व ठरत नाहीं. आणखी अज्ञेयापासून ज्ञान होणें म्हणजे आंधारापासून प्रकाश उत्पन्न होण्यासारखें विरुद्ध म्हणणें होय. ही सर्व भ्रांति आहे असें म्हणाल तर अज्ञेयास भ्रांति व्हावयाचीच नाहीं. भ्रांति जी व्हावयाची ती ज्ञेयानुसार ज्ञानशक्तीसच झाली पाहिजे. आणि असाच सर्वत्र नियम आहे. कदाचित् म्हणाल कीं ज्याप्रमाणें आंधारांत घुबडास प्रकाश दिसतो त्याप्रमाणें ज्ञानशक्ति भ्रांतीने आपणास भासते. हें म्हणणें असिद्ध आहे. कारण घुबडास आंधारांत जो प्रकाश भासतो तो अंशतः त्याच्या डोळ्यांत असतो. आणि बाह्य आंधार अत्यंत प्रकाशाभावरूप नसल्यामुळें त्या आंधारांतील भावरूप जो प्रकाश त्याचा घुबडाच्या डोळ्यांशीं संबंध झाल्यामुळें त्याला आंधारांत प्रकाश भासतो. या दृष्टांताचा वरील गोष्टीशीं मेळ घालं. आपणास ज्ञान जें होतें तें दृश्यरूप विश्वाचें असो, किंवा केवलाच्या आभासास्तिक्याचें असो, पण तें ज्ञेयानुसार असलेंच पाहिजे; आणि तसें म्हटलें कीं जें कांहीं भावरूप सत्य आभासरूपानें ज्ञेय होत असेल तें ज्ञानमय असलें पाहिजे. अज्ञानमय मानलें तर ज्याप्रमाणें आंधाराचें प्रतिबिंब पडत नाहीं त्याप्रमाणें त्याचाही आभास न झाला पाहिजे. पण येथें तर आभासावांचून भागत नाहीं. म्हणून प्रकाशाप्रमाणें हें सत्यही ज्ञानमय असलें पाहिजे.

आतां एवढें मात्र खरें कीं घुबडाचे डोळे आकुंचित असल्यामुळें हा प्रकाश सूर्याचाच आहे असें त्यास ज्ञान होत नाहीं. परंतु त्याचा व्यवहार मात्र प्रकाशांतच चालतो. इतक्यानेंच सूर्य प्रकाशमय नाहीं असें होईल काय ? त्याचप्रमाणें ही आभास घेणारी ज्ञानशक्ति व्यष्टिरूप असल्यामुळें समष्टिरूप ज्ञानाचें तिजकडून आकलन होत नाहीं. इतक्यानेंच तें अज्ञेय ठरतें क्राय ? असो. ही आभास होणारी ज्ञानशक्ति स्वयंभूच मानली पाहिजे. ही वीर्यांत कोठें होती म्हणाल तर ज्याप्रमाणें घुबडाचे डोळे सूक्ष्मरूपानें अंड्यामध्यें होते त्याचप्रमाणें विषय आकुंचित असल्यामुळें ही ज्ञानशक्तिही सूक्ष्मरूपानें वीर्यांतच होती. त्याचा आपणास अनुभव कां येत नाहीं ? असें म्हणास तर तुम्हांस निद्रेंतील ज्ञानाचा तरी अनुभव कोठें येतो ? परंतु जागृतींत स्मृति मात्र होते. त्यावरून असें अनुमान होतें कीं निद्रेंत लीनरूपानें ज्ञान आहे. त्याचप्रमाणें जाग्रदादि अवस्थांत असणारी आपली ज्ञानशक्ति वीर्यांत लीनरूपानें होती. असें कार्यपद्धतिद्वारा अनुमान निघतें. म्हणून ज्ञानशक्ति स्वयंभूच मानली पाहिजे. मग ती स्वयंभू ज्ञानशक्ति व अज्ञेय महाशक्ति या दोहोंचें बनलेलें तें महासत्य आहे काय? तसें मानाल तर आपली ज्ञानशक्ति अज्ञेयापेक्षां बलवत्तर होईल. कारण प्रकाशामध्यें जसा घुबडाचा व्यवहार चालतो. त्याचप्रमाणें आपलाही व्यवहार आभासरूप ज्ञानामध्यें चालतो. क्रिया जी करावयाची ती ज्ञानावांचून घडत नाहीं. अज्ञानाला क्रिया करण्याचें सामर्थ्य नाहीं. यावरून जगद्रूप क्रिया ज्या शक्तीनें होते ती शक्ति ज्ञानमय असली पाहिजे. इतकेंही करून अज्ञेयच म्हणाल तर हा पोरखेळ हट्ट आहे. त्यास कांहीं प्रमाण नाहीं. सर्व वस्तूंचें मनानें आकलन होत नाहीं, हेंच आमचें प्रमाण असें म्हणाल तर सर्व वस्तू अनाकलनीय आहेत. आणि केवलही भावरूप आहे अशा आपल्या अनपेक्ष ज्ञानरूप भावनेचें अस्तित्व कोठें जाईल ? जेथें अस्तित्व आहे तेथें आभास असलाच पाहिजे. आभास आहे तर ज्ञान असलेंच पाहिजे. आणि ज्ञान आहे तर तें ज्ञेयानुसार असलें पाहिजे. ज्ञेय असून आभास कसा अंगिकारिला ? असें म्हणाल तर ज्याप्रमाणें सूर्याचे अवघड प्रकाशाचा डोळ्याच्या सूक्ष्म प्रकाशामध्यें प्रतिबिंबरूप आभास घडतो त्याचप्रमाणें समष्टिरूप ज्ञेयाचा व्यष्टिरूप ज्ञानशक्तिमध्यें आभास घडतो. अर्थात हें सिद्ध झालें कीं जगत्क्रिया करणारी महाशक्ति कोणत्या तरी एका सर्वव्यापी सदधिष्ठानावर

आभिन्न आहे हें निर्विवाद आहे. पुरे. आतां पुष्कळ प्रमाणें देत बसत नाहीं. विचारवंतानें विचार करून आणखी उपपत्ति जुळवून घ्याव्या.

मग अधिष्टानाचा पक्का बोध झाला म्हणजे तें अधिष्ठान द्रव्याचें अंत:स्वरूप व भावनेचें अंत:स्वरूप आहे हें तुम्हांसच कळेल. मग ह्या अंत:स्वरूपासच अज्ञेय म्हणावयाचें काय ? होय म्हणाल तर मग ही ज्ञानशक्ति कशी झाली ? ही भ्रांति आहे म्हणाल तर अज्ञात अधिष्ठानावर भ्रांति होण्याचा संभव नाहीं असें पूर्वींच सांगितलें. तें कांहीं असो. त्या सर्वांचें मनानें आकलनच होत नाहीं म्हणाल तर तें बरोबर नाहीं. कारण कीं ज्याचें मनानें आकलनच होत नाहीं ह्याच्या अस्तित्वाचें ज्ञान तरी कसें होईल ? अस्तित्वाचें ज्ञान होण्याचें प्रयोजन काय ? असें म्हणाल तर तुमच्या मतानें सर्वच अज्ञेय झालें. मग अर्थांत तुम्हीही तुम्हाला अज्ञेयच झाले. असें असतां देहापुरत्या ज्ञानानें आपलें कार्य भागत नाहीं, आणखी कांहीं ज्ञान पाहिजे हें दुसऱ्या भागांत कशाला म्हटलें ? तें कांहीं असो. शब्दानें सांगतां मात्र येत नाहीं असें म्हणाल, तर मी विचारितों कीं मनानें जें तुम्हाला अज्ञेय वाटतें तें शब्दांनीं सांगतांच जर येत नाहीं तर ग्रंथांमध्यें तुम्ही काय लिहून ठेविलें ? भलतेंच. कांहीं प्रतिपादन केलें असेल कीं नाहीं.

सारांश, तुम्हांला जें अज्ञेय वाटतें तें तुमच्या अज्ञानामुळें. एऱ्हवीं जें कांहीं आहे तें अज्ञेय मुळींच नाहीं.तर ज्ञेयाज्ञेयातीत स्वयमानंदरूप तटस्थ आहे आणि त्याचाच आभास हें जगत आहे.हा सिद्धांत सोडून अज्ञेय म्हणत होत्साते घोटाळ्याचे ग्रंथ लिहिणें हेंच का तुमचें मतभेदसहिष्णुत्व ? वाहवा काय सुबक उपदेश हा ! ! अहो मलाही कळालें नाहीं व दुसऱ्यालाही कळत नाहीं असें म्हणून आपलें ठाम मत कशावरही न देतां निसटून जाणें हें गुरुत्वाचें लक्षण नव्हे. तर गुरु तोच म्हणावा कीं शिष्याच्या सर्व शंका जो हरण करितो. इत्यादि प्रश्न मी स्पेन्सरमतानुयायींयांपुढें मांडले. परंतु एकाही शंकेचें उत्तर त्यांनीं दिलें नाहीं. त्यावरून मला असें वाटलें कीं कोणत्याही बाजूंनीं पाहिलें असतां हें स्पेन्सरचें मत अगदीं असिद्ध आहे. इति स्पेन्सर मत त्याजनं.

वरील पत्राचें उत्तर श्रीमंत जटार साहेबांनीं ता० १९ जून १९०२ ला लिहून पाठविलें तें येणेंप्रमाणें:—

"तुमचा लेख एकंदर वाचल्यानंतर फार मौज वाटली. मयूरपक्षांच्या डोळ्यांप्रमाणें डोळे बाळगण्यापेक्षां तुमच्यासारखें प्रज्ञाचक्षूच होणें फार उत्तम आहे.

डारविन्, स्पेन्सर वगैरेंचीं मतें जितकीं तुम्ही धुंडाळून चिकित्सा केली तितकी दुसऱ्यानें केलेली आढळली नाहीं. हे तुमचे लेख कोणत्या तरी मासिक पत्राकडे अथवा केसरीसारख्या वर्तमानपत्राकडे जरूर पाठवूंन प्रसिद्ध करावे, अशी आमची आग्रहानें शिफारस आहे." या शिफारसीप्रमाणें महाराजांचे वरील लेख आजपर्यंत कोणत्याही वर्तमानपत्रांत किंवा मासिकांत छापून प्रसिद्ध झालेले दिसत नाहीं. असो.

गणपत आन्याजी थोटे यांचा विद्याभ्यास सिरसगांवीं रा० रा० माधवराव खोलकुटे यांचे घरीं झाल्याविषयींचा उल्लेख मागें आला आहे. माधवरावांच्या घरीं महाराजांचेंही जाणें येणें पुढें होऊं लागलें.

माधवरावाची ताई म्हणून एक बालविधवा मुलगी आहे. ती तेवेळीं आपल्या सासरीं मोरशीस होती. ही गणपतराव जवळून लिहिणें वाचणें शिकली होती. ह्या मुलीची प्रवृत्ति पहिलेपासून भक्तिमार्गाचे ग्रंथ वगैरे वाचण्याकडे फार असे. व प्रज्ञा चांगली असल्यामुळें वाचलेल्या गोष्टींचें तिला लवकर ग्रहण होत असे.

ह्यावर्षीं उन्हाळ्यांत ती सिरसगांवीं आपल्या माहेरीं आली होती. ह्यावेळेस महाराजही सौ० मनकर्णिका आईसह तेथेंच गणपतरावचे घरीं होते. एके दिवशीं गणपतरावबरोबर महाराज माधवरावचे घरीं आले. व ज्ञानेश्वरीच्या बाराव्या अध्यायांतील एका ओवीवर निरूपण सांगितलें. ते दिवशीं ताईला सद्विद्यादान व सत्संग यांचा लाभ देऊन तिचें संगोपन करण्याविषयीं माधवरावानें महाराजांस विनंती केली. ताईच्या स्थितीविषयीं गणपतरावानेंही यापूर्वीं महाराजांस सांगितलें होतें. ताईलाही अनायासें यावेळीं येथें सुमारें दोन तीन महिने राह-

ण्याचा योग आला होता. म्हणून महाराजांनीं माधवरावांच्या विनंतीस मान देऊन या दोनतीन महिन्यांत तिला वेदान्त विषयाची थोडी माहिती करून दिली, परमामृत समजून दिला व अनुग्रहहीं दिला.

गणपतरावची पत्निही यावेळीं सिरसगांवीं आली होती. महाराजांचें रहाणें तेथें होतेंच. त्यांच्या घरीं बंगळीवर (झोंपाळ्यावर) बसून महाराजांनीं सौ० मनकराणका आईसह स्त्रीगीताचीं गाणीं वगैरे म्हणून सर्व स्त्रीपुरुषांस आनंदाची पर्वणी करून द्यावी. सूक्तिरत्नावलीच्या चतुर्थ यष्टींत छापलेलीं स्त्रीगीताचीं पहिलीं पांच प्रकरणें ह्याच वेळीं सिरसगांवास झालेलीं आहेत.

रामचंद्र बापूनें दिवसां खेतीवाडीचें काम करून रात्रौ सिरसगांवास येऊन महाराजांची सेवाचाकरी करावी व सकाळीं पुन्हां माधानास परत जावें.

या सुमारास रामचंद्र बापूस एक मोठी मांदगी झाली होती. व तींत ते आसन्नमरण होऊन वांचण्याची आशा राहिली नव्हती. ते वेळीं महाराज त्यांस म्हणाले कीं तुझा योगाभ्यास पूर्ण झाला नाहीं. इतक्यांत तूं मरूं नको. आणखी कांहीं वर्षे वांचण्याची तुला सवड देतों. असें म्हणून शिवलीलामृताचें पठण करून महाराजांनीं त्याला तीर्थ दिलें. पुढें रामचंद्र बापू हळूहळू दुरुस्त झाले. "काळ मृत्यु भयशोक । गुरु रक्षी त्यापासुनी ॥"

कांहीं महिने सिरसगांवास राहून श्रावणमासाच्या आरंभीं महाराज सौ० मनकरणिका आईसह माधानास परत गेले. इकडे ताईलाही सासरची गाडी आल्यामुळें महाराजांच्या दर्शनास प्रथम माधानास जाऊन तेथूनच ती सासरीं गेली. जातेवेळीं महाराजांनीं तिला ज्ञानेश्वरीचा प्रसाद व आशिर्वचन देऊन ज्ञानेश्वरीचें नित्य पठण करीत जा म्हणून सांगितलें.

सिरसगांवीं असतांना ताईचा व सौ० मनकरणिका आईचा उत्तम परिचय जुळून तिच्या सहवासांत ताईचा काल मोठ्या आनंदांत जात असे;

नकरणिका आईला वारंवार ती आपल्या इकडेच जेवण्याबसण्याक-
बोलावून नेत असे.

ाई सासरीं गेल्यानंतर लवकरच महाराज उमरावतीस गेले.
ाच्या चैत्रांत महाराज यावलीस गणपतरावचे घरीं गेल्यापासून
 आपणही आपल्या येथें आणावें, असें आकाजीबापू देशमुखांस
लागलें होतें. महाराज उमरावतीस आले म्हणजे ते त्यांच्या दर्शनास
.परंतु गोष्ट काढण्याचें धैर्य होत नसे.आतां पुन्हां महाराजांचें उमरावतीस
मन होतांच आकाजीबापू त्यांच्या दर्शनास गेले. महाराज समोरच
 होते. यावलीस चलण्याविषयीं आज गोष्ट काढावीच मग कांही-
होवो असा बापूंना निश्चय करून एकदम जाऊन महाराजांचे पाय
. महाराज म्हणाले कोण आहे ? बापू— मी आकाजी. महाराज—
ला आला ! नंतर बापूंनीं यावलीस चलण्याविषयीं महाराजांस
ी केली. महाराज म्हणाले मी येतों. परंतु एकच दिवस राहीन.
ीं तें कबूल केल्यावर महाराज यावलीस गेले व एक दिवस तेथें
 दुसरे दिवशीं माधानास परत गेले. पुन्हां आश्विनांत महाराज
ावतीस गेले असतांना इकडे सिरसगांवीं राजाराम देशमुख तापानें
र पडले व ज्वर एकाएकीं फार वाढला. महाराजांस कोणी पत्र
न पाठवितांच एकदम उमरावतीहून निघाले. व वलगांवाहून
गांवास आले. ते वेळीं रात्र दोन प्रहर झाली होती. महाराजांनीं
ते पाहिली. तेवढ्या रात्रीं एकटेच चांदूरबाजारास जाऊन कुर्यामाईस
न आले, व त्यांना जपाची वरणी दिली; स्वतः आपण सात
स उपोषित राहून जप करून तीर्थ दिलें व राजाराम बापूस आराम
ावर माधानास गेले.

माधानास पांच सात मंडळींचा दिवाळीस पंढरपुरास जाण्याचा
ार ठरला. त्यांबरोबर महाराजही जावयास निघाले. सौ० मनकर-
ा आईचा बरोबर चलण्याचा विचार होता. पण महाराज म्हणाले
ऊं नको. तुझें आयुष्य कमी होईल. कांहीं बायामंडळींनीं मनकर-
ा आईला पुन्हा बरोबर जाण्यास प्रवृत्त केलें. व मारुतीजवळ महारा-

जांची गाडी गेली होती तेथें पाठविलें. महाराज संतापले पण कांहीं बोलले नाहींत. आई गाडींत बसतांच तिला खूप थंडी भरली व ताप चढला. खराळ्याला जात पावेतों ताप फार वाढला. महाराजांनीं तिला पाठीवर घेऊन गाडींतून उतरविलें व ताप अंमळ कमी होतांच रामचंद्र-भाऊ बरोबर सिरसगांवास पाठविलें. नंतर रामचंद्रास व इतर मंडळीस घेऊन पंढरपुरास गेले. तेथें एक भांडीं विकणारा महाराजांस पांडुरंगाची शपथ घालून म्हणाला कीं माझ्या दुकानांतून कांहींतरी विकत घेतल्या-शिवाय पुढें जाऊं नका. तेव्हां महाराजांस जवळची वस्तु गहाण ठेवून त्याचें म्हणणें ऐकावें लागलें. पंधरा दिवसांनीं महाराज सर्व मंडळीसह परत आले व सिरसगांवाहून मनकर्णिका आईस बरोबर घेऊन माधानास गेले. पंढरपुरास जातेवेळीं महाराजांनीं जमनाबाईस खराळ्यास ठेविलें होतें. महाराज परत आले त्या रात्रीं जमनाबाईस असा भास झाला कीं महारा-जांनीं दारावर थाप मारून जमना म्हणून हाक मारली व म्हणाले तुझी आई वाट पहात आहे. उमरावतीस जा. जमनाबाई उठून पाहूं लागली तों कोणीच दिसलें नाहीं. दुसरे दिवशीं सकाळीं सुमारें १०–११ वाजतां माधानाहून काशीबाई खराळ्यास आली व तुझ्या आईनें तुला उमराव-तीस बोलावलें म्हणून जमनाबाईस निरोप सांगितला. जमनाबाई—निरोप कोणी आणला? काशीबाई—महाराज आलेना. जमना०—महाराज खराळ्यास उतरले होते काय? काशीबाई—नाहीं. यावरून स्वप्नप्रमाणानें[1] जमनाबाईस महाराजांचें आगमन कळलें होतें हें स्पष्ट दिसतें.

मावंदें करून पांचसहा महिने महाराज माधानासच राहिले. पत्रद्वारें

---

१ स्वप्न हें अलौकिक प्रमाणांपैकीं एक प्रमाण आहे. याविषयीं योगवासि-ष्ठांत पुढील श्लोक आहेः—" स्वप्न संभ्रम संकल्प स्वानुभूतिपरंपरा । प्रमाणा-न्यत्र मुख्यानि संबोधाय प्रदीपवत् ॥" स्वप्नांत द्विज, देवता, गुरु, वगैरे जें सांग-तात तें सत्य असतें याविषयीं हारित संहितेंत असें म्हटलें आहेः—देवोद्विजोवा पितरो नृपोवा स्वप्नेषु वाक्यं वदते यथैव । तथैव नान्यच्च भवेन्मनुष्ये यद्यस्य सौख्यं विपदो रुजोवा ॥—हारित संहिता. द्वितीय स्थान. अध्याय २ श्लोक ९.—

ताईला सद्बोधामृत पाजण्याचा आरंभ महाराजांनीं सिरसगांवासच केला होता. तोच क्रम पुढें ती सासरीं गेल्यावरही चालू ठेविला. ताईकडूनही तीन पत्रें आलीं होतीं. त्यांचें उत्तर महाराजांनीं पाठवून सद्गुरु प्रेमानें शोकग्रस्त न होतां आत्मसुख दृढ करण्याविषयीं बोध केला आहे. व या पंढरी यात्रेचें समस्त सुकृत तिला अर्पण केलें आहे. यानंतर लवकरच कार्तिकमाहिन्यांत एक वेळ ताई मोरशीहून कांहीं कामानिमित्त आली होती; तेव्हां परत जाते वेळीं ती माधानास महाराजांच्या दर्शनास आली होती. तेव्हां महाराजांनीं तिला भातर्के म्हणून अमृतानुभव प्रसाद दिला.

पुढें फाल्गुन शुद्ध चतुर्थीस रामराव मास्तरची मुलगी सौ० द्वारकाबाई हिचें लग्न झालें. महाराज त्या प्रसंगाला तेथें होतेच. ते वेळीं महाराजांनीं रामरावाला गायत्रीचा अन्वयार्थ लिहून दिला.

पत्रें पाठवून ताईला परमार्थ तत्व निरूपण करण्याचा महाराजांचा क्रम चालूच होता. हीं पत्रें एकंदर ११ असून सूक्तिरत्नावलीच्या प्रथम यष्टींत छापलीं आहेत. त्यांतल्या पहिल्या आठ पत्रांत पुढील विषयांचें सुंदर निरूपण केलें आहे:—संसारकृत्यांत राहूनही सद्गुरुविषयीं अनन्यगतिक चित्तवृत्ति ठेवण्याचें महत्व, सद्गुरूचें लक्षण, भक्तांच्या प्रेमदानार्थ किंवा जिज्ञासूंच्या ज्ञानदानार्थ रामकृष्णादि अवतारांचा व जगदुपदेशक सद्गुरूंचा आविर्भाव, त्यांची सर्वांवर समान कृपा व ज्ञानोपदेशप्रवृत्ति, व प्रेमळ भाविकांस विशेष कृपापूर्वक प्रेमदान, कर्मप्रवाहांत फिरणाऱ्या रजस्तम मिश्र जीवांच्या मनोवृत्तींचें वर्णन, व आपल्या स्वभावांत चांगल्या गुणांची भर टाकण्याविषयीं त्यांस उपदेश, चित्तशुद्धीकरितां निष्काम कर्माचें आचरण, व मनाचा चंचलपणा घालविण्याकरितां सगुण ईश्वरभक्तीचे किंवा श्रीगुरुभक्तीचे १४ प्रकार, उपासनेच्या परिपाक दशेंत ईश्वरानुग्रहानें मनुष्याला सद्गुरुप्राप्ति, सद्गुरूचें देवाहून श्रेष्ठत्व, देहभावना किंवा आवरणदोष निवृत्त होण्याकरितां सद्गुरूजवळून प्राप्त होणाऱ्या निर्गुण उपासनेचा प्रकार, सद्गुरूला आत्मनिवेदनपूर्वक ज्ञानाभ्यास, लोककीर्तिकरितां चमत्कार दाखविणाऱ्यांचा निषेध इत्यादि.

या नंतरच्या पत्रांत अभ्यासांत येत असलेल्या प्रतिबंधाला न जुमानतां दृढनिश्चयानें अभ्यास चालू ठेवण्याविषयीं ताईस उपदेश आहे, महाराजांनीं सांगितलेला अभ्यास करीत असतांना तिला तिच्या मनाविरुद्ध कांहीं शब्द ऐकूं येऊन विक्षेप करीत असत. ही गोष्ट तिनें महाराजांस पत्रोत्तरीं कळविली होती.व कर्म सुखभोगूं देत नाहीं वगैरे दुःखोद्गार लिहिले होते. त्याचें उत्तर महाराजांकडून गेलेल्या पत्रांत पुढील ओव्यांत आहेः—
" तूं बोललीस एक। कीं कर्म भोगूं नेदी सुख। हें वचन अरोचक। मूर्खत्वसूचक असे कीं ॥ वस्तू चिद्घन अविकृत। कर्म अतिजड प्राकृत। अनुभवरोध करावया समर्थ। कर्म बापुडें नव्हे कीं ॥ म्हणोनि प्रारब्धवाद सांडावा। अंतरीं ब्रह्म प्रयत्न मांडावा। देहाहंकारभाव दंडावा। खंडावा क्रोधू ॥ मनाविरुद्ध जे उठती शब्द। ते लयविघ्न जाण प्रसिद्ध। तयाचा नाश करावया प्रबुद्ध। विवेकाचि कीजे ॥ "

या विघ्नासंबंधानें " अकस्मादेव पतति कर्णे शब्दः शुभाशुभः " हें अमनस्क खंडांतील वचनही महाराजांनीं एकदोन ठिकाणीं उदाहरणार्थ लिहून ठेविलें आहे. तथापि दुर्दैवाची गोष्ट कीं विघ्नाला भिऊन ताईनें पुढें तो अभ्यास सोडून दिला. त्याकरितां महाराजही पुढें तिच्यावर रागावत असत. अस्तु.

याशिवाय वरील पत्रांत व त्या पुढील एका सबंध पत्रांत (सूक्तिरत्नावलि पृ० ५४ व ५९) या प्रांतांतील योगानंद सरस्वतीचा व त्यांच्या खेचरी मुद्रेचा उल्लेख आलेला आहे. वरील पत्राच्या उत्तरार्धांत एका आत्मज्ञानावांचून खेचरीसारख्या योगमुद्रेचा व इतर योगसिद्धींचा निषेध " वो तर कच्चा बे कच्चा बे। नहीं गुरुका बच्चा " या गोरक्षनाथांच्या पदानें करून अशा साधकांची परमार्थ मार्गांतून च्युती सांगितली आहे. व त्यापुढील पत्रांत खेचरी मुद्रेनें शरीर अमर करण्याच्या कल्पनेचा उच्छेद केलेला आहे, त्या ओव्या अशाः—

" येथें योगानंद सरस्वती। खेचरी मुद्रा लोकां सांगती। शरीर अमर करावें म्हणती। भूलोकीं विचरावें ॥ त्यांनीं तुज करविलें दर्शन। मजही तैसेंच दाविलें जाण। परी मी मंदमति अज्ञान। म्हणोनि तें गुह्य

कळेना ॥ ब्रह्माविष्णु परमेश्वर । जे संपूर्ण योग आचरणार । तयालागीं ही साचार । मरण असे प्रलयांतीं ॥ शरीर मलबद्ध अविद्यायुक्त । पंच-भौतिक मिथ्याभूत । त्यातें रक्षूनि पुरुषार्थ । काय साधिला सांग पां ॥ आत्मा मुळींचाचि अमर । तो नव्हे मन ना शरीर । अखंड व्यापक निर्विकार । योगा थार नसे तेथें ॥ जें अखंड व्यापक सर्वांभूतीं । असा अनुभव आलिया चित्तीं । मग योग साधुनी तटस्थवृत्ती । वृक्षासारखी कासया ॥ महा प्रलयीं ब्रह्मांड बुडे । तेथें योगी ते काय बापुडे । एक ब्रह्म तेंचि सत्य फुडें । येर विश्व मिथ्या ''

शेवटल्या पत्रांत ११ अभंग आहेत व त्यांत विवेकविरागादि चार साधनांचीं लक्षणें व त्यांचा विनियोग सांगून पुढें महावाक्य विवेचन सांगि-तलें आहे. या पत्राच्या शेवटला कांहीं मजकूर गद्यांत असून आपलें आधि-कारिक प्रारब्ध त्यांत महाराजांनीं कबूल केलें आहे व आधिकारिकांचा जन्म लीलामात्र असतो हें व्यासवचनावरून सिद्ध केलें आहे. महाराजांनीं ताईला पाठविलेल्या या एकंदर पत्रव्यवहाराचें अत्यंत सारभूत रहस्य म्हणजे वात्सल्यभक्तीचें बीजारोपण हें होय. ह्या तत्वाचें विशेष स्पष्टी-करण पुढील उमरावती प्रकरणांत रा० रा० विठ्ठलराव केकरे वकील मंडला यांच्या पत्रव्यवहारांत महाराजांनीं केलें आहे. त्यावरून अखिल स्त्रीवर्गाच्या उद्धारार्थ अधिकारानुसार श्रुतिसिद्ध शिक्षण देण्यांत महारा-जांचें अप्रतीम प्राविण्य दिसून येतें.

## शके १८२५ इ० स० १९०३.

नवीन ग्रंथ बोलावण्याचा महाराजांचा क्रम सुरूच होता. तारीख १७ एप्रील १९०३ ला थिऑसफीची "री इनकारनेशन" वगैरे पांचसहा पुस्तकें अडयार येथून बोलावून त्यांचें परिशीलन चाललें होतें. नित्य भजन, काला, बाळलीला, खेळ वगैरे गोष्टीही पूर्वक्रमाप्रमाणें चालू होत्याच. भागवत व ज्ञानेश्वरी हे ग्रंथ तर महाराज गळ्यांत मंगळसूत्रा-प्रमाणें बाळगूं लागले. याविषयीं त्यांचा पुढील अभंगही प्रसिद्ध आहे:—

माझें हें मंगळसूत्र । श्रीमद्भागवतशास्त्र ॥१॥
तोचि आर्यपुत्र मूर्ति । ऐसी पुराणांत कीर्ति ॥२॥

कंठीं धरीन आवडी । शोभा हृदयाची फुडी ॥३॥
स्वामी आळंदी जीवन । आदिमध्यांतीं प्रमाण ॥४॥

उमरावतीस जमनाबाईच्या मुलाची मुंज होती. मुहूर्त वैशाख शुद्ध दशमीचा ठरला होता. म्हणून महाराजांस अक्षत देण्याकरितां माधानास येऊन जमनाबाई महाराजांकडेसच उतरली होती. तिला सौ० मनकरणिका आईनें स्वयंपाक करण्याकरितां दाळ, तांदूळ, कणीक वगैरे सामान दिलें. महाराज म्हणाले तिला भजीं करण्याकरितां बेसन दे. बेसन घरांत नव्हतें. म्हणून मायबाई (मनकरणिका आई) व जमनाबाई दळावयास बसल्या. इतक्यांत महाराज शौचाहून आले व कोण दळते ? काय दळते ? म्हणून विचारपूस करूं लागले. मायबाईनें सांगितल्यानंतर महाराज म्हणाले जमनाबाई आपल्या येथें पाहुणी आली आहे. तिला असें काम सांगावें काय ? नंतर जमनाबाईला जात्यावरून उठवून स्वत: महाराजांनीं व आईनें मिळून चून दळलें. दळतांना दोघांनीं मिळून सुंदर गाणीं म्हटलीं तीं अर्थातच महाराजांचीं तात्कालिक स्फूर्तिजन्य होतीं. त्यांत घरीं पाहुणी आली तिच्या करितां चून नव्हतें म्हणून दळावें लागलें अशा अर्थांचें एक गाणें होतें. स्वयंपाक झाल्यावर सगळ्यांची जेवणें झालीं. काशीबाई जमनाबाईस आपल्या घरीं जेवण्याकरितां बोलाऊं आली होती, तिलाही महाराजांनीं आपल्या इकडेच जेवण्याकारितां राहवून घेतलें. महाराज, आई, काशीबाई व रामचंद्रभाऊ हे एकाच ताटांत जेवले.

पुढें लवकरच महाराज रामचंद्रभाऊ बरोबर सोपीनाथ महाराजांच्या कवठ्यास गेले. बरोबर आणखी कांहीं मंडळी होती. रामचंद्रबापू यांनीं महाराजांकरितां कांहीं नवस केला होता तो फेडण्याकरितां या वेळीं महाराज त्यांच्या बरोबर गेले होते. तेथून परत येतांना महाराज लोणीस थांबले. महाराजांची बाई (मातामही) तेथें होतीच. तिचा मुलगा म्हणजे महाराजांचे बाजीराव मामा नुकतेच एक महिन्यापूर्वी संपले होते. त्यांचा

---

१ भगवान् सोपीनाथ महाराज हे वऱ्हाडप्रांतात सर्पविषनाशाविषयीं प्रसिद्ध आहेत. यांचें देवस्थान मौजा कवठे तालुका उमरावती येथें आहे.

एक लहान मुलगा ४ महिन्याचा होता. तो बाईनें महाराजांजवळ दिला. महाराज म्हणाले याला पांचवें वर्षी गंडांतर आहे. बाई म्हणाली कसा वांचेल? महाराज म्हणाले मुलाच्या आईनें तुळशीच्या माळेनें मंत्र जपून तीर्थ दिलें असतां वाचेल. मुलाची आई मानभावांची शिष्यीण होती. तिला महाराज म्हणाले, तूं तुळशीची माळ जपून मुलाला तीर्थ दे, म्हणजे गंडांतर टळेल. मानभावाचा मंत्र सोडून दे व आपल्या सनातन धर्माचेंच अवलंबन कर. मामाची ३–३॥ वर्षांची एक लहान मुलगीही होती. महाराज म्हणाले हिचें लग्न सातव्या वर्षी करा. व सातव्या वर्षी झालें नाहीं तर मग मात्र मला विचारून करा. महाराजांनी सांगितल्याप्रमाणें मामीनें मुलास तीर्थ दिलें नाहीं; तो पांचवें वर्ष लागतांच मेला. मुलीचें लग्न सातव्या वर्षी जुळून आलें नाहीं. म्हणून तेंही लांबलें. पुढें दोन वर्षांनीं मामीनें मानभावांचा मंत्र सोडला व महाराजांचा मंत्र घेतला. मुलीचें लग्नही तिनें पुढें महाराजांस विचारूनच केलें. व त्यांच्या सांगण्याप्रमाणें सौ० मनकरणिका आईचा बंधू दत्तात्रय गणाजी भुयार याला ती मुलगी दिली. असो, ते दिवशीं महाराज लोणी येथेंच राहिले. दुसरे दिवशीं उमरावतीस जमनाबाईचे मुलाची मौंज होती. व महाराजांस पूर्वीच आमंत्रण दिलें असल्यामुळें ती अत्यंत उत्कंठेनें त्यांची मार्गप्रतिक्षा करीत होती. बरीच रात्र झाली तरी महाराज आले नाहींत असें पाहून निराश होऊन ती रात्रभर रडली. इकडे महाराजही लोणी येथें रात्रभर रडत होते व त्यांच्याबरोबर बाईही रडत होती. ती मुलाचे दुःखामुळें रडत होती. दुसरे दिवशीं म्हणजे वैशाख शु ॥ १० सकाळीं ऐन मौंजेच्या वेळीं महाराज उमरावतीस जाऊन पोहचले. रामचंद्रभाऊ समागमेंच होते. जमनाबाईला फार आनंद वाटला हें सांगावयाला नकोच. तेथून तीन चार दिवसांनीं महाराज रामचंद्रभाऊसह माधानास परत गेले. इकडे माधानची शाळा बंद झाल्यामुळें रामरावाची बदली दुसऱ्या शाळेवर झाली होती, पण त्यांनीं तीन वर्षांची रजा घेऊन कुटुंबासहित आष्टीस जाण्याची तयारी केली होती. त्यांना महाराजांनीं बिदा केलें व पुन्हां एकटेच उमरावतीस निघून गेले.

जमनाबाईंची मावशी बुलाकाबाई ही गंडमाळेच्या आजारानें फार दिवसांपासून बिमार होती, औषधें वगैरे पुष्कळ घेतलीं परंतु गुण आला नाहीं; फार क्षीण होऊन हात पाय बारीक झाले होते. तिला महाराज नित्य तीर्थ मंत्रून देऊं लागले. सुमारे एक महिन्यानंतर ती दुरुस्त झाली. ते वेळीं महाराज बोलले होते कीं ह्या गंडमाळा तुला पुढें होतील. ती तेथून पुढें दहा वर्षांनीं शके १८३५ च्या वर्षप्रतिपदेचे दिवशीं मरण पावली. ते वेळीं तिला गंडमाळा झाल्या होत्या. असो.

या वेळीं सुमारें सव्वा महिना महाराज उमरावतीस राहिले. त्यांचा ज्ञानेश्वरी, अमृतानुभव, यांचे निरूपणाचा व भजनादि नित्य क्रम चालू होताच.

उमरावती येथें दसनामी आखाड्यांत योगानंद स्वामी कधीं कधीं येत असत. खेचरी मुद्रेविषयीं या स्वामींची फार प्रसिद्धि होती. त्यांच्याकडे महाराजही मधून मधून जात असत. एके दिवशीं महाराज तेथें असतांना उमरावतीचे रा० रा० हरि गणपत केवले हे योगानंदाच्या दर्शनास आले होते. त्यांस यापूर्वी महाराजांची कीर्ति कळली होती परंतु प्रत्यक्ष दर्शन नव्हतें. महाराज कांहीं वेळानें तेथून उठून गेल्यानंतर हे कोठील कोण वगैरे माहिती त्यांनीं योगानंदाकडून विचारून घेतली व दुसरे दिवशीं जमनाबाईचे घरीं महाराजांचे दर्शनास आले. त्यांच्या बरोबर रामराव मनोहर मुनशी वाशिमकर व जगजीवनराव शिरपूरकर हेही होते. ते वेळीं महाराज माडीवर बसले होते. ही मंडळी येऊन बसल्यानंतर महाराजांचें एक ओवीबद्ध निरूपण झालें. त्यांत खेचरी मुद्रेचें फल, त्याचा भक्तिमार्गांत प्रतिबंध, असा मार्ग सांगणाऱ्या साधूंच्या नादीं लागण्याचा निषेध इ० गोष्टींचें सयुक्तिक व समर्पक प्रतिपादन होतें. या प्रसंगाची हकिकत व वरील खेचरी मुद्रेच्यासंबंधानें निरूपण महाराजांनीं यावेळीं उमरावतीहून ताईस पाठविलेल्या पत्रोत्तरांत आलें. असून या पत्रांचा उल्लेख मागें येऊन गेला आहे.

महाराजांचें वरील चटकदार व अश्रुतपूर्व निरूपण ऐकून त्रिवर्गास

व विशेषतः हरिभाऊस मोठी अभिरुची उत्पन्न झाली. दुसरे दिवसापासून तर ते रात्रंदिवस महाराजांजवळच राहूं लागले. जेवणापुरतें मात्र घरीं जात. महाराजांनीं या वेळीं हरिभाऊस अमृतानुभवाचे पांच अध्याय समजावून दिले. शिवाय रात्रौ ओवीबद्ध अध्याय, वेदान्तचर्चा, भजन वगैरे होतच असे. भजनांत महाराज देवनाथांची पदें व स्वकृत अभंग पदें वगैरे म्हणत असत. हा क्रम चालू असतांना एके दिवशीं कांहीं कारणामुळें हरिभाऊचें महाराजांकडे येणें झालें नाहीं. ते दिवशीं ज्येष्ठ वद्य ११ एकादशी होती. तेव्हां महाराजांनीं हरिभाऊस पुढीलप्रमाणें पत्र पाठविलें. ह्यांत माधुर्यतत्व थोडक्यांत गोड शद्बांनीं सांगितलें आहे.

ॐ तत्सत् श्रीज्ञानेश्वर माउली समर्थ.

ॐनमो श्री गोपीरमणा। गोकुळवासी करुणाघना। कालियांतका दानवभंजना। विश्वव्यापका विश्वपते ॥ १ ॥ अहो श्रीहरी रूपें भगिनी। तुम्हां माथा ओळगों-चरणीं। आणि सलगीये विनवणी। करित असों ॥ २ ॥ तरी अंतका न भींतां। दोघी आळवूं नंदसुता। सेवेमाजीं जन्मानंता। आक्रमूं सुखें ॥ ३ ॥ आणिकही साह्यकारिणी। कृष्णललना चातुर्य खाणी। बैसल्या पाहुनी हरिदिनीं। प्रतिक्षे तुझ्या ॥ ४ ॥ स्त्रीपुरुष नव्हे आत्मा। ऐसी न धरावी भ्रमा। सेवक प्रीतिमुळें स्त्री जीवात्मा। सेव्यत्वें परमात्मा पुरुष ॥ ५ ॥ दोही दिठी एक कांत। येणें सुखें जन्मानंत। क्षणैक क्षमभांत। आपजेल ॥ ६ ॥ यालागीं ऐसें कीजे। आपजे तरी हा ठावो पविजे। हरिगायनीं ठवाइजे। अंतः प्रेमा ॥ ७ ॥ अथवा शारीरत्रासे। आजिचिया दिना तुमसे। येथूनि पुढें कुवासे। नियमबद्धे ॥ ८ ॥ आणि निद्रेचा उल्हासू। चाखिजे वृंदावन सौरसू। दोन्ही सांडूनि पौरुषू। कामिन्या यावें ॥ ९ ॥ नाना पुरुषाचें संवर्धन। तो पातिव्रत्यांश धर्म। म्हणूनि दोघी पुरुषोत्तम। वशत्वा आणूं ॥ १० ॥ अहो अरुषवाणी इया। ठावो न द्यावा कोपचया। आपजे तरी या। ना हरी म्हणावा ११ ॥ श्रीज्ञानेश्वरमाउली। वंदूनि तत्पाउली। विनती या संपविली। पत्रिका ही ॥

ॐतत्सदिति श्रीज्ञानेश्वर माउली समर्थ.

याच दिवशीं (ज्येष्ठ वद्य ११) महाराजांनीं सौ० मनकराणिका

आईला माधानास एक ओवीबद्ध पत्र पाठविलें. तें सु० रत्नावलीच्या द्वि० यष्टीच्या उत्तरार्धांत प्रथमच छापलें आहे. यांत परमार्थरहस्य थोडक्यांत सुंदर सांगून शेवटीं "तूं आपल्या ज्ञानेश्वरीचा व व्याकरणाचा अभ्यास कडकडीत ठेवीत जा." असें एक वाक्य लिहिलें आहे. (हें वाक्य छापील पत्रांत नाहीं.) यावरून पत्नीच्या शिक्षणाविषयीं महाराज किती कळकळ बाळगीत होते हें दिसून येतें.

या सुमारास उमरावतीस एक हिंदुस्थानी मनुष्य आला होता. तो कांहीं सामुद्रिक जाणत होता. त्यानें महाराजांचा हात पाहून त्यांचा मृत्यु जवळच सांगितला. महाराजांनीं त्यासंबंधानें बरीच चर्चा करून शेवटीं हरिभाऊला मृत्युंजयाचा व आबाजीला शनैश्वराचा जप दिला. याप्रमाणें सुमारे तीन आठवडेपर्यंत महाराजांच्या प्रासादिक, प्रेममय व अधिकार-युक्त वाणींतून निघालेलें बोधामृत पिऊन हरिभाऊ प्रभृति मंडळींनीं त्यांच्या सहवास सुखाचा नित्य नूतन आनंद घेतला. पुढें महाराज माधा-नास जाणार इतक्यांत यावलीहून आकाजीबापू देशमुख उमरावतीस आले. व महाराजांचें दर्शन घेऊन त्यांना यावलीस चलण्याविषयीं त्यांनीं विनंती केली.

महाराज म्हणाले मला पुस्तकाला पैसे देशील काय?

बापू—किती पैसे पाहिजेत?

महाराज—तेरा रुपये.

ते वेळीं बापूच्या कंबरेस बरोबर तेराच रुपये होते. ते त्यांनीं महारा-जांस दिले. नंतर त्यांच्याबरोबर महाराज यावलीस गेले. तेथें एकेदिवशीं बापूच्या घरीं माडीवर बसले असतांना महाराज म्हणाले:—गर्भांत मुलगा आहे, पण याला गंडांतरें आहेत. ९ वर्षांनंतर या मुलाला धोका नाहीं. यावलीस दोन चार दिवस राहून महाराज माधानास जाण्याच्या विचारांत होतेच. इतक्यांत सौ०आईकडून माधानाहून पत्रोत्तर आलें तें येणेंप्रमाणें:—

ॐतत्सत् श्रीसद्गुरु ज्ञानेश्वर माउली समर्थ.

सकल गुणनिधि देवाधिदेवा कृपासागरा अखंड अविनाश स्वरूपदायका जग-

दुपदेशका श्री सद्गुरुनाथ महाराज यांचे चरणकमलाचे ठायीं मनकर्णिका हिचे त्रिकालाबाधित शिरसाष्टांग प्रणाम विनंती विशेष. आपलें कृपापत्र भास्कर यांचे हस्तें पावलें. मजकूर समजला. ज्ञानेश्वरीचें तिसरें पारायण सुरू आहे व व्याकरणही सुरू आहे. आपण लिहिलें कीं "तूं नव्हस स्त्री ना पुरुष। सच्चिदानंद स्वयंप्रकाश। अविद्येनें भुलोनि तयास। स्त्रीपुरुषत्व तुज वटे॥" हें वेदगुह्य खरें, परंतु जावत्कालपर्यंत हा देह आहे, तावत्कालपर्यंत होईल तेणेंकरून गुरुसेवा, पतिसेवा व संतसेवा करणें स्त्रीदेहास वा पुरुष देहास उचित आहे, असें अज्ञानमतें मज वाटतें. हे नाथराया, आपण धनुभाऊ ठाकरे याज-बरोबर येणार होते पण आजपर्यंत न येऊनही ताईचे पत्राचे उत्तराचा मार्ग दाखवीत आहां. तेणेंकरून मन उद्विग्न होत आहे. तर हे प्रभो चित्ताला स्थिर करणार आपणावांचून कोण आहे ? जसें वत्साला आई दूर जावींशी वाटत नसून सदोदित जवळच असावी असें वाटतें त्याप्रमाणें. अज्ञानमतें लिहिलेलें पत्र आपलें चरणीं समर्पण केलें आहे. कळावें लोभ असावा ही विनंती.

ता० २३।६।१९०३.

आपली

मनकरणिका. माधान.

ॐतत्सत् श्रीसद्गुरु ज्ञानेश्वर माउली प्रसन्न.

हें पत्र आल्यावर लवकरच महाराज माधानास परत गेले. पुढ-च्याच महिन्यांत म्हणजे आषाढ शुद्ध १३ मंगळवारीं ता० ७ जुलाई १९०३ ला आकाजीबापूस मुलगा झाला. त्याला पुढें दोन गंडांतरें आलीं होतीं. एक तर फारच कठीण होतें. तीन दिवसपर्यंत मुलाला शुद्धि नव्हती. तीं दोन्हीं गंडांतरें महाराजांनीं निवारण केलीं. मुलगा हल्लीं दहा वर्षांचा असून उमरावतीस शिकत आहे.

माधानास गेल्यानंतर पुन्हा कांहीं दिवस महाराज तेथें राहिले. इकडे उमरावतीस ह्या वेळीं भयंकर प्लेग सुरु झाला व पुढें तो अतिशय वाढला. आर्वीहून रामरावचीं पत्रें महाराजांस येत होतीं. त्यांत सौ० रंगुबाई महाराजांची आठवण काढून वारंवार शोकमग्न होत असत

याविषयीं विशेषतः उल्लेख असे. त्या शोकाचे परिमार्जनार्थ एक सुंदर बोधप्रद पत्रोत्तर महाराजांनीं पाठविलें. दुसरें एक पत्र महाराजांनीं वृंदावनास श्रीगोपालकृष्ण महाराजांस पाठविलें आहे. या पत्रांत उमरावतीच्या प्लेगाचा उल्लेख असून शिवाय विरह भक्तीचें किंवा संयोगीं वियोगोपलालन भक्तीचें अंतरंग महाराजांनीं त्यांत प्रगट केलें आहे. तिसरें पत्रोत्तर उमरावतीचे हरिभाऊ केवले व त्यांचे मित्र आबाजी यांस आषाढ वद्य १४ गुरुवारीं ता० २३ जुलै १९०३ ला पाठविलें आहे. या पत्रांत हरिभाऊस व आबाजीस ब्रह्मरूपानें वंदन करून भक्तीचें रहस्य वर्णन केलें आहे. हीं तिन्ही पत्रें द्वि० षष्टीच्या उत्तरार्धांत पृ० २, ७ व १० वर अनुक्रमें छापलीं आहेत. शेवटल्या पत्राचें उत्तर हरिभाऊकडून आलें तेंही वेदान्तप्रचूर असून कृतज्ञतादर्शक असल्यामुळें येथें घेणें इष्ट वाटतें. तें असें:—

ॐतत्सत् श्रीगुरुदेवदत्त प्रसन्न.

वृत्त भुजंगप्रयात.

जयाची जगीं एक सर्वत्र सत्ता । जयाची कृपा चेतवी स्फूर्ति चित्ता । असे जो सदा सच्चिदानंद ठायीं । नमस्कार माझा गुरू दत्त पायीं ॥ १ ॥ जया सेवितां दैन्य कोठें दिसेना । जयाच्या कृपे नासती भाव नाना । जयाची कृपा मुक्तिकैवल्यदानी । नमस्कार माझा गुरूपादपद्मीं ॥ २ ॥

## ओव्या.

अहो जी गुरु गुलाबराया । डोई ठेवूनि उभय पायां । नमन करी हारें सखया । कृपामूर्ते ॥ १ ॥ लक्षितां आपलें प्रसादपत्र । आनंदें रोमांचित सर्व गात्र । कीं तें उपदेश सुधापात्र । मज गमे ॥ २ ॥ पत्रिका असे लहान । निर्देशी सच्चिदानंद पद गहन । दीपज्योती दिसे सान । परी प्रकाश थोर ॥ ३ ॥ चंद्रसूर्य आकृति सान । प्रकाशी कीर त्रिभुवन । कीं नेत्रबाहुली बिंदु प्रमाण । दीप्ति बहू ॥ ४ ॥ ऐसिया पत्रिके द्यावया उत्तर । सामर्थ्य नाहीं किंचिन्मात्र । विषयही गूढ फार । मी तों मतिहीन ॥ ५ ॥ न जाणे ओवी पद्य श्लोक—रचना । संबंधही पडला नाहीं जाणा । कायहो मी मूढ तुम्हीं नेणा । मजसी

महाराजा ॥ ६ ॥ असो प्रसंगीं पाहिजे बोलिलें । म्हणूनि स्मरूनि तुमचीं पाउलें । बोलेन जें बोलविलें । आपले प्रसादें ॥ ७ ॥ सूत्रधार सूत्राधारें । बाहुलीं नाचवी एकसरें । तैसें आपुलेच पत्राधारें । करी प्रयत्न ॥ ८ ॥ आतां मी सांगूं कांहीं स्वतंत्र । तरी न्यून कायजी तुमचें पत्र । जें मूर्तिमंत कैवल्य-दानपात्र । तात्पर्येंसी ॥ ९ ॥ वंद्यवंदक करूनि मिस । सूत्रप्राय बोलिले केवळ सारांश । कीं जे कैवल्यकनकमूस । अद्वैत सिद्धांताची ॥ १० ॥ वेद नेतिनेतीति अनुवादी । परी भेटी नाहीं साम्राज्यपदीं । मग मौन्येंचि अनेकांची मांदी । सारूनि सुखरूप होई ॥ ११ ॥ कीं जो जो भेटी करावा लाग । तो तो सुखैकघनीं होय अलाग । जे वस्तूसि नसे अंग प्रत्यंग । वस्तु आंगें स्वतःसिद्ध ॥ १२ ॥ सूर्य सर्वांसी प्रकाशी । मा स्वतः काय अप्रकाशी । वस्तु सूर्यासीही प्रकाशी । तरी काई नाहीं म्हणों ये ॥ १३ ॥ वस्तु अनाम अरूप । वस्तु नांवही मिथ्या जल्प । परी करावा लागे आरोप । जे द्वैतनिषेधें अद्वैत-प्राप्ति ॥ १४ ॥ हेंचि व्यतिरेकें जड निषेधें । दाविलें निजात्मस्वरूप प्रसिद्धें । जें ब्रह्मसत्यंजगन्मिथ्या श्रुत्यनुरोधें । प्रमाणा येई ॥ १५ ॥ ऐसेंचि ज्ञानी जाणती । व्यतिरेकें वस्तूतें ओळखती । परी जनींजनार्दन न जाणों लाहती । जें मुख्य वर्म ॥ १६ ॥ म्हणून तयांही पूर्णपणें न कळे । कीं देहाकारें जागृति-वेळे । हें दृश्यजात देखतां डोळे । चैतन्यासी अभान ॥ १७ ॥ हेंचि ज्ञानियाचें न कळणें । जे स्वरूपच्युति ऐसें बरळणें । आणि तत्प्राप्ति साधन करणें । जड-मूढ समाधि ॥ १८ ॥ ते चुकती हें वर्म । जें सत्यज्ञानमनंतंब्रह्म । जें अनेकीं व्याप्त एकपूर्ण । सदोदित अन्वयें ॥ १९ ॥ तेंही सर्वंखल्विदंब्रह्म या श्रुती । अन्वयीं दाविली उपपत्ति । जें जाणणें सर्वांप्रती । तें चैतन्य अनेकीं एकत्वें ॥ २० ॥ आणि ज्ञानी सगुण भक्ति निषेधिती । तेणें प्रारब्धकर्मी तयां गुंतागुंती जे नित्य समाधीसी अप्राप्ति । देहवंता ॥ २१ तें भक्तिरहस्य अति गूढ । दाविला त्याचाही निवाड । जें विश्वरूपें स्वानंदतरू वाढ । सुवर्णालंकार दृष्टांतें ॥ २२ ॥ वरी अमृतबिंदु सिंधु न्याय । एक अमरत्व जैसा प्रत्यय । तैसेंचि सगुण रामकृष्ण ब्रह्ममय । हेंही प्रतिष्ठिलें ॥ २३ ॥ एकेक निरूपणाची नवाई । काय वाणूं सद्गुरु आई । कीं सच्चिदानंदरूपें आई । मजसी पान्हावली ॥ २४ ॥ शेवटीं शिवोभूत्वा शिवंयजेदिती । श्रुति घेउनी प्रमाणभूती । सगुण स्फुरण

सोहंभाव प्रतीति । विशदकरुनी दीधली ॥ २५ ॥ कीं ते पूर्ण समाधी सहज-स्थिति । कैवल्यमुक्ति विदेहस्थिति । चरमाख्य जियेतें ज्ञानी म्हणती । अल्प-मती मज वाटे ॥ २६ ॥ जी नव्हे जडमूढवत । चैतन्य नाहीं काष्टपाषाणवत । कर्मी नैष्कर्म्य जिचेनि प्राप्त । तीच समाधी श्रेष्ठ जी ॥ २७ ॥ जेणें गुरुशिष्य संप्रदाय । ब्रह्मप्राप्ति असे उपाय । वेदान्त ग्रंथांही नये विपाय । सारासार मध्यवर्ती जे ॥ २८ ॥ इतुकें सान निरूपण । या रीतीं कळसासि आणून । प्रेमपान्हा वोसंडिला पूर्ण । माउलीये बाळका ॥ २९ ॥ कीं तो अनुग्रहामृत घट भरून । देऊं पातलीस दासा लागून । कीं हा अनुभवामृतचि संपूर्ण । बालरूपें अवतरला ॥ ३० ॥ ऐसें पुढतपुढती किती वाखाणूं । कां खद्योत जैसा प्रकाशी भानू । कीं बालहरिण पंचाननू । पुढें धांवे ॥ ३१ ॥ येथें बोलावया नसे उरी । परी धैर्य केलें समर्थापुढारी । जे अंजुली भरून समुद्रा भीतरीं । जलराज पूजिला ॥ ३२ ॥ कीं पक्वान्नाचें भरुनि ताट । माता भरवी बाळका गोमट । तों बालकची लीलें उलट । मातेलागीं जेववी ॥ ३३ ॥ ऐसा समर्थाचा अप-राधी । नसतेंच करी अनधिकारी । परी शरण जाणुनी अनन्यधी । क्षमापिजे दयाळा ॥ ३४ ॥ आतां कधीं होईल दर्शन । बाळाची आर्त पुरवाल कृपेंकरून । हें उत्तरीं सविस्तर लेखन । व्हावें ही विनति माझी ॥ ३५ ॥ पुढती हीच विज्ञापना । जें लेखनीं न्यून तें पूर्णपणा । करुनी लिहिजे सुधारणा । जैसी असे महाराजा ॥ ३६ ॥ दैवयोगें झाली भेटी । कां करूं दैन्य गोष्टी । धनी कराल कृपादृष्टि । हाचि पूर्ण विश्वास ॥ ३७ ॥ माता लक्षी अज्ञानबालका । तैसे पाळा लळे सेवका । हेंचि मागणें नायका । ऐसें होऊं नये ॥ ३८ ॥ सद्गुरु चरणकमळीं । प्रेमभावें होउनी अळी । गुंजारव करों मन्मति भुलली । कृपामृता कारणें ॥ ३९ ॥ वेडेंवांकुडे लेखन । सद्गुरुचरणीं असो अर्पण । हेंचि वंदन विज्ञापन । पुढतपुढती ॥ ४० ॥ सद्गुरु दत्ता वंदन । तैसेंचि सर्वात्मानंदा लागुन । तोचि भाव तवपदीं ही पूर्ण । सर्वदां समानत्वें ॥ ४१ ॥

हरिः ॐतत्सत् श्रीगुरुदत्तात्रय अवधूत प्रसन्न.

उमरावती,
मिति श्रावण शुद्ध ५ बुधवार.

समर्थांचा आज्ञांकित
**हरि गणपत केवले.**

ह्या पत्राचें महाराजांकडून असें प्रत्युत्तर गेलें:—

ॐतत्सत्.

ॐनमो श्रीगुरु निष्पापा । विश्वात्मया ब्रह्मरूपा । भक्तवत्सला मायबापा । त्रिविध तापा अनकल ॥ १ ॥ भूर्भुवस्वः ही पूर त्रिपुटी । गोविली प्रणवें एके गांठीं । ते विश्वपट सूत्रकंठीं । मिरवित असे ॥ २ ॥ म्हणोनियां जी वेदमूर्ति । ही त्रयपुरी कीर्ति । गाजे परी श्रुती । अभिप्राय ॥ ३ ॥ हा अविद्या भ्रमू नाथिला आम्हां । तो हरुनी दाविली सच्चित् प्रमा । येणें अर्थें हरी शर्मा । नाम तुम्हा विराजे ॥ ४ ॥ तुम्हां करावें कुंठित । हातों नाहीं मम हेत । परी कांहीं कारण निमित्त । लिहिणें असे ॥ ५ ॥ तुम्हीं मागील पत्रोत्तरीं । लिहिलीं वाक्यें मानकुसरी । ही अकृपा लेंकुरावरी । काय म्हणोनियां ॥ ६ ॥ होजे आपुलीया लेंकुरा । घालितां मानवचनें पारवरा । तैं तो दुरभिमानीं थारा । सावियाचि घे ॥ ७ ॥ यालागीं ऐसें न करावें । मज चिरंजीवचि लिहावें । एवढें मागत जीवेंभावें । कृपाळुवा गुरुमूर्ति ॥ ८ ॥ आणि दुसरी विज्ञापणा । श्रीरामराव गुरुराणा । जो ग्वाल्हेर संस्थाना । वास्तव्य करी ॥ ९ ॥ तन्मुख निर्गत सुधाकुंड । जो स्वानंदसाम्राज्य उत्तरखंड । तो आगत तरी प्रचंड । पाठवावा ॥ १० ॥ आणि सदाचार स्मृती । तेही पाठवा शीघ्र गती । पत्रोत्तर तत्संगती । पाठवावें कृपेनें ॥ ११ ॥ माझे अरुष हे बोल । अप्रसादिक फोला । परी हे बोबडे बोल । ग्रहण कीजे गुरुमाये ॥ १२ ॥ असो तनुमनें सहित । केला साष्टांग प्रणिपात । चरणीं अर्पिलें आर्षलिखित । तें तुम्हां समस्त प्रीति पावो ॥ १३ ॥ ॐ तत्सत् श्रीहरिभाऊ समर्थ.

महाराजांच्या अमानुष शक्तीची एक गोष्ट यावेळीं रा॰ रा॰ भिळकंठ गडी काठीकर यांच्या प्रत्यक्ष पाहण्यांत आली आहे ती त्यांच्याच शब्दांत येथें नमूद करतो:—

" सन १९०३ सालीं चांदूर बाजार येथें जनि फ्याक्टरी बांधण्याचें काम सुरू होतें, व त्या कामावर बुटी आणि कंपनीकडून माझी नेमणूक झाली होती. जीनचें काम समाप्त होऊन ओपनिंग सेरेमनी जवळ आला

होता. म्हणून पुष्कळसे खाद्यपेय पदार्थ जमवून ठेविले होते. एके दिवशीं संध्याकाळपासून अतिशय पाऊस सुरू झाला. त्यामुळें जीन जवळ नाला आहे तो भरून चालला होता. भोजनोत्तर कांहीं वेळानें मला झोंप लागली असतां श्रीगुलाबराव महाराज येऊन मला उठवूं लागले. मी उठून त्यांना बसविलें व एवढ्या काळोख्या रात्रीं पाणी पडत असतांना तुम्ही एकटे कोठून आलांत म्हणून विचारतां माधानवरून ( त्यांचें राहण्याचें गांव जें चांदूरबाजाराहून ४ मैल अंदाजन आहे ) आलों असें कळविलें व म्हणूं लागले कीं मला भूक फार लागली आहे. त्यावरून त्यांस फराळास कांहीं देऊन पाणी दिलें. इतक्यांत पाहरेवान सांगूं लागला कीं नाल्यास पाणी जास्त चढत आहे. मी गुलाबराव महाराजांचे कपडे धोतर वगैरे कोरडे पाहून प्रश्न केला कीं तुम्ही नाल्यांतून कसे आलांत ? नाला तर दोनदां पडतो. त्यावर कांहीं उत्तर देईनात. म्हणून पुनः पुन: प्रश्न केले तरी उत्तर नाहीं. ज्यावेळीं हे जिनांत आले त्यावेळीं वरूनही पाणी पडत होता व नाल्यांतही कंबरभर पाणी होतें. परंतु छत्री वगैरे कांहीं साधन नसतां कपडे कोरडे कसे राहिले हें समजेना व श्रीगुलाबराव महाराज सांगेनात. पुढें फराळ झाल्यावर त्यांना गाडीबैल देऊन सिरसगांव येथें पोहचतें केलें.

रात्रीं ११ वाजण्याची वेळ असून पाऊस पडत असतां व नाले दोन ठिकाणीं लागून पाण्यानें भरून चालले असतां, हे स्वत: दृष्टिहीन असून काळोख्या रात्रीं एकटे कसे येऊं शकले हें आश्चर्य मनास वाटे. त्या सत्पुरुषाचे अचाट शक्तीचा हा एक चमत्कार मी पाहिला आहे. संत-चरित्रें अनेक विध पूर्वीं घडलेलीं ग्रंथांतरीं आम्ही वाचलीं परंतु प्रस्तुत स्थितींत बाळपणापासून अंध असतां अलौकिक विद्या,नवीन कविता कोणत्याही विषया-वर लागोपाठ म्हणण्याची अश्रुतपूर्व शक्ति, अल्प वय असतां एक एक विषयांत ज्या विद्वान गृहस्थानें जन्म घालविला असेल त्याच्याशीं त्याच विषयांत भाषण करून त्याला चकित् करून सोडण्याची अपूर्वता, विल-क्षण त्वरित ग्रंथरचना, अशा अनेक ईश्वरी प्रसादानें पूर्ण झालेल्या श्री-गुलाबराव महाराजांस नमस्कार करून प्रत्यक्ष पाहिलेला अल्प चमत्कार

कळविला आहे. माधानवरूनच महाराज एवढे रात्रीं आले होते याची खात्री दुसरे दिवशीं करून घेतली होती."

सिरसगांव येथें पुंडालिक भट जोशी तेवेळीं रहात होते. हल्लीं ते मोर्शी तालुक्यांत दापोरी येथें राहतात. इच्छा शक्ति (Will power) संबंधानें एके दिवशीं महाराज त्यांच्याशीं बोलत असतां त्यांच्यावर त्यांनीं पुढील प्रयोग करून दाखविला:—

त्याला एका जागेवर डोळे लावून उभे राहण्यास सांगितलें. नंतर त्याच्याजवळ जाऊन त्याच्या मस्तकावरून डोळ्यांवर तीन वेळ महाराजांनीं हात उतरला व तुझी जागा बदलली म्हणून सांगितलें त्यानें डोळे उघडून पाहिलें तों खरोखरच जागा बदलली होती. त्यावेळीं गणपतराव जवळच होता ह्यानें ही गोष्ट पाहिली आहे.

दुसरे एके प्रसंगीं पाण्यानें भरलेली एक घागर चार पांच जणांच्या मध्यभागीं ठेवून त्यांना त्या घागरीला नुसतें बोट लावण्यास महाराजांनीं सांगितलें स्वतः महाराजही त्यांत होते. नंतर ही घागर फिरली पाहिजे अशी दृढ इच्छा करण्यास त्यांनीं सर्वांस सांगितलें. सर्वांची तशी इच्छा होतांच घागर फिरूं लागली.

ह्या वेळीं सिरसगांव येथील सरकारी शाळेवर हरी अंताजी मराठे ह्या नांवाचे मुख्य शिक्षक होते. त्यांस महाराजांच्या सहवासांत विशेष आनंद वाटत असे. महाराजांनीं त्यांना अमृतानुभवाच्या कांहीं अध्यायांचें निरूपण सांगितलें व अभ्यास पक्षानें नित्य ध्यानाचा व जपाचा नियम लावून दिला होता. एके दिवशीं त्यांनीं हरिकिशोर वर्तमानपत्राचा ता० २० जुलै १९०३ चा अंक महाराजांकडे आणला. त्यांत सुप्रसिद्ध जनार्दन स्वामींच्या खालील पद्याचा अर्थ विचारला होता व तो २७ जुलैच्या आंत पाठविण्याची विनंती केली होती. तें पद येणेंप्रमाणें:—

पद—तळहातींचे केंस विंचरिते गोरी। वांझेचिया सुतें धरलीसे करीं ॥ धृ० ॥ परता परता मी वंध्येची सुता। पतिव्रता मी माझीरे माता ॥१॥ आजी पणजी निपणजी तिजी। तिघी वांझा आई तुझी आ

माझी ॥२॥ विचारितां तुम्ही आम्ही भावंडें । नघडे संगू नवल दिसे कुडें ॥३॥ तूं माझा पिता तुझी मी माता । येवढी आण आतां न बोले तत्वतां ॥४॥ तूं माझा नातू कीं मी तुझी नाती । जनार्दनु म्हणे भ्रांतिरे भ्रांति ॥ ५ ॥ या पदाचा अर्थ महाराजांनीं सांगितला तो असाः—

गतकालीन सत्पुरुषांनीं ब्रह्मसूत्रापासून मनार्णवापर्यंत मायेचें अनिर्वचनीय स्वरूप सांगून तें ज्ञानानें मिथ्या आहे असें सिद्ध केलें आहे. तदनुसारच भगवान जनार्दनस्वामींनीं हें पद केलें आहे. शिवाय योगवासिष्ठांत अशा कांहीं कथा उपलब्ध आहेत. तद्विवेचनपूर्वक यथामति अर्थ लिहितोंः—

पदांतील प्रथम पंक्ति " तळहातींचे केस विंचरिते गोरी " ही आहे. हाताचा तळवा सर्वांना अपरोक्ष आहे. तदुपलक्षणपूर्वक सर्वांना अपरोक्ष जें अधिष्ठान तेंच सच्चिदानंदस्वरूपानें नामरूपादि मिथ्या जगताला आधारभूत झालें आहे. तळहाताचे ठायीं जसे केश नसतात, त्याप्रमाणें ब्रह्मस्वरूपाचे ठायीं जगत नाहींच. " एकमेवाद्वयंब्रह्म नेहनानास्तिकिंचन " इत्यादि श्रुतिप्रतिपादित असलेलें एकच ब्रह्म व्यापक आहे. परंतु "मरीचि जल सन्निभं" इत्यादि श्रुति जगदाभास दाखवितात. तो आभास कसा हें सांगण्याकरितां " तळहातींचे केश " असें म्हटलें आहे. म्हणजे अधिष्ठानावर जग नसूनही " विंचरिते गोरी " म्हणजे निरवयवा अनिर्वचनीय सदसद्विलक्षण जी माया तिनेंच अधिष्ठानीं केस विंचरिले, म्हणजे जगत रचिलें ( कल्पिलें ). हीच माया वंध्या शद्बानें बोलिली जाते. कारण वास्तविक प्रभाच पण उष्णतेहून विपरीत असदाभास मृगजल प्रतीत होते, तद्वतच माया आहे; म्हणजे हिच्या कार्याला व हिला सत्यता नाहींच, परंतु वंध्या वंध्या या शद्बानें जशी स्त्रीसत्यता भासते तद्वत जगत्कार्यानुमेया आहे. म्हणून तिचें ठायीं प्रतिबिंबित झालेलें जें ब्रह्म तो ईश्वर वंध्यासूत म्हणावा. त्यानें हिला करीं धरिलें. म्हणजे आपल्या स्वाधीन ठेविलें. " मायां तु प्रकृतीं विद्यान्मायिनं तु महेश्वरं । स मायी सृजतीत्याहुः श्वेताश्वतर शाखिनः " इत्यादि श्लोकांनीं ईश्वरस्वातंत्र्य वर्णित आहे. उपनिषदांचे ठायीं वारुणी विद्येंत भृगूनें प्रथम मी अरुंधती आहे

व तेंच ब्रह्म मी होय असें जेविं प्रतिपादन केलें आहे तद्वत भगवान् जनार्दन स्वामींनीं उपलक्षण सांगण्याकरितां ईश्वरापासून उत्पन्न झालेली इच्छाशक्ति व तदाभास जीव या दोघांचें उपलक्षण आपणाकडे घेऊन पुढील वाक्य बोलिलें. प्रथम इच्छेचें लक्षण घेऊन म्हणतात " परता परता मी वंध्येची सुता. " इच्छा त्रिविध; सात्विकाज्ञानशक्ति, राजसा क्रियाशक्ति व तामसा द्रव्यशक्ति. यांतील सात्विक शक्तींचें उपलक्षण आपणाकडे घेऊन बोधरूप म्हणतातः—हे जीवांनों परतावें, मी वंध्येची सुता आहे. म्हणजे मी मिथ्या आहे. माझ्या कार्यांत सत्यत्व नाहीं. पतिव्रता मी म्हणजे एका ईश्वराच्याच स्वाधीन आहे. "माझीरे माता" म्हणजे अनिर्वचनीय माया तीही त्याच्च परमेश्वराच्या स्वाधीन आहे. म्हणजे दोघीचाही एकच पति. आजी म्हणजे अविद्याप्रतिबिंबित जो जीव तदाश्रित अविद्या तामसा असल्यामुळें ईश्वरी राजसशक्ति ही त्याची आजी होय. व सात्विकशक्ति पणजी होय. व अनिर्वचनीय माया निपणजी होय. या तिघी वांझा म्हणजे यांच्या कार्याला सत्यत्व नाहीं. आणि तुझी आई तामसा अविद्या, व माझी आई भ्रांतिस्वरूप, यांनाही मागीलप्रमाणेंच वंध्यापत्तित्व आहे. अर्थात आई सत्य नाहींतर जीवत्व व सात्विकत्वही सत्य नाहीं. विचारानें तूंही ईश्वराभास म्हणून भाऊ व मीही ईश्वरेच्छा म्हणून बहीण. येथें सुतादि उपलक्षणें घ्यावीं. परंतु तूं लक्ष्यांशानें सत् आहेस व मी वाच्यलक्ष्यतः सदसद्विलक्षण आहे, म्हणून आपणांमध्यें साधर्म्य नाहीं. आतां तुजमजमध्यें चेतनत्व आणि चिदाभासापत्ति दृष्ट आहे हें मात्र " नवल दिसे कुडें " म्हणजे आश्चर्यरूप कवतुक होय. हे जीवा, लक्ष्यांशतः तूं सत् असल्यामुळें वस्तुतः माझा पिता आहेस व मी लक्ष्यांशतः अनिर्वचनीय असल्यामुळें त्या मजमध्यें तूं प्रतिबिंबित झालेला म्हणून मी भ्रमतः तुझी माता आहे म्हणजे तूं ब्रह्म आहेस व मी माया आहे. तो जो अन्योन्य संबंध ह्याच अनिर्वचनीय मातृपितृभाव होय. " एवढी आण आतां " असा निश्चय जाणून " न बोले तत्वतां " वाच्यांश सांडून लक्ष्यांशानें " अहंब्रह्माऽस्मि " असा आहेस. " तूं माझा नातू " मी बोधकरणारी सात्विक इच्छा असल्यामुळें माझी कन्या अविद्या तिज-

मध्यें प्रतिबिंबित तूं उपलक्षणें करून माझा नातू आहेस. आणि लक्ष्यांशतः तूं सत् असल्यामुळें ब्रह्मप्रतिबिंब ईश्वर तोच तूं शबलांश, त्याची कन्या मी सात्विक इच्छा म्हणून तुझी नाती इत्यादि. परंतु भगवान् श्रीगुरु जनार्दनस्वामी म्हणतात कीं "भ्रांति हो भ्रांति" म्हणजे आपणच अनंत प्राणी रचून स्वप्नांत त्यांच्या प्रिय भाषणांनीं मोहित होतो तसाच ब्रह्मरूप अधिष्ठानीं विवर्तालंकाररूप हा स्वप्नमय जगदाभास आहे. यावरून माझें मागचे बोलही लक्ष्यांशतः भ्रांतिमयच आहेत म्हणून "परता परता" म्हटलें. या बोधानें वाच्यांश सांडून 'तत्वमसि' महावाक्याचें लक्ष्य जें जीवब्रह्म ऐक्यज्ञान तें पावून व हा जगदाभास निरसून तदाकार होणें हें तात्पर्य आहे.

हा गूढार्थ मनांत आणून "जनार्दनु म्हणे भ्रांति हो भ्रांति" ह्या वाक्याची योजना केली. ॐ तत्सत.

हा अर्थ हरिभाऊ मराठे यांनीं "क्षेत्रस्थ" या सहीनें हरिकिशोरकडे लिहून पाठविला. तो ता० ३ आगष्ट १९०३ च्या अंकांत प्रसिद्ध होऊन हरिभाऊस ५ रुपयांचें बक्षीस मिळालें.

या वेळच्या स्वतः विषयींच्या आणखी दोन गोष्टी महाराजांनीं "साधुबोधांत" नमुद केल्या आहेत त्या अशाः—

१. हरिभाऊ मराठे शिरसगांवांत शिक्षक असतांना, मी कांहीं वेदांताच्या गोष्टी करीत असे. त्यांच्या येथें मला इंग्रजी येत नसल्यामुळें अडवून, हांसण्याकरितां एक कुत्सित मनुष्य माझी परीक्षा पाहूं लागला. तो म्हणाला, आत्मा हा एक मेंदूचाच धर्म आहे, तो देहाहून निराळा नाहीं; कारण मेलेल्या मनुष्याच्या मेंदूवर कांहीं परिणाम करून त्याला जिवंत करितां येते, अशी आतां एक युक्ति निघाली आहे. मी अत्यंत लहान पोर असल्यामुळें (science) जडशास्त्र वाचलें नसेल हें त्याला ठाऊक होतें. परंतु मी म्हटलें कीं, जिवंत झालेल्या मनुष्याला कालच्या दिवसाची स्मृति असते कीं नसते ? पहिल्यापक्षीं तो मेलाच नाहीं, असें आम्हीं म्हणूं, कारण नव्या जन्मास आलेल्या मनुष्याला पूर्वीच्या दिव-

साची स्मृति आम्हीं पहात नाहीं. मूर्च्छेत कांहीं देहाहून अगदीं पृथक् आत्मा होत नसतो. दुसऱ्यापक्षीं, आत्मा मेंदूचा धर्म होणें कधींच शक्य नाहीं, कारण अगदींच स्मृति पुसून जाण्याकरितां मेंदू नवा पाहिजे; पण त्या प्रेतांतील मेंदू तर जुनाच असतो. नवा आत्मा शरीरांत शिरतो असें म्हटलें तरी, मेंदूचा धर्म तो होत नाहीं; म्हणून कोणीकडूनही आम्हांला इष्टापत्तिच आहे. हें माझें उत्तर ऐकून तो फार चकित् झाला, आणि हरिभाऊ मराठ्यांना म्हणाला, या वयांत जें शास्त्र माहीत असणें शक्य नाहीं, त्याही शास्त्रांतीलें शंकांचे समाधान यांना करितां येतें, हें मोठें आश्चर्य आहे. एरव्हीं इंग्लिश भाषा वगैरेचें ज्ञान यांना शुद्ध दिसत नाहीं. पुढें तो मनुष्य आपल्याला माझा अनुयायी म्हणवून घेत असें. हा मनुष्य बी० ए० आहे. —साधुबोध. पृ. १७८—

२. सिरसगांवबंडमध्यें हरि अंताजी मराठे नांवाचें हेड मास्तर होते. त्यांनीं First principles of occultism याविषयीं कांहीं गोष्टी सांगितल्या. ते म्हणाले, नुसतें मनानें ध्यान केलें म्हणजे नाकानें कांहीं वास येऊं लागतो, यावरून बाह्य वस्तु कांहीं नाहींत असा नवा शोध आहे. मी म्हटलें, छे! हा नवा शोध मुळींच नाहीं. आमच्या कडील बौद्धांचा जो बाह्य शुन्यवाद आहे तोच उतरून घेतला आहे. नंतर ते म्हणाले, कोठें आहे तो ? तेव्हां मी सूत्रभाष्यांतून त्यांना बाह्य शून्यवाद काढून दिला; आणि त्यांना पटलाही. वास्तविक बौद्धमत मला मान्य नाहीं, परंतु संस्कृतेतर पक्षापेक्षां संस्कृतपक्ष धरणें बरें, असें मानूनच तेव्हां मी तें मत प्रतिपादन केलें. —साधुबोध. पृ० १९०.—

" सत्य हें त्रिकालाबाधित असल्यामुळें सत्याचा निश्चय झालेला असेल तर त्याच्यावर कोणत्याही नव्या शोधाचा हल्ला चालूं शकणार नाहीं " हें तत्व सिद्ध करण्याकरितां महाराजांनीं वरील गोष्ट सांगितली आहे.

ह्यावेळीं महाराजांना २२ वें वर्ष चालू होतें. इतक्या अवधींत त्यांच्या ग्रंथसंग्रहाच्या आवडीची व विद्याभ्यासंगाची कीर्ति वऱ्हाड प्रांतात बरीच पसरली होती.

पुढें महाराजांनीं दिवाळीकरितां ताईस मोरशीहून आणविलें व आपण एक महिनाभर सिरसगांवीं राहिले. हे एकदोन महिनें महाराजांनीं माधान, सिरसगांव, खराळ, चांदूरबाजार ह्या ठिकाणीं घालविले. भजन, ग्रंथवाचन, पत्रव्यवहार, बाललीला, फुगड्या, पिंगा, वगैरे क्रम पूर्ववत चालूच होता.

मार्गशीर्षांत महाराजांस तिवशाचे दामोदरशास्त्री भेटले. त्यांस त्यांनीं माधानास नेऊन श्रीमद्भागवतांतील दशमस्कंधांत सांगिल्याप्रमाणें कात्यायनि देवींची पूजा केली व कात्यायनीचा मंत्र त्यांच्याजवळून विचारून घेतला. हा कात्यायनिव्रताचा आरंभ होय.

रामचंद्रभाऊला महाराजांनीं योग शिकण्याकरितां आणखी कांहीं वर्षांची मुदत दिली होती ती आतां भरत आली. त्याला महाराजांनीं मृत्यूचा दिवस सांगितला व एक मृत्युपत्र करून दिलें. त्यांत मरणाचा काल, यमाच्या हातीं न सांपडण्याला काय केलें पाहिजे ? मृत्यूच्या वेळीं शांत कसें रहावें ? निरनिराळ्या देवतांच्या हातून सुटून ब्रह्मलोकास कसें जावें ? इत्यादि प्रक्रिया सांगितल्या होत्या. योगाभ्यासाच्या प्रक्रिया गुप्त रहाव्या, गुरुपरंपरेवांचून भलत्याला त्या हितकारक होत नाहींत असा योगशास्त्राचा नियम असल्यामुळें मृत्यूच्या एक दिवसपूर्वी हें मृत्युपत्र जाळून टाकण्यास महाराजांनीं रामचंद्रबापूस सांगितलें होतें.

याप्रमाणें हें सिरसगांवप्रकरण येथें संपलें. मागल्या माधान प्रकरणांत व या प्रकरणांतआलेल्या वृत्तांताचें सूक्ष्म अवलोकन केलें असतां दिसून येतेंकीं "शाब्दे-परेच निष्णातं " हा सद्गुरुत्वाचा अधिकार महाराजांस जन्मतःच प्राप्त झाला होता. अमानित्वादि लक्षणयुक्त परमभक्ति त्यांच्या ठिकाणीं पूर्ण स्वरूपानें वास करीत होती. आपण ज्या योनींत जन्म घेतला असेल तदनुरूप बरोबर वागणें, निग्रहानुग्रह सामर्थ्य, निरपेक्ष परोपकारबुद्धि, अनियतविपाकी पुण्याशय आपल्या दर्शनानें नियतविपाकी झाल्यावर अधिकारानुरूप त्याचें फळ देणें, आज्ञाधारक शिष्याच्या हितार्थ सर्वतोपरी झटून त्याचा योगक्षेम संभाळणें, इत्यादि श्रुतिसिद्ध दिव्य गुण त्यांच्या

ठिकाणीं प्रमुख होते व आपला संकल्प सिद्धीस नेण्याची अप्रतिहत शक्तिमत्ता त्यांच्या आंगांत पूर्ण होती.

सद्य: परिस्थितींत सनातन वेदमार्ग स्थापून धर्माचा जीर्णोद्धार करण्यास अवश्य लागणाऱ्या गोष्टींची योजना त्यांच्या दिव्य दृष्टीस स्पष्ट दिसत होती व तदनुसार त्यांनीं आपल्या कर्तव्याचें धोरण शास्त्रशुद्ध पाया घालून निश्चित केलें होतें.

उमरावतीस महाराजांचें जाणें येणें होऊं लागल्यापासून आपल्या भावी कार्यक्षेत्राचें निरीक्षण त्यांनीं किती शांतपणाणें व व्यवस्थितपणें चालविलें होतें या विषयीं एकेठिकाणीं ते म्हणतात:—

" जमनाबाईचे ओळखीनें ( प्रथम मी ) उमरावतीस आलों. मला योग येतो असें स्पष्ट सांगून गंगाराम व गंगाधरपंत कास्त यांची ओळख केली. पुढें एक दिवस प्रायव्हेट हायस्कूलमध्यें जाऊन श्रीनिवासशास्त्री यांचीही भेट घेतली. नंतर हंसस्वरूपानें घातलेल्या योगशाळेचा कार्यक्रम जाऊन पाहिला. शास्त्री महाराजांनीं याच वेळीं मला एक कुडतें दिलें, पण मी तें घेतलें नाहीं. पुढें माधानास तसाच मी निघून आलों. नंतर दुसऱ्यानें पुन्हां उमरावतीस आलों. तेव्हां हरिभाऊची व माझी गांठ पडली. त्यानंतर पुन्हा मी माधानास गेलों. "

उमरावतीचा प्लेग आतां नाहींसा झाल्यामुळें तिकडे येण्याविषयीं हरिभाऊ प्रभृति मंडळीकडून महाराजांस आग्रहपूर्वक पत्रें येत होतीं. इतक्यांत यावलीच्या आकाजीबापूकडून महाराजांना नेण्याकरितां गाडीही आली. तेव्हां पौष वद्य एकादशी किंवा द्वादशीचे सुमारास सौ० मनकराणिका आईसह माधानाहून निघून मध्यंतरीं तीळसंक्रांत यावलीची करून महाराजांनीं उमरावतीस प्रयाण केलें.

हें महाराजांचें जाणें श्रीकृष्णाच्या मथुरागमनाप्रमाणें अर्थातच "धर्मस्थापन व्हावा अशी मूळची वृत्ति " सफळ करण्याच्या विशेष हेतूनें होतें हें निराळें सांगावयास नको.

उमरावतीस गेल्यानंतर पुढें महाराजांनीं "आपल्या वाणीचा परिणाम"

कसा दाखविला, " ब्राह्मणांची तरुण मुलें मिळवून " त्यांस विद्यादान कसें केलें; सत्यशोधक, थिऑसफी, इत्यादि मतांतील दोष दाखवून आपल्या विद्वत्तेचें वजन लोकांवर कसें बसविलें, वेदपुराण मतांचा उद्धार करून योगसामर्थ्यानें नास्तिकांस आस्तिक कसें बनविलें, संप्रदायसंघ जुळविण्याकरितां कायावाचामनानें झिजून कशी खटपट केली, आपल्या वीर्यवती वाणीला लुब्ध होऊन प्रेमवश झालेल्या मंडळीला रक्षण शिक्षणादि शास्त्रसिद्ध गुरुसंप्रदायमार्गाची दिशा दाखवून ज्ञानोत्तर भक्तीचा सुगम मार्ग कसा दाखविला व शेवटीं माधुर्यबोधक सुंदर वाङ्मय निर्माण करून मधुराद्वैत संप्रदाय यशस्वी करण्याचा कसा प्रयत्न केला; इत्यादि पुण्यपुरुषार्थमय रमणीय वृत्तांत यथास्थळ व यथाक्रम पुढील प्रकरणमालिकेंत श्रीमहाराजांची कृपा ग्रथन करवील.

हरिः ॐ तत्सत् श्रीमत्सद्गुरु ज्ञानेश्वर महाराजार्पणमस्तु.

सिरसगांव प्रकरण समाप्त.

श्रीज्ञानेश्वरमाउली समर्थ.

# उमरावती प्रकरण. रज ४ था.



## शके १८२५ पौष. ते शके १८३६.

मधुराद्वैतमताचा उत्कर्ष.

श्लोक—प्रायेण देवमुनयः स्वविमुक्तिकामा मौनंचरंति विजने न परार्थ निष्ठाः। नैतान्विहाय कृपणान्विमुमुक्षएको नान्यं त्वदस्य शरणं भ्रमतोऽनु पश्ये ॥ श्रीमद्भागवत ७-९-४४.

अभंग—मुनीमुक्त झाले भेणें गर्भवासा। आम्हां विष्णुदासां सुलभ तो ॥१॥ अवघाचि संसार केला ब्रह्मरूप। विठ्ठल स्वरूप म्हणोनियां ॥२॥

— श्रीतुकाराममहाराज—

## शके १८२५ शोभन नाम संवत्सरे. इ० स० १९०४.




वेळीं माधानांत महाराजांची बाललीला चाललेली होती त्याच सुमारास उमरावतीस एक नवीन हायस्कूल स्थापन झालें होतें. नागपूरचे श्रीनिवास शास्त्री ऊर्फ अण्णाशास्त्री हरिदास त्या शाळेचें मुख्य अध्यापक असून वासुदेवराव मुळे, गणपत खंडो भालेराव वगैरे मंडळी अध्यापकांचे कामावर आली होती. ही सर्व मंडळी फुरसतीच्या वेळांत एकत्र जमून अध्यात्मपर ग्रथांचें वाचन व चर्चा करीत असत. पुढें या मंडळीचा व हरिभाऊ केवले यांचा परिचय जुळून हरिभाऊही त्या मंडळींत गीतार्थाचें अध्ययन श्रीनिवासशास्त्री जवळून शिकण्याकरितां जाऊं लागले. पुढें हरिभाऊची व महाराजांची भेट व परिचय झाल्यानंतर हरिभाऊनें महाराजांविषयीं मुळे-प्रभृतीस माहिती सांगितली, तेव्हांपासून त्यांनाही श्रीमहाराजांच्या दर्शनाची उत्कंठा लागून राहिली होती. असो.

पौष वद्य १३ चे दिवशीं मायबाई ( मनकर० आई ) सह महाराज यावलीहून आले ते नेहमींप्रमाणें जमनाबाईचे घरीं उतरून तिसरेप्रहरीं सुमारे ३।४ वाजतां हरिभाऊचे भेटीस गेले. बरोबर मन० आई होत्याच. तेथें प्लेगसंबंधीं चर्चा निघाली. प्लेगमध्यें त्रिदोष होतो काय ? असा प्रश्न निघून तापानें त्रिदोष होऊन मनुष्य मरतो इ० प्लेगमीमांसा झाल्यावर महाराज बिऱ्हाडावर परत जाण्यास निघाले. समागमे हरिभाऊही गेले. महाराजांचे आगमनाची वार्ता हरिभाऊनें मुळेप्रभृतीस सांगितल्यावरून दुसरे दिवशीं ती सर्व मंडळी मिळून सायंकाळीं महाराजांचे दर्शनार्थ जमनाबाईच्या येथें गेली. ते वेळीं कांहीं कारकून मंडळीला महाराज विवेकसिंधूचें निरूपण सांगत होते. मुळे वगैरे मंडळीला तें निरूपण फारच गोड व अश्रुतपूर्व वाटून मोठा आनंद झाला. दुसरे दिवसापासून ही मंडळी नित्य सायंकाळीं महाराजांचें निरूपण ऐकण्यास जात असत. हा क्रम माघ शुद्ध १५ पर्यंत सुमारे १५ दिवस चालला. इकडे माधवाच्या मंडळीचाही परामर्ष महाराज मधून मधून घेत असत. माघ शुद्ध ११ स महाराजांनीं माधवास रामचंद्रबापूकडे पत्र पाठवून चि० बळवंताकडून रूपावळी व अष्टाध्यायीसूत्रें चांगलीं पाठ करून घेण्यास लिहिलें होतें. व पुढेंही पत्रद्वारें अभ्यासाविषयीं विचारपूस करीत असत. यांत महाराजांचा असा हेतू होता कीं आपली स्वज्ञाति विद्याहीन असल्यामुळेंच ब्राह्मणांचा द्वेष करण्यास प्रवृत्त झाली आहे म्हणून पौराणिकज्ञानद्वारा त्यांची उन्नति करावी. यावरून स्वज्ञातीवर त्यांचा प्रेम व त्यांच्या उन्नतिविषयीं कळकळ दिसून येते.

माघ वद्यांत महाशिवरात्रीकरितां महाराज यावलीस गेले. हरिभाऊही बरोबर गेले होते. यावलीहून माघ वद्य १ स महाराजांनीं रामचंद्रबापूस भक्तिज्ञान वैराग्यबोधक एक पत्र पाठविलें; तें सूक्तिरत्नावलीच्या द्वि० यष्टीच्या उत्तरार्धांत छापलें आहे. पुढें महाराजांच्या बोलावण्यावरून रामचंद्रबापूही महाशिवरात्रीकरितां यावलीस आले होते. महाशिवरात्र करून फाल्गुनारंभीं महाराज पुन्हां उमरावतीस परत आले.

इकडे मुळेप्रभृति मंडळी महाराजांच्या आगमनाविषयीं केवळ आतुर झालेली होती. आजपर्यंत एकत्र जमून त्यांचें जें ग्रंथपरिशीलन व चर्चा स्वतंत्रपणें झाली होती ती केवळ शिळोप्याच्या गप्पासारखी मनोरंजनार्थ झाली होती व प्रत्येकाच्या मनांतल्या शंका जशाच्या तशाच कायम राहिल्या होत्या; त्यांचें समाधान करणारा पुरुष त्यांना पाहिजे होता. इतक्यांत थिआसफीची भरभराट होऊन आनीबिझांट बाईची वक्तृत्व-शक्ति जेव्हां प्रगट झाली तेव्हां ह्या केवळ आपल्या देशाच्या उद्धारार्थ योगिनीच अवतरल्या आहेत असें बहुतक सुशिक्षित मंडळीप्रमाणें मुळे मास्तर यांनाही वाटलें. याचें कारण मुळे सांगतातः—

" जगत् काय ? ईश्वर काय ? जीव काय ? यांचा संबंध कसा काय ? वगैरे गोष्टी संबंधानें माझे विचार नेहमीं चालत असत. राम काय ? कृष्ण काय ? शिव काय ? हे कोठें असतील ? यांची पूजा काय म्हणून करावी ? अशा कित्येक गोष्टी मनांत एकसमयावच्छेदें करून येऊन मनाची अगदीं तारांबळ उडत असे; व कोणाकडून या प्रश्नांसंबंधानें उलगडा करावा या विषयीं निश्चय होत नसे. प्रसिद्ध मठाधिपती शंकरा-चार्यांसारख्या सोंवळ्या कर्मठाकडे जावें तर तो अमकें करा, तमकें करा, याप्रमाणें प्रभूप्रमाणें नुसती आज्ञा करणार. दुसऱ्या एखाद्या मनुष्याकडे जावें तर तेंही कठीण. कारण तेथें जाऊन आपण फसणार नाहीं हें कशा-वरून ? जो मनुष्य शिष्य प्रश्नोत्थित शंकेनें स्वतःच घोंटाळून जातो तो दुसऱ्याचें समाधान काय करणार ? तेव्हां असला मनुष्य लोभाविष्ट होऊन आपणाला शिष्य करूं इच्छिणार नाहीं हें कशावरून ? सारांश, असा मनाचा घोंटाळा होऊन प्रश्न उद्भूत झाले, तेव्हां अमकें करा, तमकें करा, अशा पोकळ आज्ञेनें मनाचें समाधान व्हावें कसें ? त्याला पाहिजे विचारच. अशा विचारांचा उलगडा करणारी त्यावेळीं निदान मला "थिऑसफिकल सोसायटीच" च दिसत होती. सबब पुढें, प्रसंगीं त्या सोसायटीचे मेंबर होण्याच्या उद्देशानें मी उमरावती मुक्कामीं त्या सोसायटींत जाऊं येऊं लागलों. पुस्तकें वाचूं लागलों. मनाला वाटूं लागलें कीं ह्या सोसाय-

टींत कांहीं धर्मविचार प्रगल्भ आहेत; वगैरे वगैरे. मोठमोठाले साधुसंत यांनीं ज्याप्रमाणें लोकांच्या उद्धारार्थ व जगाच्या कल्याणार्थ पूर्वी हलक्या कुळांत जन्म घेतले, तद्वतच त्यांनीं हल्लीं युरोपांत जन्म घेतले नसतील कशावरून ? असा मनाचा ग्रह होऊं लागला. व आपल्याला खरें धर्म-रहस्य येथेंच कळेल असें मनाला वाटूं लागलें. आनीबिझांटबाई ही कोणी-तरी योगभ्रष्ट बायको असून हिंदुस्थानाच्या उद्धारार्थ इणें जन्म घेतला आहे असेंही वाटे. १९०१ सालीं व त्यानंतर लवकरच इचा उपदेश घ्यावा असें वाटलें. परंतु युरोपांतील बायकोकडून उपदेश घेण्यापेक्षां एखाद्या इंडियन थिऑसफिस्टाचा उपदेश घ्यावा हें बरें, असेंही पुन्हा वाटूं लागलें. ब्राह्मणांनीं हिंदुहून इतर लोकांकडून उपदेश घेण्याचा किंतु मनांत आल्यामुळें उपदेश घेण्याचें दिरंगाईवर पडलें. सबब नारायण-स्वामी थिऑसफिस्ट यांचा उपदेश घ्यावा असा मनानें विचार केला. त्यावेळीं थिऑसफी अगदीं भरभराटींत होती. थिऑसफिस्ट होणें मोठें भूषणावह वाटत होतें. मोठमोठाले गृहस्थ लेले, बोधनकर, खापर्डे, काळे यांनीं देखील उपदेश थिऑसफीचा घेतला हें ऐकून मनाची आणखी दृढतर इच्छा झाली. परंतु या सर्वांनीं "मायबाईचा" उपदेश घेतला तें मला बरें वाटलें नाहीं. इकडे नारायणस्वामी पुन्हां आले असतां त्यांच्याकडून उपदेश घेऊं किंवा नको, अशा प्रकारची स्वतः माझ्या मनाची दोलाय-मान चित्तवृत्ति झाली होती. असा प्रकार चालला असतां श्रीगुलाबराव महाराजांची व माझी गांठ पडली."

इकडे थिऑसफीमुळें झालेली परिस्थिति पाहून महाराजांस जें कांहीं वाटलें त्याविषयीं ते म्हणतात:—"सत्यशोधकांच्या भीतीनें मी उम-रावतीस आलों तर येथें मला थिऑसफीचे प्रश्न लोक करूं लागले. आगींतून निघून फुफाट्यांत पडल्यासारखी स्थिति झाली. त्यामुळें थिऑ-सफीवर धडधडीत टीका करणें भाग पडलें. खापरडे साहेब थिऑसफिस्ट म्हणून अप्रत्यक्षपणें त्यांच्यावरही कधीं कधीं माझा attack होत असे. त्यामुळें उमरावतीस कांहीं मंडळी माझ्याविरुद्ध राहिली व कांहीं माझ्या-

कडे आली. शास्त्रीबोवा ( श्रीनिवासशास्त्री ) मुळे ( वासुदेवराव ) भालेराव वगैरेंचें माझ्यावर विलक्षण प्रेम बसलें. माझ्या भाषणाच्या प्रेमामुळें शास्त्रीबोवा मजकडे येत असत व नोकरींकरितां त्यांना थिऑसफिस्ट लोकांचेंही ऐकावें लागे. याच वेळीं मुळ्यांना दहावर्षें थिऑसफीचें आयुष्य आहे असें भविष्य मी सांगितलें होतें. पुढें राम, कृष्ण या ( अवतारां) विषयीं माझा व मुळ्यांचा विवाद होऊन शेवटीं मुळ्यांचें समाधान झालें आणि त्यांची थिऑसफी शिथील पडली. ''

या पूर्वी उमाकांत देशपांडे, बोधनकर, करंदीकर वगैरे थिऑसफिस्ट वकील मंडळीबरोबर वासुदेराव मुळे हे नसरवानजी मंचरजी देसाई एक्साइस इन्स्पेक्टर यांच्या खासगी बंगल्यावर जमून थिऑसफी विषयक चर्चा करीत असत व तेथें यांची व्याख्यानेंही होत. पुढें महाराजांचाही नसरवानजीशीं परिचय झाला.

थिऑसफीसंबंधानें महाराजांचा व वासुदेवराव मुळ्यांचा जो विवाद होत असे त्यांत थिऑसफींत कोणकोणते दोष आहेत, तिचा उद्देश काय, ह्या समाजाचा पुढें कसा ऱ्हास होईल, नूतन सुशिक्षित मंडळी बहुत करून बिझांटबाईच्या वक्तृत्वाकर्षणामुळें दिपून महत्वाकांक्षेकरितां थिऑसफिस्ट कसे होतात इ० गोष्टींची चर्चा असे. महाराज म्हणतात हा वाद एक वेळ किंवा दोन वेळ झाला नाहीं तर सारखा वर्षभर झाला.

याशिवाय श्रीनिवासशास्त्री, वासुदेवराव मुळें व गणपत खंडो भालेराव या मंडळींचा व थिऑसफिस्टांचा संबंध तुटावा व " सर्वांनीं माझ्यावर विश्वास ठेवून थिऑसफीवर फटका झाडावा " म्हणूनही महाराजांनीं पुष्कळ खटपट केली व ती फलद्रूप होऊन पुढें मुळेप्रभृति मंडळीचा व उमरावती येथील प्रायव्हेट हायस्कूलचा संबंध हलुहलु कसा तुटला हें मुळे मास्तर आपल्या एका पत्रांत लिहितात:—" माझा, भालेरावचा व श्रीनिवासशास्त्रीचा प्रायव्हेट स्कूलचा संबंध तुटेल याबद्दल महाराजांनीं कांहीं वर्षें अगोदरच भविष्य करून ठेविलें होतें. मी इ० स० १९०४

१ सूक्तिरत्नावली. सप्तम यष्टि पृ. २४०. पहा.

ऱ्या आक्टोबर मध्यें ( नागपूर येथें नील सिटी स्कुलांत ) आलों, नंतर भालेरावाला मी येथें १९०५ आगष्टमध्यें आणलें व श्रीनिवासशास्त्री हे त्यांचे चुलते बिमार असल्यामुळें नौकरी सोडून १९०७ मध्यें आले. मी उमरावतीहून नागपुरीं येण्याकरितां कांकूं करूं लागलों त्यावेळीं महाराजांचे शद्ब मला हे होते ' न भेतव्यं, ज्ञानेश्वरेणैवाहमत्र प्रेषितस्तेऽहं तत्र संरक्षणं करिष्यामि. ' असो.

याप्रमाणें महाराजांकडे जी मंडळी आली त्यांत कोणी थिऑसफिस्ट, कोणी सायन्सवादी, कोणी पुराणांचा व वेदांचा मेळ न मानणारे तर कोणी निर्गुण ज्ञानामुळें सगुण भक्ति न मानणारे असे असून कोणाच्या कांहीं, कोणाच्या कांहीं, शंका होत्याच. महाराज हे संशयछेदनपटु व सद्विद्यादानशील असून एवढ्या करितांच सकुटुंब बाहेर पडले होते. त्यांना ही जिज्ञासु मंडळी मिळाल्याबरोबर मोठ्या आवडीनें, प्रेमानें, नेहमींची बालवृत्ति कायम ठेवून व स्वतःकडे लहानपणा घेऊन श्रुतियुक्तिअनुभवप्रचूर व प्रक्रियाभरीत अशीं निरूपणें सांगून ते त्यांचे संशय निरसन करूं लागले.

यावलीहून परत आल्यानंतर नित्य सायंकाळीं देवीच्या दर्शनास जाण्याचा महाराजांचा क्रम होता. तिकडूनच ते मुळेमास्तरच्या घरीं जात असत. तेथें रात्रौ बारावर दोन दोन वाजेपर्यंत निरानिराळ्या विषयांवर निरूपणें होत असत व नंतर महाराज जमनाबाईच्या बिऱ्हाडावर परत येत. याप्रमाणें सुमारें १०—१२ दिवस क्रम चालला. मुळे वगैरे मंडळीला ज्या शंका येत असत त्या निरूपण प्रसंगीं आधींच ओळखून ओव्यांत त्यांचें उत्तर देऊन महाराज समाधान करीत. त्यामुळें येथें कांहीं ईश्वरी चमत्कार आहे असें त्यांना वाटे. महाराजांना रात्रौ दोन प्रहरानंतर स्फूर्ति होते असें गोविंदराव राजुरकर कधीं कधीं म्हणत असत. एके दिवशीं महाराज सकाळीं दहा वाजतांच आले व अध्याय म्हणून हजार बाराशें ओव्या केल्या. तें पाहून मुळें मास्तर गोविंदरावला म्हणाले—" अरे तुझी रात्रीची दोन वाजतांची स्फूर्ति आतां

या वेळीं कशी रे आली ? " असो. याप्रमाणें महाराजांचीं निरूपणें नित्य नूतन होत असल्यामुळें अधिकाधिक अभिरुची मंडळीला वाटूं लागली. तेव्हां वासुदेवराव मुळ्यानीं महाराजांस आपल्या घरींच येऊन राहण्याची विनंती केली. व महाराजांनींही ती मान्य केली. सौ० मनकरणिका आईलाही मुळें यांनीं आपल्या घरींच आणविलें. पुढें नाना कविमंडन, व्यंकटराव देशपांडे, यांचाही महाराजांवर प्रेम जडला, व तेही रात्रंदिवस महाराजांच्या जवळ राहून निरूपणें ऐकूं लागले. हरिभाऊ तर जेवणापुरते मात्र घरीं जात; बाकी सारा वेळ महाराजां-जवळ राहून अभंग, पदें वगैरे नवीन झालेले लिहून घेत व निरूपणाचे वेळीं टिपणें वगैरे करून ठेवीत. याप्रमाणें मुख्य लेखकाचें काम हरिभाऊ यांनीं स्वतःकडे घेतलें.

एके दिवशीं नित्य क्रमाप्रमाणें महाराज देवीच्या दर्शनास गेले होते. बरोबर हरिभाऊ वगैरे मंडळी होती. दर्शन करून महाराज परतले, इतक्यांत देवीच्या दर्शनास आलेल्या एका म्हाताऱ्या मनुष्यानें देवीच्या देवालयांतील घंटा वाजवून ' जय जगदंब ' अशी गर्जना केली. तो शब्द कानावर पडतांच महाराज एकदम थांबले व " कोण ? बळवंत-राव मराठे आहेत काय ? " असें मोठ्यानें विचारलें. हें ऐकतांच " होय " असें साशंक वृत्तीनें उत्तर देऊन तो गृहस्थ महाराजांजवळ येऊन मोठ्या बुचकळ्यांत पडला. व आश्चर्यचकित् मुद्रेनें त्यांच्या-कडे पाहूं लागला.

इतक्यांत महाराज पुन्हां म्हणाले—" बळवंतराव तुम्ही माझी ओळख विसरलेत काय हो ? आई खुशाल आहेना ? " असें म्हणून महाराजांनीं त्यांच्या कानांत पुढील गोष्टी सांगितल्या:—" तेथल्या मंडळीपैकीं कांहीं मंडळी येथेंही आहे. जी मंडळी नेहमीं आपल्या बरोबर राहणारी आहे, ती कोणत्याही जन्मीं आपल्या जवळच राहील. जी नवीन मंडळी आपल्या धुनीपानीची नाहीं त्यांचा भाव बसाव-याचा नाहीं. "

ह्या खुणांवरून काठेवाडांतील जुंझवाडा येथें गुरु बेचरानंद महाराज म्हणून जे सत्पुरुष होते तेच या रूपानें येथें जन्मास आले आहेत, असा बळवंतरावांचा निश्चय झाला व त्यांचें मनही त्यांना असेंच सांगूं लागलें. या गृहस्थाचें नांव बळवंत पांडुरंग मराठे. यांचें वय सुमारें ६८ वर्षांचे असून त्यावेळीं उमरावतीस डेप्युटी कमिशनरच्या कचेरींत हे नकल नवीसीचें काम करीत होते. असो. वरील प्रकार बरोबरच्या मंडळीस कांहींच समजला नाहीं. लगेंच या गोष्टीची जिकडे तिकडे वार्ता पसरली. महाराज लवकरच मुळे मास्तरच्या घरीं परत आले.

यानंतर बळवंतराव मराठे हे फुरसतीच्या वेळीं महाराजांचें दर्शनास येत असत. व मंडळीच्या आग्रहावरून बेचरानंद महाराजांची माहिती थोडथोडी त्यांना सांगत असत. एके दिवशीं हें महाराजांनीं माडीवरून ऐकलें व बळवंतरावला हाक मारून या पुढें ही माहिती आपल्या आज्ञेवांचून कोणास सांगण्याची मनाई केली. पुढें मंडळीच्या अती आग्रहावरून कांहीं दिवसांनीं परवानगी दिली. ती माहिती अशी:—

गुजराथ प्रांतांत जुंझवाडा नांवाचे एक लहानसें संस्थान आहे. तेथें देवीच्या मंदिरांत बेचरानंद गुरुमहाराज म्हणून एक महात्मा पुरुष राहत होते. या देवीला तेथें राजसबाई माताजी असें नांव आहे. बेचरानंद महाराज औदीच जातीचे वासिष्ठ गोत्री ब्राह्मण होते. हे बाळपणापासून दोन्ही डोळ्यांनीं आंधळे असून उमर सुमारें ८० वर्षांची होती. यांना संस्कृत फार चांगलें येत असून सर्व वेदशास्त्रें मुखोद्गत होतीं. ही विद्या आपण काशीस शिकलों असें ते सांगत. शरीरकांती फार तेजःपुंज असून त्यांचे समोर बोलण्याची कोणाची छाती होत नसे. त्यांची कांहीं शिष्य मंडळी होती ती रात्रीं भजनास येत असे. भजनाचे प्रसंगीं महाराज नवीन पद्यें म्हणत. त्यांत श्रुतीपुराणांचा अर्थ गोवला असे. पद्यें लिहिणारा कोणी नव्हता. रात्रभर भजन, निरूपण, चर्चा, वगैरे दिवस निघेपर्यंत चालत असे. उजाडलें म्हणजे महाराज निजून राहात.

संभूराम ब्राह्मण, मल्लूजी भगत, वीरभगत कुणबी, हे महाराजांच्या मंडळींत प्रमुख असत. हा वीरभगत मोठा धनाढ्य असून त्याचा नातू महाराजांचा शिष्य होता. तो घरचें काम करून महाराजांचीही सेवा-चाकरी करीत असे. एक वेळ तो बिमार पडला व थोड्या दिवसांनीं आसन्नमरण झाला. त्याचा आजा वीरभगत हा महाराजांकडे येऊन घरीं चालण्याविषयीं विनंती करूं लागला. महाराज म्हणाले 'आयुष्याला उपाय नाहीं. मी येऊन काय करूं? जसे तुम्ही तसा मी.' तुमचा नातू पुढें उत्तम कुळांत जाईल. त्याची तुम्ही काळजी करूं नका. त्याला मुलगा आहेच. कांहीं दानधर्म करा. "धर्मेण हरते व्याधिः" वीरभगत घरीं गेल्यावर लवकरच त्यांचा नातू संपला. मग महाराजांची स्वारी गेली व त्यांचें शांतवन केलें.

जोमा नांवाचा महाराजांचा एक पट्टशिष्य होता. हाही औदीच ब्राह्मणच होता. हा नेहमीं मंदिरांतच महाराजांजवळ रहात असे. व स्वयंपाक वगैरे करून महाराजांना जेऊं घालीत असे. याचा स्वभाव फार तापट होता. कांहीं कारणावरून संतापला म्हणजे "तमारे करू हय तो करो, मारे थी थतु नथी" असें म्हणून दोन दोन दिवस स्वयंपाक करीत नसे. महाराजही "मर्जी तमारी" असें म्हणून जास्त न बोलतां दोन दोन दिवस तसेच राहात; दुसऱ्याच्या हातचें जेवीत नसत. मंदिरांत महाराजांजवळ दोन गाई होत्या व बसावयाची एक पांढरी घोडी सुमारें दीड पुरुष उंचीची होती. इतक्यांचा खर्च कसा चालत असे तें कोणास कळलें नाहीं. महाराज फार निरिच्छ असत. कोणी सिधा वगैरे आणल्यास कारणावांचून जास्त घेत नसत. फक्त जवारीचें पीठ व मीठमिरची बहुत करून घेत.

बहुतेक आठ दिवसांतून एक वेळ महाराज आपल्या पांढऱ्या घोडी-वर बसून बाहेर निघत. त्यावेळीं त्यांचें भव्य तेजःपुंज शरीर, घोडीच्या पायांपर्यंत पडलेल्या लांब जटा, कपाळभर कुंकवाचा मळवट व हातांत लोखंडाचा त्रिशूळ; असें ध्यान पाहून प्रत्यक्ष शंकरच आहेत असें वाटे. बाहेर निघाले म्हणजे लोक त्यांच्या पायां पडत. महाराज

इच्छेप्रमाणें गांवांत फिरत, गांवास प्रदक्षिणा घालीत किंवा एक मैलावर जंगलांत नळेश्वर म्हणून शंकराचें स्थान आहे तेथें दर्शनास जाऊन परत येत.

## बेचरानंद महाराजांचें पूर्ववृत्त.

सिद्धपूर ज्याला मातृगया म्हणतात, तेथून सुमारें ८ मैलांवर सिपूर-नामक गांवीं बेचरानंद महाराजांचा जन्म झाला. हे वयांत आल्यावर यांचे आईबाप लग्नाच्या गोष्टी करूं लागले. महाराज म्हणाले लग्न करूं नका.स्त्री फार दिवस वांचणार नाहीं.आईबाप आग्रह करूं लागले.महाराज म्हणाले तुमची आज्ञा मी मोडणार नाहीं.पण बायको मात्र वाचणार नाहीं हें खरें आहे. लग्न झालें. थोड्याच दिवसांनीं बायको मेली. दुसरें लग्न केलें. तीही मेली. याप्रमाणें तीन बायका मेल्यावर आईबापांनीं लग्नाचा नाद सोडला. नंतर महाराज काशीस गेले. व गंगेची कावड आणून मातापितरांस अभिषेक केला. नंतर त्यांनीं चारही धामच्या यात्रा केल्या व तेथून परत आल्यावर झुंझवाड्याजवळ नळेश्वराच्या जंगलांत बारा वर्षेपर्यंत निंब खाऊन तप केलें. पुढें पूर्वोक्त राजसबाई माताजीच्या मंदिरांत राहूं लागले. हे महाराज इ० स० १८७९ –८० च्या सुमारास आपल्या वयाच्या ८५ वें वर्षीं ब्रह्मी-भूत झाले.

बळवंतराव मराठे हे झुंझवाडा जेथें ६० रु० पगारावर इ० स० १८६४ ते ६७ पर्यंत तीन वर्षें पोष्ट मास्तरच्या कामावर होते. तेथें असतांना ते बेचरानंद महाराजांच्या दर्शनास जात असत. बळवंत-रावची पत्नीही कधीं कधीं महाराजांच्या दर्शनास जात असे. तिला मुलें वाचत नव्हतीं. एक मुलगा नुकताच झाला होता. तो तिनें महाराजांच्या पायांवर टाकला. महाराज म्हणाले थांब, हा मुलगा अल्पा-युषी आहे याला मरूं दे. दुसरा तुला चांगला मुलगा होईल. ती ऐकना. ती म्हणाली एवढा वाचूं द्या. पुढें न होवो. महाराज म्हणाले बरें. हा मुलगा कांहीं दिवस वाचेल पण मूढ होईल. तो मुलगा मूढ निघाला व

१६ वर्षांचा होऊन मरण पावला. पुन्हा बाई जेव्हां दर्शनास आली तेव्हां महाराज म्हणाले खबरदार, मी पूर्वीच तुला सांगितलें होतें. आतां दुसरा मुलगा मिळणार नाहीं. याप्रमाणें ही बळवंतरावांनीं सांगितलेली बेचरानंद महाराजांची हकीकत आहे.*

रा० रा० निळकंठ गडी काठीकर यांना चांदूरबाजार येथें आलेला महाराजांचा अनुभव मागें सिरसगांव प्रकरणांत आलेला आहे. या वेळीं त्यांना उमरावती येथें दुसरा अनुभव आला तोही त्यांच्याच शब्दांनीं येथें देतों:—

"पुढें कांहीं दिवसांनीं मी उमरावतीस बुटीचे दुकानीं बुधवार पेठेंत येऊन राहिलों. श्रीगुलाबराव महाराज मुळेमास्तरचे येथें उमरावतीस येऊन राहिले होते व प्रतिदिवशीं प्रात:काळीं बुटीचे दुकानावरून देवीचे दर्शनास जाण्याचा त्यांचा मामुल होता. एके दिवशीं ते जात

* ही माहिती लेखकानें स्वत: बळवंतरावला विचारून त्यांनीं सांगितली तशी वर नमूद केली आहे. "तेथल्यापैकीं कांहीं मंडळी येथेंही आहे" असें जें महाराजांनीं देवीच्या देवळांत म्हटलें, त्याचा खुलासा बळवंतरावला विचारला असतां ते म्हणाले:—वीरभगतचा नातू जो मरण पावला व जो पुढें उत्तम कुळांत जाणार आहे म्हणून बेचरानंद महाराज बोलले होते तो हरिभाऊ केवले असावा व जोमा म्हणून जो पट्टशिष्य होता तीच महाराजांची पत्नि सौ० मनकरणिका आई असावी. कारण "माझा हा तापट स्वभाव जाण्याकरितां पुढील जन्मीं मी तुमची पत्नीच झालों पाहिजे" असें जोमा बेचरानंद महाराजांस कधीं कधीं म्हणत असे. जुंझवाड्याचे बेचरानंदमहाराज तेच हे गुलाबराव-महाराज होत हा निश्चय तुम्ही कशावरून करतां? असें विचारलें असतां "तसें मला वाटतें म्हणून" असें बळवंतराव म्हणाले. मनोवृत्तीवरून पूर्वजन्मसंबंध कळतो याविषयीं "अहेतुः पक्षपातो यस्तस्य नास्ति प्रतिक्रिया ।. सहि स्नेहात्मकस्तंतुरंतर्भूतानि सीव्यति ॥" इ० वचनें प्रमाण आहेत. आपला पूर्वजन्म काठेवाडांत होता व आपण ब्राह्मण होतो, व हरिभाऊ त्या जन्मीं आपल्याकडे येत असत इ० माहिती प्रसंगविशेषीं महाराजांच्या बोलण्यांतही आलेली आहे.

असतां माझा परिचित् शब्द ऐकून त्यांनीं हाक मारली, तेव्हां त्यांना मी दुकानीं बोलाविलें. समागमे त्यांचें कुटुंब श्रीमती सौ० मनकरणिकाबाई व कांहीं मंडळी होती. त्यांना स्वागतपूर्वक बसविल्यावर तेथें सुंदरविलास नांवाचें मी वाचित असलेलें पुस्तक पडलें होतें. तें त्यांनीं घेऊन मला कांहीं कांहीं वेंचे वाचण्यास सांगितलें. ते मी वांचून दाखवितांच एकपाठ्याप्रमाणें तितकेही छंद त्यांनीं तोंडपाठ म्हटले व सर्व मंडळीस सानंद चकित् केलें. पुढें त्यांनीं सुंदरविलासाचीं कांहीं पानें उघडून त्यांवर हात फिरविला व पुस्तक माझे हातीं देऊन हात फिरविलेले वेंचे सर्व तोंडपाठ म्हटले.

नंतर त्या रात्रीं महाराजांस मी फराळास बुटीचे दुकानीं बोलाविलें व पंक्तीला जैरामशास्त्री कारंजकर व बरीचशी मंडळी होती. पंक्तींत संस्कृत श्लोक शास्त्री म्हणूं लागले व तत्क्षणीं त्या श्लोकांचें भाषांतर त्याच वृत्तांत महाराजही म्हणूं लागले व पुढें त्यांचेच कृपाप्रसादें श्रीमती मनकरणिकाबाईनें कांहीं श्लोकांचें भाषांतर मूळ वृत्तांत म्हटलें. दोघांचाही आवाज अति मधुर व मनोहर होता."

पुढें याच सुमारास ( फाल्गुनशुद्धांत ) वऱ्हाडांतील परलोकवासी सुप्रसिद्ध प्रेमळ हरिदास ह० भ० प० कृष्णबोवा पातुरकर यांची व महाराजांची भेट होऊन परिचय जुळला. व परस्पर एकमेकांच्या भेटीस जाणें येणें होऊं लागलें. महाराजांच्या निरूपणास कृष्णबोवा अत्यंत लुब्ध झाले होते. एके दिवशीं महाराजांनीं पातुरकरांच्या घरीं ज्ञानेश्वरीचें निरूपण सांगितलें, त्यांत सबंध ज्योतिषशास्त्राचा विषय आला होता. पातुरकरांचीं कीर्तनें भाजीबाजारांतील मुरलीधराच्या मंदिरांत होत असत. ते वेळीं महाराजांस ते आग्रहपूर्वक पाचारण करीत. महाराजांसही त्यांच्या कीर्तनापासून मोठा आनंद होत असे. परंतु एके दिवशीं पातुरकरांचें कीर्तन एका प्रसिद्ध वकिलांचे येथें झालें. कीर्तन समयीं बोलावणें आलें असतां महाराज गेले. ते वेळीं कांहीं श्रोते मंडळी वस्त्रांत हात घालून सलज्ज नामस्मरण करीत होती. ही कथाकालींची अमर्यादा पाहून मात्र महाराज रागावले, व भगवन्नामस्मरण करण्यासही

त्यांना लाज वाटते अशांच्या येथें कीर्तन कशाला केलें! असें म्हणून तेथून परत आले. असो.

याच सुमारास मुरलीधराच्या मंदिरांत आर्वीचे प्रसिद्ध सत्पुरुष दामोदर आपाजी महाराज वृंदावनची वारी करून आले होते. त्यांची व महाराजांची भेट होतांच " माझा श्रीकृष्ण मला आज प्रत्यक्ष भेटला. " असे उद्गार काढून आपाजी महाराज श्रीगुलाबराव महाराजांस कडकडून भेटले व त्यांच्या नेत्रांतून प्रेमाश्रू वाहूं लागले. आपाजी महाराज तेथें असतांना कधीं कधीं परस्परांचें हितगूज एकांतांत होत असे. मुरलीधराचे पुजारी वेद० गणेशभट जोशी नाशिककर म्हणून आहेत; हे आपाजी महाराजांचे शिष्य आहेत. त्यांनीं एके दिवशीं आढून कांहीं गोष्टी ऐकल्या. त्यांत पुढील गोष्ट आपाजी महाराजांनीं श्रीगुलाबराव महाराजांस सांगितलीः—आपाजी महाराज म्हणाले, एकदां मी वृंदावनास असतांना राधेच्या मंदिरासमोर सभामंडपांत निजलों होता. राधेच्या पुजाऱ्याला राधेचा साक्षात्कार होता. ते दिवशीं दोन प्रहर रात्रीं राधेच्या मंदिरांत लख्ख प्रकाश दिसला. व पुढीलप्रमाणें राधा पुजाऱ्याशीं बोलत होतीः— " बेटा ऐसा नहीं करना भला. जो मै हूं सोही ललिता और बिशाखा है. भिन्नभाव नहीं समझना. " इत्यादि शब्द मोठ्या प्रेमानें व लडिवाळपणाणें राधा पुजाऱ्याला बोलत होती. याचा पूर्वसंबंध असा होता कीं ते दिवशीं पूजेच्या वेळीं ललिता व विशाखा यांना कपडे नेसवीत असतांना ते मधून मधून विसकटूं लागले व पुजाऱ्याला घरच्या कांहीं कामामुळें घाई झाली होती म्हणून संतापाच्या भरांत " मैं राधिका का पुजारी हूं, तुम्हारा नहीं तुम मेरेकूं काहेकू सताती है? " असें म्हणून त्यानें विशाखाचा गा[illegible] घेतला होता. याप्रमाणें आपाजी महाराजां सारखे सत्पुरुष आपले [illegible] महाराजांना मोठ्या प्रेमानें सांगतात व आपली उपास्यदेवता समजून लीन होतात हें पाहून गणेशभट पुजारी व इतर मंडळी यांना महाराज हे कोणी अवतारी पुरुष असावेत असें वाटून विशेष आदर उत्पन्न झाला व उत्तरोत्तर महाराजांची कीर्ति वाढत चालली.

नूतन सहवासी मंडळीला तर महाराज, त्यांचा साधा खेळवळ पोशाख, बालवेष, शुकाचार्याप्रमाणें कुरळ केस, गोड स्वभाव, खेळकरपणा, संतोषवृत्ति, अद्वितीय बुद्धिमत्ता, मधुर सामगायन, विनयसौजन्यादि शीलसंपत्ति, उत्कृष्ट व्यवहार नैपुण्य इत्याद्यनेक सद्गुणांमुळें सुहृद्; अभिनव शब्दसौष्टव व वेदार्थ सागरांतून समर्पक वाक्यरत्नें निवडून काढण्याच्या प्राविण्यामुळें आप्त व अलौकिक भगवत्प्रेमामुळें आपले उद्धारक सद्गुरु वाटूं लागले. ओवीबद्ध अध्याय, अमृतानुभव, ज्ञानेश्वरी इत्यादि निरूपणांचा महाराजही मेघवृष्टिन्यायानें वर्षाव करूं लागले. निरूपण प्रसंगीं सर्व शास्त्रपुराणवचनांचा समन्वय करण्याचें महाराजांचे चातुर्य, निरनिराळ्या ग्रंथांतील व पुराणादिकांतील प्रमाणवचनें व पृष्ठश्लोकनिर्देशपूर्वक त्यांची पत्तेसूद माहिती, ओवीबद्ध निरूपणाचे शेवटीं ओव्यांची एकंदर संख्याकथनपद्धति, अविद्यासंभूत असंख्य शंका उत्थापन करून त्यांचें समाधान, भिन्न भिन्न पंथ, धर्ममतें, व मतवादी यांच्या विचारांचें दिग्दर्शन व समीक्षा; इत्यादि कडीबंद प्रतिपादनशैली पाहून त्या श्रवणानंदानें ही मंडळी विदेही बनली; जेवणखाण, झोंप, वस्त्रप्रावरण या आवश्यक गोष्टीही त्यांना रुचेनाशा झाल्या व त्यांच्या सर्व चित्तवृत्ती महाराजांकडे लागून राहिल्या. मंडळीच्या आग्रहावरून लवकरच ज्ञानेश्वरीच्या निरूपणास पहिल्या अध्यायाच्या पहिल्या ओवींपासून आरंभ झाला. 'ॐ नमोजी आद्या' व 'देवा तूंचि गणेश' या दोन ओव्या निरूपण झाल्यानंतर "आतां वाच्यवाचका । अभेदू लाहे नेटका । नामरूपें टका । तूतें झाला ॥" या तिसऱ्या ओवीच्या निरूपणास आरंभ झाला. ही ओवी उपलब्ध प्रतींत नाहीं. [illegible]तु भावार्थ—दीपिका हा ग्रंथ एकंदर १०००० असून सांप्रत ९०[illegible] च उपलब्ध ठेवला आहे, असें महाराज म्हणाले. नारद[illegible]सूत्रेंहीं अशींच थोडीं उपलब्ध आहेत, असें महाराज एक दोनदां बोलले होते. असो.

याप्रमाणें हा निरूपणानंद फाल्गुन वद्य दशमी एकादशीपर्यंत चालल्यावर पुढें रामनवमीच्या उत्सवाकरितां रा० रा० रामकृष्णपंत मोटे

ज्ञा० क० प० पृ० १३४.



तूं बाळ ऐसा वर्तसी। परी बाळबुद्धि नाहीं तुजपाशीं।
सर्वज्ञ सर्वथा होशी। ऐसें आम्हांसी दिसतसे ॥ १ ॥.

**एकनाथी भागवत ७-२८.**

यांजकडून महाराजांस आग्रहानें कारंजांस पाचारण झाल्यावरून कांहीं मंडळीसह महाराज कारंजास गेले.

---

श्रीज्ञानेश्वर माउली समर्थ.

शके १८२६ क्रोधीनाम संवत्सरे. इ० स० १९०४–०५.

कारंजा येथें घडलेल्या मुख्य गोष्टीः—

१. महाराज लक्ष्मणराव दहीहांडेकरांचे घरीं बंगळीवर बसले असतांना तेथें सुमारे ५।६ चिमटावाले बैरागी आले. महाराजांस पाहून एकजण आपसांत बोलला " यह महात्मा यहां कैसे आये ? " दुसरा म्हणाला " महात्मा लोग अपने इच्छासे चाहे वहां संचार करते है " ही त्यांची आपसांत कुजबुज चालली असतां महाराजांनीं रामकृष्णपंतास एकदम हाकमारून म्हटलें, यांना चांगला सिधा देऊन जाऊं द्या. रामकृष्णपंतांनीं त्यांस आटा, तूप साखरीचा सिधा दिल्यावर महाराज त्या बैराग्यांस म्हणाले " तुम यहांसे एकदम चले जाव. बहोत बातचित् मत करो. " हें ऐकतांच ते बैरागी चुपचाप चालते झाले. त्यांच्या मागें मंडळीपैकीं एकानें जाऊन चवकशी केली असतां त्यांनीं सांगितलें कीं हे महाराज आमच्या गुरूचे गुरु असून यांना आम्ही चाळीस वर्षांपूर्वीं पाहिलें आहे. त्या बैराग्यांपैकीं कांहीं ६०।७० वर्षांचे होते. पुढें महाराजांस या संबंधानें विचारलें असतां यांची व माझी भेट नर्मदाप्रदक्षिणेचे वेळीं झाली होती, एवढेंच त्यांनीं सांगितलें.

२. त्या वेळीं मोहरमचे दिवस होते. महाराजांनीं दिवसां कांहीं वेळपर्यंत एका मडक्यास घागऱ्या बांधून त्याच्या तालावर मुसलमानी भाषेंत मर्से म्हणत बसावें. ते फार गोड सुस्वर वाटत व ते ऐकण्यास पुष्कळ मुसलमान मंडळी जमा होत असे.

३. कारंजास एक गरीब भट्टजी राहत असतात. ते भिक्षा मागून उदर निर्वाह करीत असतात. त्यांनीं एके दिवशीं महाराजांच्या दर्शनास येऊन विनंती केली कीं मज गरीबाच्या येथें येऊन आपण भाजीभाकर ग्रहण करतील. महाराजांनीं त्यांना उदईक भाजीभाकर तयार

ठेवण्यास सांगितलें. तेच दिवशीं कारंजा येथील प्रसिद्ध श्रीमान् गृहस्थ रा. रा. रामजी कान्नव यांच्याकडून भोजनास बोलाविण्यास रामकृष्णपंत महाराजांकडे आले. महाराज म्हणाले मी भोजनास उद्ईक येईन परंतु मी मागेन तो पदार्थ तयार असला पाहिजे. त्यांनीं बरें म्हणून पंचपक्वान्नांची तयारी करविली. भोजनाचे वेळीं महाराज म्हणाले भाकर पाहिजे. ती तयार नव्हती. इकडे भट्टजी येऊन बसलेच होते. त्यांस महाराज म्हणाले तुम्ही आपल्या घरची भाजीभाकर घेऊन या. भट्टजी मोठ्या संतोषानें ती घेऊन आले. हे भट्टजी आतां चांगल्या स्थितींत आहेत म्हणून ऐकतों.

४. महाराजांचा आवडता भक्त माभान येथील रामचंद्रबापू यांस महाराजांनीं मृत्यूचा दिवस सांगून मृत्युपत्र करून दिलें होतें वगैरे माहिती मागें सिरसगांव प्रकरणांत आलीच आहे. कारंजास एके दिवशीं बंगळीवर बसून महाराज आपल्याशींच पुढीलप्रमाणें बोलले:—

" सर्पयोनी घे. सरस्वतीच्या तीरीं जा. तेथें सौभरी ऋषी आहेत त्यांचा मंत्र घे. " इत्यादि भाषण त्यांचें सरासरी पंधरा मिनिटेंपर्यंत चाललें होतें. तेथून एक दोन दिवसांनींच रामचंद्र बापूची निधन वार्ता महाराजांस पत्रद्वारें कळली. बापू चैत्र शु० ११ रविवारीं ता० २७ मार्च १९०४ रोजीं संपले. पत्र पावतांच महाराजांनीं महाभारत काढून भीष्माचार्यांच्या निर्याण कालाचे, उत्तरायण, शुक्लपक्ष, अरुणोदय, निर्धूम, प्राणनिरोध, शांत असणें इत्यादि योग जुळवून पाहिले ते सगळे बरोबर जुळून शिवाय रविवारचा योग बापूस विशेष मिळाला. भावी मृत्यूची वार्ता रामचंद्र बापूंनींही आपल्या आप्तेष्ट मंडळीस आठ दिवसांपूर्वीं कळविली होती. मुलास संस्कृत शिकविणें, श्रीमहाराजांस एका तिफनची जमीन अर्पण करणें, व एक गाय देणें वगैरे व्यवस्थाही त्यांनीं मरण समयीं सांगून ठेविली होती. माभान येथें महाराजांस राहण्याकरितां एका कायमच्या मकानाची व्यवस्था करण्याच्या हेतूनें

रामचंद्र बापू त्या उद्योगास लागले होते परंतु त्यांच्या मृत्यूमुळें तें काम अपुरें राहिलें.

याप्रमाणें निःशेष स्वार्थत्यागानें, कडकडीत वैराग्यानें, निष्कपट प्रेमानें व निर्विकार शांत वृत्तीनें सद्गुरु सेवा करून योग्यालाही दुर्लभ असें मधुर-फल रामचंद्र बापूनें मिळविलें व आपलें उदाहरण मोहोड वंशाला भूषण व पुढील शिष्य मंडळीला अनुकरणीय करून ठेविलें.

महाराज कारंजा येथें सुमारें तीन आठवडे राहून चैत्रवद्यांत उमराव-तीस परत आले.

येथून महाराजांच्या माधुर्यामृत सागरास पूर्ण भरती येऊन विविध शास्त्रांच्या रहस्यमय निरूपणांचा वर्षाव होऊं लागला व भक्तिपदतीर्था-मृतादि ग्रंथ जगदुद्धारार्थ निर्माण होऊं लागले. भक्तिपदतीर्थामृत हा महाराजांचा आद्य प्रकरण ग्रंथ असून त्यांत महावाक्याच्या रीतीनें भक्तिचें सुंदर प्रतिपादन केलेलें आहे. ज्ञानेश्वरीचें निरूपण पुन्हां सुरू झालें. कपिलगीता, अमृतानुभव, भगवद्गीता, हरिपाठ, यांजवरील निरू-पणेंही चालू लागलीं. सौ० मनकरणिका आईबरोबर गोड व नवीं नवीं गाणीं म्हणणें, भजन समयींची अंतःस्फूर्तीची कविता व आख्यानें, नानाप्रकारचे खेळ, बाळलीला, व हास्यविनोद हा तर महा-राजांचा जविनक्रम व सहवासी मंडळीचा नित्य नवा आनंद होता.

निरूपणाच्या ओघांत निरनिराळ्या किती प्रकारच्या विषयांवर नवीन

---

१ उदाहरणार्थ कांहीं विषयांचीं नांवें:—

पुराणाचे तीन भाग कोणते? पुराणें गुरुरूप व भक्तिरूप कशीं? पुराणें वाचतांना लक्ष्यांत ठेवण्यासारख्या गोष्टी, वेद हें आप्त कसे? नित्यानुभूती, संभूती, परार्थगा, व रंजकी अशा चार प्रकारच्या कथा व त्यांचीं लक्षणें, भगवद्गीता ही नवीन उपनिषद आहे असें शंकराचार्यांचें म्हणणें, भगवद्गीतेंत आहेत परंतु कोणत्याही उपनिषदांत नाहींत अशा गोष्टी. योग, ज्ञान, भक्ति, इ० विषयांच्या क्रमानें गीतेच्या अध्यायांचा वाचनक्रम, आसुरी निश्चय व दैवी निश्चय, चांद्रायणादि व्रतांची सार्थकता, ज्ञानेश्वरी अध्याय वाचनक्रम, ने

नवीन माहिती येत असे याची कल्पना इतरांस होणें शक्य नाहीं. परंतु निरूपण आटल्यावर, झालेल्या निरूपणांच्या प्रतिज्ञा संक्षेपतः स्वतःच

---

श्वरीच्या कोणत्या अध्यायानें वाचकाच्या मनावर काय परिणाम होतो? जीवाला मुक्तीपेक्षां भक्ति श्रेष्ठ कां? भगवद्भक्तांना जन्ममरण मोक्षरूप केव्हां होतें? भगवद्भक्तीवांचून असंप्रज्ञात योगाचें वैय्यर्थ्य, नामस्मरणानें पंचक्लेश निवृत्ति, कोणत्या वृत्तीनें काय साध्य होतें? मनाच्या जड व सूक्ष्म भागाचा परिणाम, भक्त व योगी यांच्यांतील फरक, सन्निंदा व स्तुति यांचें रहस्य, नारदांच्या कळी लावण्याचें रहस्य, बुद्ध व थिऑसफिस्ट हे आसुरी मार्ग कसें? 'एसोटेरिक प्रिंसिपल्स आफ थिऑसफी' या पुस्तकामधील कांहीं व्यंगें व तीं बुद्धांचीं तत्वें आहेत याविषयीं निरूपण, भगवान् बुद्ध वंदनीय व बौद्ध त्याज्य कां? बौद्धमतांचे प्रकार, त्यांची समीक्षा व खंडण; स्वप्नाच्या असत्यत्वाची सिद्धि, स्वप्नांत महात्म्यांचें दर्शन होतें हें थिऑसफिस्टांचें म्हणणें खोटें, वैद्य-शास्त्रांतील स्वप्नाध्यायांतर्गत शुभाशुभ फलें व ज्योतिषशास्त्रांतील नवग्रहादि दानहोमादिकांचें समर्थन, कँट मतखंडनार्थ प्रश्नोत्तरें, ऋषीप्रणीत मार्ग हाच शुद्ध व दैवीमार्ग कसा? सद्गुरूच्या उपदेशवृष्टीचा मेघवृष्टीपेक्षां चांगला परिणाम, सद्गुरुस्मरण कसें ठेवावें? सद्गुरुस्मरणानें संकटनाश व विषयपरावर्तन, वियोग-भक्ति व सेवेचें फळ, चिंतनाचें फळ, साधनें व प्राप्य वस्तु, गुरुकृपेनें साधनां-शिवाय जर प्राप्तव्य वस्तु मिळण्याचीं चिन्हें असलीं तर खऱ्या मुमुक्षूनें साध-नांची इच्छा न करण्यांतच त्याचें खरें कल्याण आहे याविषयीं, गुरुवाक्यानें भक्तीची सिद्धि, मननाचे भयंकर क्लेश व ते न होऊं देण्याविषयीं सद्गुरु काय करतात? संचित, क्रियमाण व प्रारब्ध कशा कशानें दग्ध होतात? चित्तशुद्धि म्हणजे काय? सत्वगुणच मोहादिकांमुळें रजस्तम कसा होतो? दैवादि चार वाद आत्मनाशाला कारण कसे होतात? निश्चयात्मिका बुद्धीनें मोह कसा जातो? कोणत्या दृष्टीच्या मनुष्याला कोणता उपदेश करावा? नुसत वितंडवादी असेल त्याच्याशीं कसें वागावें? पामर किंवा बद्ध यांस उन्नत कसें करावें? जिज्ञासूंना व मुमुक्षूंना उन्नत कसें करावें? भगवद्भक्तिलक्षण, नेत्रसिद्धांत, अश्रूंमध्यें अस्ति, भाति, प्रिय कसे प्रगट होतात? इ० इ०.

महाराज सांगत असत. त्यांचा संग्रह रा० रा० वासुदेवरावमुळे यांनीं मोठ्या प्रेमानें करून ठेवला आहे. त्यावरून त्यावेळच्या निरूपणांची कांहींशी कल्पना होते. त्यांतून एक 'पुनर्जन्म' विषयक निरूपण येथें देतो. हा विषय अमृतानुभव निरूपण प्रसंगीं ता० १६।७।१९०४ व १८।७१९०४ रोजीं झालेला आहे. तो येणेप्रमाणें:—

खालीं लिहिलेल्या तीन गोष्टींनीं पुनर्जन्मसिध्दि होते:—१ जातिस्मरानें, २ सुखदुःखानें, ३ मौक्तिकोपनिषदानें.

१. दहरोपासनेनें आपण पूर्वीं कोण होतो हें कळतें व स्मरतें. व ह्या जातिस्मरानें मागील जन्म दहरोपासनद्वारें प्रत्यक्ष होतात.

२. सुखदुःखानें अनुमान प्रमाणद्वारा पुनर्जन्म सामान्यतः दृष्ट होतो. "झाड ओळखिजे फुलें। मानस ओळखिजे बोलें। सुखदुःखें जाणिजे केलें। पूर्वजन्मींचें ॥" ज्ञानेश्वरी.

३. मौक्तिकोपनिषदानें (शद्वप्रमाणानें किंवा आप्तवाक्यानें) पुढल्या मागल्या जन्माचें अनुमान प्रतीत होतें. विमूढाला किंवा नास्तिकाला आत्म्याच्या आस्तित्वाविषयीं सामान्यतो दृष्ट अनुमान आहे. म्हणजे मूर्खाला किंवा नास्तिकाला देखील 'आत्मा आहे' 'आत्म्याचें अस्तित्व आहे' हें सामान्यतः दृष्टीनें अनुमान कांढतां येतें. (या ठिकाणीं महाराजांनीं सामायिकाभाव, प्रागभाव, प्रध्वंसाभाव, अत्यंताभाव, अन्योन्याभाव इ० न्यायघटित अभावांचें विवरण करून, यांतून कोणत्याच प्रकारानें आत्म्याचा अभाव सिद्ध होत नाहीं असें सोदाहरण सिद्ध केलें आहे व ह्या तर्कांचा उपयोग शास्त्रसिद्धांत समजण्याकरितां कसा करावा हें सांगून शेवटीं आत्म्याचें अस्तित्व सामान्यतोदृष्ट अनुमानानेंच काढतां येतें हें सिद्ध केलें आहे.)

चैतन्य हें शुक्रशोणिताच्या संयोगाचा परिणाम नाहीं. म्हणजे पूर्वीं नसलेला पदार्थ अस्तित्वांत येत नाहीं तर असलेलाच पदार्थ अस्तित्वांत येतो हें सामान्यतोदृष्ट अनुमानाचें लक्षण आहे.

---

१. शेषवत् अनुमानः—कार्यावरून कारणाचें अनुमान करणें. पूर्ववत् अनुमानः—कारणावरून कार्याचें अनुमान करणें. सामान्यतः अनुमानः—आत्म्याचें अस्तित्व.

1st premiss. अप्रयत्न सुखदुःख संभवत नाहीं हा निर्णय, 2nd premiss आपणाला सुखदुःखें होतात. Inference म्हणून पूर्वी किंवा पूर्वजन्मीं प्रयत्न झाला असला पाहिजे. पुत्रोत्पत्ति मैथुनाशिवाय संभवत नाहीं हा निर्णय. सत्रावीच्या अमृतानें योगियांस पुत्र होतो ही गोष्ट निराळी. संयमादिक योगानें हें सिद्ध झालें कीं सूर्यादि रश्मीच्या ठायीं तो आत्मा जातो. तो कसा जातो हें मानण्याला शद्बप्रमाण (आप्तवाक्य--आगम) फार उपयोगी आहे. व हें शद्बप्रमाण फार बलवत्तर आहे. जे गेले आहेत त्यांचा हा अनुभव सिद्धांत आहे. त्यांनीं हें प्रत्यक्ष पाहिलें आहे. प्रत्यक्षाला व्याप्तीचें काम नाहीं. अप्रत्यक्षालाच व्याप्ति पाहिजे.

शद्बप्रमाण बलवत्तर असल्यानें आपणाला ऐतिह्य मानलें पाहिजे. व पुराणें ऐतिह्य असल्यानें तीं आपणाला मानलींच पाहिजेत. म्हणून पुराणें कल्पना किंवा कादंबरी नव्हत. कल्पनेंत परंपरा नसते. पुराणांत परंपरा आहे व ह्याचा परंपराद्वारा अनुभव येतो. पुराणांत सांगितलेल्या गोष्टी एकानेंच पाहिल्या नाहींत; त्या कित्येक भगवद्भक्तांनीं प्रत्यक्ष पाहिल्या आहेत व अझूनही दृष्टीस पडतात व त्यांनीं ज्या कांहीं भगवल्लीला डोळ्यांनीं पाहिल्या आहेत त्यांत यत्किंचितही फरक पडलेला दृष्टीस आला नाहीं. प्रत्येकाला भगवल्लीलेचा एकसारखा अनुभव येतो. "तं गच्छ त्वं ध्यानयोगेन." म्हणून पुराणांवर आक्षेप येऊं शकत नाहीं. पुराणावर आक्षेप आणणारे बहुतकरून प्रत्यक्षवादी असतात- एकवेळ ईश्वर नाहीं म्हटलें असतां चालेल. परंतु पुराणें नाहीं म्हटल्यानें सर्व जगच बुडेल. एक वेळ अनुमान चुकेल (पारकीय जडवादियांत ज्या निरनिराळ्या थिअरीज Theories काढल्या जात आहेत व दुसऱ्या दिवशीं खोडल्या जात आहेत त्यावरून हें चांगलेंच स्पष्ट होतें) परंतु शद्बप्रमाण चुकणार नाहीं. अर्थात आगम--आप्तवचन--अनुमानापेक्षांही बलवत्तर आहे. व वेद, गुरु हे आपले आप्त होत. म्हणून ह्या आप्तांवर आपणांला श्रद्धा ठेविलीच पाहिजे. व ह्या आप्तांवरच ठेवलेली श्रद्धा आंधळी नसून सकारण व सप्रमाण आहे.

हेंही ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं शद्बप्रमाण (गुरु वेद प्रामाण्यात्) हें अनुमानापेक्षां बलवत्तर आहे एवढेंच नव्हे, तर तें प्रत्यक्ष प्रमाणापेक्षां देखील बलवत्तर आहे. ह्या गोष्टीचा चांगला बारीक विचार केला असतां तेव्हांच लक्ष्यांत

येईल, व ह्या गोष्टीचा आपण चांगला विचार केला नाहीं, म्हणूनच आपण आपलीं पोथी पुराणें झुगारून देण्यास तयार झालों आहोंत. आपल्या लोकांत चमत्कार दिसून येतो तो हाच कीं आपण ज्ञानदेव, तुकाराम, रामदास, एकनाथ, मोरोपंत ह्या सर्वांना मोठा मान देतो, साधु समजतो, अनुकरणीय समजतो, त्यांचे ग्रंथ वाचतो, परंतु त्यांच्या शद्वावर आपला विश्वास नाहींसा झाला आहे. ह्याचा अर्थ काय ? त्यांना मानणें न मानणें सारखेंच.

जातिस्मरानें बालावचारीं दहराकाशांत मागचे पुढचे जन्म दिसतात. सारांश, जन्म प्रत्यक्ष होतो. अर्थात दहराकाशांत. हें दहरज्ञान नाहींसें झाल्यामुळेंच सर्व योग ( लययोग ) नष्ट झाला. कारण शद्बप्रमाणश्रद्धा नाहींशी झाली म्हणून. " सकालेनेह महता योगो नष्टः परंतप "—भगवद्गीता—

म्हणून शद्बप्रमाणप्राबल्य व वेदाचें ईश्वरप्रणितत्व ह्या दोन गोष्टी चांगल्या मनावर वठल्या पाहिजेत. जीव जीवाला वेद सांगणारा आहे असें म्हटल्यास त्यामागल्या प्रत्येक जीवास कोणी तरी वेद ( ज्ञान ) सांगणारा असला पाहिजे. पण तसा प्रकार नाहीं. म्हणून परमेश्वरच वेदाचा कर्ता आहे; म्हणजे वेद अपौरुषेय होत.

ता० १८।७।०४.

नत्वा ज्ञानेश्वरं देवं सद्गुरुम् परमेश्वरम् ।
अमृतानुभवस्यास्य कुर्वे व्याख्या समासतः ॥

काल त्रिविध प्रमाणांनीं पुनर्जन्मसिद्धि झाली. पुनर्जन्माला आधारभूत तीन तत्वें आहेत तीं हीं:—

१ आचरण २ अदृष्ट व ३ वासना. या जन्मीं केलेले धर्माधर्म तें आचरण. केलेल्या धर्माधर्मानुसार वृत्ति ती वासना. देवतानुग्रहानुग्रह हें अदृष्ट.

सर्वांचीं सर्व सत्रा तत्वें मिळून झालेला तो सूक्ष्म देह होय. अपंचीकृत पंचमहाभूतांपासून झालेलें, सुखदुःखादि भोगांचें साधन व पंचज्ञानेंद्रियें, पंचकर्में-

| १ पंचज्ञानेंद्रियें. | देवता | विषय. |
|---|---|---|
| श्रोत्र=कान ... ... | दिशा ... ... | शद्ब ऐकणें. |
| त्वक्=चर्म ... ... | वायु ... ... | स्पर्श समजणें. |

द्रियें, पंचप्राण, मन व बुद्धि अशा सत्रा तत्वांसह राहणारें तें सूक्ष्म शरीर होय. याचा अभिमानी आत्मा तैजस म्हणविला जातो.

सूक्ष्म शरीराचें रक्षण त्या त्या लोकीं देवता करतात. अर्थात वर निर्दिष्ट केलेल्या देवता अपंचीकृत सूक्ष्म शरीराचें रक्षण करतात.

पदार्थाला अधिभूत म्हणतात. पदार्थाचें चालकत्व ज्याकडे आहे ती अधिदेवता. व पदार्थाचें भोक्तृत्व ज्याकडे आहे तें अध्यात्म. नेत्र तेजाचे अध्यात्म होय. रूप पहाणें तेजाचें अधिभूत व सूर्य तेजाचें अधिदैवत होय.

---

| | | |
|---|---|---|
| नेत्र=डोळे ... ... | सूर्य ... ... | रूप पहाणें. |
| जिव्हा-जीभ=रसना ... | वरुण ... ... | रस ग्रहण करणें. |
| घ्राण=नासिका ... | अश्विनीकुमार ... | वास घेणें. |

हीं १७ तत्वें मिळून झालेला सूक्ष्म देह एकेच ठायीं जातो.

| पंचकर्मेंद्रियें | देवता | विषय. |
|---|---|---|
| वाणी=वाचा ... | अग्नि ... ... | भाषण करणें. |
| हात ... ... | इंद्र ... ... | वस्तु ग्रहण करणें. |
| पाय ... ... | विष्णु ... ... | चालणें. |
| पायू (गुदद्वार) ... | यमराज ... ... | मलत्याग करणें. |
| उपस्थ (लिंग) ... | प्रजापति ... ... | विषयानंद अनुभवणें. |

### अंत:करण चतुष्टय.

| | | |
|---|---|---|
| मन ... ... | चंद्रमा ... ... | संकल्प विकल्प करणें. |
| बुद्धि ... ... | ब्रह्मा | अमुक करावेंच हा निश्चय करणें. |
| अहंकार ... ... | रुद्र | अमुक गोष्ट करणारा मीच एक आहे असा अभिमान धरणे. |
| चित्त ... ... | वासुदेव | सर्व वस्तूंचें चिंतन किंवा वासनारूप स्मरण करणें. |

पंचप्राणः—१ प्राण २ अपान ३ व्यान ४ उदान ५ समान. *cf* श्लोक.—

हृदिप्राणो गुदेऽपानः समानो नाभिसंस्थितः। उदानः कंठदेशस्थो व्यानः सर्व शरीरगः ॥ १ ॥

कर्मभोग संपतपर्यंत सूर्य नेत्रास सोडीत नाहीं. तद्वतच, कर्मभोग संपतपर्यंत कर्मभोग देहास सोडीत नाहीं. अधिभूत हें अध्यात्माचें रक्षण करतें. सूक्ष्म शरीराच्या देवता सूक्ष्म शरीराचे वायुसहित प्राण रक्षण करतात. प्राणगती विषयीं विचारः—

वायु ही प्राणाची वृत्ति आहे हें वेदान्तमत आहे व प्राण हे वायुकार्य आहे असें नैय्यायिक म्हणतात. या दोहोंपैकीं वेदान्तमतच बरोबर आहे. न्यायाला दृष्ट प्रत्यक्षता आहे. न्याय खंडन करण्याच्या तीन पद्धतिः—

जिज्ञासा दृष्टीनें:—त्याचेंच त्यानें खंडन करणें हा कनिष्ट पक्ष. अन्यदोष आणून दुसऱ्याचें मत खंडन करणें हा मध्यमपक्ष व स्वसिद्धांत प्रतिपादन करून अन्य मत खंडन करणें हा उत्तमपक्ष. तर्कदृष्टीनें— त्याचेंच त्यानें खंडन करणें हा उत्तमपक्ष. अन्यदोष आणून दुसऱ्याचें मत खंडन करणें हा मध्यमपक्ष व स्वसिध्दांत प्रतिपादन करून अन्यमत खंडन करणें हा कनिष्टपक्ष.

न्यायांत वायूला प्राण मानलें आहे याचें खंडन संक्षेपानें खालीं दिलें आहेः—

नैय्यायिक म्हणतात कीं वायु ही वरखालीं येणारी गति आहे. प्रतिपक्षी— तर मग ही गती समवाय संबंधानें रहाते कीं काय? व रहात असेल तर बाह्यवायु प्राणसमवाय झाला कीं काय? व असें असेल तर मग ती गती दिसायला पाहिजे होती. निर्णय—म्हणून समवाय संबंधानें ही गती राहत नाहीं. प्रतिपक्षी—निमित्त संबंधानें ही गती रहाते कीं काय? निर्णय—नाहीं. प्रतिपक्षी—प्राणाचे चालक कोण? पण प्राणाचा चालक मन, इंद्रियें, आत्मा कोणीच नाहीं. कोणीच निमित्त नाहीं, तर मग तुमच्या मतें वायूला गती देणारा प्राण स्वतंत्र असला पाहिजे. नैय्यायिक—उपाधिभेदानें प्राणापान वगैरे भेद आहेत. जसें—व्यान हलका आहे. समान जड आहे.

प्रतिपक्षी—व्यान, समान, हे हलके जड कसे? तुमच्या न्यायमतें तर वायूला गुरुत्व किंवा रूपत्व मुळींच नाहीं. रूपमय म्हणावें तर वायूचे तुकडे तुकडे झाले पाहिजेत. वायु प्रतिबंधक होत नाहीं. पण त्याला रूप असल्यामुळें तुमच्या मताप्रमाणें वायु प्रतिबंधक झाला पाहिजे. दुसरें तुमच्या मताप्रमाणें

मेल्यावर वायु जीवंत राहिला पाहिजे. परंतु मरणकालीं वायु शरीरांतून निघून जातो हें आम्ही पाहतों; म्हणून वायु प्राण होऊं शकत नाहीं. इ० इ०.

प्राणाचा व अंतःकरणाचा अत्यंत संबंध आहे. जसें—श्वास बंद केल्यानें मनाची एकाग्रता होते. अंतःकरण चतुष्टय ( मन, बुद्धि, चित्त, अहंकार ) सुषुप्तींत लय पावतात. अंतःकरण (मन) हें अंतरिंद्रिय होय. व हें सर्व शरीरांत व्याप्त आहे.

नैय्यायिकांचें व पारकीय तत्ववेत्यांचें खंडनः—

प्राणाची आविर्भवन व तिरोभवन शक्ति आहे काय ? वायुगती बाहेर येऊं शकत नाहीं म्हणजे काय ? संस्काराशिवाय ती ( वायुगती ) मस्तकांत ( मेंदूत ) पोंचू शकत नाहीं म्हणजे काय ?

संस्कार कोणाला व कशाचा झाला पाहिजे ? ज्ञानतंतूला संस्कार होतो असें मानलें व ज्ञानतंतु घेऊन मध्यें फट मानली, तर सुखदुःखाचें संस्कार होणार नाहींत.

मन अणुमय आहे असें मानलें तर एके ठिकाणीं एक व दुसरे ठिकाणीं दुसरें ज्ञान झालें पाहिजे. म्हणून मन अणुमय नाहीं. न्यायमतें एकदम ज्ञान होत नाहीं. ज्ञान होण्याला कांहीं वेळ लागतो, अर्थात फारच थोडा. न्यायमतें सर्व ज्ञानशक्त्या एके ठिकाणीं राहतात. ( ब्रेन विषयीं आंग्ल तत्ववेत्यांचेंही असेंच म्हणणें आहे. ते म्हणतात ब्रेन अणूंचा ( atoms ) चा बनलेल आहे. इ० इ०. )

वेदांतियांचें मत असें नाहीं. त्यांचे मतें ज्ञानशक्ति सर्व शरीरीं व्याप्त आहे. व शरीराच्या कोणत्याही भागीं सुखदुःख झालें असतां तें ज्ञान तत्काल तेथेंच होतें. इंग्रजांच्या मतें तो सुखदुःखानुभव ज्ञानतंतुद्वारा ब्रेनमध्यें गेला पाहिजे व नंतर मग आपणाला सुखदुःखाचा संस्कार त्याच ज्ञानतंतुद्वारा उलट होतो. (हें म्हणणें अर्थातच असंबद्ध आहे).

प्राण अंतःकरणाशीं संयुक्त आहे हें वर सांगितलेंच आहे. सूचना—निर्णयवाद दृष्टांतानीं सिद्ध करावा. परंतु सिद्धांतवाद दृष्टांतांनीं न करतां सिद्धांतानेंच झाला पाहिजे. कारण दृष्टांतानें सिद्धांतवाद होत नाहीं.

जे गुण पदार्थ असतांना असतात व पदार्थ नसतांना ( पदार्थ नष्ट झाले असतां ) नसतात ते ते त्याचे गुण होत. परंतु गुण जाऊन पदार्थ किंवा द्रव्य राहूं शकत नाहीं. क्वचित् प्रसंगीं पदार्थ जाऊन गुणसंस्काराचा भास होतो. जसें, फूल नष्ट झाल्यावर फुलाचा वास रहातो.

वेदान्तमतें सर्वज्ञान अहंला ( Ego ) होतें. जड व चेतनभेद युरोपियन लोकांना माहीत नाहीं. आपण घेतलेले संस्कार ध्यानानें दृढ होतात. आपण जे संस्कार घेतो ते संस्कार त्या पदार्थांचें आपणाला सूक्ष्म ज्ञान करून देतात. यावरून ठरतें कीं प्राण मन किंवा मेंदू अणुमय नाहींत.

वायु ही प्राणाची वृत्ति आहे, हें वेदान्तमत यथार्थ आहे. अंतःकरणाशीं प्राणगती संयुक्त असते व वायु पोकळींत विराला म्हणजे ( वायु पोकळींत विरतोच कारण तो पंचीकृत आहे म्हणून ) मग नुसता प्राण रहातो. हा प्राण अपंचीकृत आहे व हा प्राण शरीरांतून निघून गेला म्हणजे तोच मृत्यु आहे. मनाप्रमाणें प्राण सूक्ष्म आहे. मरणानंतर धनंजय वायु शरीरांत राहतो. धनंजय वायु ही प्राणवृत्ति आहे खरी, तथापि सर्व वायु पोकळींत विरून गेला असल्यामुळें पाणी निघून गेल्यावर पाण्याचा ओलावा जसा तत्पश्चात् राहतो त्याचप्रमाणें तो धनंजय वायुही आहे. ( पाण्याच्या ओलाव्या प्रमाणेंच धनंजय वायु आहे. A kind of Vital air nourishing the body ) धनंजय वायुदेवता तुष्ट्यर्थ देहाचें दहन करणें इष्ट आहे. दहन जर न केलें तर देवता देहाला पुढें कष्ट देतील. दहनानंतर हा धनंजय वायु पुढें तेजांत लीन होतो. हें मागें* सांगितलें आहे.

---

* हा विषय ता० १५।७।०४ च्या अमृतानुभवाच्या प्रथम ओवीच्या निरूपणांत झाला आहे तो असाः—हंस=घर्षणशक्ति. चंद्रसूर्य देवतांचें जें चालन तेंच हंस. हा हंस दैविक ठिकाणीं स्थित होणारा प्राण होय. हा प्राण शक्तिरूपानें धनंजयांत राहतो. धनंजय ही प्राणाची वृत्ति होय. मरण पावल्यानंतर देखील धनंजय प्राण देह भस्मसात् झाल्याशिवाय देहपाताबरोबर तेजांत लीन होत नाहीं. म्हणून धनंजय प्राण तेजांत लीन होण्याकरितां देहाला अग्निसंस्कार करावा लागतो. देहपात झाल्यानंतर व देहाला अग्निसंस्कार होण्यापूर्वी जोंपर्यंत मृत-

सूक्ष्मशरीराभिमानी जीव तेजस्थित असतो किंवा रश्मीस्थित असतो. सतरा तत्वें निघून जाणें म्हणजे मृत्यु होय. लिंगशरीर अपंचीकृत असते.

मरणाचीं तीन ठिकाणें म्हणजे तैजस जीव जाण्याचे तीन मार्गः—१. रश्मी —अनावृत मार्गानें जाण्याची रीति. २. निद्रा—आवृत्त अथवा धूममार्गानें जाण्याची रीति. ३. लोक—मोघम मार्गानें जाण्याची रीति.

तैजस जीव " लोकीं " भोगशरीर ग्रहण करतो, व तेथेंही तो पंचाग्निनेंच जातो.

जीव कर्मभूमीवर जन्म घेण्याकरितां येतो ते पांच मार्ग—याला पंचाग्नि-क्रिया म्हणतात. हे सर्व दुःखमय असल्यामुळें यांना अग्नि म्हणतात. पूर्व शरीराची व जीवाची व्याप्ति नाहीं. कारण अनुमानांत व्याप्ति नाहीं. वेदान्तमतें पुरुषरेतांत जीव पहिले जातो व नंतर तें रेत संभोगकालीं योनींत जातें.

अपंचीकृत लिंगदेह देवतासत्तेनें फिरतो, ( १७ देवता ) पंचाग्निक्रियेत लिंगदेहाला भोग नाहीं. पंचाग्निक्रिया मनुष्यालाच लागू आहे, वृक्षकीटक पशूंना लागू नाहीं. वृक्षकीटकपशूंना " त्रिवृत् " म्हणजे वायु, वृष्टि, व अन्न लागू आहे; किंवा द्विवृतच आहे, असें म्हटलें तरी चालेल. म्हणजे वायु व वृष्टिच लागू आहे. म्हणजे ते त्या त्या मार्गानें जन्मास येतात.

जीवाचे पंचाग्नीनें येण्याचे पांच मार्गः—

वायु, वृष्टि, अन्न, पुरुष, व योषित् ( स्त्री ). पंचाग्नीनें लिंगशरीर एका दिवसांत देखील जन्मास येऊं शकेल. पंचाग्नींत तो अपंचीकृत असतो. तो भोगलोकांत वृक्षपाषाणादि जन्म घेतो, कारण सुखदुःखें तेथें असतात. पण

---

शरीरांत धनंजय प्राण आहे तोंपर्यंतच योगी, भक्त, वगैरे मनुष्याला उठवूं ( जीवंत करूं ) शकतात. व अग्निसंस्कार होइसतों देहांत धनंजय प्राण असतोच.

बहुतकरून तेथें दुःखेंच असतात. तेथल्या दुःखाच्या प्रकाराचा खुलासा खालील उदाहरणावरून होईल. तो झाड झाला म्हणजे तें झाड खालच्या बाजूनें जळलेलें व वरच्या बाजूनें हिरवें असून तो भोग भोगीत असतां अशा प्रकारचा ताप अनुभवीत असतो.

सूर्यलोक चंद्रलोक वगैरे हे फक्त भोगलोकच आहेत. येथें जीव सुखदुःख भोगच भोगतात. तेथें ते जीव कर्म मुळींच करीत नाहींत. परंतु पृथ्वी ही भोगाचें स्थान असून कर्मभूमीही आहे. म्हणजे पृथ्वींतील लोक भोगही भोगतात व कर्मेंही करतात. ह्या मृत्युलोकीं वृक्षपाषाणादिकांना देखील आम्ही कर्मे करीत आहों हें कळतें. कोणी सत्पुरुष किंवा दुर्जन वगैरे त्यांच्या आश्रयाखालीं आला असतां त्यांना कळतें.

त्रिविध भोग व त्यांचें लक्षणः—

१. मोघम हें पापस्थान आहे. जसें—यमलोक, पिशाच लोक, गंधर्वलोक, स्थूललोक वगैरे. २. आवृत्त ( धूममार्ग )—यज्ञकर्में करून स्वर्गात, चंद्रलोकांत, सूर्यलोकांत वगैरे गेलेले लोक. ३. अनावृत्त—अर्चिरादि मार्गानें गेलेले ब्रह्मलोकांत जातात. वरच्या सर्व लोकांमध्यें दहर आहे.

दहरस्थ लय योगी आवृतांतून व अनावृतांतून अपंचीकृत जीवाला सिद्धि-सामर्थ्यानें तेथून परत आणतात व उच्चनीच कोटींत त्याला घालतात. बहुतकरून हे दहरस्थ लययोगी आपल्या सामर्थ्याचा उपयोग जीवाला उच्च कोटींत घालण्याकडेच करतात. नीच कोटींत घालण्याकडे करीत नाहींत. सारांश, दहरस्थ लययोगी बहुतकरून आपल्या सिद्धीचा उपयोग, आवृत व अनावृत जीवांना उच्चकोटींत नेण्याकडे करतात. परंतु हेंही ध्यानांत ठेवलें पाहिजे कीं जर एखाद्या भगवद्भक्तानें एखाद्या आवृत किंवा अनावृतांतील जीवाला आणखी नीच कोटींत घातलें ( हें होणें त्यांचा स्वभाव पाहिला असतां असंभवनीयच आहे ) तर तेथें कोणाचाही कांहींच इलाज नाहीं. परंतु जर योग्यानें दहरांत आपली सिद्धि सोडून दिली असेल ( सापाच्या कातेप्रमाणें ) तर मात्र ते सिद्धीचा उपयोग करीत नाहींत. व मग ते उपदेश वगैरे करणें सोडून दहरोपरि ( वर ) जातात. परंतु त्यांनीं

परमानंद प्राप्तीचें गुह्य तत्वः--

१. वृत्ति ध्यानांत ठेवावी—सगुण मूर्तीचे ध्यानांत वृत्ति अडकवून टाकावी. व २. आपलें आरूढत्व ( म्हणजेच आपलें वृत्तिसत्तात्व ) दास्यत्वांत नाहींसें करावें व तिसरी जी एक गोष्ट आहे ती गुरुगम्य आहे तिची माहिती गुरु जवळून करून घ्यावी म्हणजे आनंद प्राप्ति होते. विद्यारण्यमतें जीव, ईश्वर, एकच आहे, याचा विचार व समजः--

पंचकोशांत असलेला जीव—हाच जीव, व्यतिरेकज्ञानानें पंचकोशरहित झाला म्हणजे ईश्वर होतो. व ह्याच दृष्टीनें जीव व ईश्वर एक आहे असें विद्यारण्य मानतात. परंतु हा समज बरोबर नाहीं हें ध्यानांत ठेवणें. ईश्वराधिष्ठानाचे अथवा ईश्वराच्या प्रत्ययाचे दोन प्रकारः—

१. गुरुस्तु दीपवत् मार्गदर्शकः—ह्यानें तत्काल ईश्वरप्राप्ति होते. २. एकांतांत बसून स्थिर विचार करणें. संतशास्त्रमार्गावलंबन करणें व अशा प्रकारें सत्वशुद्धि करणें. ह्यानें तत्काल जरी परमेश्वरप्राप्ति होत नाहीं तथापि जन्मांतरानें ईश्वरप्राप्ति होतेच हा निश्चय.

ह्या दोन प्रकाराचा संक्षेपतः विस्तारः—

आपणाला एखाद्या आंधार कोठडींतील वस्तूची माहिती किंवा तत्रास्थित वस्तूचें ज्ञान करून घ्यावयाचें असलें तर आपणाला त्या वस्तू दीपाच्या सहायानें तत्काळ कळतील. तद्वतच हृदयगुहास्थित परमेश्वराची प्रतीति गुरुमाउलीच्या सहायानें तत्काळ होते. कांहींच उशीर लागत नाहीं. म्हणूनच गुरुमाउलीचें महत्व जितकें गावें तितकें थोडेंच आहे. व अतिशय दीनता प्राप्त झाल्याशिवाय परमेश्वरप्रचोदित गुरुमाउलीची भेटही होणें शक्य नाहीं. मग उपदेशामृतरसास्वादन तर पलीकडेच राहिलें.

परंतु दीपाभावीं जर मनुष्य खोलींत जाऊन बसलाच तर त्याला पूर्वीं डोळ्यांतील तेजाधिक्यानें अंध झालेल्या दृष्टीनें जे पदार्थ एकदम दिसत नव्हते तेच पदार्थ थोडा वेळ अंधार कोठडींत बसल्यावर व दृष्टि साफ झाल्यानंतर किंचित् किंचित् जास्त प्रमाणानें प्रतीत होऊं लागतात. तद्वतच गुरु न भेटतां जर मनुष्य विषयसुखाला कंटाळला व कोणत्याही रीतीनें म्हणजे जबरदस्तीनें कां

होईना, संतांनी व शास्त्रांनीं निर्दिष्ट केलेल्या मार्गानें जाऊं लागला व अशा प्रकारें सत्वबृध्दि करूं लागला म्हणजे त्याला हृदयगुहास्थित परमेश्वराचा किंचित् किंचित् परिचय होऊं लागतो व जन्मांतरांनीं त्याला ईश्वरप्रतीति प्रत्यक्ष होते. येथें हेंही ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं मनुष्यानें दांतहिरड्या खाऊन जरी परमेश्वरप्राप्त्यर्थ सत्कर्मावलंब केला, चुकीचा हठयोग किंवा राजयोग केला किंवा कोणत्याही मार्गाचा अवलंब केला तरी–तो त्याचा प्रयत्न ईश्वरप्राप्तिमूलक मात्र पाहिजे—त्याला आज नाहीं उद्यां, उद्या नाहीं परवा परमेश्वर भेटेलच हा निश्चय. कारण साधक श्रध्देच्या जोरावर कर्म करीत असल्यामुळें ईश्वर त्याला वायां जाऊं देत नाहीं.

नुसत्या शुध्दसत्वानें ईश्वराचें व आपलें ऐक्य कसें आहे हें कळावयाचें नाहीं. याला गुरूच पाहिजे. खोलींत गेल्यावर वस्तु जरी दिसल्या तथापि त्या वस्तूंवर मालकी कोणाची आहे हें आपणाला कळल्याशिवाय ईश्वराची महती कळावयाची नाहीं. ह्या सर्व वस्तू परमेश्वराच्या मालकीच्याच आहेत हें ज्ञान होण्याकरितांच गुरु पाहिजे, नुसत्या सत्वशुध्दीनें हें कळणें नाहीं.

ईश्वर कां गुरु होऊं शकत नाहीं ?

---

१ ईश्वर कां गुरु होऊं शकत नाहीं ? २ तत्वसत्ता व वृत्तिसत्ता हीं एक कशीं ? ३ संकेत दृष्टि. ह्या तीन गोष्टींचें सामान्य स्वरूप कळण्याकरितां ता० १८।६।०४ च्या निरूपणांतील कांहीं भाग खालीं देतोंः—

ओवी अमृतानुभव—प्रकरण १ लें—

किंबहुना तियें । प्रणवाक्षरीं विरूढतीये ।
दशेचीही वैरियें । शिऊशक्ति ।। ४४ ।।

निरूपण—सांकेतिक दृष्टि म्हणजे भक्तदृष्टि. हें सर्व जगत् चिद्घनानंदमय आहे म्हणजे हें सर्व जगत् अस्ति भाति व प्रियमय आहे. याचें तत्व—हे परमेश्वर, हें सर्व वैभव तुझें आहे. माझें कांहींच नाहीं. भक्त म्हणतो हे परमेश्वर, संकटें पाहिजेत, तीं माझ्यावर येवोत. परंतु तुझ्या सेवेंत किंचित् देखील अंतर न पडो. म्हणजे संकेत दृष्टींत भक्त परमेश्वराची निरपेक्ष बुद्धीनें सेवा

ईश्वर गुरु होतो म्हटलें तर परमेश्वर भावनापेक्षी नाहीं. तमोदृष्टीनें, रजोदृष्टीनें, किंवा सत्वदृष्टीने किंवा कोणत्याही दृष्टीनें पहा, परमेश्वर हा अज्ञानापेक्षी किंवा भावनापेक्षी मुळींच नाहीं; म्हणून त्याला उपदेश करणें शक्य नाहीं.

मुख्य संबंध सामानाधिकरण्यें करून असतो. देवतांत व ईश्वरांत सामानाधिकरण्येंकरून संबंध आहे. आरूढ चैतन्य जीव व अधिष्ठान चैतन्य परमेश्वर

---

करतो. सारांश, परप्रीतींत म्हणजे परमेश्वरप्रीतींत भक्ताला भोक्तृत्वेच्छा रहात नाहीं. हीच **पराभक्ति व संकेतदृष्टि** होय. सांकेत दृष्टयनुरूप मनुष्य ज्ञानानें मुक्त झाल्यावर देखील त्याला परमेश्वराचे भक्तीची आवश्यकता आहेच, व जोंपावेतों तो परमेश्वरभक्ति करीत नाहीं तोंपर्यंत त्याला सांकेतिकदृष्टि समजली असें म्हणतां येत नाहीं. हें साधारण मनुष्यानेंच काय परंतु आपणाला मुक्त मानून घेणाऱ्या लोकांनीं देखील ध्यानांत ठेविलें पाहिजे. ही सांकेतिक दृष्टि चांगली समजली म्हणजे मनुष्य अमृतानुभवाचे उपदेशास पात्र होतो.

नामांत सांकेतिक दृष्टि आहे हें गुरुमाऊलीच्या उपदेशाशिवाय कळत नाहीं. ईश्वर सर्व व्यापक असल्यामुळें त्याच्यानें सांकेतिक दृष्टीचा उपदेश होणें शक्य नाहीं. गुरुमाउलीच्या उपदेशानेंच सांकेतिक दृष्टि येते. म्हणूनच वेदांत जीवाला उपदेश केला आहे तो हा—हे जीव, " आचार्यवान् पुरुषो वेद " ह्या श्रुत्यन्वये गुरुयुक्त पुरुषालाच सांकेतिक दृष्टि काय आहे हें समजतें. म्हणूनच नामरूप सद्भावानेंच प्रतीत होतें. सद्गुरुच आपणाला सांकेतिक दृष्टि कां देऊं शकतात? व परमेश्वर कां देऊं शकत नाहीं? हें खालील व्यावहारिक उदाहरणावरून स्पष्ट होईल:—

हा मुलगा माझ्याच वीर्यापासून झाला असें जरी बापानें म्हटलें तरी तितका विश्वास बसावयाचा नाहीं, जितका आईनें हा माझा मुलगा अमक्याच्याच वीर्यापासून झाला आहे हें सांगितलेलें पटेल. म्हणजे आपण आपल्या बापाच्याच वीर्यापासून झालों ह्याची खात्री बापाकडून न होतां आईकडूनच होते, तद्वतच नामांत सांकेतिक दृष्टि आहे हें जितकें आपणाला गुरूपासून कळतें तितकें प्रत्यक्ष परमेश्वरापासून देखील कळत नाहीं, हें पूर्ण लक्ष्यांत ठेवावें.

येथें हेंही ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं जसें सत् तेंच चित् व आनंद आहे

म्हणूनच एका वृत्तीचेंही अधिष्ठान ईश्वरच आणि समस्त वृत्तींचेंही अधि-
परमेश्वरच आहे. व म्हणूनच तत्वसत्ता व वृत्तिसत्ता हीं एकच[२] होत.
ा आपल्या नाना प्रकारच्या वृत्या नाहींशा करण्याकरितां आपण पहिले
थानीं स्थीर रहावें व हृदयीं परमेश्वराची प्रतीति घेतल्यावर मग आपल्या
ी व्यापकता करावी व मग पुनः हृद्देशीं स्थित करावी. म्हणजे सगुण
ा करावी. परमेश्वर हृद्देशीं आहे ह्याच्या समर्थनार्थ गीतेंतील श्लोक "ईश्वरः
भूतानां" इ० प्रमाण आहे. १८–६१.
रमेश्वर जाणण्याचे तीन प्रकारः—१. अस्तित्वानें सत्ताप्रतीति=सत्.
संकेत[३] दृष्टीनें चित् प्रतीति=चित्. ३. भगवद्भक्तीनें परमानंदप्राप्ति=आनंद.
थाकाशस्थितो नित्यं वायुः सर्वत्रगोमहान्—मत्स्थानीत्युपधारय ॥ ९–६
श्लोकानें ईश्वरसत्ता प्रतीत होते. मया ततमिदं सर्वं—न चाहं तेष्ववस्थितः ॥
४. मी भूतसत्तेनें मर्यादित नाहीं हा वृत्तिसत्तात्मक श्लोक होय. नच

ाच अस्तिभाति प्रिय हे एकमेकांहून भिन्न नसून एकच आहेत. अस्ति तेंच
ी व भाति तेंच प्रिय होय. म्हणजे नामरूप एकच होत, भिन्न नाहींत.
ते व पुरुष हे सांकेतिक दृष्टीनें एकमेकांना नाशक होतात. म्हणजे हे
ोही नाहींत हें ठरतें. म्हणजे सर्व जग ईश्वरमय—चेतनमय—आहे हें
त पक्के बिंबतें.
आपली प्रीति नानावृत्तींची बनली कीं ती वासना होते. परंतु तीच आपली
ी एका वृत्तीची बनली कीं भक्ति उत्पन्न होते, म्हणजे सांकेतिक दृष्टि सम-
ो असें समजावें. + +
मनुष्यदृष्टीनें ज्याप्रमाणें पितापुत्र एक, तद्वतच संकेतदृष्टीनें तत्वसत्ता व
सत्ता एकच होत. म्हणून वृत्तिसत्ता नित्य असून ती कांहीं खोटी किंवा
ाकृत नाहीं, म्हणून परमार्थांत व्यवहार व व्यवहारांत परमार्थ सत्य आहे.
ीसत्ता म्हणजे वासना. संकेतदृष्टीनें जन्ममरण म्हणजेच मोक्ष होय. कसें ?
तत्वसत्तेनें वृत्तिसत्ता विराजणें हें तत्वसत्तेचें खरें लक्षण होय. म्हणून वृत्ति-
ेचा विरोध करूं नये. उ० गोडी आणि गुळ इ० ( अमृतानुभव )
२, ३—पृष्ठ १५१ वरील टीप पहा.

मत्स्थानि भूतानि पश्यमे योगमैश्वरम् । भूतभृन्नच भूतस्थो ममात्मा भूतभावनः ॥ ९-५ या श्लोकानें देखील सत्ता प्रतीत होते.

गीतेंतील ९ व्या अध्यायांतील सहाव्या व पांचव्या श्लोकांनीं ईश्वर जगाच्या सत्तेनें मर्यादित नाहीं पण जग ईश्वराच्या सत्तेनें मर्यादित आहे असें प्रतीत होतें.

सर्वतः पाणिपादं तत्सर्वतोऽक्षि शिरोमुखम् । इ० व सर्वेंद्रिय गुणाभासं सर्वेंद्रिय विवर्जितम् । इ० तेराव्या अध्यायांतील १३ व १४ ह्या दोन श्लोकांनीं तत्वसत्ता प्रतीति होऊन चित्प्रतिपादनही होतें, हीच संकेतदृष्टि होय. तेराव्या श्लोकांत जीवाचें आरूढ दशेनें व ईश्वराचें व्यतिरेक दशेनें वर्णन केलें आहे.

ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति ।
भ्रामयन् सर्व भूतानि यंत्रारूढानि मायया ॥ १८।६१.
तमेव शरणं गच्छ—स्थानं प्राप्स्यसि शाश्वतम् ॥ १८।६२.

आपल्या वृत्तिसत्तेचें अधिष्ठान परमेश्वर ओळखण्याला ६१ वा श्लोक उपयोगी आहे व दोन्ही श्लोक भक्ति करून परमानंद प्राप्त्यर्थ आहेत. "भोक्तारं यज्ञ-तपसां–" ५–२९ व "मांच योऽव्यभिचारेण भक्तियोगेन सेवते" १४–२६ हेही श्लोक भक्ति करून परमानंद प्राप्त्यर्थच आहेत.

१. तत्वावर वृत्ति उठणें (हीच शिवाची शक्ति) ही ध्यानानें नाहींशीं होते. २. मग वृत्तीवर आरूढभावनेनें अहंत्व येतें. हें दास्यत्वानें नाहींसें होतें. ३. मग अहंभावानें शरीर, दारा, पुत्रसंबंधीं जें ममत्व उत्पन्न होतें तें वैराग्यानें नाहींसें होतें. वृत्तींत तत्व स्फुरणें ही अपराभक्ति असून मुळींच वृत्ति न स्फुरणें ही पराभक्ति होय. हीच दोन प्रकारची भक्ति आहे.

मांच योऽव्यभिचारेण भक्तियोगेन सेवते ।
स गुणान् समतीत्यैतान् ब्रह्मभूयाय कल्पते ॥ गीता १४–२६.

याचाच अर्थ "शिवो भूत्वा शिवं यजेत्" असा आहे. अशा भक्ताला पुनरावृत्ति नाहीं. परंतु हें ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं आपली वृत्ति सत्वारूढ जर असली तर आपणाला पुनरावृत्ति आहे. "आब्रह्मभुवनाल्लोकाः पुनरावर्ति-नोऽर्जुन" गीता ८–१६. परंतु १४–२६ त सांगितलेल्या पराभक्तीनें गुणातीत होऊन परमेश्वरीं मिळाला म्हणजे याला पुनरावृत्ति नाहीं. "मामुपेत्य तु

ा पुनर्जन्म न विद्यते " गीता ८-१६. योगी, व्यतिरेकी वगैरेनां अव्य-
ारी भक्ति न घडल्यानें व त्यांची वृत्ति नुसती सत्वस्थच असल्यानें म्हणजे
ीत न झाल्यानें त्यांना पुनरावृत्ति आहे हें पूर्ण लक्ष्यांत ठेवावें.
ा. १३।७।०४ चे निरूपणांत, जीवाच्या उत्क्रांतीला किंवा अवनतीला व
ची सुटका होण्याला १ संगति. २. प्रक्रिया व ३. सामर्थ्य ह्या तीन
ांचें विवेचन सांगतांना, हिंदुधर्मदृष्ट्या पुनर्जन्माचा खरा विचार महाराजांनीं
तला आहे तो असाः—
ोणी म्हणतात, मनुष्यजन्म व विशेषेंकरून ब्राह्मणजन्म एकदांच येतो.
म्हणतात, मनुष्यजन्म बहुत जन्मांनंतर समसमान पापपुण्यें करून येतो
ाच जन्मांत आपण कांहीं केलें तर आपणाला मोक्ष आहे, नाहीं तर नाहीं.
कवेळ मनुष्य जन्म व्यर्थ गेला म्हणजे पुनः पुनः मनुष्यजन्म येत नाहीं.
( थिऑसफिस्ट ) म्हणतात कीं मनुष्यजन्म एकदां प्राप्त झाला म्हणजे
ानुष्य पुनः नीच कोटींतल्या प्राणिवर्गांत जाऊं शकत नाहीं. परंतु हे सर्व
र बरोबर नाहींत. खालीं लिहिलेला विचारच बरोबर आहे, हें आपणाला
ा येईलः—पाप भोगून पुण्य होत नाहीं किंवा पुण्य भोगून पाप होत नाहीं.
नें श्रम मात्र होतात. श्रमाचा परिहार केला पाहिजे, म्हणजे त्याला
ाति दिली पाहिजे. याकरितां श्रमपरिहारार्थ स्वर्गांतल्या व नरकांतल्या
ांना पाषाणादि योनींतच जावें लागतें हा निश्चय. सारांश, मनुष्य पाप
भोगून व पुण्य भोग भोगून स्थावरांतच जातो.
ुण्यकर्में करून व तज्जन्य सुखभोग भोगून दमलेलीं माणसें विश्रांतिस्तव
णादि कोटींत अनुक्रमें जन्म घेतात. म्हणजे देवमूर्तीचा पाषाण अथवा
ायरींचा तो दगड होतो. मग तो ज्या झाडाचीं फुलें देवाला वाहिलीं
ोल असा पुष्पवृक्ष होतो. मग गाय होतो किंवा रावा पक्षी होतो व ह्या-
णें शेवटीं देवकोटींत जातो. हींच सत्वाश्रित देवयोनी होत.
निषिद्ध कर्माश्रित म्हणजे पापकर्में करून व तज्जन्य दुःखभोग भोगून दमलेला
य विश्रांतिस्तव अनुक्रमें खालील जन्म घेतातः—प्रथम शेतखान्यांतील
, मग कंटक वृक्ष, मग व्याघ्र, मग भूत, पिशाच, राक्षस वगैरे योनींत
ो. हींच आसुरयोनी होय. मात्र सर्व पुण्यभोग व पापभोग निःशेष भोग-

त्याशिवाय प्राणी स्थावर योनींत जात नाहीं. यत्किंचित् जरी भोग भोगाव-याचा राहिला तर त्याला कीटक अथवा दुसऱ्या कोणत्या तरी उच्च योनींत जावें लागतें.

संगीताच्या[1] व प्रक्रियेच्या[2] योगानें प्राणी देवांपर्यंत वैकुंठांत जातात व ते परत येत नाहींत. परंतु सामर्थ्यदृष्टीनें[3] भोगरूप सामर्थ्यानें प्राणी परतही येतात; कारण स्वसामर्थ्यानें जेवढा भोग भोगावयाचा तेवढा भोग भोगला म्हणजे प्राणी पुनः परत येतात.

असो. याप्रमाणें भक्तिबोधार्थ श्रोत्यांच्या वृत्तीगत नाना कुशंकांचें हरण करणारी प्रतिपादनाची हातवटी महाराजांच्या निरूपणांत किती अप्रतीम असते हें वरील एकाच निरूपणावरून दिसून येतें. ज्ञानेश्वरमहाराजांच्या हरिपाठावरील निरूपणें तर फारच महत्वाचीं आहेत. त्यांतील व इतर निरूपणांतील कांहीं प्रतिज्ञा पुढें वाङ्मय प्रकरणांत घेण्याचा विचार आहे.

याप्रमाणें निरूपणांचा आनंद चालला असतांना आषाढ शुद्ध १० चे दिवशीं सौ० मायबाईस ( मनकरणिका आईस ) व आणखी पांचसात मंडळीस बरोबर घेऊन महाराज श्रीक्षेत्रआळंदीस जाण्याकरितां निघाले, व आळंदीची यात्रा करून सुमारे १५ दिवसांत परत आले. आळंदीगम-नाची ही महाराजांची पहिलीच वेळ होय. तेव्हांपासून वर्षांतून एकदोन वेळ नियमानें जाऊं लागले.

उमरावतीस परत आल्यानंतर पूर्ववत निरूपणादिकांची बहार चालू झाली. तशीच श्रीकृष्णपत्नित्वामुळें स्त्रियांचीं व्रतें वगैरेही सुरू झालीं. श्रावण-मासापासून मंगळागौरीचें व्रत महाराज करूं लागले. वेद० गोविंदशास्त्री पंचभाई हे नुकतेच महाराजांकडे येऊं लागले होते. ह्यांस रक्तपिती

१. गाढ निद्रेंत अपाय असेल तर त्या मनुष्याला आप्तांनीं उठवावें ही **संगति**. २. तो होऊन उठत नसला तर त्याला हात धरून उठवावें ही **प्रक्रिया**. ३. इतकेंही करून उठला नाहीं तर त्याला तोंडांत मारून उठवावें हें **सामर्थ्य**. ब्राह्मणादि वर्ण स्थावरांचे आप्त होत.

त्यामुळें अपंग झाले होते. त्यांची योजना महाराजांनीं व्रतोत्सवादि
ीं पूजापाठ सांगण्याकडे केली. श्रावण वद्यांत श्रीकृष्ण जन्मोत्सव सुरू
। त्यावेळीं काल्याचे अभंग, गाणीं वगैरे, नेहमींप्रमाणें प्रेमळ, अर्थ-
व श्रवणमनोहर अशीं झालीं.

---

। उदाहरणार्थ खालील अभंग पहा:— ता० ४।९।१९०४ गोपीवचन
हाणीं:—

ाई यशवदे आईक । गर्ग चुकला जातक । चोर जार तव बालक । त्याचे
वर्णिले॥१॥ याचे दृष्टीं उठे काम । तेणें विसरलों धाम । सोडियेलें गृहकाम ।
ी नाम भूललों ॥ २ ॥ कष्ट देतो मोठ्या घरीं । गरीबातें पदरीं धरी ।
ी मोडी सर्वांपरी । याची थोरी वेदान्तीं ॥ ३ ॥ विंचू सोडितो आंगणीं ।
पापाची झाडणी । तुम्ही पाटील म्हणोनी । बोली बोलतां नये ॥ ४ ॥
याचे गुण पाहे । कर्मी बुडविले माहे[1] । त्याची संगती धरी स्वयें । मग
दावी त्यां ॥ ५ ॥ यानें तपी नागवीले । विप्रां स्वर्गी या गोंविलें । जार
ासी नेले । हें तों झालें वेदबाह्य ॥ ६ ॥ मामी आतां सांडा मौन । बाळका
त्वा गुण । पाटीलपणा अभिमान । या सांडून सकळ ॥ ७ ॥ तुकीं[2] नोहे हा
ळक । गुणीं गाई तो नायक । उगे करिता कवतुक । पुत्र दृष्टीं पाहोनी ॥८॥
का वेदबाह्य करी । तया जोतिष नये घरीं । लटकी जातकाची परी ।
ाचार्य बोलिले ॥ ९ ॥ सर्व मंत्रांसी आधार । असोनियां हा तस्कर । उपरीं
हेतो अंतर । वाटे आला पाहिजे ॥ १० ॥ आम्ही ज्ञानेश कुमरी । जरीं
तां आला हरी । तरी बांधूं दृढ अंतरीं । तव घरीं येऊं न देऊं ॥११॥
ांच पुढील गाणीं किती अर्थपूर्ण आहेत पहा:—

ईश्वरध्यानयोगें । विक्षेपा उठे भाव । संतांच्या नमस्कारें ग बाई । विश्वाची
णराव ॥ रोग्यानें विष खातां । मरणा पुढें करी । वैद्याच्या हातें तेंचि ग
ई । अमृत मार्गे सारी ॥ शास्त्रांच्या योगें ज्ञान । संसारीं घाली पुन्हा ।
रुमुखें तेंचि ग बाई । दाखवी ब्रह्मपणा ॥ वैद्याच्या योजनेनें । जें मारी

१ माहे=प्राणी. २ तुलनेनें.

पुढें नित्य नियमानें महाराजांचें भजन सुरू झालें. भजनप्रसंगीं भक्ति-प्रेमरसाचा प्रवाह उत्पन्न होऊन श्रोत्यांच्या नेत्रांतून प्रेमाश्रू वाहूं लागत व अद्वैतशास्त्रसिद्धांताचा आणि भगवत्कथेचा ठसा त्यांच्या मनावर उमटून वृत्ती भगवत्प्रेमोन्मुख होण्याला फार साह्य होई. ज्ञानेश्वरी, अमृतानुभवादि निरूपणप्रसंगीं प्रतिपादिलेल्या बहुतेक गोष्टी भजन प्रसंगांतही

---

तेंचि तारी । सद्गुरुकृपें तैसा ग बाई । भवसर्प तोंही हरी ॥ कृष्णाच्या हाता-मध्यें । नसता जरी पावा । तरी गोकुळामध्यें ग बाई । न येत्या गोपी मोहा ॥ तैसे नसतां संत । भूमीवरी स्वभक्ती । एकल्या हरीयोगें ग बाई । स्थापतां नये युक्ती ॥ असोनी जड वेळू । श्रीकृष्णामुखीं आला । सद्गुरुनर तैसा ग बाई । हरिहूनी थोरावला ॥ गोपींच्या रासयोगें । कृष्ण हा पूर्णकाम तैसें सद्गुरुकृपें ग बाई । विश्व हें घनःश्याम ॥ यशोदा कृष्णमुखीं । दह्याचे कवळ भरी । सद्गुरु माय माझी ग बाई । तृप्तिदे विश्वभरी ॥ गोपींनी पाळुनीही । श्रीकृष्ण मथुरे गेला । सद्गुरुकृपाबंधें ग बाई । गतिमार्गची मोडिला ॥ कृष्णातें भजतां गोपी । वियोग भोगी भारी । सद्गुरुकृपायोगें ग बाई । अखंड कृष्ण ऊरीं ॥ कृष्णातें कृष्णपण । संकेतावीण नाहीं । तो संकेत सेवक ग बाई । गुरुवचनाचा पाही ॥ देवाच्या कृतीमध्यें । नानात्व जग झालें । सद्गुरुकृतीमध्यें ग बाई । ब्रह्मत्वा विश्व आलें ॥ बाळासी खेळवितां । मायेसी बरोबरी । दूध पाजी त्यावेळीं ग बाई । वरीष्ठ सर्वोपरी ॥ फिरतां संगतीनें । सद्गुरु दिसे नर । उपदेशी ज्ञान जेव्हां ग बाई । तैं वंदी परमेश्वर ॥ हरीच्या कृतीमध्यें । यमासी यमपण । सद्गुरु-कृपायोगें ग बाई । यमची नारायण ॥ ईश्वर अवतारीं । दुष्टांसी मृत्युप्राप्ति । सद्गुरु अवतरतां ग बाई । कीड्यांही जीवन्मुक्ती ॥ ईश्वरकृत वेदीं । जाण्याचे नाना मार्ग । सद्गुरु उपदेशीं ग बाई । वैकुंठ होय अंग ॥ ईश्वरकृत सृष्टी जीवासी झोळीगांठ । सद्गुरुकृत सृष्टी ग बाई । सच्चिदानंदपट ॥ ईश्वर सृष्टीमध्यें दुष्काळादिक दुःख । सद्गुरुसृष्टीमध्यें ग बाई । गाळीव तृप्तिसुख ॥ किंचित द्वेष होतां ।ईश्वर नरकीं घाली । सद्गुरु माय माझी ग बाई।द्वेष्यां दे मोक्ष खोली । ३०

—श्रीगीतसंग्रह. पृ० ५३—५४.

नूतन अभंग पदांच्या रूपानें ग्रथित करून महाराज उत्तम पटवून देत व निरनिराळ्या रसभरीत भगवत्कथा व हरिभक्तांच्या कथा यांच्या दृष्टांतांनीं त्यांना पुष्टि आणीत. याप्रमाणें नित्य भजनाच्या क्रमांत राधाविलास, नारायणदास, शुकगणिका, उपमन्यू आदिकरून सुंदर आख्यानें निर्माण झालीं. तीं महाराजांच्या गाथ्यांत आलीं आहेत.

मागें सिरसगांव प्रकरणांत ज्या गृहस्थाची हकीकत आलेली आहे तेच काशीरावबापूजी देशमुख पुन्हां या भजनानंदाचा आस्वाद घेण्यास उमरावतीस आले असतां त्या वेळचा आपला अनुभव त्यांनीं पत्रांत लिहून कळविला आहे तो असा:—" इ० स० १९०४ सालांत महाराज उमरावतीस असतांना त्यांचे रसभरीत व प्रेमळ भजनाची फारच विशेष तारीफ रा० ठोंबरे यांचे मुखानें मी ऐकली. त्याचे पूर्वी कधीं कधीं मी महाराजांकडे जात येत असे. व संसारीक कुशल गोष्टी त्यांच्याशीं बोलत असे. पारमार्थिक भक्तिमार्गासंबंधानें बहुतकरून मी त्यांच्याशीं फारसा बोलत नसे. कारण माझे मनाचा झोंक त्या दिशेनें साधारण बेताबाताचाच होता. मी त्यांचें भजन कधींच ऐकलें नव्हतें. रा० ठोंबरे यांचे तोंडानें त्यांचे भजनाची फारच प्रशंसा ऐकल्यावर महाराजांचें भजन आज ऐकण्यास जावें या हेतूनें मी त्याच दिवशीं सायंकाळीं महाराजांकडे गेलों. त्यावेळीं एक पोथी व कांहीं पुस्तकांचें पार्सल पोष्टांतून नुकतेंच महाराजांकडे आलें होतें. तें पार्सल महाराजांनीं स्वतः माझे समोरच उघडलें. त्यांतील पोथी आणि पुस्तकें काढून कांहीं पानांवर महाराजांनीं डावा हात फिरविला. आणि मंडळीस सांगूं लागले कीं यांत ज्ञानेश्वरीवर टीका केलेली आहे, परंतु ही टीका सर्वच चुकली आहे. लागलीच रा० हरिभाऊ केवले यांस गीतेंतील एक विवक्षित भाग वाचण्यास महाराजांनीं सांगितलें. त्या भागावरची टीका ज्ञानेश्वरीचे अमके अध्यायांतील अमुक ओव्यांमध्यें आहे ती वाचा, असें महाराजांनीं सांगितल्यावरून रा० हरिभाऊ यांनीं ती वाचून पाहिली. त्याचीच टीका या नवीन आलेल्या पोथीचे अमुक अध्यायांतील अमुक श्लोकांत अमुक पानांत आहे ती

वाचावी असें सांगितल्यामुळें तेंही वाचून पाहिलें. ही टीका गीतेशीं व ज्ञानेश्वरीशीं जुळत नाहीं असे महाराजांनीं सांगितलें आणि मंडळीनें तें कबूल केलें.

वरील प्रकार झाल्यावर मी महाराजांस दुरूनच नमस्कार केला. त्यावर महाराजांनीं मला लागलीच ओळखलें व म्हणाले आज भजन ऐकण्यास रहा. त्यावर मी उत्तर दिलें कीं महाराज, मी आज त्याच उद्देशानें मुद्दाम आलों आहें. त्या दिवशीं रात्रीं महाराजांचे स्वकृत अभंग, ओंव्या वगैरे पद्यात्मक भजन झालें. तें मला फारच प्रेमळ, प्रासादिक आणि रसभरीत वाटलें. त्या दिवशीं भजनी मंडळीचे नेत्रांतून प्रेमाश्रू वाहिले. महाराजांच्या अलौकिक सामर्थ्याबद्दल त्यादिवशीं माझी पूर्ण खातरी पटली, व अशा महात्म्याची खरी ओळख मला आजपर्यंत पटली नसल्यामुळें मी त्यांच्याशीं साधारण गृहस्थाप्रमाणें वागत आलों याबद्दल मला फार पश्चात्ताप झाला. तेव्हां पासूनच महाराजांविषयीं माझे अंतःकरणांत खरी सात्विक पूज्यबुद्धि उत्पन्न झाली. यानंतर महाराजांचे भजनास मी बहुतकरून नियमानें जात असे. तुकारामाचा एक अभंग किंवा ज्ञानेश्वरींतील एक ओवी अगर गीतेंतील एक श्लोक यांपैकीं कांहींतरी एक, प्रथम एका इसमानें वाचावें; आणि त्यावर महाराजांनीं स्वकृत भजन करावें. एक चरण महाराजांनीं म्हणावें. त्यांचे मागून तेंच चरण मंडळीनें म्हणावें व लागलीच त्याचे पुढील चरण स्वयंस्फूर्तीनें महाराजांनीं म्हणावें. याप्रमाणें एक तास दोन तास व कधीं कधीं तीन तीन तास भजन एकसारखें चालत असे. करुणारसांत भजन चाललें असतां श्रोत्यांचें अंतःकरण करुणेनें भरून यावें. प्रेमयुक्त भजनाचा भाग आला म्हणजे प्रेमाश्रूंच्या धारा श्रोत्यांच्या नेत्रांतून एकसारख्या वाहूं लागाव्या. भक्तिरसाचे वेळीं श्रोत्यांचें अंतःकरण भक्तिभावानें थबथबून जावें व एखाद्या नास्तिकाचेंसुद्धां अंतःकरण त्यावेळेपुरतें पाझरून जावें आणि वीररसाचे वेळीं आंगांत स्फुरण चढावें. याप्रमाणें ज्या ज्या रसांत भजन चाललें असेल तो तो रस

त्यावेळीं मूर्तिमंत वठत असे; आणि मंडळी त्यांत दंग होऊन जात असे. त्यांच्या त्यावेळच्या प्रासादिक वाणींत इतकें कांहीं अद्भूत आणि विलक्षण सामर्थ्य असे कीं माझ्यासारख्या पामरानें त्याचें यथायोग्य वर्णन करणें अशक्य आहे. ज्या भाग्यवान् मार्मिक श्रोत्यानें त्याचा प्रत्यक्ष अनुभव घेतला असेल तोच त्याची खरी थोरवी जाणें. मी स्वतः पुष्कळ भजनें ऐकिलीं, अनेक कीर्तनें व पुराणें ऐकिलीं पण महाराजांच्या भजनासारखें भक्तिरसानें ओथंबलेलें व अंतःकरणाला पाझर फोडणारें प्रासादिक भजन मी आजपर्यंत मुळींच ऐकलें नाहीं.

या भजनाचे काळांत नागपूरचे रा० देव या नांवाचे एक गृहस्थ कांहीं सरकारी कामाकरितां उमरावतीस आले होते, व त्यांचे मित्र भालेराव गुरु यांचे येथें ते उतरले होते. एके दिवशीं महाराज मंडळीला कांहीं निरूपण करीत असतांना रा० देव हे भालेरावगुरूला तेथें बोलावूं आले. त्यावेळीं त्यांना उद्देशून महाराज कांहीं कडक शब्द बोलले. त्यामुळें रा० देव यांना अर्थातच राग आला. कारण महाराजांची माहिती त्यांना नव्हती. सबब घरीं गेल्यावर महाराजांविषयीं ते बरेच कुरकुरले. परंतु रा० भालेरावगुरु यांनीं त्यांची समजूत पटविण्याचा प्रयत्न केला. त्या वेळीं महाराज बुधवारांत रा० मुळे मास्तर बी. ए. यांचे माडीवर रहात असत. त्या ठिकाणीं त्याच दिवशीं रात्रीं भजन होणार हें ऐकून रा० देव हे तेथें आले. त्या वेळीं खालचे आवाराचें दार बंद होतें. सबब खालीं असलेले मंडळींपैकीं एकजण दार उघडण्यास गेला असतां माडीवरून महाराजांनीं सांगितलें कीं दाराशीं आलेल्या इसमास आंत घेऊं नका. त्यामुळें ते परत गेले. दुसरे दिवसापासून ते रा० भालेराव यांचे बरोबरच गुपचुप भजनास येऊन बसत असत. पण भजन अगर महाराजांस नमन वगैरे कांहीं एक करीत नसत. याप्रमाणें तीन चार दिवस गेले. पुढें दसऱ्याचा दिवस आला. त्या दिवशीं महाराजांना सोनें देण्याकरितां कांहीं जास्त मंडळी आली. त्यांत रा० देव हेही आले. त्यावेळीं कांहीं मंडळींसह महाराज भोजनास बसले होते. मी स्वतः पंक्तींत भोजनास बसलों होतों.

सायंकाळचे पांच साडेपांच वाजण्याची वेळ होती. महाराजांसह सर्व मंडळींचें अर्धें अधिक भोजन आटपत आलें होतें. सर्वांनीं एक एक श्लोक म्हणावा अशी श्रीमहाराजांची आज्ञा झाली. पाहिला श्लोक महाराजांनीं स्वतःच म्हटला. नंतर फेरपाळीप्रमाणें सर्वांनीं श्लोक म्हटले. अखेरची पाळी रा० देव यांचेवर आली. त्यांनींही श्लोक म्हटला. तो मला आठवत नाहीं. परंतु त्यांतील भावार्थ असा होता कीं कर्ताकरविता आणि बुद्धीचा दाता जर परमेश्वर आहे तर मग स्नानसंध्यादि कर्मे न केल्यामुळें व इतर कारणांमुळें मनुष्याचे हातून जें पाप घडतें त्या पापांचा दोष मनुष्याकडे कां लागावा ? अर्थात त्याचा दोष परमेश्वराकडे लागला पाहिजे. अशा अर्थाचा तो श्लोक होता. हा श्लोक पूर्ण होतांच त्याचें उत्तर महाराजांनीं श्लोकांतच दिलें. त्यावेळीं अनेक दृष्टांत देऊन उत्तरा दाखल महाराजांनीं चार श्लोक म्हटले. ते श्लोक मला आठवत नाहींत. परंतु त्यांतील एक दृष्टांत आठवतो. एका श्लोकांत महाराज म्हणाले, सूर्याच्या प्रखर किरणांच्या योगानें मृगजळ उत्पन्न होतें व तृषाक्रांत मृग त्याला खरें जल समजून मोठ्या उत्कंठेनें तिकडे धांव घेतात. पळतां पळतां त्यांची तृषा अमर्याद वाढून व अखेरीस प्राण व्याकूळ होऊन खरें पाणी न मिळाल्यामुळें कधीं कधीं ते मरणही पावतात. तरी त्यांच्या मरणाच्या पापाचा अधिकारी सूर्य होऊं शकेल काय ? अर्थात नाहीं. त्याप्रमाणेंच ईश्वरानें दिलेल्या बुद्धीचा सदुपयोग न करितां खोट्या मायेला भुलून जर तुम्ही आपले बुद्धीचा दुरुपयोग कराल तर त्या पापाचा अधिकारी परमेश्वर कसा होईल ? याप्रमाणें महाराजांचें उत्तर पूर्ण होतें न होतें तोंच रा० देव यांस आलेलें प्रेमाचें भरतें अनावर होऊन ते बिछायतीवरून एकदम उठले व महाराजांचे चरणांवर मस्तक ठेऊन आपल्या प्रेमाश्रूंनीं त्या चरणांस अभिषेक केला. महाराज सोंवळ्यांत भोजनास बसले होते व रा० देव यांनीं आंगावरील कपड्यांसुद्धां जाऊन महाराजांचे पाय धरले होते तरी विटाळ केल्याबद्दल कांहीं एक न बोलतां पाय सोडण्याबद्दल महाराजांनीं त्यांना पुष्कळ आग्रह केला परंतु त्यांनीं पाय सोडले नाहींत.

। "तुम्ही चिंता करूं नका. तुमचे इच्छेप्रमाणे तुमचे सर्व अपराध
ाले आहेत; आतां सर्व कांहीं चांगलें होईल"". असें महाराज
तेव्हां त्यांनीं पाय सोडले. नंतर भोजन आटपून सर्व मंडळीसह
। सीमोल्लंघनास गेले. "

त्र दिवशीं सकाळीं सुमारें १० वाजतां पासून दुपारचे बारावर
जत पावेतो महाराजांनीं प्रेमभरांत येऊन कुणबी भाषेंत रुक्मिणी
गाईलें. त्या प्रसंगांस इतका रंग चढला कीं स्नान भोजन वगैरे
श्रोते मडळी श्रवणांत तटस्थ झाली. ह्या रुक्मिणी स्वयंवराची
वीस केडवीं आहेत.

ाप्रमाणें भगवद्भजनाचा व भगवद्भजनसहवासाचा महाराजांचें
ाजन आनंद घेत असतां श्रीनिवासशास्त्री यांनीं नागपूर येथें
। वडील मुलास म्हणजे बापूगडांस पत्रद्वारें कळविलें कीं उमरा-
थें एक अत्युत्तम सत्पुरुष आले आहेत. त्यांच्या सहवासामुळें पत्र
ास इतके दिवस सवड मिळाली नाहीं.सगळ्यांनीं त्यांची भेट घेतली

---

क्मिणी स्वयंवर. कुणबी भाषेंतलि दडंगी लावणीचे चालीवर.
ऱ्या देऊळीं लौकर यावें यदुराया । हा मज वैरी शत्रू झाला बंधू रुख-
ध्रु० ॥ तीर्थांमधी तीर्थ जाना कौंडणपुरभारी । होइन पुंन्याची शाम-
तेथला राजा भीमकराना पराक्रमी थोर । त्याले होते चवघ पोर ।
ोरा पाठीवरते कन्या सुंदर । रखुमिनी झाली सकुमार । मंग चवघा
बापाचा लोभ तिच्यांवर । तिनेंच मोहिलें अंतर । पाहुन उपवर इचार
आपल्या मानिं राया ॥ हा मज वैरी० ॥ १ ॥ सुकीर्ति नांवाचा बाह्मन
ाला मनसबीत । चार हाताची मुरति सावळी गून वानत । देवलोकीं
ों नाहिं तसा तिरभुवनांत । पाहतां मनिं पुरतो हेत । असी ऐकुन
रगी दचकलि मनांत । मंग तें रूप हुरद्यांत । किस्न व्हावा पतीं म्हनुन
पित्याच्या पाया ॥ हा मज वैरी० ॥ २ ॥ इ० इ०.

—पदाची गाथा. पृ० ३०३.—

पाहिजे. ह्या पत्राचा बापूगडीला मोठा चमत्कार वाटला. स्नानसंध्या, भगवत्स्मरण, सत्संग ह्या गोष्टींविषयीं कट्टी उदासीनवृत्ती धारण करणारे अण्णासाहेब ( श्रीनिवासशास्त्री ) ज्यांना अत्युत्तम सत्पुरुष म्हणतात, इतकेंच नव्हे तर घरीं पत्र लिहिण्याचीही विस्मृति पडेपर्यंत ज्यांचा सहवास ह्यांना रुचला असे हे सत्पुरुष कोण असावे ? हें पाहण्याकरितां त्याचें मन मोठें उतावीळ झालें. लवकरच बापूगडीस उमरावतीस जाण्याचा योग येऊन कार्तिक शुद्ध ४ गुरुवारीं महाराजांचे दर्शनाचा लाभ झाला. ते वेळीं रा० रा० रामभाऊ डोळे यांचे वाड्यांत महाराज होते. जवळ बरीच मंडळी जमली होती, व महाराजांचें कांहीं निरूपण होऊन " श्रीमत्सद्गुरु ज्ञानेश्वर माउली की जय " असा घोष चालला होता. महाराज एका बाजेवर बसले होते. त्यांच्या आंगांत बंडी व डोक्यास टोपी होती. नंतर तेथून उठून महाराज भालेरावच्या घरीं गेले. तेथें भजन झालें. व्यंकटरावांनीं " माझा तुझा देवा कारे वैराकार" हा तुकाराम महाराजांचा अभंग गाण्यावरून म्हटला. त्यावर उत्तरादाखल महाराजांनीं कांहीं नवीन अभग म्हटलें व नंतर "अजापालाचें आख्यान" नवीन केलें. भजन झाल्यावर महाराज निजले. ते वेळीं झोंपेंतही महाराज नवीन ओव्या म्हणत. " बाळ आलास. बैस. मी सांगतों इकडे लक्ष्य दे. " असें म्हणून नवीन ओव्या म्हणत. रिकामा वेळ अगदीं जात नसे. नेहमीं ओव्या, भजन, भोजनसमयीं गाणीं, ज्ञानेश्वरी, अध्याय, चर्चा वगैरे सतत चालत असे. पूजेच्या वेळीं ज्ञानेश्वरी होत असे. भोजनकाळीं गाणीं व्हावीं. गाण्यांतही ज्ञानेश्वरीनिरूपणांतलि विषय गोवला असे. भोजनोत्तर अण्णासाहेबांनीं झालेल्या निरूपणावर प्रश्न विचारावे, त्यांचीं उत्तरें महाराजांनीं फार समर्पक द्यावीं. नंतर भजन होत असे. अशा प्रकारचा महाराजांचा नित्यक्रम चार दिवस पाहून बापू गडी परत नागपुरास गेला. जाते वेळीं हे खरोखरच अत्युत्तम सत्पुरुष आहेत अशी बापूगडीची खातरी होऊन महाराजांचे ठिकाणीं त्याची चित्तवृत्ति लागून राहिली.

याप्रमाणें हळु हळु महाराजांना मंडळी मिळत चालली. कोणाला लौकिक, कोणाला अलौकिक प्रमाणबलानें महाराजांचा सहवास गोड वाटूं लागला. माधुर्य संप्रदायानुरूप श्रीकृष्णपत्नित्वामुळें उपासनामार्गही महाराज विशेष रीतीनें चालवूं लागले. कार्तिक शुद्ध १२ जवळच आली होती. घरोघरीं तुलसी विवाहोत्सव या दिवशीं होत असतो. महाराजही हा उत्सव अपूर्व रीतीनें करूं लागले. स्वतःला वधू व श्रीकृष्णाला वर कल्पून मंडळींतील कांहीं गृहस्थांस व स्त्रियांस वधूपक्षाकडील व कांहीं गृहस्थांस व स्त्रियांस वरपक्षाकडील ठरवायचें व विवाहविधिप्रमाणें स्वतःचें कन्यादान करवून श्रीकृष्णाशीं विवाह करावयाचा असा त्याचा प्रकार होता. हा समारंभ मोठा प्रेमोत्पादक व मनोरंजक होत असे. ह्या वर्षी श्रीनिवासशास्त्री वधूपक्षाकडे व कृष्णराव ठोंबरे वरपक्षाकडे होते. एकंदरींत महाराजांची नित्यचर्या मोठी अपूर्व, व प्रेमचमत्कृतिजनक वाटे. त्यांचीं नित्य नूतन शास्त्रीयविषयक निरूपणें व भजन व भोजनसमयींचीं गोड कवनें हा तर एक मोठाच दृष्ट चमत्कार असून त्यांच्या दैवी सामर्थ्याचा दर्शक होता, परंतु मधून मधून त्यांचें स्वतःचें योगबल व आधिकारिकत्वही सहवासी जनांच्या अनुभवास येत असे. अशा प्रकारच्या कांहीं गोष्टी प्रसंगानुसार मागें आल्या आहेत व पुढेंही येतील व हे अनुभव ज्याचे त्याला स्वसंवेद्य असल्यामुळें खोटे म्हणतां येत नाहींत; तथापि ह्या विषयाच्या सामान्य चर्चेंत महाराजांकडून जो ऊहापोह झालेला आहे त्या दृष्टीनें त्यांचा विचार करणें अधिक श्रेयस्कर आहे. तो ऊहापोह पुढें "अलोक" प्रकरणांत येणार आहे. असो.

कधीं कधीं महाराज स्वतः विषयीं अलौकिक अशी माहिती मंडळीला सांगत असत. ते म्हणत कीं माझें गांव केशवपुरी म्हणून बदरीनारायणाच्या पलीकडे फार दूर आहे. तेथें जाण्याला मला माहित असलेला मार्ग निराळा आहे. तो भूगर्भांतून आहे. मी तुम्हांला त्या रस्त्यानें नेऊं शकतो. त्या रस्त्यानें जेवणाची वगैरे तुम्हांला फिकीर करायला नाकों मुक्कामावर सगळी व्यवस्था आपोआप होत जाईल. वरच्या कलीक.

रस्त्यानें एक ठिकाण व्यासांचें पुराण सांगण्याचें म्हणून प्रसिद्ध आहे. आमच्या रस्त्यानें प्रत्यक्ष व्यास पुराण सांगत आहेत असें तुम्हाला दिसेल व अनेक ऋषींचीं दर्शनें होतील. परंतु तुमचा अधिकार नसल्यामुळें तुम्हाला त्यांच्याशीं भाषण करतां येणार नाहीं. तो अधिकार येण्याकरितां तुम्हाला मी सांगेन त्याठिकाणीं कांहीं दिवस तप केलें पाहिजे. केशव-पुरीचें वर्णन तर महाराज फारच विलक्षण करीत. महाराजांनीं सांगित-लेली प्रत्येक गोष्ट मंडळीला मोठी अश्रुतपूर्व वाटे व एक प्रकारची सत्या-न्वेषण जिज्ञासा उत्पन्न होई. महाराजांनीं सांगितलेली अमुक माहिती कोणत्या ग्रंथांत आहे असें मंडळीनें विचारलें असतां महाराज म्हणत कीं असें अनेक ग्रंथ केशवपुरींत आहेत. हीं वर्णनें ऐकून श्रीनिवासशास्त्री आदि करून मंडळीच्या मनांत व्यासादि महात्म्यांच्या दर्शनाची इच्छा अनावर होत असे. असा प्रकार चालला असतांना वैकुंठ चतुर्दशीचे दिवशीं उत्तररात्रीं योगवासिष्ठांतील चित्ताकाशाचें निरूपण निघालें. त्यांतील प्रतिपादन अशा प्रकारचें होतें कीं व्यासनारदादि मोठमोठे महात्मे चिदाकाशाच्या दृष्टीनें एकच आहेत. चित्ताकाशदृष्टीनें मात्र त्यांच्यांत भेद दिसतो. यावर मंडळींनीं शंका केली कीं, चिदाकाशदृष्टीनें जर सर्व महात्मे एक आहेत तर विश्वामित्रांनीं प्रतिसृष्टि केली व वसिष्ठांनीं केली नाहीं अशा प्रकारचे भेद त्यांच्या सामर्थ्यांत कां दिसतात? महाराज म्हणाले हा भेद त्यांच्या तपःसामर्थ्यांत दिसत होता. ब्रह्मज्ञान सगळ्यांचें सारखेंच होतें. ब्रह्मज्ञानापुढें तपःसामर्थ्याचें कांहीं महत्त्व नाहीं. हें निरूपण सांगून महाराजांनीं मंडळीला विचारलें का, या वेळेला तुम्ही चिदाकाशा-मध्यें स्थित असल्याकारणानें तुम्हांला प्रत्येक महात्म्यांत भेद दिसतो काय? तें सांगा. हें ऐकून श्रीनिवासशास्त्री आदिकरून मंडळी आपल्या मनांत

---

१ या वर्णनाप्रमाणें केशवपुरीच्या कांहीं प्रदेशाचा देखावा पुढें स्वाप्निक दृष्टांतानें महाराजांनीं मंडळींतील एकाजणास (बापूगडीस) दाखविला आहे, तो वृत्तांत पुढें सु० प्रा० प्रकरणांत पहावा.

समजली कीं, व्यासादि महात्म्यांच्या दर्शनाची जी आम्ही इच्छा करीत होतों ती आज महाराजांच्या दर्शनानेंच सफळ झाली. आतां इतर कोणत्याही महात्म्याच्या दर्शनाची इच्छा उर्वरीत राहिली नाहीं. ही मंडळीची समजूत दृढ झाल्यानंतर पुढें बदरीनारायणाच्या रस्त्याची व महात्म्यांची गोष्ट महाराज फारशी काढीत नसत.

निरूपण आटपल्यावर निजतेवेळीं महाराज मंडळीला बोलले कीं, आजचें निरूपण मी व्यास होऊनच सांगितलें आहे असें समजा. या भाषणाचें विशेष स्पष्टीकरण महाराजांच्या अलौकिक व्याख्यानमालेंत पृष्ठ १३।१४ वर आलेलें आहे. त्यांत ते म्हणतातः—" निरनिराळें ज्ञान मी सांगतों हें पाहून कित्येकांना आश्चर्य वाटण्याचा संभव आहे. माझी भेट झाल्यापासून माझें आत्मज्ञान स्थिर असून अलौकिक ज्ञानांतही निरनिराळ्या तऱ्हेनें भर पडत आहे असें दिसण्याचा संभव आहे. परंतु ह्या गोष्टीचा विचार आपल्या तऱ्हेनें केला तर हीही गोष्ट सहज समजण्यासारखी आहे. ह्याबद्दल मी तुम्हांला आणखी एक कथा सांगतोंः—महाभारतांतील शांतिपर्वांतर्गत मोक्षधर्मपर्वांत अशी कथा आहे कीं, सृष्टीच्या पूर्वी भगवान् नारायण परमेश्वरापासून अपांतरतम नांवाचे ऋषी वेदांचे आचार्य उत्पन्न झाले. त्यांना नारायणांनीं असा वर दिला कीं, कली प्राप्त होईल तेव्हां तुझें कृष्ण म्हणजे काळें रूप होईल व त्यावेळीं तूं नाना देशांत नाना कर्मांचा प्रवर्तक होशील व तूं नाना देशांत नाना कर्में करशील, व त्या सर्व कर्मांनीं लोकांना तूं तारण्याचा यत्न करशील. याप्रमाणें भगवान् अपांतरतम मुनी हे सत्यवतीसुत व्यास झाले व तेच कलींत नाना प्रकारच्या कर्मांचे व ज्ञानाचे प्रवर्तक होतात. " असो.

वरील चित्ताकाशाचा प्रकार इकडे महाराज मंडळीला ज्या वेळीं पटवून देत होते त्याच वेळीं दुसरीकडे एका गृहस्थाला स्वप्न दृष्टान्तानें त्याचें प्रत्यक्ष प्रत्यंतर दिसून राहिलें होतें. या गृहस्थाचें नांव रा. रा. रामचंद्र गंगाधर भागवत. यांची हकीकत त्यांच्याच शब्दांत अशी आहेः—

" मी उमरावती येथें १ नंबरचे शाळेंत हेडमास्तर असतांना सन १९०३

सालांत तेथें प्लेग होऊन शाळा बंद झाल्या. तेव्हां मी कायरास राहण्यास आलों. आश्विन, कार्तिक व मार्गशीर्ष हे महिने मी कायरास घालविले. तेव्हां श्रीगुलाबराव महाराजांची व माझी ओळख नव्हती, त्यांचेविषयीं माहिती नव्हती, किंबहुना त्यांचें नांवही मला त्या वेळीं माहित नव्हतें. त्या सालीं सबंध आश्विन महिना मी येथील आपल्या मित्रमंडळीसह गीताचर्चेंत घालविला. कार्तिकांत दोन श्रीभागवताचीं सप्ताह पारायणें श्रवण केलीं. कार्तिक शुद्ध एकादशीला भागवत श्रवणानंतर घरीं आल्यावर पांडवप्रताप वांचला, व ती रात्र मला फारच पवित्र गेली दुसरे दिवशीं सकाळीं सूर्योदयाचे वेळीं मला एक चमत्कारिक स्वप्न पडलें, व त्यांत श्रीभगवान् व्यास यांचें दर्शन झालें. त्यांनीं गीतेंतला शेवटला श्लोक अक्षयीं पठण करण्याची मला आज्ञा केली. डोळे उघडून पहातों तों एकदम कोमल सूर्यबिंबच माझ्या दृष्टीस पडलें. मी तशाच ठिकाणीं त्या दिवशीं सहज निजलों होतों. त्या तेजांत ती मूर्ति अंतर्धान पावली, त्या दिवसापासून माझें वृत्तींत फरक पडत गेला. पुढें दोन तीन महिन्यांनीं श्रीगुलाबराव महाराज मला मिळाले. तरी बरेच दिवस पर्यंत त्यांचें माझें संघट्टन झालें नाहीं. नंतर कांहीं महिने मी नागपुरास होतों. तेथून १९०४ चे आश्विनांत उमरावतीस परत आलों. मी एकटाच होतों, व एका स्नेहाचे घरीं राहात होतों.

सोमवारचा दिवस, वैकुंठ चतुर्दशीची पहाट, ते वेळीं श्रीगुलाबराव महाराज व पूर्वीं दिसलेलें श्रीव्यास महर्षि यांचें मला युगपत् दर्शन झालें. अथवा श्रीगुलाबराव महाराजांचे हवालीं मला करण्याकरितां श्रीव्यास महर्षि फिरून मला भेटले. त्यांनीं, उपदिष्ट श्लोक सुवर्णाक्षरांनीं लिहिलेला श्रीगुलाबरावांचे पदकमलावर मला दाखविला व दोघेही अंतर्धान पावले. मी जागा झालों व श्रीगुलाबराव महाराज त्या वेळीं रा० मुळे मास्तरचे घरीं राहात होते त्यांचे जवळ एकदम निघून आलों. ती वेळ फारच सकाळची होती. कोणी जागें नव्हतें. महाराजही पांघरूण घेऊन निजले होते. मी बराच वेळ महाराजांचे पायशार्शीं उभा होतों.

मी आलों हें फक्त श्रीनिवासशास्त्री यांसच माहित झालें. कारण ते जवळच निजले असून कशाकरितां कीं जागे झाले होते. तेही मजशीं कांहीं विशेष बोलले नाहींत. मी मग कांहीं वेळानें परत बिऱ्हाडीं येऊन आपले कामास लागलों. ते दिवसापासून तो गुरुप्रसादाचा दिवस समजून मी वैकुंठ चतुर्दशीस उपोषण वगैरे करीत असतो.

या सर्व चमत्काराचा स्फोट मी कधींच कोणापाशीं केला नव्हता. पुढील वर्षी म्हणजे इ० स० १९०५ सालीं शुक्लेश्वर वाठोडा येथें महाराजांची कात्यायनी व्रताचे प्रसंगीं गांठ पडली व दोनचार दिवस राहण्यास मला संधि मिळाली. तेव्हां श्रीनिवासशास्त्री यांजकडूनचकी काय या गोष्टीचा उकल झाला.''

भगवान वेदव्यास व भगवत्पूज्यपाद श्रीमच्छंकराचार्य यांच्या भेटीचा प्रसंग शांकरदिग्विजयांत सातव्या अध्यायांत वर्णन केला आहे. त्यांत व्यासमहर्षींनीं शंकराचार्यांना उद्देशून म्हटलें आहे ''त्वमस्मदादेः पदवीं गतोऽभूरखण्डपांडित्यमबोधयंते ।'' ह्या व्यासवचनाची वरील वृत्तांतावरून आठवण होते व श्रीमहाराजाच्या योगसामर्थ्याचें कौतुक वाटतें.

अशा दृष्टादृष्टचमत्कारांच्या अनुभूतीमुळें निष्कंटक व सोज्वळ बनलेल्या परमार्थ पथावरून श्रीमहाराजांच्या सहवासांत मोठ्या आनंदानें भगवद्गुणगान श्रवण करीत सहवासी मंडळी मार्ग आक्रमण करूं लागली. इतक्यांत हेमंतऋतूला आरंभ झाला. उमरावती पासून आठ कोसांवर पयोष्णीच्या कांठीं शुक्लेश्वर वाठोडा म्हणून एक रमणीय स्थान आहे. तेथें कार्तिक वद्य १ गुरुवार पासून महाराजांनीं कात्यायनी व्रताला आरंभ केला. ते वेळीं महाराज जवळच्या मंडळीला म्हणाले, गडेहो ! आपण सर्व गोपी आहोंत अशी भावना करा व श्रीमद्भागवतांतील कथेंत वर्णन केल्याप्रमाणें गोपकुमारींनीं कात्यायनीव्रत करून श्रीकृष्णाच्या रासक्रीडेचा अधिकार मिळविला तसा आपणही मिळवूं या.

अशा मधुरफलसूचक प्रेमळ वचनांनीं त्यांनीं मंडळीला प्रोत्साहन देऊन त्यांची सहानुभूति मिळविली.

व्रतसंबंधीं पूजा वगैरे सांगण्याकरितां वेद० गोविंदशास्त्री पंचभाई यांची नेहमींकरितां महाराजांनीं योजना केली होतीच.

व्रतसंबंधीं पूजा व भागवत ज्ञानेश्वरीचें श्रवण वगैरे नित्यक्रम आटपल्यानंतर महाराजांचा नेहमींचा सच्छास्त्रनिरूपणाचा व भगवद्गुणवर्णनाचा व्यासंग अहोरात्र चालत असे. उलूखलबंधन, यमलार्जुनोद्धार इत्यादि आख्यानें या कार्यक्रमांतच निर्माण झालीं.

उमरावतीच्या मंडळीपैकीं रा. रा. वासुदेवराव मुळें यांस नागपूर येथें नीलसिटीस्कुलांत नोकरी मिळाल्यामुळें नुकतेच दीडमहिन्यापूर्वी ते गेले होते. बाकीची श्रीनिवासशास्त्री आदिकरून मंडळी बहुतकरून दर शनिवारीं दुपारच्या सुटींत उमरावतीहून वाठोड्यास जाऊन सोमवारीं सकाळीं परत येत असत.

वरील मंडळीस रागनिवृत्तिपूर्वक सद्गुरुभजनाचें तत्व कळावें व त्यांची बुद्धि वाढावी या हेतूनें सुहृत्प्रेमाच्या मधुर शद्बांनीं लिहिलेलीं पत्रें पाठवून शिक्षण देण्याचा या वेळीं महाराजांनीं उपक्रम केला व त्याप्रमाणें श्रीनिवासशास्त्रीस दोन[1] पत्रें वाठोड्याहून पाठविलीं.

पहिल्या पत्रांत चित्तैकाग्र्य व सत्संग यांचें महत्व मोठ्या प्रेमळ शद्बांनीं ठसवून देण्याचा यत्न केला आहे. उदाहरणार्थ कांहीं ओव्या:—जय जय श्री सद्गुरु अखंडैकरस सुखाकारू। करोनि आमुचा स्वीकारू। स्वपद दास्य देयावें॥ आतां सावधान श्रोतीं। सुकुमार कराव्या वृत्ती। अंतरबाह्य माधुर्य स्थिती। आठवावी॥ परब्रह्माचा उध्दार करावा। ब्रह्मभाव ब्रह्मीं मुरवावा। साक्षित्वें व्यवहार पहावा। ब्रह्मरूप॥ स्त्रियांसी सांगावा पतिसेवा धर्म। पुत्रासी सांगावें अध्ययन कर्म। सच्छिष्या सांगावा सांख्यक्रम। जना वर्णाश्रम उपदेशावे॥ करोनि गुरुकृपाभावना। प्रेमार्द्र करावें मना। अभिषेकावा राणा। वैकुंठींचा॥

---

१ सूक्तिरत्नावलि द्वि० यष्टि उत्तरार्ध पृ० १३ व १६ पहा.

पाषाण आणि रत्न । शेण आणि सुवर्ण । पापी आणि संतसज्जन । पहावे चेतन स्फूर्तिरूप ।। स्वसत्तेनें रक्षाव्याश्रुती । स्वचेतनें स्थापाव्या वृत्ती । स्वानंद योगें श्रीहरी भक्ति । गुरुरूपाकृति करावी ।। विषयांसी देयावे वर्णाश्रम । इंद्रियांसी देयावे यमनियम । आत्म्यासी द्यावा हरिप्रेम । एकत्वेंचि ।। अथवा हें सर्व सोडावें । एका गुरुकृपेनें स्मरावें । तेणेंही होआवें । कृतकार्य ।। + + विश्वाहूनि थोर व्हावें । किंवा जगा धाकुटें रहावें । नातरी दोन्ही त्यागोनि होआवें । ज्ञानेश्वर बाळ ।। हें लिखित नाकळे जरी स्थिती । तरी स्मराव्या माझ्या पूर्वोक्ती । ज्ञानेश्वरीचर्चा भजन आरती । करीत असावें ।। तुम्ही महासमर्थ विद्वज्जन । मी मंदमती अज्ञान । हे बोबडे बोल स्वीकरोन । बाळकौतुक करावें ।। अथवा माझेंचि बाळ होआवें । किंवा मज सच्छिष्य म्हणावें । भलत्याही रीति भोगावें । स्वसुखातें ।। अथवा मज मूर्ख मानोनी । तुम्ही करावी ब्रह्ममय वाणी । किंवा मज मानोनि ज्ञानी । विश्वास वचनीं ठेवावा ।। मज पायीं लोळवावें । अथवा तुम्ही शरण यावें । कोणेही प्रकारें करावें । बरवेंपण आपुलें ।। तुम्ही आम्ही एक म्हणोन । बोलिलों मी धीट वचन । आपुला बाळ मानोन । कृपेनें नयन उघडावें ।। आपण मज लाजवावें । स्वसुखीं सदा रहावें । बोललियाचें नाणावें । वैषम्य मनीं ।। तुमचें नाम श्रीनिवास । तरी एकत्वें भजावा लक्ष्मीविलास । मग आम्हीच तुम्हांस । ज्ञानेश्वर म्हणूं ।। मज तारोनि नेयावें । अथवा माझ्यासवें तरावें । किंवा ज्ञानेश्वर चरणीं करावे । तनुमन अर्पण ।।

द्वि० यष्टि. उत्तरार्ध पृ. १५.

दुसऱ्या पत्रांत परमार्थशिक्षणमीमांसा आहे. परमार्थांत प्राथमिक शिक्षण वेदान्ताचें द्यावें किंवा सांख्याचें द्यावें याविषयीं श्रीनिवास शास्त्रयांचा व महाराजांचा वाद होत असे. त्याचा निर्णय करण्या करितां महाराजांनीं हें पत्र लिहिलें आहे. यांत प्राथमिक-शिक्षण वेदान्ताचें न देतां सांख्याचेंच कां दिलें पाहिजे याविषयीं महाराज म्हणतातः—

" शिक्षण म्हणजे सुसंस्कार भांडाराचें दान १ करणें होय. संस्कार वस्तुज्ञानजन्य असतो. अपरिच्छिन्नानंदप्राप्ति हें शिक्षणाचें फल होय.

यथार्थ वस्तूचें ज्ञान हेंच अपरिच्छिन्नानंद प्राप्तीला हेतुक असतें. म्हणून तदीय संस्कार तें शिक्षण म्हणावें. आणि फलप्राप्ति झाल्यानंतर शिक्षणाची आवश्यकता नाहीं. आत्माशिक्षणाचें अद्वैत हें फल आहे. आणि तें जातिसमावेशसाध्य आहे. तत्साधक संस्कार संशयनिवृत्तिद्वारा सुसंस्कार प्रदान हेंच शिक्षणाचें तत्व आहे. आणि तें सांख्यद्वारानें सिद्ध होतें." याप्रमाणें शिक्षणाचें तत्व सांगून पुढें नुसत्या वेदान्तानें परोक्षज्ञान कसें होतें व संशयनिवृत्तिपूर्वक अपरोक्ष ज्ञान होण्याला सांख्यद्वारा वेदान्त शिक्षणाची किती आवश्यकता आहे हें महाराजांनीं सोदाहरण सिद्ध केलें आहे.

इतर मतांतील ग्रंथांची समीक्षा वगैरे करण्याचा महाराजांचा क्रमही पूर्ववत चालूच होता. पुढें मार्गशीर्ष शुद्ध १४ स त्यांनीं चांदूर बाजार येथील कुर्याभाईस जें एक पत्र पाठविलें त्यांत असा उल्लेख आढळतो:—"साधेराज मानभावांचे महंत यांच्या म्हणण्याप्रमाणें 'हम्' हें स्वार्थीं अव्यय मेदिनी कोशांत दिसत नाहीं. सध्यां माझा काशीपतिकृत वैय्याकरणसिद्धांत बिंदुसार चालला आहे. त्याचीं सूत्रें ६५००० आहेत. कैवल्य दीपिका मीं पाहिली. ती टीका चंद्रिका व्याकरणानुसार रचली आहे. चंद्रिका ही जैनप्रणीत असल्यामुळें पुष्कळ स्थळीं वेदविरुद्ध आहे. आणि पारस्कराचार्यकृत व्याकरणानें तिजवर विधिसूत्रानें दोषही प्राप्त होतात. म्हणून ती प्रमाण नाहीं." असो.

दिसेंबरच्या सुट्या लागतांच सर्व मंडळी वाठोड्यास जमली. कात्यायनी व्रतारंभापासून ३३ दिवसांनीं मार्गशीर्ष वद्य ५ ता० २७।१२।०४ रोजीं व्रताची सांगता झाली. नंतर शुक्लेश्वर दर्शनास महाराज गेले असतां तेथें एक अध्याय महाराजांनीं नवीन म्हटला. त्यांतील निरूपणाचा विषय श्रुती गोपी कशा झाल्या हा होता. या प्रसंगीं महाराजांनीं एक एक श्रुती म्हणून ती श्रुती गोपी कशी झाली या विषयीं विवेचन केलें. व्रतसमाप्तीचे सुमारास बापूगडीही नागपुराहून आला.

होता. महाराजांचीं गाणीं, ज्ञानेश्वरी, अध्याय, आख्यानें वगैरे ऐकून व मंडळींचा परस्पर निरपेक्ष प्रेम पाहून त्याचें मन अत्यंत लुब्ध झालें व सर्वांचा दृढ परिचय झाला. विशेषतः सौ० मनकरणिका आईविषयीं तर त्याला फारच पूज्यबुद्धि वाटली. तेथें एक विशेष गोष्ट बापू गडीच्या नजरेस आली ती अशी कीं, शौचेचे वेळीं महाराज कांहीं भूतांस उद्देशून भाषण करीत असत. कोणास ह्मणत ' तू अमक्याचा ताप घे, तूं अमुक माणसास ताप आण, तूं अमुक कल्पपर्यंत या योनींत राहून पुढें उत्तर कुरूंत किंवा अमुक द्वीपांत जन्म घे ' याप्रमाणें कोणास कांहीं कोणास कांहीं सांगत.

कात्यायनी व्रताची सांगता झाल्यावर एक दोन दिवसाकरितां महाराज खोलापुरास गेले होते. तेथले विश्वासराव देशमुख हे महाराजांच्या कृपेनें नुकतेंच जीवावरच्या मांदगीतून सावरले होते व त्यांच्या दर्शनाकरितां फार आतुर झाले होते.

तेथें महाराजांचें एक निरूपण झालें. त्याचा विषय ध्यान व मानसपूजा असून आपल्या मनांत आलेल्या दुष्ट वृत्ती ईश्वरार्पण करून चित्ताची शुद्धता कशी करून घ्यावी इत्यादि प्रतिपादन त्यांत होतें. नंतर तेथील कांहीं एका विशेष प्रसंगाकरितां मंडळीला व्यवहारपटुत्वाचें शिक्षण देऊन महाराज उमरावतीस परत आले.

पुढें थिऑसफीच्या ' पुनर्जन्म ' व ' तेजोवलय ' नामक दोन ग्रंथावर मार्मिक आक्षेप काढून 'काळ' वर्तमानपत्राकडे पाठविण्यास महाराजांनीं एक लेख तयार केला तो येणेप्रमाणें:—

श्रीसद्गुरु ज्ञानेश्वर महाराजकी जय.

रा० रा० काळकर्ते यांस सां० प्राणिपात विनंती वि० कांतज सृष्टींत कांतवीर्य गुणापरिहार्यत्वास्तव पतिव्रता स्त्रियांना द्वेष्य असें कांहींच भासत नाहीं, तरी प्रियत्वाची सीमा मात्र संपत नसते. अशांतही 'यद्यद्विभूतिमत्सत्वं श्रीमदूर्जितमेववा । तत्तदेवावगच्छत्वं मम तेजोंशसंभवम्॥१॥'

ही भर्तृआज्ञा परिपालन न करून वेश्यापणाचा बुरखा माथ्यावर घेण्याला कोण स्त्री सरसावणार आहे ? आणि सरसावली तरी काय फळ मिळणार ? म्हणून कांताज्ञानुसार विभूतिमत्सत्वस्थ गुरुत्व ग्रहण करून शंकाप्रवाहपतित मत्स्यांनीं तदधिष्ठातृत्तरजालांत बद्ध होऊन मोक्षसुख घेणें श्रेयस्कर होय, पण असें सुख शास्त्रदृष्टीनें दाखवून देऊन जुन्या नव्या विचाराचें साम्य जोडणारें "थिऑसफी" शिवाय दुसरें साधनच उरलें नाहीं. म्हणून तदुत्तर जालांत जातां यावें म्हणून हा शंकाप्रवाह पुढें करीत आहे.

थिऑसफीच्या पुनर्जन्मनामक ग्रंथांत जीवोत्क्रांति मानिली आहे आणि तेजोवलय ग्रंथांत सत्वरजस्तम यांचे क्रमानें श्वेतरक्तकृष्ण असे वर्ण सांगितलें आहेत, त्यावर अशी शंका येते कीं अतिवाहिक जीवसंबंधीं गुणबद्धता मानावयाची कीं नाहीं ? आणि वर्ण हे गुणपरिणत कार्य मानावयाचे कीं काय ? दोन्हीपक्षीं क्रमभंग आणि युगपदुत्पतन हे दोन्ही दोष येतात. कारण कोणत्याही दृष्टींत गुणप्रत्यक्षता पुरातन सांख्यादिकांनीं मानलेली नाहीं. शांकरभाष्यांतही गुणाला रूपत्वाचा निषेध केला आहे. त्याहूनही हा नवा शोध असला तर रूपात्मक पंचीकृतांचा व गुणात्मक अपंचीकृतांचा परिणत कार्यानें विरोधपरिहार झाला असतांही परिणाम—क्रमभंगपूर्वक कार्य कारणात्मक कसें होतें ? आणि होत नाहीं म्हटल्यास सर्व पुरातन ग्रंथांस अनिष्टापात्ति येते. तसेंच वैषम्यजातिपरिणत कार्यत्वामुळें जीवांचें अवस्थांतरही संभवणार नाहीं.

या दोन प्रश्नांचें कोणत्याही थिऑसफिस्टानें कृपा करून उत्तर द्यावें. लाजिकली प्रश्न बरोबर नसतील तर ते दोष दाखवावे म्हणजे आम्ही भरून काढूं. दुसरीकडून उत्तर मिळण्याची आशा राहिली नाहीं, म्हणून या संस्थेस विचारलें. आतां उत्तराची प्रतीक्षा करीत बसलों आहे.

उमरावती,
ता० २०।२।०५

आपला एक
थिऑसफी जिज्ञासू.

ह्या लेख पुढें प्रसिद्धीकरितां काळपत्राकडे गेला नाहीं. तथापि यांतील प्रश्न मार्मिक असल्यामुळें तो येथें घेतला आहे. रा. रा. वासुदेवराव मुळ्यांकडून नागपुराहून महाराजांस पत्रें येत होतीं. महाराजही त्यांस बोधप्रद पत्रें पाठवून परमार्थ शिक्षण देऊं लागले. या सुमारास महाराजांकडून त्यांस दोन पत्रोत्तरें गेलीं. ( द्वि० याष्टि उत्तरार्ध पृ० २३ व २५ पहा. ) त्यांत प्रथम, अनेक ब्रह्मांडांची घडामोड करून जीवाला संसारपाशांत गोवणाऱ्या चित्ताचें वर्णन करून व विरक्तीवांचून नुसत्या शास्त्राध्ययनाचें व योगादि साधनांचें वैय्यर्थ्य सांगून मनोजयाची आवश्यकता सिद्ध केली आहे व नंतर परिचय, क्रिया आणि सिद्धि ह्या तृप्तीच्या तीन कक्षांचें निरूपण करून वैराग्यपूर्वक सत्संग व सच्छास्त्र श्रवण हे मनोजयाचे उपाय सांगितले आहेत, व दुसऱ्या पत्रांत, चमत्कार दाखवून संसार वाढविणाऱ्या पुरुषांनांच ज्ञानसिद्धि असते ह्या लौकिक समजुतीचा निषेध करून खऱ्या आत्मावर विश्वास ठेवण्याविषयीं अत्यंत सहवासांतल्या माणसांचीही कशी हेळसांड होते याविषयीं तुकाराममहाराजांच्या स्त्रियेचें उदाहरण दिलें आहे व स्वतःवर ( महाराजांवर ) प्रेमपूर्वक दृढ श्रद्धा ठेवून व मनांतून सर्व कामना काढून टाकून स्वहित साधण्याविषयीं कर्तव्याची जाणीव उत्पन्न केली आहे व शेवटीं ओवी छंदांत स्वसुखानुभव कथन केला आहे.

याच सुमारास कांहीं कारणाकरितां थिऑसफिस्ट होण्याची इच्छा होऊन महाराज आकोल्यास गेले. तेथें त्यांचे पूर्वपरिचयाचे पारशी गृहस्थ मिस्तर नसरवानजी मंचरजी देसाई हे होते. त्यांची भेट घेऊन महाराज थिऑसफिस्ट होऊन आले व थिऑसफीचा डिप्लोमाही लवकरच ता० १३ मार्च इ० स० १९०५ रोजीं महाराजांच्या नांवानें उमरावतीस आला.

यापूर्वीं मुळे मास्तरजवळ थिऑसफीसंबंधानें बोलतांना महाराज ह्मणत कीं नवीन सुशिक्षित मंडळी बिझांटबाईच्या वक्तृत्वास भुलून महत्वाकांक्षेकरिता थिऑसफिस्ट होतात. ह्या गोष्टीचें स्मरण ठेवून वासुदेवराव

मुळ्यांस या सुमारास पाठविलेल्या एका पत्रांत महाराज म्हणतात:—
" मी थिऑसाफिस्ट महत्वाकांक्षेकरितां किंवा आकर्षण पडलें म्हणून झालों नाहीं तर यांत माझा कांहीं हेतु आहे. " ह्या पत्राचा उल्लेख वर आलेला आहे.

थिऑसफिस्ट होण्याकरितां महाराज आकोल्यास गेले होते तेव्हां ते तेथले प्रसिद्ध वेद शा० सं० बाबाजी शास्त्री घोंगे यांजकडेस उतरले होते. यांच्या संबंधाची एक गोष्ट येथें सांगावयाची आहे. हे घोंगेशास्त्री मोठे वैदिक, विद्वान, सदाचरणी व प्रेमळ भगवद्भक्त म्हणून अझूनही त्यांचा लौकिक आहे. महाराजांचें आगमन आपल्या येथें झालें आहे असें कळतांच ते देवपूजा करीत होते तरी तसेंच आसनावरून उठून सोंवळ्यानेंच महाराजांजवळ आले, मोठ्या प्रेमानें सद्‌गदीत होऊन महाराजांस त्यांनीं आलिंगन दिलें, त्यांचें यथोचित् आदरातिथ्य केलें, भोजन झाल्यावर स्वतः आपल्या हातांनीं त्यांचें उच्छिष्ट पात्र काढलें व " धन्य माझें भाग्य कीं अशांचें उच्छिष्ट आज माझ्या घरीं पडलें " असे त्यांनीं प्रेमोद्‌गार काढले.

करितां देवतार्चन । घरा आले संतसज्जन ॥ १ ॥
देव सारावे परते । संत पूजावे आरते ॥ २ ॥
शालिग्राम विष्णुमूर्ति । संत हो कां भलते याती ॥ ३ ॥
तुका म्हणे आर्धी । पूजा वैष्णवांची मांदी ॥ ४ ॥

या भागवत मर्यादेला अगदीं ततोतंत जुळणारें हें शास्त्रीबोवाचें उदाहरण आहे.

याप्रमाणें शके १८२६ क्रोधीनाम संवत्सरांतील वृत्तांत आहे. माधानास असतांना " ब्राह्मणाचीं मुलें मिळवून त्यांना विद्या शिकवूं " इत्यादि प्रकारचे रामचंद्र बापूजवळ महाराजांनीं केलेले बेत या संवत्सरांत फलद्रप होऊं लागले, भक्तिमार्गाचें बीजारोपण झालें, ज्या सहज भगवद्गुणवर्णनाच्या आवडीनें व सद्विद्यादानाच्या उत्कंठेनें प्रेरित झाल्यामुळें परोपकारैकपरायण होऊन महाराज सकुटुंब बाहेर पडले होते त्या

ार्यास विस्तृत क्षेत्र मिळूं लागतांच महाराजांचें अलोक सामर्थ्य, रज्ञान, व दैवीशक्तीसिद्ध विद्वत्ता प्रगट होऊन, गोड निरूपणें, पद्यें, व नवीन नवीन रसाळ आख्यानें यांचाही सहवासी जनांवर व त्यांच्या प्रेममयी अमृतवाणींतून होऊं लागला. त्यायोगानें अंत:करणांत दाटलेलें कुशंकातमाचें काहूर दूर होऊन शुद्ध वेदमार्ग त्यांना स्पष्ट दिसूं लागला; वेदांतपदार्थोद्देशदीपिका, शासिद्धांततुसार आदिकरून मननार्थ व निदिध्यासनार्थ ग्रंथ होऊं लागले; भक्तिज्ञानवैराग्यपोषक पत्रव्यवहार परिचित वाढला, जन्माष्टमी, कात्यायनी, इत्यादि व्रतांचे उत्सव प्रमाणावर साक्षेपपूर्वक सुरू झाले; मधुराद्वैताचा उत्कर्ष होऊं प्रेमळ सज्जनांच्या भेटी होऊन त्यांच्या प्रेमास भरती येऊं लोकांस ज्ञानेश्वरीचा प्रसाद देऊन तिच्या नित्य पठणाचा शक्य सार करण्याच्या प्रयत्नामुळें भाविकजनांचें कल्याण होऊं लागलें. त्रे महाराजांचे कुरळ केश वृद्धिंगत होऊन आतां वेणीफणी होऊं व श्रीकृष्णपत्नित्वाला साजणारा त्यांचा गोपीवेश नित्य बनला; ांच्या सहवासांत पांचचार सुशिक्षित मंडळी राहूं लागली; व विमंडन, व्यंकटराव, हरिभाऊ हे तर त्यांचे व्यवस्थापक, ग्रंथ-व लेखक बनून ग्रंथ लेखनाचें कार्य अव्याहत चालू झालें व इतरगांवीं जाणें झाल्यास ही नेहमींची मंडळी त्यांच्या बरोबरच ाली. इत्याद्यनेक गोष्टीमुळें हें संवत्सर महाराजांच्या चरित्रांत आहे.

---

श्रीज्ञानेश्वर माउली समर्थ.

## .८२७ विश्वावसुनाम संवत्सरे. इ० स० १९०५–१९०६.



ारंभीं महाराजांस बाहेर गांवची दोन बोलावणीं होतीं. एक

कारंजा येथें रा० रा० लक्ष्मणराव दहींहांडेकरांकडून दत्तविधान समारंभाकरितां, व दुसरें महाराजांच्या आजी (मातामही) कडून होतें. हिनें बालपणीं महाराजांचें संगोपन केलेलें होतें व महाराज तिला "बाई" म्हणत असत वगैरे माहिती मागें माधान प्रकरणांत आलेली आहे. ही "बाई" (हिचें नांव सावित्री नानी होतें) आतां महाराजांच्या भेटीविषयीं फार आतुर होऊन तिनें निरोप पाठविला होता. वरील दोन्ही ठिकाणीं पंधरावीस दिवसांकरितां महाराज गेले होते. बरोबर नाना कविमंडन, कृष्णराव ठोंबरे, गणपत खंडो भालेराव, गोविंद रामचंद्र भक्त, गणपतराव सावळीकर वगैरे सहवासांतील मंडळी होती. सौ० मनकरणिका आईही बरोबर होती. ती गरोदर होती. महाराजांनीं तिला तसबिरींतील श्रीकृष्णमूर्तीचें ध्यान सांगितलें होतें व हरिभाऊ केवले हे संतानगोपाल स्तोत्राचें नित्य पठण करून आईला तीर्थ देत असत. आजीबाईची व महाराजांची भेट काकडा येथें झाली. त्यावेळीं महाराज बाईला म्हणाले "बाई तुझ्या नातसुनेला दिवस आहेत. मुलगाच होईल." यापूर्वी मध्यंतरीं कोणाच्या सांगण्यावरून म्हातारीचा असा समज झाला होता कीं गुलाबराव देवपिसा झाला असून त्याचें लक्ष्य घरादाराकडे, संसाराकडे नाहीं. त्यामुळें एकवेळ ती भोळी म्हातारी महाराजांस म्हणाली होती कीं "अरे, दुसऱ्याचें तरी बीज घेऊन वंश चालीव." यावर "असें होईल तर मी कोर्टांत जाऊन सांगेन कीं माझी पत्नि व्यभिचारिणी आहे" असें महाराजांनीं उत्तरही दिलें होतें. असो.

म्हातारीचा नातू म्हणजे मुलाचा मुलगा याला महाराजांनीं पांचवें वर्षी गंडांतर सांगितलें होतें व तें टळण्याचा उपायही सांगितला होता, परंतु मुलाच्या आईनें तो उपाय केला नाहीं म्हणून पांचवें वर्ष लागतांच मुलगा मेला वगैरे हकीकत मागें सिरसगांव प्रकरणांत आली आहे. या मुलाचें दुःख आठवून म्हातारी रडूं लागली. "झाल्या

ास कांहीं इलाज नाहीं. तूं दुःख करूं नको " इत्यादि गोष्टींनीं तिचें ःवन करून "तुझ्यासाठीं मी बगीचा तयार करून ठेवला आहे" असें ाराजांनीं तिला आश्वासन दिलें.

उमरावतीस परत आल्यावर घरोघरीं गवरणी होतांना पाहून ाराजांनींही भिवापूरवाल्याचे बगीच्यांत गवरणी केल्या. त्या वीं तेथें मनास प्रसन्न करणारा बुक्याचा विलक्षण सुगंध सुटला ा व मंडळीला तो दिवस एखाद्या महोत्सवाप्रमाणें आनंदकारक ला.

श्रीनिवास शास्त्रीचा मुलगा बापूगडी हा कात्यायनीव्रत समाप्तीचे गारास नागपुराहून आला होता तो आतांपर्यंत महाराजांच्या सहवा-ला लुब्ध होऊन उमरावतीसच होता. त्याला आतां " मेडिकल कालरशिप " मिळून पाटण्यास जाण्याचा विचार ठरला होता. रंतु " गेल्यास अरिष्ट येईल म्हणून जाऊं नको " असें महाराज बोलले. ावर " म्याट्रिक पास नसतांही ज्या अर्थी आपल्यास स्कालरशिप ाळाली व डाक्टरीची परीक्षा पास होण्याची पुढें उमेद आहे त्या ार्थी ही संधी घालवूं नये " असें बापूगडीस वाटून त्यानें जाण्याचा ाश्चय कायम केला. शेवटीं, अभक्ष्य भक्षण न करणें, नित्य मृत्युं-य मंत्राचा जप करणें, वगैरे नियम सांगून महाराजांनीं त्याला निरोप दिला. ढें नागपुरास गेल्यावर बापूगडीनें आपल्या हेतूविषयीं महाराजांस ा० २६।४।१९०५ रोजीं पत्र पाठविलें. त्यांत मुख्यत्वेंकरून पुढील ोष्टींचा उल्लेख आहे:—

" माझे जाण्याबद्दल सर्व पक्कें जुळून आल्यासारखें दिसत आहे. ासे स्कालरशिप मिळण्याकरितां मला प्रयत्न करावे लागले नाहींत, ासेंच ती घालविण्याविषयींही प्रयत्न करूं नये असें मला वाटतें. आपण सांगितल्याप्रमाणें श्रीमृत्युंजय मंत्राचा जप मी करीन. इतरही क्रम आपण लिहून पाठवाल त्याप्रमाणें करीन. तिथें जाऊन अभक्ष्य वगैरे कालत्रितयीं भक्षण करावयाचें नाहींच व प्रसंगही येत नाहीं.

अरिष्टासंबंधानें श्रीज्ञानेश्वर महाराज समर्थ असतांना माझ्या बापड्याच्या काळजीनें काय होणार आहे ? माझे मनांत आपण सांगितलेल्या गोष्टींपैकीं ज्ञानेश्वरींतील सहाव्या अध्यायांत सांगितल्याप्रमाणें शिकावयाचें आहे. स्थानावश्यकता आहे. तत्सदृशस्थानीं नेउन आपण स्वत: अगर कोणाकडून सांगवीत असल्यास मला स्कालरशिप वगैरे कशाची पर्वा नाहीं. आपण इथेंच हळुहळु ग्रहण करावी असें म्हणत असल्यास तिकडून आल्यानंतरही होऊं शकेल. अपात्रता होण्याचा संभव आहे असें वाटतें. माझे हातून आपण कांहीं तरी काम करवून घ्यावें अशी उत्कट इच्छा आहे. आपण मात्र वरचेवर पत्र पाठवून धर्माविषयीं अरुचि उत्पन्न होऊं देऊं नये इतकी सविनय कर जोडून प्रार्थना आहे. ''

या सुमारास उमरावती येथें " कुंभारेबोवा '' म्हणून एक खोलापूरचा ब्राह्मण आला होता. तो आपणास सेगांवकर महाराजांचा शिष्य म्हणवीत असे. त्यानें आपल्या दंडास एक बाळकृष्णाची मूर्ति बांधली होती. महाराजांनीं त्याचें आदरातिथ्य व व्यवस्था वगैरे उत्तम ठेविली होती व स्वतः जातीनें त्याची पायचेपी वगैरे करूं लागले. पुढें एके दिवशीं तो ज्ञानेश्वर महाराजांची तसबीर फोडून टाकण्यास सांगूं लागला व " ज्ञानेश्वर महाराज हे समाधिस्थ आहेत. त्यांची भक्ति कशास पाहिजे ? जे सत्पुरुष आज प्रत्यक्ष आहेत त्यांची भक्ति करा. तुम्ही सेगांवास चला म्हणजे तुह्मांस प्रत्यक्ष देव दाखवितो व मंत्र देवावितो. तुह्मी ज्ञानेश्वरांचें नांव घेऊं नका. '' इत्यादि वल्गना करूं लागला. एकादशीचे दिवशीं त्यानें कांदाभाकर मुद्दाम मागून घेऊन भक्षण केली.

ह्या कुंभारेबोवा संबंधानें स्वतः महाराज एके ठिकाणीं ह्मणतात:— " कुंभारेबोवा नांवाचे एक साधू उमरावतीस आले. तेव्हां मी मुद्दामच त्यांची सेवा करूं लागलों. यामुळें पुष्कळ मंडळीला ते माझ्यापेक्षां विदेही आहेत असेंही वाटलें. पुढें कुंभारे बोवांनीं तातांना सोडून

द्या असें मला सांगितलें. त्यामुळें मंडळी बिथरून कुंभारेबोवाला तेथून जावें लागलें. महाराज ब्रह्मनिष्ठ असल्यामुळें ते कसेंही वागतात असा यामुळें जवळच्या मंडळीचा समज झाला. ''

वरील वाक्यसंघाला महाराजांनीं " परीक्षा '' असें नांव दिलें आहे. यांत खरोखरच मंडळीच्या वैराग्याची परीक्षा होती, हें महाराजांनीं या प्रसंगाला जे अभंग केले आहेत त्यांतील एका अभंगावरून दिसून येते. ताताना ( ज्ञानेश्वर महाराजांना ) सोडून द्या इ० जेव्हां कुंभारेबोवा बोलूं लागले तेव्हां महाराजांस तें सहन न होऊन तत्काळ ते तेथून निघून तारखेड्यावर रा० हरचंद पाटलाचे घरीं गेले व त्यांच्या माडीवर एकटेच भजन सुरू करून करुणमय अभंगवाणीनें त्यांनीं आपल्या ज्ञानेश्वर माउलीस आळविलें. पुढें श्रीनिवासशास्त्री आदि मंडळी महाराजांचा शोध काढीत तेथें जाऊन पोहचली व महाराजांची खरी स्थिती आपण ओळखूं शकलों नाहीं याविषयीं खेद प्रदर्शित करून त्यांस परत घेऊन गेली. या प्रसंगास झालेले महाराजांचे अभंग त्यांच्या गाथ्यांत ' प्रणयकलहपर ' अभंगांत छापले आहेत. ( अभंग १४५१ ते १४६२ पहा ) त्यांतून स्वतःच्या स्थितीचें व मंडळींच्या स्थितीचें वर्णन केलेले दोन अभंग येथें घेतो:—

१४५८ आळंदीपर्यंत घालीन लोळण । परी न घे मन मुक्तीकडे ॥१॥ भोगावे वाटती विषारीच नर्क । परी तो हीनार्क मोक्ष नको ॥२॥ तुझा नाहीं जेथें दास ज्ञानेश्वरा । ऐसा तूंही बरा न वाटसी ॥ ३ ॥ काय बोलूं आतां पुरे ही सलगी । धरोनियां आंगीं पायीं ठेवा ॥ ४ ॥ माझ्या प्रिय पुत्रां वैराग्याची सवे । नाहीं तुझे पाय साक्ष यासी ॥ ५ ॥ परी तुझें नांव देयावें तयांसी । म्हणोनि कष्टासी सोशियलें ॥६॥ संवत्सर केला जिवापाड श्रम । परी तुझा प्रेम दिला कांहीं ॥७॥ सकळांसहित येईन अलकावती । पाहीन मी मूर्ति तुमची डोळां ॥८॥ देहाचे परमाणू काढूनि वेगळे । पूजीन सकळे शिलावृक्ष ॥९॥ प्रिय पुत्रांलागीं आणीन देउळीं । मी तों द्वारपाळीं राहीन द्वारीं ॥१०॥ एवढीच आशा पूर्ण बा करावी । अन्य नच द्यावी सिद्धि मुक्ति ॥११॥ तुमचे प्रेमानें आठवितां पाय । जन्म

मृत्यु भय आहे कोणा ॥१२॥ मृगजळासाठीं कोणें केल्या नावा । वंध्यासुत गांवा कोण्या गेला ॥१३॥ संध्याकाळ घोळोनि केली साखर । भरिलें बिढार शशश्रृंगें ॥१४॥ इतुकाचि आम्हां भव सत्य वाटे । त्याच्यासाठीं फाटे कोण मोडी ॥१५॥ तोडोनियां झाडें अंधारा वाहावी । तैसीच पदवी अपवर्गाची ॥१६॥ भक्ति सांडोनियां मुक्ति जे मागती । नको आम्हांप्रति तन्मुख दावूं ॥१७॥ सकळांसहित प्रभू लोटांगण । दमलों निर्वाण आरडोनि ॥१८॥ आतां करा क्षमा न्यावे कडेवरी । सांभाळा कुसरी मज देवा ॥१९॥ आधीं तारा जन मग मज न्यावें । उतावेळ नोहें कदाकाळीं ॥ २० ॥ ऐसेंही असोनि कां मज सांडितां आणिकाची सत्ता नका करूं ॥२१॥ परीक्षा पाहतां नाहीं आम्हां बळ । किती वेळोवेळ बोंबलावें ॥२२॥ ज्ञानेश्वर प्रभु समाधि सांडोनि । उचला निर्वाणीं मज आतां ॥२३॥

१४६१ ज्ञानेश्वरा मज तुम्ही दिली स्थिती । नाहीं कोणाप्रति ज्ञान तीचें ॥१॥ वरिलिया स्थिती करिती अनुमाना । जैसें येतें मना बकती तैसें ॥ २ ॥ पाण-बुड्याविण सागरींचा हिरा । न शके दुसरा कदा काढों ॥३॥ चांदण्या पाहोनि हंस ते उडती । तैसे जन जाती सिद्धिपुढें ॥४॥ म्हणोनियां ऐसे येताती संकष्ट । आतां तुम्ही कष्ट निवारा ते ॥५॥ म्हणा ज्ञानेश्वर म्हणा ज्ञानेश्वर। उचलितो कर बळें आपणा ॥६॥

यानंतर बरोबरच्या मंडळीसह महाराज सिरसगांवबंड येथें गेले. गुरु-शिष्य संवादपर व श्रीकृष्णलीलापर कांहीं स्फुट अभंग पदें वगैरे तेथें झालीं. नंतर यावलीचे गणपतराव अवचित व आकाजीबापू देश-मुख यांच्या विनंतीवरून यावलीस जाऊन तेथें महाराज कांहीं दिवस राहिले.

इकडे नागपूर येथें रा० वासुदेवरावमुळें बरेंच दिवस महाराजांची भेट नसल्यामुळें भेटीसाठीं आतुर झाले होते. त्यांस आणखी दोन पत्रें महाराजांनीं परमार्थ शिक्षणाविषयीं पाठविलीं आहेत. (द्वि० यष्टि उत्तरार्ध पृ०२८व३० पहा.) त्यांतील पहिल्या पत्रांत, सत्संगातिवांचून नुसत्या साध-नाचा निषेध, [illegible]ला ब्रह्मज्ञान आणि साधन यांची समुच्चयपूर्वक

आवश्यकता, विद्वत्ता आणि ब्रह्मनिष्ठता या दोहोंचें सारखें महत्त्व व दोन्ही पक्षानें मंडळीला सारखें नेण्याची आपली खटपट, सद्गुरुमुखानें शास्त्रश्रवणाचें महत्त्व व श्रवणानंदानें समाधी, कोणत्याही भाषेंतून तत्त्वज्ञान ग्रहण करण्याची आपली प्रवृत्ति व इंग्रेजी भाषा मंत्ररहित असल्यामुळें तिच्यापासून तत्त्वज्ञानाला प्रतिबंध इ० विषय असून, दुसऱ्या पत्रांत, मनोनिग्रहाचा उपाय व स्वरूप दाखविण्याची प्रतिज्ञा, श्रीमद्भगवद्गीतेंत श्रीकृष्णांनीं अर्जुनाला सांगितलेला वैराग्य, चित्तशुद्धि वगैरे साधनक्रम व स्वरूपदर्शनाला ही संपत्ति आधीं आंगीं आणण्याची आवश्यकता व धैर्यपूर्वक प्रयत्न केल्यास एकाच जन्मांत इतकी तयारी होऊन श्रीकृष्णांप्रमाणें मी तुम्हांस विश्वरूप दाखवीन असें आश्वासन व शेवटीं विदुरव्याधप्रभृति ज्ञानसिद्धां सारखी आपलीही स्थिति व आचरण आहे याविषयीं सप्रमाण निरूपण व महात्म्यज्ञान कथन इ० विषय महत्त्वाचे आहेत.

आतांपर्यंतच्या व या पुढील सर्व पत्रांत मंडळीला वैराग्य बोधक युक्ती शिकविण्याकडे महाराजांचें मुख्य धोरण आहे व हें धोरण सनातन कालापासून श्रुतिसंताच्या शिकवणींत परंपरेनें आलेलें आहे. योगवासिष्ठाच्या निर्वाण प्रकरणांत म्हटलें आहे:—

> मनस्युपशमं याते त्यक्त भोगैषणे स्थिते ।
> कषायपाके निर्वृत्ते सर्वेंद्रियगणस्यच ॥
> यांति चेतसि विश्रांतिं विमला देशिकोक्तयः ॥

अर्थ—मन शांत होऊन तें भोगेच्छारहित झालें असतां, चित्ताचे राग द्वेषादि दोष पक्व झाले असतां व सर्व इंद्रियसमूह विषयविमुख झाला असतां गुरूच्या शुद्ध उक्ती चित्तांत स्थिर होतात असा नियम आहे

निर्वाण प्र० पूर्वार्ध सर्ग १०१ श्लो १०

यावरून सत्संग व सच्छास्त्र हे पचविण्याला वैराग्याचें केवढें महत्व आहे तें स्पष्ट दिसून येतें.

पुढें शाळेला मे महिन्याची सुटी लागतांच उमरावतीस निघून आले व महाराजही या आले.

वासुदेवराव मुळ्यांचे वडील बंधु वेद० बाळकृष्ण शा येथें रहात असतात. त्यांचा एक धाकटा मुलगा नुकताच म्हणून त्यांच्या चित्तास विक्षेप वाटत होता. याकरितां राजांनीं उमरावतीस बोलाविल्यावरून तेही आले होते. रावांचे सहाध्यायी रा० रा० विठ्ठलराव केकरे हे मंडल्यास त्यांनीं महाराजांची कीर्ति श्रवण केली होती म्हणून तेही दर्शनार्थ यावेळीं उमरावतीस आले होते. महाराज आळं जाणार होते व ही मंडळीही त्यांच्या सहवासांत अपूर्व संधी साधण्याकरितां उत्सुक होती. या मंडळीला एक आप्त रा० रा० गणपतराव करोडे हेही येऊन अष्टौप्रहर चालत असलेली महाराजांची सच्छास्त्रचर्चा, श्वरी भागवत, यांवरील निरूपणें, नवीन प्रकारची शैली, प्रेमळ भगवद्गुणसंकीर्तन, महाराजांची प्राप्त त्यांचें स्वभावसिद्ध निर्मळ आचरण, सौ० मायबाईंचें शुद्ध प्रेमळ वर्तन इत्यादि गोष्टींचा या मंडळीच्या मनावर परिणाम झाला.

रा० रा० विठ्ठलराव केकरे यांच्या व महाराजांच्या भेटीन प्रसंग असल्यामुळें यावेळीं त्यांच्या मनावर जो कांहीं परिण आपल्या विशेष स्वानुभवाचें ते येणेंप्रमाणें वर्णन करितातः—

" श्रीसद्गुरुमहाराजांचें दर्शन घेतल्यावर मला असें व महाराजांना पूर्वी कधींतरी पाहिलें असावें व असें मला विषयीं मी मनांत विचार करूं लागलों. अर्थात ह्या जन्मीं राजांना पाहिलेलें मला आठवत नव्हतें. पण असा भास असेंच मला ह्याच्यापूर्वीही बापू गोखले जे आष्टीच्या लढा

त्यांच्या तसबिरीकडे पाहून वाटलें होतें. या संबंधींची सर्व हकीकत महाराजांना पुढें मी कळविली आहे. ह्या सर्व प्रकारचा पूर्व जन्मार्शीच संबंध आहे असें माझ्या मतानें निश्चित ठरलें. असो. श्रीसद्गुरुमहाराजांची कवित्व-

---

१ ही हकीकत पुढें इ० स० १९०८ च्या जून महिन्यांत उमरावतीसच विठ्ठलरावांनीं स्वतःच्या सहीनिशीं महाराजांच्या "अदृश्यदीपिकेंत" लिहून दिली आहे ती अशीः—

मी लहान असतांना मला पंढरपूरच्या यात्रेला जाण्याचा प्रसंग आला. समागमें वडील व मातोश्री वगैरे घरचीं माणसें होतीं. बारशीहून पलीकडे पंढरपूरला जाण्याला तेव्हां रेलवे नव्हती. म्हणून बारशीहून बैलगाडीनें आम्ही पंढरपूरला जाण्यास निघालों. वाटेंत आष्टीला मुक्काम झाला. तेथें आम्ही दिवसा सुमारें बारा वाजतां पोहचलो. त्या ठिकाणीं पोहचल्यापासून माझ्या मनांत एक प्रकारचा भीतीचा विकार उत्पन्न होऊन तेथून केव्हां जाऊं असें झालें. तेथें असतांना माझ्या मनाची काय स्थिती होत होती हें सांगतां येत नाहीं. पण भीति मात्र होती. कांहीं वेळानें आम्ही ओढ्यावर गेलों. ओढा अगदीं मैदानांत असून जंगल वगैरे कांहींच नाहीं. ओढ्यांत पाणीही फार नाहीं. सारांश भीतीचा कांहींच संभव नसतांना तेथेंही मला भीति वाटतच होती. आष्टीचा पूर्वइतिहास मला त्यावेळीं मुळींच माहीत नव्हता. नंतर सुमारें ११-१२ वाजतां रात्रीं आम्ही तेथून निघालों. तें स्थळ सोडल्याबरोबर माझ्या मनाला फार बरें वाटूं लागलें व छातीवरलें ओझें हलकें झाल्याप्रमाणें आनंद वाटला. पहाटे पहाटे चंद्रभागेच्या कांठीं पोहचलों. तेथून पंढरपूरचा देखावा दिसूं लागला. तो देखावा व चंद्रभागेंतील नांवा वगैरे पाहून असा निश्चय झाला कीं हें स्थळ पूर्वी आपण कधींतरी पाहिलें असलें पाहिजे. परंतु आईला विचारतां ती म्हणाली आम्हींच येथें कधीं पूर्वी आलों नाहीं मग तूं कसा येशील? परंतु माझ्या मनावर जे परिणाम झाले होते ते मात्र तसेच कायम राहिलें. त्यानंतर चारपांच वर्षें झालीं असतील, मी जबलपूर कॉलेजांत शिकत असतांना कांहीं मंडळीबरोबर आमचे मित्र कृष्णराव पावणस्कर यांचे इथें गेलों. त्यांच्या बैठ-

शक्ति पाहून आणि कवितेचा ओघ पाहून असें वाटलें कीं कांहीं विचार न करितां सहजगत्या ह्या कविता एकामागून एक अशा सपाट्यानें निघत आहेत, तेव्हां अर्थातच ही दैवीशक्ति आहे; मानुषीय नाहीं. तसेंच दोन्ही डोळ्यांनीं अंध असून वेदांतलीं प्रमाणें ठीक पत्तेसूद देणें हें ह्या जन्माच्या अभ्यासानें संभवनीय नाहीं व ह्या गोष्टीचें निराकरण तेव्हां महाराजां-

---

कींत पुष्कळसे फोटो लागले होते. त्यांतला एक फोटो पाहून माझें मन तिकडे वेधल्यामुळें तो काढून मी हातांत घेतला व त्याच्याकडेसच पुष्कळ वेळ पहात बसलों. इकडे मंडळींच्या गप्पांच चालल्या होत्या. पण मी मात्र एकसारखा त्या फोटोकडे पहात होतों. त्या फोटोंतील गृहस्थ माझ्या फार परिचयाचा व अत्यंत प्रेमाचा आहे असें मला वाटून त्याला सोडावेसें वाटेना. शेवटीं मंडळी घरोघर जाऊं लागली असतां ते मला म्हणूं लागले कीं तेव्हांपासून तुम्ही फोटोच पहात आहांत तर त्यांत असें काय विलक्षण आहे? मी म्हणालों हा गृहस्थ माझ्या परिचयाचा दिसतो, पण ह्यांना मी कुठें व केव्हां पाहिला तें मुळींच आठवत नाहीं. त्यावर कृष्णराव हंसून म्हणाले यांनां तुम्ही पाहिलें असेल हें मुळींच संभवत नाहीं.

मी विचारलें हे कोण आहेत? कृष्णराव म्हणाले हे बापुगोखले आहेत. व ते आष्टीच्या लढाईत मारले गेले. लढाईत जाण्याच्या पूर्वी ते पंढरपूरला विठोबाच्या दर्शनास गेले होते व तेथून पैदल परत येत असतांना त्यावेळीं घेतलेला हा त्यांचा फोटो आहे. हें ऐकतांच आष्टीला मुक्कामाला उतरलों असतां जी माझ्या मनाची स्थिति झाली होती त्याची मला एकदम आठवण झाली व मी त्यांना विचारलें बार्शीहून पंढरपूरला जातांना जी रस्त्यांत आष्टी लागते तेथील ही गोष्ट आहे काय? ते होय म्हणाले. ह्या एकंदर गोष्टीवरून काय निष्कर्ष निघत असेल तें मला सांगतां येत नाहीं. वरील कृष्णराव पावणस्कर हे हल्लीं राजपुतान्यांत किशनगड स्टेटमध्यें दिवाण आहेत.

ता० १४।६।१९०८ उमरावती. } सही V B. Kekre

ष्याच तोंडून झालें. एका गृहस्थानें शंका केली कीं "शूद्रानें वेदाचा उच्चार करूं नये असें म्हणतात" त्यावर श्रीसद्गुरुमहाराज म्हणाले "ठीक आहे, आणि शूद्रानें वेदाचा उच्चार केल्यास त्याची जिव्हा छेदन करावी असा दंड शास्त्रांत सांगितला आहे; पण हा प्रत्यवाय सिद्धांना किंवा ज्यांना पूर्वजन्माच्या अभ्यासानें वेद येतात त्यांना नाहीं." असें म्हणून महाराजांनीं ग्रंथांतलें प्रमाण[1] सांगून मंडळीकडून वाचून दाखविलें. पुढें

---

१ हें प्रमाण शांकरभाष्य प्रथमाध्याय तृतीयपाद सूत्र ३८ हें होय. ह्या संबंधानें महाराजांनीं वासुदेवरावमुळे यांना पाठविलेल्या पत्रांत उल्लेख केलेला आहे तो असाः—

"आणि शूद्र मी पठण करी श्रुती । हा आक्षेप न घ्यावा चित्तीं । शांकरभाष्यामाजीं निश्चिती । प्रथमाध्यायीं कथियलें ॥ गद्यः—शांकरभाष्य प्रथमाध्याय त्रितीयपाद यांत शूद्राला वेदाचा अनधिकार सांगून पुढें ३८ व्या सूत्राच्या टीकेंत आचार्यांनीं असें म्हटलें आहे कीं, विदुरव्याधप्रभृतींना जें वेदज्ञान दृष्टीस पडलें, तें त्यांना अध्ययन न करतां आपोआप आलें होतें, आणि ज्ञानाचें फळ जी भगवत् सिद्धि तीही त्यांना झाली होती. म्हणून त्यांना कोणी दोष देऊं शकत नाहींत, आणि वेदही दोष देण्याला समर्थ नाहींत. याच भाष्याच्या टीकेंत आनंदगिरी असें म्हणतात कीं, वैदिक धर्मांतील चार वर्णांपैकीं सिद्ध पुरुष कोणीही असो, त्याबद्दल विचार नाहीं. साधक शूद्रानें मात्र वेदाध्ययन न करितां पुराणांतून ज्ञान संपादन करावें. यावरून मी सिद्ध आहे, असें मात्र म्हणत नाहीं, पण ज्ञानेश्वरकृपेनें तसें झालें यांत काय नवल आहे? आतां तें भाष्य आणि टीकारूप वाक्यें खालीं लिहितोंः—

शांकरभाष्य प्रथमाध्याय त्रितीय पाद ३८ सूत्रः—"येषां पुनः पूर्वकृत संस्कारवशाद्विदुरधर्मव्याधप्रभृतीनां ज्ञानोत्पत्तिस्तेषां न शक्यते फलप्राप्तिः प्रतिषेद्धुं ज्ञानस्यैकांतिकफलत्वात्." यावर आनंदगिरीकृत टीकाः— साधकस्याधिकारचिंता न सिद्धस्येत्याह. (आनंदाश्रमांत छापलेल्या पहिल्या भागाचें पृष्ठ ३१३) या वाक्याचा वर लिहिलेला अर्थ आम्ही भामती टीकेच्या अनुसार

उखाणा—नांव घ्या म्हणावयासाठीं निगम झाले भाट। पंचलतिकेच्या मंदिरीं वासुदेवाचा थाट ॥

गाणें—सुदीन सुदीन उगवला। गगनीं नित्य दिवो ग सखुगडणी ॥ नांव ठेविलें नांव ठेविलें वासुदेव ॥ नांव ठेविलें वासुदेव ॥ १ ॥

वेद० बाळकृष्णशास्त्री मुळे यांचा थोरला मुलगा गंगाधर हा तेवेळीं उमरावतीस शिकत होता. महाराजांचें रहाणें यांच्या घरींच असल्यामुळें अनायासें याला महाराजांच्या सेवेचा व सहवासाचा लाभ मिळत होता. गोविंद रामचंद्र भक्त म्हणून याचा एक सहाध्यायी तेली आहे तोही महाराजांकडे येऊं लागला होता. या दोघांनींही अर्थातच "महाराजांच्या[२] निरूपणामुळें आपल्या शाळेंत जाण्याकडे दुर्लक्ष केलें होतें. त्यामुळें जीजीबाईच्या (वासुदेवराव मुळ्यांची बहीण) मनावर गंगाधर महाराजांच्यामुळें आमचें ऐकत नाहीं, अशा वृत्ती येऊं लागल्या. परंतु महाराजांचें ज्ञान आपल्यास पाहिजे, या करितां मुळ्यांकडून किंवा कोणाकडून त्यांस स्पष्ट तसें म्हणवलें नाहीं. पुढें महाराज यावलांकडे गेले तेव्हां जीजीबाईनें गंगाधरला त्यांच्या मागेंच हर्द्याला पाठविलें. पुढें गंगाधरला बरें न वाटून त्यानें कोठें नोकरी धरली." परंतु ही स्थिति त्याला बरी वाटत नव्हती. आजन्म ब्रह्मचर्य पाळून संसाराच्या किटकिटींत व उदरंभरणाच्या विवंचनेंत न पडतां सगळें आयुष्य महाराजांच्या सेवेंत घालवावें असें याला वाटूं लागलें होतें व मनांत घोळत असलेले हे विचार तो महाराजांस पत्रद्वारें कळवीत असे. एका पत्रांत तो म्हणतो:—

"दुसऱ्याचे लग्नविवाहादि मंगलकार्य पाहून माझें मन आतांपासून थरथर कांपतें व वाटतें कीं माझ्यावरसुद्धां एखादे दिवशीं असा घोर प्रसंग (?) येणार व नौकरीच्या पाठीं देशोधडीला कोठेंतरी भटकावें लागणार. मग कोठें माझी सद्गुरुमाउली व कोठें मी? ×× कसेंही

१ हें महाराजांनीं स्वतःला घेतलेलें श्रीकृष्णपत्निवाचक नांव आहे.

२ हे उद्गार महाराजांनीं एके ठिकाणीं लिहून ठेविले आहेत.

करून माझ्या शरीराला दुःखांत व बंधनाच्या संसारांत मात्र घालूं नको. ×× तुझी संगती नसतांना मला लग्न करून पोटामागें नौकरींत भटकणें मात्र कधींही होणार नाहीं."

पुढें सुमारें एक वर्षाच्या आंतच गंगाधर आपली ललितपूर येथील नोकरी सोडून महाराजांच्या सहवासाला येऊन राहिला व सुमारें अर्धा तप त्यानें महाराजांची उत्तम प्रकारें सेवा केली. नोकरी व लग्न वगैरे न करण्याचा त्याच्या मनांतील आग्रह महाराजांनीं हरप्रयत्नानें हळुहळु काढून टाकून पुढें त्याला आपल्या आज्ञेप्रमाणें लग्न करावयास लाविलें.

काशीराव बापूजी देशमुख हे यावेळीं पंढरपूरच्या यात्रेस जाण्याकरितां सिरसगांवाहून उमरावतीस आले होते. महाराजांचे दर्शनास ते गेले असतां आपला स्वानुभव ते येणेंप्रमाणें कळवितात:—

"इ० स० १९०५ सालांत आषाढमासीं पंढरीचे यात्रेस जाण्याची मीं तयारी केली व माझे वडील मुलासुद्धां उमरावतीस आलों. महाराजांचें दर्शन घेऊन नंतर रेलवे मार्गानें त्याच दिवशीं पंढरीस जावें या हेतूनें महाराजांचे दर्शनास गेलों, आणि महाराजांस आपला हेतू कळविला. महाराज म्हणाले आज जाऊं नका. उद्यांचे गाडीनें जा. आषाढी एकादशी अगदीं जवळ आली होती. सबब त्याच दिवशींचे गाडीनें जाण्याविषयीं मीं आपली आग्रहाची इच्छा दर्शविली, पण मी दुसरे दिवशीं जावें असाच त्यांचा आग्रह पडला. सबब त्या दिवशीं मुक्काम करून दुसरे दिवसाचे गाडीनें मी गेलों. पुढें गेल्यावर पहातो तों मूर्तिजापूर स्टेशनाचे अलीकडील पूल पुरानें खचला होता, त्यामुळें आधले दिवसापासून रेलवे बंद होती. मी ज्या गाडीनें गेलों त्या गाडीचे थोडा वेळ अगोदर पूल दुरुस्त होऊन नुकतीच रेलवे सुरू झाली होती."

बापूगडी हल्लीं पाटणा (बांकीपूर) येथें टेंपल मेडिकल स्कूलांत अभ्यास करीत होता. तेथून महाराजांस तो पत्रें पाठवीत असे व

महाराजही त्याला उत्तरें पाठवीत असत. मेडिकल कालेजांत न जाण्याचा जो त्याला महाराजांनीं निषेध केला होता, तो न मानून आपण येथें आलों याचें त्याला वाईट वाटत होतें असें दिसतें. कारण आषाढ वद्य १० ता० २७।७।१९०५ रोजीं जें त्याचें पत्र आलें त्यांत पुढील मजकूर आहेः—" आपणही इथें येण्याबद्दल मला पुष्कळसे आढेवेढे घेतले परंतु पलीकडे मीही कांहीं करीन, तूं मृत्युंजयाचा जप कर म्हणजे झालें, म्हणून सांगितलें. एतावता माझ्या चुकीमुळें म्हणा अगर गैरसमजुतीनें म्हणा इथें तर येऊन पडलों. आतां पलीकडे तरी आपण मार्ग दर्शविल्याप्रमाणें वर्तन करावें अशी इच्छा आहे. × × विचारा अंतीं मला असें कळून आलें कीं ऐहिक क्षणिक सुखोपभोगाचें विषय जसजसे जवळ येतातां तसतसें परमार्थिक सुख दूर जात असतें. परंतु हीच गोष्ट कांहीं दिवस अगोदर कळण्यास पाहिजे होती. असो. झालें तें झालें. × × महाराज मी अनन्यगतिक आपल्यास शरण आहे. आपण आपल्या चरणापाशीं या दीन बालकास आश्रय द्यावा अशी सविनय विज्ञप्ति आहे. इत्यादि. "

श्रावणमास लागतांच महाराज सर्व मंडळीसह यावलीस गेले व श्रीकृष्ण जन्माष्टमीकरितां तेथून कुऱ्हा येथें गेले. कुऱ्हा येथील रा०रा० तुकाराम बापू देशमुख यांच्या येथें श्रीकृष्ण जन्माष्टमीचा उत्सव झाला. उत्सवाची व्यवस्था देशमुखांनीं उत्कृष्ट ठेविली होती. उत्सव समयींचें जातक वर्णन व काल्याचे अभंग वगैरे फारच मनोवेधक झाले. एकंदरींत श्रावण महिना, यावली येथें व कुऱ्हा येथें मंडळीला महाराजांच्या सहवासांत अधिक आनंदाचा गेला. यावेळची यावलीची व कुऱ्हा येथें झालेली महाराजांची कविता त्यांच्या गाथ्यांत छापली आहे.

मागें विष्णुपंत पानवळकरांनीं कबूल केल्याप्रमाणें चांदीच्या पादुकांचे दोन जोड तयार करवून ते कुऱ्हा येथें आणले. पितृपक्ष लागण्याचे पूर्वीं हे जोड आळंदीस न्यावयाचे होते. म्हणून कांहीं मंडळीसह

महाराज तावडतोब आळंदीस निघून गेले. पानवळकर बरोबर होतेच. गुरुवारीं ज्ञानेश्वर महाराजांच्या पादुकांबरोबर महाराजांनीं आणलेल्या पादुकांस अभिषेक होऊन पूजाअर्चा झाल्यावर व रात्रौ पालखींत मिरविल्यावर त्यांतला एक जोड प्रसाद म्हणून महाराजांनीं नित्य पूजेकरितां ग्रहण केला व दुसरा तेथें अर्पण केला. तेव्हां-पासून दर गुरुवारीं पालखी काढण्याचा नियम महाराजांनीं सुरू केला.

पुढें थोड्या दिवसांनीं पानवळकरांनीं काशीहून महाराजांकरितां श्रीकृष्णाची मूर्ति आणली. त्या मूर्तीची व पादुकांची नित्य पूजाअर्चा होऊं लागली व पूजेचे वेळीं महाराजांचें उच्च स्वरांत अपराधक्षमापन स्तोत्रांचें पठन, ज्ञानेश्वरीचें निरूपण, गुरुवारीं पालखीची मिरवणूक व त्यावेळीं महाराजांचे नवीन अभंग पदें वगैरे होऊं लागलीं.

आळंदीहून पुण्यास परत येतेवेळीं रस्त्यानें " आई मज नको साडी चोळी । " इत्यादि करुणावाणीनें आपल्या श्रीज्ञानेश्वर तातांस महाराजांनीं आळवून दरवर्षीं आपणास दर्शनास आणण्याविषयीं विनंती केली व त्यांच्याच गाडींत पानवळकर होते त्यांना कांहीं वेदान्तविषय वगैरे अभंग रूपानें सांगितला.

पुणें येथें महाराज रा० रा० केशवराव देशमुख यांजकडे उतरले. पानवळकर बरोबर होतेच. महाराज कोठेंही असोत, अहोरात्र गद्यपद्यमय सच्छास्त्रचर्चा व भगवद्गुणानुवाद त्यांच्या वाणींतून निघत असावयाचे व बहुतेक प्रसंगीं मंडळीचा घोळका त्यांच्या सभोंवती जमून शंकासमाधानपूर्वक निरूपणें चालावयाचीं असा नेहमींचा परि-पाठ होता. आसुतेरामृतेकालं नयेद्वेदांतचिंतया । दद्यान्नावसरः किंचित् कामादीनां मनागपि । ही सन्नीति त्यांच्याठिकाणीं उपजतच दिसून येत होती, व लोकांनाही ते हाच उपदेश करीत.

केशवरावचे चुलते मुंबई येथील प्रसिद्ध डा० नानासाहेब देशमुख हे त्यावेळीं कांहीं कामानिमित्त पुण्यास आले होते. ते हीं महाराजांची असामान्य बुद्धिमत्ता पाहून चकित् झाले व निरानिराळ्या शास्त्रांत यांच्या बुद्धीची अप्रतिहत शक्ति कोठपर्यंत चालते हें विशेष रीतीनें परीक्षून पाहण्याचें ठरवून सर्व बरोबरच्या मंडळीसह त्यांना मुंबईस घेऊन गेले. तेथें सुमारें सात दिवसपर्यंत अहोरात्र महाराजांची निरानिराळ्या शास्त्रांवर चर्चा होत असे. वेदांत, व्याकरण, न्याय, गायन, प्रचलित कायदे, आर्य व आंग्ल वैद्यक शास्त्र, सर्जरी, इत्यादि विषयांत आजन्म खपून प्राविण्य मिळाविलेल्या माणसांबरोबर महाराज बोलूं लागले म्हणजे, आपल्या नेहमींच्या अस्खलित, निश्चयी व प्रमाणसूद भाषासरणीनें थोड्याच वेळांत त्यांना कुंठित करून भडकमकर प्रभृति निर्णायक शास्त्री मंडळास चकित् करीत. याप्रमाणें व्यंकटाचल शास्त्री, मनोहर गवई, ब्यारिस्टर सेटलवाड, डाक्टर भाजेकर वगैरे गृहस्थांबरोबर महाराजांची भाषणें होऊन त्यांच्या विद्येचा सत्कीर्तिपरिमळ अधिकाधिक पसरूं लागला, व "दोनतीन दिवसांत चार हजारांचा लोकसमुदाय दर्शनार्थ लोटला." नानासाहेब वगैरे मंडळीस तर महाराजांच्या विद्येचा हा एक अलौकिक चमत्कार वाटला. मुंबईच्या या सात दिवसांत अहोरात्र महाराजांजवळ गर्दी सारखी रहात असे. झोंप देखील या सात दिवसांत महाराजांनीं मुळींच घेतली नाहीं. फक्त सायंकाळचे ५ वाजल्यापासून रात्रींचे ८ वाजेपर्यंत शौच, स्नान, पूजा भोजनादि अत्यंत आवश्यक गोष्टींत जेवढा काल गेला असेल तोच! बाकीचा सारा वेळ महाराज सारखे शास्त्रचर्चेंत निमग्न असत. पुढें बऱ्याच लोकांकडून महाराजांस आदरपूर्वक बोलावणीं होऊं लागलीं. परंतु उपाधी वाढूं नये म्हणून एकाएकीं महाराज तेथून निघून आले.

परत येतांना भाद्रपद शुद्ध १०, ११ दशीस नाशिकचें स्टेशनावर महाराजांचा मुक्काम होता. तेथें पंढरीवर्णन वगैरे संबंधानें महाराजांचीं कांहीं स्फुट पदें झालीं. त्यांत भावी देशस्थितीचें सूचक एक पद होतें.

ादशीस महाराज उमरावतीस येऊन पोहचले व पांच चार दिवस
थें राहिले.

या वेळांत वेद० गोविंदशास्त्री पंचभाई हे कांहीं कारणामुळें आपले-
कडे येऊं शकत नाहींत असें महाराजांस कळल्यामुळें त्यांनीं त्यांस एक
त्र पाठविलें. त्यांत महात्म्यांच्या वागणुकीचें सुंदर सोपपत्तिक प्रतिपादन
सल्यामुळें तें जसेंचें तसेंच येथें घेतों:—

श्रीमत्सद्गुरु सर्वत्रयशस्वी ज्ञानेश्वरमाउली समर्थ.

श्रीगुरु आचार्य वेदमूर्ति गोविंदशास्त्री पंचभाई महाराज यांचे चरणीं
चिरंजीवी पंचलतिका इच्या शिरसाष्टांग प्रणिपात विनंति विशेष. आपल्या
एक एक उपकाराचें स्मरण केलें म्हणजे हृदयावच्छेद होऊं पाहतो पण
आम्ही मात्र दुर्दैवी असल्यामुळें आमच्या हातून कांहींच सेवा होऊं
शकत नाहीं. त्याविषयीं वाईट न वाटतां उलटें आपण येथें कां येत
नाहीं असे पुष्कळ वेळ उद्गार काढले, पण आपण कांहींच उत्तर न
देतां उलट भयच मात्र धारण केलें. एवढा आपला माझे ठिकाणीं
विश्वास बसण्यापुरती माझी योग्यता नाहीं. माझ्या आंगीं एवढा कोण-
ताच मोठा चमत्कार नाहीं कीं मी बोलेन तसें होऊं शकेल व पुढेंही
तो चमत्कार यावयाचा नाहीं. त्यामुळेंच माझी निंदा लोकांनीं मागें
केली, आतां करतात, व पुढेंही करतील. आणि माझें वर्तनही सहजच
असें असतें कीं ज्याच्या योगानें लोकांनीं माझी निंदाच करावी. ही गोष्ट

---

१ गोविंदशास्त्री हे व्रतें, उत्सवादि समयीं पूजापाठादि संकल्प सांगणारे
महाराजांचे आचार्य असून "श्रीकृष्णपत्नि यजमानाऽहं" असा महाराज
संकल्प सोडीत असत, म्हणून "पंचलतिका" हें श्रीकृष्णपत्निवाचक नांव
महाराजांनीं येथें घातलें आहे.

२ याचें विशेष स्पष्टीकरण महाराजांनीं सूक्तिरत्नावलि सप्तम यष्टि पृ० ११३
यांत केलें आहे तें असें:—"यद्यपि साधु आपला अपमान जरूर करून घेण्याचा

सांगण्यासारखी नव्हे, पण तुम्हांला मात्र कांहीं कारणामुळें सांगणें भाग पडलें. म्हणून आपल्या समक्ष माझी निंदा कोणी केली असतांना आपणास वाईट वाटणें साहजिक आहे. कारण पुत्राची निंदा पिता सहन करीत नाहीं. परंतु तसें आपण वाटूं देऊं नये. कारण श्रीकृष्णास जर मी पति मानीत आहे तर त्यांच्या आज्ञेप्रमाणें वागणें हें आमचें सर्वस्वी कर्तव्य आहे. म्हणूनच " अमानित्वमदंभित्वमहिंसाक्षांतिरार्जवम् " या गीतेंतील श्लोकांत सांगितल्याप्रमाणें अपमान करून घेण्याकडेच माझें फार लक्ष्य असतें. शिवाय " तुल्यनिंदास्तुतिर्मौनी संतुष्टो येनकेनचित् । अनिकेतःस्थिरमतिर्भक्तिमान्मे प्रियोनरः ॥ " हें भगवद्वाक्य सोन्याच्या अक्षरांनीं लिहून ठेवण्यासारखें आहे; आणि चमत्कार वगैरे जे कांहीं होतात ते व्यावहारिक लोकांना खुष ठेवण्याकरितां असतात. परमार्थांत

---

यत्न करीत असतात, असें तातांनीं ज्ञानेश्वरींत " वाचस्पतीचेंति पाडें । सर्वज्ञता तरी जोडे । परी वेडिवे माजीं दडे । महिमे भेणें " या ओवींत म्हटलें आहे; तरी त्याचा अर्थ असा आहे कीं, वेदांनीं सांगितलेले धर्म दूषित न करितां लोकांनीं आपल्यावर आळ आणावी असें वर्तन करावें, तरच त्याचा योग सिद्ध होतो; नाहींतर होत नाहीं. हेंच विष्णुपुराणांत सांगितलें आहे. " सम्माननना परां हानिं योगर्द्धेः कुरुते यतः । जनेनावमतो योगी योगसिद्धिंच विंदति ॥ तस्माच्चरेत्तु वैयोगी सतांधर्ममदूषयन् । जना यथावमन्येरन्गच्छेयुर्नैवसंगतिम् ॥" विष्णुपुराण. अंश २ अध्याय १३ श्लोक ४२–४३. भावार्थः—चांगला मान मिळणें यांत योगवृद्धीची मोठी हानी होत असल्यामुळें, लोकांनीं केलेल्या अपमानामुळेंच, योगी पूर्णत्वाला पोंचतो. म्हणून लोकांकडून अपमान होईल असें आचरण महात्म्यांनीं करावें. परंतु महात्म्यांनीं, सांगितलेले धर्म बुडवून मात्र लोकांकडून छी थू करवून घेऊं नये. म्हणूनच "सतां धर्ममदूषयन्" असें श्लोकांत म्हटलें आहे. तर धर्म न बिघडवितां लोक अपमान करतील असें करावें. × × आपण निष्पाप असून आपला अपमान होतांना, शास्त्रकार त्याला अमृत पिणें म्हणतात."

त्याचा लेशाही उपयोग पडत नाहीं. म्हणूनच श्रीतुकाराममहाराज म्हणतातः—

सोन्याचे पर्वत करवती पाषाण । अवघे रानोरान कल्पतरू ॥ १ ॥
करवेल मंत्रयंत्रअनुष्ठान । नेववेल प्राण ब्रह्मांडासी ॥ २ ॥
ब्रह्माविष्णुशिव होतील चाकर । नित्यची किंकर इंद्रचंद्र ॥ ३ ॥
परी ते दुर्लभ श्रीकृष्णाचे पाय । तेथें हे उपाय न चलती ॥ ४ ॥
तुका म्हणे माझा ऐसाची निश्चय । आठवीन पाय तुझे देवा ॥ ५ ॥

या अभंगांत प्रत्यक्षच चमत्काराचा निषेध केला आहे. आतां निंदे-विषयींही तुकाराममहाराज असेच म्हणतातः—

निंदकाचें घर असावें शेजारीं । येताती बाहेरी गुणदोष ॥
निंदक हा माझा कंठींचा ताईत । त्यानें सर्व हीत केलें माझें ॥

याचप्रमाणें कौषीतक्युपनिषदांत एक श्रुति अहे:—

श्रुतिः—" तस्य ते गृण्हंति सुहृदः साधुकृत्यान् द्विषतः पापकृत्यान् पुत्रादयो धनान् । सवै पापपुण्यं विधूय निरंजनः शाश्वतनुपैति दिव्यम् ॥ "

श्रुत्यर्थः—जो ब्रह्मनिष्ठ असतो त्याची स्तुति करणारे जन त्याचें पुण्य घेतात, द्वेष करणारे जन पाप घेतात, आणि त्याचे पुत्रनात्वादिक त्याचें धन घेतात. तो स्वतः तर पापपुण्य या दोहोंचाही नाश करून शाश्वत जें निरंजनपद त्याचे ठिकाणीं प्राप्त होत असतो. या श्रुतींत ब्रह्मनिष्ठांना पुत्र असावेत असें सांगितलें; म्हणूनच श्रीगुरुआज्ञेवरून मनकर्णिकाचे ठिकाणीं मी गर्भस्थापन केला आहे. त्याहीबद्दल पुष्कळ पुरुष विशेषें-करून निंदा करतात. पण त्याबद्दल मला कांहींच वाटत नाहीं. आतां आपणच सांगावें महाराज, कीं मी श्रुतिस्मृति आणि संतांच्या आचरणा-प्रमाणें चालावें किंवा लोकांना खुष ठेवण्याकरितां व्यावहारिक चमत्कार दाखवून त्याप्रमाणें चालावें ? कबीरमहाराज म्हणतातः—निंदक हमारे इष्ट है ओ मावापसे पैलपार । आप डुबे मंझारमें हमें उतारत पार ॥ १ ॥

या सर्व वचनांवरून माझा पक्का निश्चय झाला आहे कीं मला चमत्काराची अगर कोणी साधु म्हटलें पाहिजे याची बिलकूल आवश्यकता नाहीं. आणि म्हणूनच कोणी मजविषयीं कांहींही उद्गार काढले तरी आपण वाईट वाटूं देऊं नका. ऋषिपत्न्यांनीं श्रीकृष्णाला अन्न नेऊन देतांना आणि गोपींनींही श्रीकृष्णाबरोबर रासक्रीडा करतांना त्यांचीही निंदा अतिशयच झाली. तितकी तर माझी अजून झालीही नाहीं. तितकी व्हावी अशी माझी फार इच्छा आहे. परंतु आपल्या कृपेनें प्रभु तसें केव्हां घडवून आणील कोण जाणें ? शिवाय तुकारामबोवानें एका बाईचें पोट आलें असतांना आपलें नांव सांगून लोकांकडून आपणास गध्यावर बसवून घेतलेंहाहीं उदाहरणें दिसतात. आपणास ठाऊकच आहे कीं कुंभारेबुवानेंमला " ज्ञानेश्वर सोडा " असें म्हटलें होतें, त्यावरून त्यांच्याशीं मी भाषण वर्ज्य केलें. असो. आपणाला मात्र माझ्यामुळें फार त्रास होत आहे. पण ही गोष्ट नेमानें व्हावयाचीच. त्याबद्दल खेद करून उपयोग नाहीं. कारण " त्वां सेवतां सुरकृता बहवोंऽतरायाः " या भागवतांतील श्लोकांत सांगितल्याप्रमाणें भगवद्भक्ति पूर्ण बाणेपर्यंत देवता विघ्नें करीत असतात. म्हणून जे कोणी आपणास त्रास देतात त्यांच्या मनामध्यें देवताच स्वतः प्रेरणा करीत असतात. त्या बिचाऱ्यांचा कांहींच अपराध नसतो. शिवाय " सुखस्य दुःखस्य न कोऽपि दाता । परो ददातीति कुबुद्धिरेषा ॥ " इत्यादि श्लोकांत नेहमीं समाधान वृत्तीच ठेवण्यास सांगितलें आहे. महाराज आपलें संचित तर दग्ध होत चाललें आहे. क्रियमाणही हळुहळु अभ्यासानें क्षीण होईल. पण प्रारब्ध जें कर्म तें मात्र भोगलेंच पाहिजे. " प्रारब्धकर्मणां भोगादेवक्षयः " अशी श्रुति आहे. यद्यपि योगशास्त्रानें प्रारब्धाला जिंकून टाकतो असें सांगितलें आहे तथापि प्रारब्धकर्मांचें दुःख जोंपर्यंत येऊन पडलें नाहीं तोंपर्यंतच त्याचा उपाय करावा असें सांगितलें आहे. " हेयं दुःखमनागतम् " इत्यादि सूत्र त्या विषयीं प्रमाण आहे. पण आपणाला रोग होण्यापूर्वीं जर ह्या कन्येची भेट झाली

१ गोविंदशास्त्री यांस रक्तपिती झालेली आहे. हें मागें सुचविलेंच आहे.

असती तर बरें झालें असतें. पण आतांही आपली जी आज्ञा असेल ती मजकडून होईल तितकी साह्यता करून पाळण्यास मी तयार आहे. पण दुसऱ्याचें मात्र मी ऐकणार नाहीं. आपण स्वतःच सांगितलें पाहिजे. पुण्यास तर माझा एका रांडेच्या हातून जोडे खाण्याचा विचार होता, पण मंडळींनीं ती गोष्ट घडूं दिली नाहीं. हे महाराज, येथवर मी आपलें रडत गाणें मला वाटलें तितलें गाइलें. आतां मुख्य गोष्ट ही कीं जेवढें कांहीं विश्वांत आपणास चांगलें आणि वाईट भासतें तेवढें आपल्या अज्ञानामुळें भासत असतें. आत्मा आणि परमात्मा कांहीं निराळा नाहीं. पण आपल्या डोळ्यांवर अज्ञानाचा पडदा असल्यामुळें तो आपल्या हृद-यांत असूनच कोट्यावधि योजनें दूर भासतो. पण खरोखर तो प्रभु आपल्या पुढें उभाच आहे. आपणच मात्र त्याच्याकडे पहात नाहीं. त्याला त्यानें काय करावें ? आपणच आपणास विसरलों तें न जाणून देवावर दोष देत असतों. पण त्यानें तरी आपणास विकत पिसें लावून घेऊन तुम्हाला मिथ्या साह्य देण्याइतकें पुण्य कोठून आणावें ? आपणास जो भुलला आहे त्याला श्रुति स्पष्ट चोर म्हणते. श्रुतिः—योऽन्यथा संतमा-त्मानमन्यथा प्रतिपद्यते । किंतेन न कृतं पापं चौरेणात्मापहारिणा ॥ तसेंच श्रीमत्सद्गुरु तात ज्ञानेश्वर म्हणतातः—शास्त्रसिद्ध ब्रह्मबुद्धि उपजविसी । तरी कां आपआपणांसि बुझसीनारया ॥ निळोबाराय म्हणतातः—घरीं चूकलें ठेवणें सर्व कांहीं । उगा धुंडतो भूवरी देश दाही ॥ आणि "जुनें ठेवणें मीपणें तें कळेना" असें समर्थ रामदासही म्हणतात. याप्रमाणें हा अल्प लेख पुष्पपंकोळिका न्यायानें द्विजराजचरणीं समर्पण केला. श्रीज्ञानेश्वर माउली समर्थेत्यनेनालम् ॥ ता० क० हें पत्र ऐकून आपणांस तातडी होईल, पण तसें मात्र पावसांत करूं नये ही माझी विनंती आहे; आणि त्याप्रमाणें कराल अशी आशाही आहे. मात्र प्रसादोत्तर जरूर पाठवावें. कळावें ही विनंती.

नागपुरास येण्याविषयीं रा० रा० वासुदेवराव मुळ्यांकडून महाराजांस आग्रहपूर्वक बोलावणें होतेंच. म्हणून भाद्रपद वद्य द्वितीयेच्या सुमारास

महाराज नागपुरास गेले. बरोबर गोविंद रामचंद्रभक्त, नाना कविमंडन वगैरे होते. सौ० मायबाई उमरावतीसच होत्या.

## नागपूर येथील हकीकत.

नागपूर येथें महाराज वासुदेवराव मुळेमास्तर यांच्या माडीवर उतरले होते. नेहमींच्या क्रमाप्रमाणें बहुतेक रात्रौ वेदांतादि निरूपणें होत असत व तीं ऐकण्याकरितां गणपत खंडो भालेरावादि परिचित् मंडळी व शहरांतील व सीताबर्डीवरील इतर जिज्ञासु मंडळीही मुळयांच्या माडीवरच रात्रौ येऊन निजत असत.

एके दिवशीं निरूपणप्रसंगीं महाराजांनीं एक श्रुति प्रमाणार्थ म्हटली व ही श्रुति नारदपंचरात्रांत आहे म्हणून सांगितलें. पुढें महाराज म्हणाले कीं, नारदपंचरात्र ग्रंथ हल्लीं छापलेला नाहीं व त्याच्या लेखी प्रतीही फक्त दोनच ठिकाणीं उपलब्ध आहेत. एक येथील भोसले सरकारच्या वाड्यांत आहे व दुसरी मथुरेच्या एका चौब्याजवळ आहे. इतकें सांगून भोसले सरकारच्या वाड्यांतील प्रत महाराजांनीं मंडळीला आणावयास सांगितले. पण तेथल्या लायब्ररीचा कारकून त्या मंडळींत नव्हता. म्हणून त्याला बोलवायला त्याच्या ओळखीचे एक दोन इसम निघाले; इतक्यांत तो कारकूनच तेथें येऊन पोहचला. त्याला ग्रंथ आणावयास मंडळींनीं सांगितलें असतां तो म्हणाला कीं इतक्या रात्रीच्या वेळीं मला अमुक ग्रंथ कोठें ठेविला आहे हें समजणें शक्य नाहीं. पाहिजे तर सकाळीं आणून देईल. ते वेळीं महाराज म्हणाले कीं ती पोथी अमुक आलमारीच्या अमक्या खणांत ठेविली असून तिला अमुक रंगाचें वेष्टण आहे. तिच्या खालचे व वरचे ग्रंथ काढून ठेवून पोथी घेऊन या. इतका पत्ता सांगितल्यावर पोथी आली. त्या पोथीच्या अमक्या अमक्या पानांत ती श्रुती आहे असें महाराजांनीं सांगितल्यावर गोविंद रामचंद्र भक्त यांनीं ती श्रुती काढून दिली.

यानंतर अमृतानुभवाचे निरूपणास आरंभ व्हावयाचा होता. त्या

पूर्वी महाराजांनीं एका गृहस्थास हाक मारली. तो निजला होता व झोंपेंतून उठविणारास चापट मारण्याची त्याला संवय होती म्हणून त्याला उठविण्यास मंडळी भिऊं लागली. तेव्हां महाराज स्वतः त्याला उठवूं लागले असतांना निद्रावश स्थितींत त्यानें महाराजांवरही तोच प्रयोग केला व लगेच डोळे उघडून पाहतो तों समोर महाराज ! झालें. त्याला आपल्या कृतीचा पराकाष्ठेचा त्वेष आला. त्या भरांत ताडकन उठून खालीं उतरून तो बाहेर जाऊं लागला असतां मंडळी त्याला अडवूं लागली. शेवटीं जोरानें लाथ मारून भाडकन् खिडकी उघडून तो तडक घराबाहेर पडून चालता झाला. मंडळीही त्याच्या मागोमाग गेली. इकडे महाराजांजवळ कोणीच नव्हते. तेव्हां तेही एकटेच बाहेर गेले व त्या गृहस्थाला शोधून हात धरून घरीं घेऊन आले. मंडळीही कांहीं वेळानें परत आली. त्या गृहस्थाला महाराजांनीं अभय देऊन फार सांत्वन केलें, तथापि अत्यंत वाईट वाटल्यामुळें दोन तीन दिवसपर्यंत त्यानें अन्नपाणी वर्ज्य केलें होतें. असो.

येथें सीताबर्डीवर महाराज रा० रा० जटार यांचें घरीं एके दिवशीं गेले असतां त्यांच्या वडिलांनीं महाराजांशीं सांख्यशास्त्रांत वाद केला, परंतु त्यांस आपली बाजू व्यवस्थितपणें सांभाळतां न आल्यामुळें त्यांत विशेष कांहींच निष्पन्न झालें नाहीं. या वादाचा प्रकार महाराजांनीं मुंबईस डा० मोरेश्वर गोपाळ देशमुख यांस जें पत्रोत्तर ता० २७-९-१९०५ रोजीं पाठविलें त्यांत लेखन केलेला आहे व "या गृहस्थाची सांख्य शास्त्रांत प्रख्याति आहे, पण अशा प्रकारचा वाद कापिल, आसुरी, पंचशिख, वोढ्ढ, सनातन या सांख्य पंचकांतून कोणत्या शास्त्रांत लिहिला आहे, हें मला व सर्व पृथ्वींतील शास्त्र्यांना गूढच राहणार आहे. × × अशा विरुद्ध वादानें माझें हृदय अगदीं क्षीण होऊन मला कांहीं समजत नाहीं, असें म्हणून मी त्या वादाची कशी तरी पीडा टाळली." असें त्यांत म्हटलें

१ सूक्तिरत्नावली द्वि० यष्टि० उत्तरार्ध पृ० ३६ पहा.

आहे. " नये सांख्य मजप्रती । हें वडीवरी सिद्ध झालें । " हें सूचना प्रकरणांतील महाराजांचे व्याजोक्तीचें म्हणणें याच प्रसंगाला उद्देशून आहे.

उमरावतीचे नाना कविमंडन हे सतत महाराजांच्या सेवेंत राहून तनुमनधनानें त्यांची होईल तेंवढी व्यवस्था ठेवीत असत. अनोळखीच्या ठिकाणीं रात्रीं अपरात्रीं महाराजांचा मुक्काम झाला असतां तेथेंही नानांनीं महाराजांच्या व मंडळीच्या स्नानभोजनादिकांची नीट व्यवस्था जुळविल्याचीं उदाहरणें आहेत.

नानाची थोडी पूर्व हकीकत अशी आहे कीं, यांना पूर्वीपासून पंचमुखी हनुमत्कवचाचा पाठ व मारुतीची पूजा वगैरे करण्याचा नाद असे व कांहीं वैद्यकीही जाणत असत. यांचे वडील उमरावतीस सत्पुरुष या नात्यानें प्रसिद्ध होते व श्रीकृष्ण जन्माष्टमीचे नवरात्र व उत्सव वगैरे मोठ्या थाटाचा व भक्तिपूर्वक करीत असत. त्यांच्या अंतकाळीं त्यांनीं नानास असा आशिर्वाद दिला होता कीं तुला एका मोठ्या महात्म्याचें दर्शन होईल. आकोला येथील प्रसिद्ध प्रेमळ भक्त वेद० शा० सं० बाबाजी घोंगेशास्त्री यांजपाशीं कांहीं दिवस नानांनीं काव्य वगैरे म्हटलें होतें. असो, पुढें कांहीं दिवसांनीं नानाला सत्संगाविषयीं वासना उत्पन्न होऊन सत्पुरुषाच्या सेवेंत रहावें असें वाटूं लागलें होतें व लवकरच त्यांची व महाराजांची भेट होऊन ते महाराजांच्या सेवेंत राहूं लागले. पुढें कांहीं दिवसांनीं आपण उत्तरोत्तर क्षीण होत चाललों आहोंत असें नानाला आढळून आलें व कोणी तरी आपणास विषप्रयोग केला आहे असें मनास वाटूं लागलें. शेवटीं अन्न वगैरे चालेनासें होऊन जेव्हां फारच क्षीणता वाटूं लागली व महाराजांच्या सेवेला आपण अंतरतो कीं काय अशी नानाला भीति वाटायला लागली तेव्हां एके दिवशीं त्यांनीं सगळी हकीकत महाराजांस सांगून या संकटांतून आपल्यास वांचविण्याविषयीं विनंती केली. महाराजांनीं त्यांस अभय दिलें. पुढें असा प्रकार होऊं लागला कीं बसल्या बसल्या नानाला थोडी झोंप आल्यासारखें वाटावें व

एक मोठा भयंकर सर्प आपल्या आंगावर चालून येत आहे व तितक्यांत महाराज हातांत तरवार घेऊन त्याचे तुकडे तुकडे करीत आहेत असें दिसावें. हा प्रकार सुमारें सहा महिनेपर्यंत चालला व नानाही उत्तरोत्तर दुरुस्त झाले. नागपूर मुक्कामीं एके दिवशीं रात्रौ नानाला महाराजांचे मोठमोठें पाणीदार डोळे दिसले. दुसरे दिवशीं महाराजांना पूजेच्या वेळीं पूजासाहित्य देत असतांना त्यांना नाना म्हणाले मी आपल्याला एक गोष्ट सांगूं काय ? महाराज म्हणाले माझे डोळे तुला दिसले हीच गोष्ट ना ?

पुढें आश्विन महिन्याचा पहिला दिवस उजाडला. दसऱ्याच्या नवरात्रानिमित्त सप्तशतीचा पाठ नानांनीं महाराजांकरितां केला व नंतर त्यांना ताप भरला. इकडे महाराजांचा यावलोस जाण्याचा बेत ठरून तांगा आणावयास नानांस सांगितलें.एकवेळ तांगा आणलेला परत पाठवून पुन्हां तांगा आणावयास महाराजांनीं सांगितलें. नानाचा ताप १०४।१०५डिग्री वाढला होता. हें महाराजांस नानांनीं कळविलें. तथापि तुलाच जाऊन तांगा आणला पाहिजे असें महाराज म्हणाले, म्हणून नाना जाऊन पुन्हां तांगा घेऊन आले. नंतर महाराज, बापूगडी ( हा हल्लीं नागपूरलाच आला होता ) दत्तात्रेय गणपतराव खापरे व नाना वगैरे मंडळीसह स्टेशनावर गेले. स्टेशनावर जातांच नानाचा ताप साफ बरा झाला. गाडी चालू झाल्यावर अमृतानुभवाच्या एका ओवीवर महाराजांचें निरूपण झालें. त्याच्या आरंभीं सद्गुरुस्तवन करून तातांच्या अगाध शक्तिविषयीं व त्यांची कृपा ज्यावर आहे त्याला इंद्रचंद्रादि वश होतात याविषयीं महाराजांनीं विवेचन केलें. उमरावतीला पोंहचल्यानंतर नानाला पुन्हां ताप येऊं लागला. महाराज म्हणाले तुला भयंकर बिमारी येणार आहे. तथापि भिऊं नको. येथेंच रहा. बिमारींत तुला एक भयंकर पुरुष दिसेल. त्याला तूं भिऊं नको. एक ज्ञानेश्वर महाराजच सर्व रूपांनीं नटले आहेत. सत्कर्माचरण करणाराला ते शिवविष्णुरूप होतात व दुष्टांना यमरूप दिसतात. त्यांनीं तुला पदरांत घेतलें आहे म्हणून ते

कोणत्याही रूपांत दिसले तरी भिऊं नको. एवं प्रकारचे संस्कार नानाचे मनावर करून आपण यावलीस गेले. बरोबर बापूगडी व दत्तात्रेय खापरे गेले. सौ० मायबाई पुर्वीच गेल्या होत्या. इकडे नाना उमरा-तीस मुळेमास्तरच्या माडीवर होते. त्यांचा ताप वाढत वाढत १०६ डिग्रीपर्यंत वाढला. तथापि बेशुद्ध झाले नाहींत. स्वत: कंदील घेऊन जिना उतरून शौचास जात. स्वत: वैद्य असल्यामुळें त्यांनींच आपली नाडी पाहिली.त्यांत दोष कुपित झालेले दिसले. लवकरच नानांस सन्निपात होऊन मूर्च्छा आली. मूर्च्छेत असतांना त्यांना एक भयंकर पुरुष दिसला.पूर्वी महाराजांनीं शिकवून ठेविल्या प्रमाणें त्याच्याशीं नाना बोलले. इकडे व्यंकटराव ला उमरावतीहून यावलीस पाठवून महाराजांस नानाचा हाल कळविण्यांत आला. ते वेळीं सौ० मायबाईनें नानांस हरप्रकारें वांचविण्याविषयीं महाराजांची विनंती केली. महाराजांनीं उमरावतीस येऊन नानांस पाहिलें. नानाच्या जिभेस काटे येऊन गळा बंद झाला होता. महाराजांनीं गळ्यावरून हात फिरविला व नाना म्हणून हाक मारली. गळ्याला महाराजांचा अमृतकरस्पर्श होतांच नानांस बरें वाटलें व ते महाराजांशीं बोलू लागले. लवकरच नानाला आराम पडला, व त्याच रात्रीं त्यांना रासदर्शन झालें. या नंतर सुमारें ५।७ तासांनीं नानाला तंद्रावस्थेंत असें दिसलें कीं आपण आळंदीस गेलों व दत्ताच्या देवळांत पादुकांचा डबा ठेवून इंद्रायणींचें स्नान करून येऊन पादुकांची पूजा करूं लागलों.पूजा झाल्यावर आरतीकरण्याचे वेळीं आरती वाकडी धरली.इकडे महाराज त्याचं माडीवर दुसरीकडे कांहीं मंडळी सह बसले होते ते म्हणाले " आरती सीधी धर. " पूजा आटपल्यावर नाना प्रदक्षिणा करूं लागले तों प्रदक्षिणेची कांहीं वाट बिकट दिसली. इकडे महाराज बोलले " संभाळ पडशील. " यावरून नानाची ही तंद्रागत चर्या महाराजांस प्रत्यक्ष दिसत होती असें दिसतें. पुढें लोकरीतीप्रमाणें जप करून तीर्थ वगैरे दिलें व मंगनीराम वैद्याचें औषध सुरू केलें. उत्तरोत्तर नानाची प्रकृतीही सुधरूं लागली. महाराज परत यावलीस गेले.

यावली येथें महाराज सर्व मंडळीसह आकाजी बापूच्या येथेंच असत. एके दिवशीं महाराज झोंपाळ्यावर बसले असतां बापूगडीशीं बोलतांना वामाचाराविषयीं गोष्टी निघाल्या व नंतर भूतांच्या गोष्टी निघाल्या. इतक्यांत संध्याकाळ झाला म्हणून सेठ अंबादास मारवाडी यांच्या वाडींत महाराज फिरायला गेले. बरोबर बापूगडी, खापरे वगैरे मंडळी अर्थात होतीच. तेथें चित्ताकाशाविषयीं महाराजांचें निरूपण निघालें. मृत मनुष्यें कोठें व कशीं राहतात ? त्यांचीं शरीरें वगैरे कशीं असतात ? ते आपल्याला ओळखतात काय ? आपण त्यांची गांठ कशी घेऊं शकतो ? त्यांची ओळख कशी काढूं शकतो ? त्यांना ओळख पटते किंवा नाहीं ? इत्यादि प्रश्नांवर चर्चा होऊन बापूगडीला महाराजांनीं चित्ताकाशांत जाण्याच्या प्रक्रियेवर उत्तम निरूपण सांगितलें. ( ह्या निरूपणाचा विषय पुढें शके १८२८ च्या चैत्रांत महाराजांनीं बापूगडीला पत्रांत लिहून पाठविला आहे. सूक्तिरत्नावलि द्वि० उत्तरार्ध पृ० ४२ पहा ) दुसरे दिवशीं महाराजांचें भजनांत गुरुसेवेचें महत्व वगैरे विषयावर फार बहारीचे अभंग झाले व त्यांनीं म्हटलेल्या एका स्वकृत हिंदी पदाचे बोल तंबुऱ्यांतून निघाले.

दत्तात्रेय गणपतराव खापरे यांची ही महाराजांबरोबर येण्याची पहिलीच वेळ होती. हे चांद्याचे राहणारे असून नागपूर येथें कॉलेजमध्यें शिकत होते. महाराज नागपुरास असतेवेळीं हे त्यांजकडे येऊं लागले होते व बापूगडीचा व यांचा आप्तसंबंध असल्यामुळें दोघेही यावेळीं यावलीस आले होते. तेवेळीं महाराजांना तीर खेळण्याचा नाद असे. एकवेळ असें झालें कीं महाराजांनीं सोडलेला बाण पलीकडच्या दारापर्यंत सरळ जाऊन तेथें एक बाई सारवीत होती तिच्या पाठीस न लागतां वळून दुसरीकडे गेला. तंबुरीवर भजन करितांना महाराजांच्या गाण्याचे बोल तंबुरींतून निघावे. इत्यादि कांहीं अपूर्व प्रकार तेथें खापरे यांच्या दृष्टोत्पत्तीस आले. नित्य भजनसमयीं नवीन होत असलेलीं गाणीं, भूपाळ्या, गाऱ्हाणीं उद्धवागमन, रासक्रीडा व श्रीकृष्णलीला वर्णनपर कवितेची बहार तर

अपूर्व होतीच. याप्रमाणें श्रीमहाराजांच्या सहवासांत कांहीं दिवस राहिल्यावर विजयादशमी करून आठ दहा दिवसांनीं बापूगडी व खापरे परत नागपुरास गेले.

या वेळीं हरिभाऊ उमरावतीस असून नानाच्या प्रकृतीचा हाल वरचेवर महाराजांस लिहून कळवीत असत. त्यांस महाराजांनीं यावेळीं पाठविलेलें पत्रोत्तर विशेष महत्वाचें असल्यामुळें तें खालीं टीपेंत दिलें आहे. त्याच्या ताजा कलमांत " मंगनीराम वैद्याला विचारून तो सांगेल त्याप्रमाणें

श्रीसद्गुरु ज्ञानेश्वर माउली समर्थ.

साष्टांग प्रणिपात उपरी विनंती विशेष. ओवी अमृतानुभवः—दो ओठी एक गोष्टी । दो डोळियां एक दृष्टी । तेवीं दोघी जिहीं सृष्टी । एकचि जेवीं ॥ १ ॥ प्रथम अलंकार आणि नंतर सोन्याची ओळख, ही घातक आहे, हें तुम्हाला पूर्वीं सांगितलें होतेंच. म्हणून प्रथम सोनें कळलें पाहिजे आणि नंतर अलंकाराची मजा भोगली पाहिजे. "ज्ञानात् ध्यानं विशिष्यते " म्हणजे पूर्वांग ज्ञान पाहिजे. याहून बाकीच्या ओवीचा खुलासा मी सध्यांच करूं शकत नाहीं. हे शब्द जरी तुम्हाला व्यर्थ वाटले तरी आम्हांला सार्थ आहेत. पण स्वार्थ सुटून परमार्थ दृष्टीचा सामानार्थ कळला पाहिजे. याला अति आर्त झाल्यावांचून उपाय सोपा नाहीं. म्हणून सद्गुरुकृपाच त्रिविधतापाला निवारिते. कोणी प्रत्यक्ष सूर्यचंद्रलोकांवर जरी गेले तरी तुम्ही तशा नादीं न लागून अमृतानुभवाच्या एका एका ओवीचा शंभर शंभर जन्मपर्यंत जन्मरहित असा अभ्यास कराल काय ? असें मी तुम्हांस विचारतो. उत्तर यावें. कळावें हे विनंती.

आपला गुलाब.

ताजा कलम—नानाला स्नानार्थ विचारलें तर मंगनीराम यांना विचारून काय तें करावें. त्या संबंधांत माझें मत उपयोगी नाहीं. त्याला विचारून तो सांगेल तसें करावें. × × आपण दिवाळीचे अगोदर एक दिवस येऊन जात असल्यास येऊन जावें, परंतु नानाचे प्रकृतीस जपत जावें. त्यांची प्रकृति पाहून काय तें करावें.

करावें. त्या संबंधांत माझें मत उपयोगी नाहीं. '' असें जें एक वाक्य आहे त्यावरून दुसऱ्या वैद्यावर सोंपविलेल्या प्रकृतीचा स्वतः विचार न करण्याचा महाराजांचा स्वभाव दिसून येतो. स्वत: संबंधानेंही ते असेच वागत असत.

सौ० मायबाईस आतां नववा महिना संपून, त्या कार्तिक शुद्ध ५ बुध-वारीं दुपारीं बारा वाजतां प्रसूत होऊन मुलगा झाला. बाळंतपणाकरितां गं० सारजाबाई, ( महाराजांची सासू ) गं० जीजीबाई, (वासुदेवराव मुळेमास्तर यांची बहीण) ह्यांस बोलाविल्यावरून त्याही आल्या होत्या. पुढें महाराजांनीं वेद० गोविंदशास्त्री पंचभाई यांस उमरावतीहून बोलाऊन मुलाचें जातक वगैरे करविलें. मुलाचें जन्मनांव भास्कर व व्यावहारिक नांव अनंता ठेविलें. मूळ नक्ष-त्राच्या तृतीय चरणावर मुलाचा जन्म होता म्हणून शांती वगैरे करविली. हरिभाऊला महाराजांनीं येथून पुन्हां एक पत्रोत्तर पाठविलें. त्यांत थिऑ-सफीची अंत:सभा बाह्यसभा व आपल्याकडील अंत:सभा बाह्यसभा ह्यांतील भेद सांगून मनाचे विकार दूर होण्याला भगवत्कृपेची आवश्य-कता सांगितली आहे व आत्मप्राप्तीचा बाह्यक्रम व अंतःक्रम सांगून प्रेमाचे निर्देश ओवीबद्ध सांगितले आहेत, व कात्यायनी जवळ आल्यामुळें वाठोड्यास लवकर येण्याविषयीं ताजाकलमांत सूचना केली आहे.

कार्तिकी द्वादशीस तुलसी विवाहाचे दिवशीं श्रीकृष्णमूर्तिबरोबर महा-राजांचा विवाह व्हावयाचा परंतु जननाशौचामुळें तो उत्सव महारा-जांनीं पुढें कार्तिकी पूर्णिमेस केला. या प्रसंगीं आकाजीबापू देशमुख यांनीं भक्तिपूर्वक साह्य केलें.

पुढें कार्तिक वद्य तृतियेचे दिवशीं सौ० मायबाईकरितां बाळंतिणीच्या औषधांत घालण्याकरिता जीजीबाई गोखरू दळत होत्या. इतक्यांत महाराज माडीवरून खालीं आले व जीजीबाईबरोबर दळूं लागले. सौ०

---

१ सूक्तिरत्नावली द्वि० यष्टि उत्तरार्ध पृ० ११ पहा.

मायबाईलाही महाराजांनीं हाक मारली व दोघे मिळून दळूं लागले. त्या वेळीं ‘ दळण दळतां । दळलें सर्व कांहीं । आतां तें एक उरलें ग बाई । पूजाया शेषशायी ॥ ’’ इ० गाणीं दोघांनीं मिळून म्हटलीं तीं फार बहारीचीं झालीं. ऐकायला मंडळीही बरीच जमली होती.

या सुमारास पाटण्याहून बापूगडीचें एक गद्यपद्यमय पत्र महाराजांस आलें. त्यांतील मुख्य गोष्टी अशा:—

१. “ मी इथें आलों त्या दिवसापासूनच आपण सांगितल्याप्रमाणें अभ्यास करणें सुरू आहे. * * निरंतर आपले संबंधींच विचार चालत असल्या कारणानें नाना प्रकारचे सुस्वप्न पडत असत. याप्रमाणें दोन तीन दिवस गेल्यानंतर गुरुवारीं एक विचित्र स्वप्न पडलें. त्याची हकीकत मी येथें देतों:—मी एका खेड्यावरून दुसऱ्या एका गांवास जाण्याकारितां निघालों. माझे बरोबर माझा आजा–आईचा बाप–हा होता. रस्त्यानें चिखल होता परंतु पाऊस वगैरे येत नव्हता. गोष्टी आपल्या संबंधानेंच चालल्या होत्या. आपले विषयीं माझे मनांत अश्रद्धाजनक दुरुपदेश ते मला करीत होते. इतक्यांत माझे जवळ असलेले सर्व पैसे तिथें खालीं चिखलांत पडले. हें पाहून तर त्यांना अधिकच स्फुरण येऊन विशेषच मला बोलूं लागले. महाराजांचे संगतींत विशेष काय आहे वगैरे वगैरे त्यांचे बोलण्याचा रोख होता. इतक्यांत एक आवाज माझे कानावर आला. त्यांत इतके शब्द मी स्पष्ट ऐकिले:—“ ए आंधळ्या बोवा, पहाना करना कांहीं आतां ” इतक्यांत मी पैसे उचलण्याकारितां थांबतों न थांबतों तोंच आपण त्या ठिकाणीं येऊन सर्व पैसे उचलून माझे हातीं दिले; हें पाहून माझा आजा तर आश्चर्यांत मग्नच झाला. २. इथें आणखी एक गोष्ट लिहाविशी वाटते ती अशी कीं सर्व मुलांनीं मिळून इथें यंदा तुलसीविवाह लाविला. त्या दिवशीं म्हटलेल्या मंगलाष्टकांपैकीं एक खालीं लिहितों:—

श्रीकृष्णा गरुडासना यदुपते राधापते श्रीपते
गोविंदा करुणापते मधुपते श्रीसत्यभामापते ।

---

१ श्रीगीतसंग्रह. चतुर्थ यष्टि पृ० ६९ गाणीं ७४४ ते ७५६ पहा.

पायीं ती अतिलीन पंचलतिका देवा तुझ्या हे हरे।
श्रीमत्सद्गुरु ज्ञानदेवतनया घेई करीं श्रीहरे ॥ १ ॥

३. पत्राच्या शेवटीं बापूगडीनें श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या स्तवनपर स्वकृत ओव्या वगैरे लिहिल्या आहेत; त्यांतले शेवटले अमृतध्वनीवृत्ताचे श्लोक संग्राह्य असल्यामुळें येथें घेतों:—

पापापहा चरण देवामहाप्रलयकालीं अहा तव विभो।
होई तरी प्रलय वारी वरी प्रणत तारी करी पदविभो॥
अंभोजसा अरुण तापालसा हरणकारी असा मनिं वसो।
ज्ञानेश्वराप्रणत कामेश्वरा नमन सर्वेश्वरा तुज असो॥ १॥
धांवोनियां प्रणत होवोनियां चरण वंदोनियां सुख वरूं।
शर्वादिकां निगम शास्त्रांदिकां अगम त्या पादुका उरिं धरूं॥
जावोनियां पदज घेवोनियां अमृत सेवोनियां नच मरूं।
ज्ञानेश्वरा प्रणत कामेश्वरा नमन सर्वेश्वरा तुज करूं॥ २॥
देवा तुला नमन केल्या मला न भय कालाकुलासहि कदा।
पाठीं वसे सतत खाटीं असे मज न सांडी जसें जल कदा॥
मीना तसें सकल ठाया दिसे अवनकारी असे पदगुरू।
ज्ञानेश्वरा प्रणत कामेश्वरा नमन सर्वेश्वरा तुज करूं॥ ३॥
ध्यावे सदा चरण देवा मुदा हृदयिं मोदास दायिच खरें।
होईन मी शरण पायां नमी चरण कामीं रमी नच बरें॥
गंता तदा भवति हंता सदा खलनियंता मुदा खलु *मो।
ज्ञानेश्वरा प्रणत कामेश्वरा सतत सर्वेश्वरा तुज नमो॥ ४॥
देवा पहा प्रणत पापापहा त्रिविध तापीं अहा सुकुनियां।
गेलों अति त्वरित येवा क्रिती अजुनि काला मिती उठुनियां॥
ध्यातां तुझे अरुण पादांबुजें हृदयिं माझ कुजें अघ वमो।
ज्ञानेश्वरा प्रणत कामेश्वरा सतत सर्वेश्वरा तुज नमो॥ ५॥

मालिनी—सतनुमनधनें हें सर्वही ज्ञानराया।
पदकमलिं तुझ्या बा अर्पिलें स्वीकराया॥

चरणकमलिं राहो प्रीति अत्यंत माझी ।
विनति सतत देवा नित्य ही पामराची ॥ ६ ॥

याप्रमाणें यावली येथील हकीकत आहे. यावेळीं महाराजांनीं यावलीस असतांना भानुमतीचा खेळ म्हणून आधुनिक Clairvoyance क्लेअरव्हायन्सवर एक निबंध लिहिला. शिवाय गोपीभक्ति, गुरुनामाची श्रेष्ठता, श्रीज्ञानेश्वर महाराजकृत हरिपाठाच्या प्रतिज्ञा, स्फुट पदें व अभंग वगैरे झाले.

असो. नंतर कात्यायनी जवळ आली होती म्हणून कांहीं मंडळीसह महाराज पुढें शुक्रेश्वर वाठोडा येथें गेले व कार्तिक वद्य १२ च्या सुमारास तेथें व्रतारंभ केला. सौ० मायबाई आठदहा दिवसांनीं मागाहून गेल्या. अरुणोदयीं स्नान करून कात्यायनी देवीचें पूजन, नंतर भागवत, ज्ञानेश्वरीचें श्रवण वगैरे व्रतसंबंधीं नित्य क्रम आटपून नंतर शास्त्रचर्चा, ग्रंथ वाचन, लेखन वगैरे करण्याचा महाराजांचा परिपाठ होता. याप्रमाणें एके दिवशीं मंदिराचे गच्चीवर व्यंकटराव हे महाराजांस द्रौपदीवस्त्रहरणाख्यान वाचून दाखवीत होते. दुःशासनानें द्रौपदीची वेणी धरून तिला सभेंत ओढीत आणल्याचा कथाभाग जेव्हां निघाला तेवेळीं महाराजांनीं मोठ्यानें ओरडून एवढी भयंकर गर्जना केली कीं ती ऐकून सर्व मंदीर दणाणलें व व्यंकटराव तर इतका भ्याला कीं पुढें दोन तीन दिवस त्या गच्चीवर जाणेंच त्यानें वर्ज्य केलें.

या कात्यायनी प्रसंगीं काशीराव बापूजी देशमुख हे वाठोड्यास महाराजांच्या दर्शनास आले होते. या वेळचा त्यांचा अनुभव त्यांच्याच शद्बांनीं येथें देतों:—

" इ० स० १९०५ सालचे डिसेंबर (मार्गशीर्ष) महिन्यांत महाराजांचे कात्यायनीव्रताकारितां उमरावतीहून वाठोड्यास मी प्रथमच गेलों. महाराजांची गंगेवरील सकाळची पूजा आटोपल्यावर सर्व मंडळीसह तेथील राममंदिरांत ते आले. मंदिरांत येतांच भागवत सुरू झालें.

रा० हरिभाऊ केवले पुराण वाचीत होते. सर्व मंडळी गडबडीनें येऊन पुराण ऐकण्यास बसली. मी महाराजांचे जवळच बसलों. त्या गडबडीत कोण कोठें बसलें आहे हें महाराजांस सहज समजण्यासारखें नव्हतें. कारण सर्व मंडळी एकदमच येऊन बसली होती. पुराण शांतपणें चाललें होतें. थोड्या वेळानें महाराजांनीं माझेकडे तोंड वळवून म्हटलें "तुम्ही आले हें चांगलें झालें. याचा मोबदला देव तुम्हाला लवकरच देईल. एक महिन्यानें तुमचे फायद्याचें कामास सुरुवात होईल आणि एक वर्षानें तें काम पूर्ण होईल." याप्रमाणें महाराज स्वयंस्फूर्तीनें सहजच बोलले. मी त्यांना प्रश्न मुळींच केला नव्हता. मी महाराजांचे जवळच बसलों असल्यामुळें व माझेकडेच तोंड वळवून महाराज बोलल्यामुळें ते शद्ब मलाच उद्देशून असावेत असें समजून मी आपले नोटबुकांत लागलीच ते शद्ब टिपून घेतले. पुढें एक महिन्यानें आमचे कचेरींतून जनाब कमिश्नर साहेब प्रांत वऱ्हाड यांचेकडे रिपोर्ट करण्यांत आला कीं, या कचेरींत कारकून जास्त असलेमुळें दोन दोन कारकून परजिल्ह्यांत पाठवावे. हें प्रपोजल ९-१० महिन्यांनंतर मंजूर होऊन आलें व त्याचे बरोबरच ५० रु० दरमहाची एक नवीन जागा मंजूर होऊन आली. यावेळीं ४० रुपये पगाराचे माझेसुद्धां तीन इसम आमचे कचेरींत होते. त्यांपैकीं एकालाच ५० रु. पगारावर नेमून द्यावें आणि मला व दुसरे एका इसमाला परजिल्ह्यांत पाठवावें असा विचार सुरू झाला. ४० रु. पगाराचे तीन इसमांत माझा नंबर पहिला होता. तरी ५० रु. पगाराची जागा माझे खालचे इसमास देण्यांत आली. तेव्हां अर्थातच वढती न मिळतां परजिल्ह्यांत जाण्याची पाळी माझेवर आली. पण ही अन्यायाची गोष्ट मी वरिष्ठ अधिकाऱ्याचे कानावर घालतांच त्यांनीं ५० रु. ची जागा मला देऊन उमरावतीसच कायम केलें. ही गोष्ट पूर्ण होण्यास एक वर्ष लागलें. महाराजांचे वचनाचें मला स्मरण झालें व ही गोष्ट मी त्यांना कळविली तेव्हां त्यांस आनंद झाला."

रा० रा० लक्ष्मण रामचंद्र पांगारकर हे यावेळीं उमरावतीस राष्ट्रीय

विद्यालयाचे हेडमास्तर होते. यांनीं महाराजांचें भजन व सपत्निक गाणीं वगैरे यापूर्वीं ऐकलेलीं नव्हतीं. ते ह्या वर्षी कात्यायनीव्रत पाहण्या-करितां वाठोड्यास आले होते. त्यांच्याबरोबर आणखी ८–१० इसम उमरावतीहून आलेले होते. ही सर्व मंडळी अगदीं न बोलतां एके जागीं उभी असतांना महाराज एकेकाच्या हाताची नाडी पहात पहात ह्यांच्या जवळ आले व नाडी पाहतांच हे पांगारकर म्हणून त्यांनीं सांगितले. आलेल्या मंडळींत कोण कोठें उभें होतें हें पूर्वी महाराजांस मुळींच ठाऊक नव्हते.

ह्या वेळीं पांगारकर यांस महाराजांच्या अलौकिक कवित्वशक्तीचा जो अनुभव आला तो पुढें त्यांनीं आपल्या मुमुक्षुपत्राच्या शके १८३० भाद्रपद वद्य १४ गुरुवार ता. २४ सप्टेंबर १९०८ च्या अंकांत छापून प्रसिद्ध केला तो येणेंप्रमाणेः—

* * " यांच्या कवित्वाची एक स्वानुभवांतली गोष्ट सांगतो:— आम्ही उमरावतीस असतांना एकदां तेथून आठ कोसांवर पूर्णा नदीच्या तीरीं यांचें कात्यायनीव्रत चाललें होतें तत्प्रीत्यर्थ मुद्दाम गेलों. उमरावतीहून ८।१० इसम बरोबर होते. त्या प्रसंगीं आमचे पुण्याचे मित्र श्रीज्ञानेश्वरीभक्त व अत्यंत पुण्यशील आणि खरे मुमुक्षु रा० केशवराव देशमुख बी० ए० हेही होते. आमचे तीन दिवस श्रीकृष्णाच्या नंदगोकुळांत जाण्याइतके परमानंदांत गेले. दुसरे दिवशीं दुपारीं तीन वाजतां सुमारे ४०।५० इसम एका उपवनांत आम्ही शिवालयासन्निध पुष्पवाटिकेंत बसलों होतों, गुलाबराव महाराज अर्थातच बरोबर होते. त्यांची वृत्ति प्रसन्न झाली व " मी आतां पुराण सांगतों तुम्ही सर्वजण ऐका " असें ते म्हणाले. पुराणाचा विषय आम्ही सुचवावा असा त्यांचा फार आग्रह पडल्यावरून " हें विश्वचि माझें घर । ऐसी मती जयाची स्थिर । किंबहुना चराचर । आपण जाहला ॥ १ ॥ " ही ज्ञानेश्वरींतील बाराव्या अध्यायांतली ओवी आम्ही सुचविली. ओवी ऐकतांच गुलाबरावांनीं मान दहावीस वेळां

फिरविली. ( ही त्यांना संवयच आहे. ) व ओव्या म्हणण्यास आरंभ केला. पुराणाचें मंगलाचरण त्यांनीं १५० ओव्यांत केलें ! १०० ओव्यांत वरील ओवीचा मागचा संदर्भ जुळवून दिला व एका प्रह-राच्या अवधींत म्हणजे तीन साडेतीन तासांत वरील ओवीच्या अर्थाचें विवरण तात्काळ रचत म्हटलेल्या किंवा म्हणत रचलेल्या एक हजार ओव्यांत त्यांनीं केलें ! ! ! आमच्या प्राचीन संतकवींचें आम्हांस स्मरण झालें. ओव्या तरी सामान्यांतल्या होत्या असें नाहीं. ज्ञानेश्वरी, अमृता-नुभव, नाथभागवत, विवेकसिंधु ह्या जगन्मान्य ग्रंथांच्या टीकाकारांला सर्वथा शोभण्यासारख्या भारदस्त, शुद्ध व अत्यंत प्रेमळ अशा त्या ओव्या होत्या. नामदेव तुकारामाचे अभंग कोटींनीं मोजण्यासारखे असणें अशक्य नाहीं असें आम्हांस तेव्हां वाटलें. भागवतावर व रामायणावर नाथ हजारों ओव्या कसे बोलत गेले असतील याची कल्पना आम्हांस तेव्हां आली ! महाराजांनीं दुसऱ्या दिवशींही " म्हणोनि जें जें उचित । आणि अवसरें करूनि प्राप्त । तें कर्म हेतुरहित । आचरे तूं ॥ " ह्या तिसऱ्या अध्यायांतल्या ओवीवरही अशाच ७०० ओव्या तात्काळ रचीत रचीत म्हटल्या. महाराजांची वाणी अत्यंत शुद्ध, सरस व प्रासादिक आहे. इ० इ०

पूर्व दिवशीं पांगारकरांबरोबर एक ग्याज्वेट गृहस्थ होते. ते परत बिऱ्हाडीं गेल्यावर महाराजांच्या ओव्यांसंबंधीं म्हणाले कीं ह्या ओव्या महाराजांनीं पूर्वीं पाठ करून आज म्हणून दाखविल्या असतील. त्यावर पांगारकर म्हणाले " अहो पण विषय मी आयत्या वेळीं सांगितला होताना ? " यावर ते निरुत्तर झाले. दुसरे दिवशीं हे गृहस्थ पुन्हां पांगारकराबरोबर होतेंच. तेवेळीं महाराज म्हणाले " मी ओव्या पाठ करून ह्मणत असतों अशी जर कोणाला शंका तर त्यानेंच मला आज विषय सांगावा. " हें ऐकून ग्याज्वेटांनीं मान खालीं घातली.

व्रत समाप्तीचे सुमारास बरीच मंडळी आली. त्यांत उमरावतीची नेहमींची मंडळी श्रीनिवास शास्त्री वगैरे होते. चांद्याहून रा० रा०

दाजी साहेब देवईकार वकील, बळवंतराव देशमुख वकील, दत्तात्रेय खापरे व त्यांच्या आप्तसंबंधांत असलेले नारायण पैकाजी पंडित हेही आले होते. हा प्रसंग विशेषतः खापरे यांस मोठा अनुपम व आजन्म आठवणींत राहण्यासारखा वाटला. तेथून जातेवेळीं त्यांस वाईट वाटलें व " पुन्हां आपली भेट कधीं होईल कोण जाणे " असें ते महाराजांस म्हणाले. यावर महाराज बोलले कीं तूं मजकडे येतजा म्हणजे माझी भेट होईल किंवा मीच तुझ्या गांवीं येईन. " मीच तुझ्या गांवीं येईन " या महाराजांच्या शब्दांचें महत्व खापरे यांस यावेळीं कांहीं वाटलें नाहीं. उलट महाराज कसचे आपल्या गांवीं येतात असेंच त्यांस वाटलें. परंतु परत गेल्यावर खापरे यांना त्यांच्या " लाडकी " नामक मालगुजारी गांवीं लवकरच जो एक विलक्षण अनुभव आला त्याच्या योगानें महाराजांचे वरील शब्द त्यांना चिरस्मरणीय झाले. हा त्यांचा अनुभव महाराजांच्या "अदृश्य दीपिकेंत" त्यांच्याच (खापऱ्यांच्या) सहीनें लिहिलेला आहे तो येणेंप्रमाणें:—

" इ० स० १९०६ च्या जानेवारी महिन्यांत मी आपल्या लाडकी नामक मालगुजारी गांवीं असतांना श्रीगुलाबराव महाराजांचे सहवासांत अनुभविलेल्या कात्यायनी व्रताची आठवण होऊन मला करमत नसे. त्यावेळीं माझे बरोबर माझे शालक रा० रा० [1]नारायणराव पंडित हेही होते. मी निजून राहिलों म्हणजे वाठोडा येथें असल्या प्रमाणेंच सर्व गोष्टी स्वप्नांत दिसून आनंद वाटत असे, त्यामुळें मी बहुतेक निजूनच रहात असे. पुढें श्रीज्ञानेश्वरकृत हरिपाठाचें एकदां पारायण केलें व नंतर पारणें केलें. त्या दिवशीं श्रीज्ञानेश्वरमहाराजांचे नांवानें एका लहान ब्राह्मणास आमंत्रण देण्याविषयीं कारकुनास मी मुद्दाम सांगितलें होतें. परंतु तसा ब्राह्मण मिळाला नाहीं. दुसरे निमंत्रित ब्राह्मण येऊन भोजनाची तयारी झाली. इतक्यांत एक आगंतुक ब्राह्मण तेथें आला.

---

१ हा वृत्तांत रा० रा० नारायणराव पंडित यांनीं आपल्या अभंगात्मक चरित्रांतहि वर्णन केलेला आहे.

हा साधारण बावळटासारखा दिसत असून वर्ण सांवळा होता. मऱ्हाटी भाषा त्याला येत नसून कन्नडसारख्या भाषेंत कांहीं शब्द तो बोलत होता. त्याची चर्या व्यवस्थित दिसत नव्हती. मी त्यास संस्कृत भाषेंत कांहीं प्रश्न विचारले असतां " यन्था संस्कृतम् ? " असें विस्मयपूर्वक त्यानें उत्तर दिलें. जेवतांनाही तो नीट व्यवस्थित जेवला नाहीं. भोजनोत्तर त्याला दक्षिणा दिली ती त्यानें तेथेंच टाकून दिली. कांहीं वेळ तेथें राहून जाते समयीं " पोता महाराजा " असें म्हणून चालता झाला. मला त्याच्या स्थितीविषयीं विलक्षण वाटलें व आदरबुद्धि उत्पन्न झाली.

एके दिवशीं मला तोच ब्राह्मण स्वप्नांत दिसला व मला ओळखलें काय ? असें विचारूं लागला. मी आपणांस कसें ओळखावें ? असें मी त्याला म्हणालों. तो मला म्हणाला मी कोण आहे हें तुला आतां सांगतों. असें म्हणून दोन्ही हातांच्या नखांनी त्यानें आपलें हृदय दुभंग केल्यासारखें केलें. तोंच एकाएकीं लख्ख प्रकाश पडला, व त्या प्रकाशांत श्रीज्ञानेश्वरमहाराजांची रम्यमूर्ति दिसूं लागली.. तत्काळ माझा कंठ दाटून येऊन मी रडूं लागलों. तेव्हां असें करूं नये, असें प्रेमळ शब्दांनीं म्हणून त्यांनीं मला उचलून धरलें. झालें. स्वप्न संपलें. ही सर्व हकीकत पुढें मी भेटींअंतीं महाराजांस विदित केली असतां " मधें मधें दर्शन देत असावें असें तूं मला म्हटलें होतें, त्यावरून तुला श्रीज्ञानेश्वर-महाराजांनीं त्या रूपानें दर्शन दिलें " असें ते म्हणाले."

बापूगडीचीही या वेळची हकीकत कांहींशी अशाच तऱ्हेची आहे. अभ्यासाच्या वगैरे अडचणीमुळें या प्रसंगीं तो व्रताकरितां येऊं शकला नाहीं. परंतु इकडील चिंतनामुळें सात्विक भावनेच्या परिपाक दशेंत काव्यस्फूर्ति, रासदर्शन, यतिरूपानें श्रीगुरूचा स्वाप्निक अनुग्रह इत्यादि मानसप्रत्यक्ष अनुभव त्याला पाटणा येथें आले व ते सगळे त्यानें श्रीमहाराजांस व कांहीं आपल्या तीर्थरूपास पत्रद्वारें कळविले. त्यांचा यथावकाश निर्देश पुढें " सुहृत्प्राप्ति " प्रकरणांत येणार आहे.

ह्या भावनामय गौण कथांपेक्षांही संपूर्ण जीवांच्या संसारयात्रेंतील क्लेश हरण करणाऱ्या मुख्य ईश्वरविषयक कथांचा प्रभाव तर महाराजांच्या ठिकाणीं अद्‌भुत दिसून येत होता. त्या सत्यज्ञानबोधक व भक्तिज्ञान वैराग्यवर्धक कथा महाराजांच्या छंदोमय अखंड प्रेमळ वाणींतून निघूं लागल्या म्हणजे त्यांचा प्रवाह इतका अनावर होत असे कीं ऐकणाराला नुसतें अनुसंधानही स्थिर ठेवणें जड जात असे, मग जलद लेखकाच्या शीघ्र लेखनपटुत्वाची गोष्ट तर दूरच राहिली.

वाठोडा येथील सुमारे दीड महिन्याच्या अवधींत महाराजांचे नित्य नवीन अभंग, आख्यानें, पदें, गाणीं वगैरे नाना प्रकारची कविता निर्माण होत होती तिचें वर्णन कोठवर करावें ? जेथें जेथें म्हणून महाराजांचें वास्तव्य होत असे तेथें तेथें हा त्यांचा नेहमींचा स्वयंसिद्ध वाग्यज्ञ सर्व जीवांस कृतार्थ करून पावन करीत असे.

पौष वद्यांत उमरावतीस परत आल्यावर सरासरी दोन महिने-पर्यंत महाराज तेथें राहिले. या अवधींत घडलेल्या विशेष गोष्टी:—

पुण्याहून रा० रा० केशवराव देशमुख यांजकडून पत्र आलें होतें. त्याचें उत्तर महाराजांनीं पाठविलें. तें सूक्तिरत्नावली द्वि० यष्टि उत्तरार्ध पृ० २१ वर छापलें आहे. त्यांत श्रीज्ञानेश्वर महाराजांचें सर्वात्मकत्व अनुभवास येण्याकरितां, वैराग्यपूर्वक प्रेमळ चित्तानें श्रीगुरुवचनावर विश्वास ठेवून उक्त साधनाभ्यास स्वानुभवासहित सांगितला आहे.

माघ शुद्ध ११ एकादशीचे दिवशीं सोमवारीं रामचंद्रराव भागवत मास्तर ( यांचा उल्लेख मागें आला आहे ) यांनीं महाराजांकडे येऊन रा० रा० माधवराव अणे मास्तर बी. ए. यांच्या स्वभाववादविषयक

प्रश्नाचा अनुवाद केला की " उंदीर बिळांत गेला व मुलगा झाला म्हणून आईबापांची सेवा करण्याचें कांहींच कारण नाहीं. स्वभावानेंच सर्व होतें. " त्यावर महाराजांनीं उत्तरादाखल पुढील अभंग म्हटलाः—

कोंवाळिया मनावरी नारायणा । विद्या अभिमाना ठाव नको ॥१॥
शुष्क तर्कजाळें हारपतो प्रेम । भासती निगम मूढबुद्धि ॥२॥
तर्कवादियांचे नवल आक्षेप । माय आणि बाप अप्रमाण ॥३॥
म्हणती बापासी मैथुनीं आवडी । आमुची ती गोडी काय ती त्यां ॥४॥
आम्हीं तों सहज जन्मलों मैथुनें । बापाचें करणें येथें काय ॥५॥
खजिार स्वभाव सहज आचार । आम्हां जन्मभार त्यांचा काय ॥६॥
ऐसियांचें कैसें कीजे समाधान । कैसें तें वचन आकळावें ॥७॥
वेद पौरुषेय म्हणाया सिद्धता । आमुची कविता तेथें कोण ॥८॥
ऐसियांच्या पायीं दुरूनी वंदन । निवृत्तिनंदन कडिये राहू ॥९॥

स्वतःच्या पुस्तकालयांतील भारत, भागवत, योगवासिष्ठादि ग्रंथांचें वाचनही यथावकाश चालत असे. असे जे ग्रंथ रोज वाचण्यांत येतील त्यांतील निवडक व गंभीर विषयांचा संक्षेप एका लेखमालेंत ग्रथित करण्याचा महाराजांचा विचार ठरला होता. त्याप्रमाणें प्रथम श्रीमद्भागवतांतलि प्रथम स्कंधांतर्गत कांहीं अध्यायांतील विषयांचा संक्षेप यावेळीं ग्रथित झालेला आहे. तो फार सुंदर आहे. त्यांतून कांहीं उतारे येथें घेतोः—

चतुर्थाध्याय—श्लोक ३२ उत्तरार्ध व ३३ ' कृष्णस्य नारदो ' ' तमभिज्ञा ' ती भक्ति सत्संगावांचून प्राप्त नाहीं. पूर्ण ब्रह्मवेत्त्यांनांही सत्संगावश्यकता. २ वेदद्रष्ट्या ऋषीनेंही भगवद्भक्तांची पूजा करावी, याविषयीं व्यासाचे घरीं नारद आले असतांना व्यासांनीं नारदाची पूजा केली हें आप्तवाक्यरूप ऐतिह्य प्रमाण. पंचमाध्याय श्लोक ११ ' तद्वाग्विसर्गो ' १. हरिभक्तीवांचून व्याकरणाचा निषेध. २. नुसत्या व्याकरणांत अथवा वाणीच्या शुद्ध प्रयोगांत प्रसाद नाहीं. ३. हरिभक्तांचा अशुद्ध वाणीप्रयोगही प्रासादिक असतो. ४. व त्या प्रसादानें जसें

जगत्कार्य होतें तसें वैय्याकरण, न्याय, घटपटादि तर्कपटूंच्या शुद्धवाणीप्रयोगानें होत नाहीं. श्लोक १५ वा. ' जुगुप्सितं ' हरिभक्तीवांचून व्यासांसारख्यांच्याही हातून अन्याय होतात. २. याविषयीं व्यासांचा अन्याय नारदांनीं दाखविला हें उदाहरण. ३. नारद म्हणतात हे व्यासा, इतर पुराणादि ग्रंथांत कर्म-उपासनेचें प्रतिपादन, जैमिनीचे हातून मोक्षनिषेधरूप धर्मजिज्ञासेचा निषेध करविणें, भारताला पंचम वेद म्हणणें, व ब्रह्मसूत्रांत त्याच्या समन्वयाचा विचार न करणें, आणि योगसूत्रादिकांच्या भाष्यांत स्वतः त्याचें मंडन करणें, म्हणजे सत्वरजस्तमोगुणावस्थेला प्रकृति म्हणणें, व ब्रह्मसूत्रांत त्याच योगाचा निषेध करून अग्नि, पाणी व पृथ्वि याला प्रकृति म्हणणें, प्रधान कारणवादांत मन्वादिकांच्या विरुद्ध जाणें, वेदोपनिषद्भाष्य न करितां तुझ्याच मतानें सांख्ययोगादिक विरुद्ध असतांही त्यावर भाष्य करणें; इत्यादि तुझे अन्याय हरिभक्ति केली असतां क्षम्य होऊन त्वां केलेल्या सर्व कार्यांचा समन्वय होईल. यावरून हरिभक्तास कोणत्याही महापुरुषाची भीति नाहीं. अध्याहारः—पहा त्वां केलेल्या वेदविभागरूप शाखा आपल्या पैलादि शिष्यांना दिल्या, परंतु तर्पणामध्यें पैलसूत्रादिकांचें नांव घेऊन ' व्यासं तर्पयामि ' असें तुला कोणीच म्हणत नाहीं. आक्षेप—अहो " पैलसूत्रभाष्यभारत महाभारत धर्माचार्यास्तृप्यन्तु " इत्यादि महावाक्यांत ' भारतमहाभारतादि ' शब्दानें सामान्येंकरून व्यासांचें ग्रहण होत नाहीं काय ? समाधान—अरे सर्वकर्त्यापुरुषाचें सामान्येंकरून ग्रहण व त्याच्या शिष्यांचें विशेषेंकरून ग्रहण हा महापुरुषांचा मोठा अपमानच होय. दुसरें 'सूत्र' शब्दानें आश्वलायनादिक, भाष्य शब्दानें शबरादिक, भारतशब्दानें जैमिन्यादिक, व महाभारत शब्दानें वैशंपायनादिक अपेक्षित नसतील कशावरून ? म्हणून नारद म्हणतात हे व्यासा, तूं उरुक्रम भगवल्लीला गान केली असतां तुझ्या ह्या अवताररूप चिरंजीव देहाचें सार्थक होऊन कलियुगासारख्या दुष्ट पुरुषाकडूनही तुझ्या कीर्तीचें गान होईल, मग इतर युगें नाहींत का करणार ? नाहींत करणार तर त्यांत त्यानांच लज्जा प्राप्ति होईल. कारण तूं तर कर्मज्ञानभक्तियोगानें चारी युगांना समान ठेवणारा होशील.

सप्तमाध्याय. श्लोक ६ ' अनर्थोपशमं ' १ सर्व अनर्थांची निवृत्ति करणारी

व परमानंदप्राप्ति करून देणारी भक्ति आहे असें जाणून सर्व साधनांचा त्याग करून ही भक्तिप्रधान 'भागवतसंहिता' पाहून लिहिली. (संहिता हें वेदाला नांव आहे. भागवतालाही वेदत्वच आहे म्हणून त्याला संहिता म्हटलें. हा अर्थ श्रीधरी टीकानुसार आहे) टीप—ह्या श्लोकाची टीका भगवान् श्रीधराचार्यांनीं अति गोड केली आहे व ती भगवान् श्रीवल्लभाचार्य मताला अनुसरून असून श्रीशंकराचार्य मतालाही पूर्ण अनुकूल आहे. दुसरें, श्रीमच्छुकाचार्य शिष्य विष्णुस्वामी यांचे दोन श्लोक श्रीधरांनीं आपल्या टीकेंत दिले आहेत. आणि याच टीकेंत ईश्वराचें स्वरूप व तटस्थ लक्षण आणि जीवाचें स्वरूपलक्षण अत्युत्तम रीतीनें वर्णन केलें आहे. तें मुमुक्षुजनांनीं अवश्य वाचावें, व यापासून दुसरा फायदा हा कीं श्रीक्षेत्र गोकुलवासी ब्रह्मसूत्राणुभाष्यकार विष्णुस्वामीमतानुयायी वल्लभाचार्य व भगवान् श्रीशंकराचार्य या दोघांच्या मताचें ऐक्य होऊन परस्पर द्वेष नाहींसा होतो. अध्याहार:—आम्हीं असें म्हणतों कीं वल्लभाचार्यमताचा द्वेष करणारे शांकरमती भागवतधर्मी नव्हेत, म्हणून त्यांचे ठिकाणीं हरिभक्ति उत्पन्न व्हावयाची नाहीं, व तसेंच, शंकराचार्यमताचा द्वेष करणारे वल्लभमतानुयायीही भागवतधर्मी नव्हेत; म्हणून त्यांचेही ठिकाणीं हरिभक्ति उत्पन्न व्हावयाची नाहीं. भागवतावरून व भगवान् श्रीधरस्वामी सत्कृतीवरून व दोघांचेंही सूत्रभाष्य अवलोकन करून दोघांही आचार्यांचें अत्यंत ऐक्य आहे, असें आम्ही स्पष्ट म्हणतों. जास्ती कमी निरूपण ही बुद्धीची व्यवस्था होय. हें ऐक्य संकेतदृष्टीनेंच आहे असें आम्ही म्हणत नाहीं. तर बाह्य दृष्टीनेंही स्पष्ट ऐक्य आहे व त्याविषयीं कोणी वाद घातला असतां आम्ही सभेंत सिद्ध करूनही देऊं. वल्लभाचार्य विष्णुस्वामीमती आहेत याविषयीं 'शुद्धाद्वैतमार्तंड' यांत प्रत्यक्ष साक्ष आहे व या टीकेंत दिलेले विष्णुस्वामीचे श्लोक आणि वल्लभाचार्यांचें 'ब्रह्मसूत्रभाष्य' या दोहोंचा अर्थही एकच आहे. श्रीधराचार्य शांकरमताचे असून आपल्या अनुष्ठीयमानमताला न सोडतां विष्णुस्वामीश्लोकांची अवतरणिका देऊन वल्लभमतवर्ती अर्थ केलेला आहे, म्हणून वल्लभाचें 'शुद्धाद्वैत' व शंकराचार्यांचें 'अद्वैत' दोन्हीही एक आहेत; म्हणून ते दोघेही आचार्य हरिहरांप्रमाणें समान अभिनंदनीय आहेत.

तें ऐक्य कसें व त्याचा गुणदोषविचार कसा? याचें स्पष्टीकरण येथें विस्तार-भयास्तव करीत नाहीं. श्लोक ७ ‘ यस्यां वै ’:—१ भागवताचें महत्व. २ वेदाचे पठनानें फल होतें व भागवताचा नुसता ऐकण्याचा निश्चय केला असतांना सर्व दुःखें निवृत्ति करणारी श्रीकृष्णभक्ति उत्पन्न होते; म्हणून वेदाहून भागवताचें वारिष्ठ्य.

श्लोक ८ ‘ ससंहितां ’:—१. भागवताला वेदरूपत्व. २. वेदांतियांना आश्चर्य करावयास लावणें. ३. जीवन्मुक्तानेंही भक्तिशास्त्राचें पठण व भगवद्भक्ति करणें. ४. याविषयीं श्रीमच्छुकाचार्य ब्रह्मनिष्ठ व जीवन्मुक्त असतांही त्यांना श्रीव्यासांनीं भक्तिप्रधान भागवतसंहिता शिकविली हें ऐतिह्य प्रमाण. ५. व म्हणूनच विदेहीमुक्त असणारे व वनांत पळालेले शुकाचार्य भक्तिप्रेमानें पुन्हा पितृगृहाप्रत आले. श्लोक ९ ‘ सवै ’:—विषय–पूर्वपक्ष. ब्रह्मनिष्ठाला पूर्ण मोक्ष झाला असतांही भक्तिशास्त्र पठणाची काय अवश्यकता? हा पूर्वपक्ष. श्लोक १० ‘ आत्मारामाश्च मुनयो ’:—विषय—सिद्धांत. या श्लोकांतील चकार हा पूर्वपक्षनिवृत्यर्थ आहे. २. संकेतदृष्टीच्या ज्ञानानें आत्म्याचेच ठिकाणीं स्थिर झालेले मुनी आणि ग्रंथीत्रय नाश झालेला आहे ज्यांचा व वेदादि ग्रंथांपासून झाली आहे निवृत्ति ज्यांची असे जीवन्मुक्तही प्रभूचे ठायीं निर्हेतुक भक्ति करितात. ३. याला कारण प्रभूचे गुण आनंदापेक्षांही आनंदरूप आहेत. ४. याविषयीं शुक पूर्णकाम असूनही सगुण भक्तिप्रधान भागवताचें त्यांनीं पठण केलें हें ऐतिह्य प्रमाण. (हा श्लोक श्रीज्ञानेश्वरमहाराजांचा व माझा अत्यंत आवडता आहे, आणि “ शिवो भूत्वा शिवं यजेत् ” ही श्रुती या श्लोकाला पुष्टिकारी असून भक्ति वाढविणारी आहे. श्रुत्यर्थ—चेतन ऐक्यरूप लक्ष्यांशानें संकेतदृष्टिपूर्वक जगज्जीवेश्वर ऐक्य झालें तरीही ऐक्यत्वोर्मीरूप जें ‘ वाचारूण ’ तें निवृत्त करण्यासाठीं व आणखी कांहीं गुह्य कारणासाठीं व शुद्ध निरपेक्षभाव कळण्यासाठीं भगवद्भक्ति करणें अवश्य आहे.)

सनातन भक्तितत्वाचें प्रतिपादन पूर्वपरंपरेला न सोडतां वेळोवेळीं आपल्या गद्यपद्यान्वित रसाळ वाणीनें नवीन तऱ्हेनें करण्यांत महाराजांचा

अधिकार केवढा होता याची कल्पना येण्याकरितां वर घेतलेले वेचे पुरे आहेत.

सौ० मायबाई महाराजांच्या अत्यंत पतिपरायण पत्नि व सद्गुरुप्रेमैकनिष्ठ शिष्या होत्या, तथापि नूतन जन्मलेल्या चार महिन्यांच्या अर्भकाविषयीं त्यांच्या वृत्तींत मोह राहणें अपरिहार्य होतें. महाराजही अत्यंत वृत्तिनिरीक्षणकुशल असून स्वकीय भक्तांचें निरपेक्ष हित साधण्यांत नेहमीं दक्ष असत. त्यांनीं सौ० मायबाईची ही स्थिती व परमार्थ प्रगतीवर होणारा तिचा परिणाम आपल्या दिव्य शास्त्रदृष्टीनें जाणला, व नुकत्याच झालेल्या कात्यायनी प्रसंगांत वाठोडा येथें असतांना तिच्या हातानें मुलास विष देवविण्याचा एक खोटा व्यूह रचून, व आतां उमरावतीस असतांना मुलास घरीं ठेवून व मायबाईस एकटेंच आपल्याबरोबर बडनेरास यावयास लावून त्यांच्या मनांतील मोहवृत्ति अत्यंत प्रक्षुब्ध केली व नंतर बडनेराहून त्यांस हरिभाऊबरोबर उमरावतीस परत पाठविलें व आपण बरोबरच्या मंडळीसह चारसहा दिवसांकरितां लोणीस आपल्या आजोळीं गेले. यावेळीं मायबाईस खरा प्रकार उमजून आल्यामुळें त्या पुष्कळ वेळपर्यंत मूर्च्छित पडल्या व "चांडाळा, सद्गुरुसेवेंत अंतर पाडण्याला तूं माझ्या पोटीं कशाला आलास?" असे शब्द मुलास उद्देशून नंतर त्यांच्या तोंडांतून निघाले. याप्रमाणें आपल्या नेहमींच्या अतर्क्य शिक्षणपरिपाटीनें मायबाईच्या मनांतला पुत्रमोह महाराजांनीं नाहींसा केला.

लोणहून परत आल्यावर मुळे बंधूंच्या विनंतीवरून महाराज मायबाईसह सर्व मंडळी घेऊन हरद्यास जाण्यास निघाले व फाल्गुन वद्य ५ मीस तेथें जाऊन पोहचले. नंतर फाल्गुन वद्य ११ चे दिवशीं नेमावर येथें नर्मदा स्नानास जाऊन व तेथें नर्मदास्तुतिपर व हरिहरस्तवनपर नवीन पदें वगैरे करून आपल्या हरिभजनप्रतापानें त्या क्षेत्रास चार दिवस शोभा आणली.

---

श्रीज्ञानेश्वर माउली समर्थ.

शके १८२८ पराभवनाम संवत्सरे. इ० स० १९०६—१९०७.



चैत्र, वैशाख दोन महिने महाराजांचें वास्तव्य हरद्यासच होतें. नेमावर, मजली येथेंही मध्यंतरीं महराज गेले होते. नेहमींच्या क्रमाप्रमाणें सच्छास्त्रचर्चा, प्रेमळ भजन वगैरे चालू होतेंच. त्यामुळें भाविक व प्रेमळ जिज्ञासूंस परमार्थ लाभ होऊं लागला. हर्दा येथील नारायण रघुनाथ केकरे व गणपतराव केकरे हे उभय बंधूही महाराजांच्या निरूपणादिकांस लुब्ध होऊन त्यांजकडे येत असत. रामनवमीचा उत्सव हर्दा येथेंच वेद० दादामुळे यांच्या घरीं महाराजांनीं केला. उत्सव प्रसंगीं जातक, पाळणें, गाणीं, काला वगैरेची मोठी वहार झाली.

येथून चित्ताकाशवर्णनपर एक पत्र महाराजांनीं बापूगडीस पाठविलें. या पत्राचा संबंध मागें दाखविला आहे. (पृ० २०५ पहा.) या पत्रांत चित्ताकाशांत जातांना, येणारे चार अडथळे, तन्निवारणार्थ शास्त्रांचा विनियोग, आत्मसिद्धीस शास्त्र, ईश्वर, गुरु व स्वतःचा प्रयत्न या चारही गोष्टींची अत्यंत आवश्यकता इत्यादि विषयांचें सुंदर विवेचन आहे. सूक्तिरत्नावलि द्वि. यष्टि उत्तरार्ध पृ. ४२ पहा.

पुढें महाराजांचा आळंदीस जाण्याचा विचार ठरून सौ० मायबाईसह सर्व मंडळीस घेऊन ते निघाले. वेद० गोविंदशास्त्री पंचभाई हे उमरावतीस होते. त्यांस तार करतांच तेंही उमरावतीहून निघून इगतपुरीचे स्टेशनावर येऊन मिळाले. या सर्व मंडळीसह महाराज ज्येष्ठ शुद्ध प्रतिपदेस गुरुवारीं आळंदीस पोहचले व त्रिरात्र तेथें राहून पुण्यास आले व तेथें दोन तीन दिवस राहून पुन्हां हरद्यास परत गेले. आळंदीस मायबाईनीं महाराजांच्या आज्ञेवरून ज्ञानेश्वरीचें पारायण दोन दिवसांत केलें. त्या वेळांत त्यांनीं मुलाला पाजलें देखील नाहीं.

यावेळीं पुण्यास जो प्रकार घडला त्याविषयीं महाराज एके ठिकाणीं म्हणतातः—“ या सुमारास मी एकदोन वेळ आळंदी, पुणें व मुंबईला जाऊन आलों होतो. तेव्हां माझ्या विषयीं बऱ्याच लोकांचा समज चांगला झाला होता. परंतु पुण्याच्या लोकांना कांहींतरी विलक्षण चमत्कार पाहिजे होता. त्याचा मी सारखा निषेध करीत असे. शिवाय अशा वेळीं पुण्यांतील एका प्रतिष्ठित म्हणविणाऱ्याचें मत मी खोडून काढलें होतें. त्यामुळें रा० ब० पेंडशाला एके दिवशीं त्यांनीं आणलें. मी त्यांना “ बंधूनि बहुव्रीहौ ” हें सूत्र विचारलें. त्यांनीं सांगितलें तें कौमुदींत नाहीं. परंतु तुम्हाला सर्व कांहीं पाठ येते असें म्हणतां तर आम्हांला भारताचें वनपर्व पाठ म्हणून दाखवा, असें ते म्हणाले. ह्या पूर्वी उमरावतीस एका स्त्रीनें माझ्याशीं दुर्वर्तन करण्याची खटपट केली होती व ती मी त्याच वेळीं खापरे, शास्त्रीबोवा ( श्रीनिवासशास्त्री ) वगैरेंच्या समक्ष बाहेर काढली. इतकी गोष्ट सत्य घेऊन मी * आहे असें लोकांना सांगून मी पुण्यांतील खटखट टाळली. ” “ नये व्याकरण मजप्रती । पुण्यपत्तनांतीं श्रुत हें ॥ ” हे व्याजोक्तीचे उद्गार याच प्रसंगाला अनुलक्षून महाराजांनीं एके ठिकाणीं काढले आहेत. व “ पुण्यास २।४ तर्कटी मंडळीशीं यांचा थोडा बेबनाव झाला तथापि हे अलौकिक बुद्धीचे व भगवत्प्रसादपात्र झालेले आहेत अशी आमची तरी कल्पना होऊन चुकलेली आहे. ” असें मुमुक्षु पत्राच्या ता० २४ सप्टेंबर १९०८ च्या अंकांत मुमुक्षु कर्त्यांनीं म्हटलें आहे.

## हर्दा येथील हकीकत.

ह० भ० प० गोंदवलेकर ब्रह्मचैतन्य महाराज यांचेंही वास्तव्य अलीकडे हर्दा येथेंच होतें. महाराजांचें व त्यांचें अनेक विषयांवर भाषण होत असे. परंतु पुढें दोघांचा मतभेद झाला. त्याचें कारण असें कीं, गोंदवलेकर महाराजांचा अभिप्राय असा होता कीं यज्ञ, याग, स्नानसंध्यादि कर्मे सर्व गौण असून नामस्मरणानेंच सर्व कांहीं होतें व या आपल्या म्हणण्याला श्रीमद्भागवताचें ते प्रमाण देत. यावर

महाराजांचें असें उत्तर होतें कीं, नामस्मरण हें सर्वसाधारण प्रायश्चित असल्यामुळें त्यानें फक्त वाक्यप्रतिबंधच दूर होतो. पण अविद्यामूलक आवरण नष्ट होण्यास सद्गुरुपासून श्रवणमननपूर्वक वेदान्तचिन्तनच घडलें पाहिजे. श्रीमद्भागवतप्रामाण्याविषयीं महाराज म्हणाले कीं, त्यांत श्रुतिविरुद्ध मत प्रतिपादन केलेलें असल्यामुळें तें आम्ही प्रमाण मानीत नाहीं. हें श्रुतिविरुद्ध मत कोणतें असा तेथें प्रश्न निघाला असतां ' सएष जीवो विवरप्रसूतिः ' या श्लोकांत जीवाची उत्पत्ति मानली आहे हें महाराजांनीं दाखवून दिलें व हर्दा येथील शास्त्रीपुराणिकादि विद्वान मंडळीस तेथें बोलावून त्यांस विचारलें असतां त्यांनींही ती गोष्ट कबूल केली.

याच सुमारास काशी येथील कैवल्यधाम मठाचे अधिपती कृष्णानंद-सरस्वती हे कोल्हापुरास वेदोक्त प्रकरणासंबंधानें गेले असतां तेथें त्यांनीं महाराजांच्या विद्येची कीर्ति ऐकली. या स्वामीच्या विद्वत्तेची ख्याति सर्वत्र आहे. ते कोल्हापुराहून परत येत असतांना एक दिवसाकरितां म्हणून हर्द्यास उतरले होते. त्यांना घेण्याकरितां खंडेराव विनायक मजलीवाले वगैरे शिष्य मंडळी रेलवे स्टेशनावर गेली होती. त्यांजबरोबर महाराजही गेले होते.

गाडींतून उतरतांच खंडेरावांस स्वामीनीं विचारलें कीं, येथें कोणी विद्वान सत्पुरुष आले आहेत म्हणून ऐकतों तर ते कोठें उतरले आहेत? खंडेराव म्हणाले ते आपल्या घराजवळच आहेत व हल्लीं येथें आपल्या दर्शनासही आले आहेत. इतक्यांत महाराजांनीं येऊन स्वामींस साष्टांग नमस्कार घातला. गोंदवलेकर महाराजही टांग्यांत बसून आले होते त्यांनीं स्वामींस आपल्याबरोबर टांग्यांत घेऊन आपल्या बिऱ्हाडाकडे टांगा चालू केला. परंतु तेथें न उतरतां स्वामी खंडेराव मजलीवाले यांचे येथें उतरले.

पुन्हां स्वामींच्या बिऱ्हाडावर महाराज त्यांच्या दर्शनास गेले होते. परंतु स्वामींनीं उपेक्ष्य वृत्ति धारण केलेली दिसली व महाराजांच्या

स्त्रीवेषास उद्देशून कांहींसे निषेधपर भाषण त्यांनीं केलें. ते वेळीं अत्यंत विनीत होऊन महाराजांनीं त्यांस पुढील शंका विचारल्याः—

१. वेद ईश्वराच्या निश्वासापासून सृष्टीच्या पूर्वी निर्माण झाले. असें असून त्यांत हरिश्चंद्रादिकांच्या कथा कशा ?

२. कपिलांच्या सांख्यसूत्रांत 'ईश्वरासिद्धेः' या सूत्रांत ईश्वराचें अस्तित्व मानलें नसून 'ईदृशेश्वरसिद्धिः सिद्धा' या सूत्रांत ईश्वराची सिद्धि केली आहे हें कसें ?

स्वामींचें व महाराजांचें भाषण ऐकण्याकरितां मंडळी बरीच जमली होती. स्वामी म्हणाले ह्या वेळेस मला तुमच्या प्रश्नाकडे लक्ष्य देतां येत नाहीं. मी नुकताच येऊन बसलों आहे. मग पाहूं. हें ऐकून महाराज परत गेले व जमलेली मंडळीही उठून गेली. ते दिवशीं सायंकाळीं मुकुंदभट तेलंग स्वामीपाशीं म्हणाले कीं येथील कांहीं ब्राह्मण मंडळी शूद्राच्या नादीं लागतात व मंत्र घेतात, त्यांनीं विद्वान ब्राह्मण पाहून मंत्र कां घेऊं नये ? उगीच एखाद्या शूद्राच्या नादीं लागण्यांत काय अर्थ आहे ? स्वामी त्यावर म्हणाले कीं, त्या शूद्राजवळ तशीच विद्या व अधिकार असेल. तेवेळीं तेथें खंडेराव बसले होते. ते स्वामीस म्हणाले कीं ते (गुलाबराव) महाराज शूद्र आहेत तथापि त्यांचें उत्तम आचरण, विद्वत्ता वगैरे पाहून आमची श्रद्धा त्यांचे ठिकाणीं जडली आहे. आपणही अगोदर त्यांची परीक्षा करून नंतर आपलें मत सांगा. कृष्णानंद म्हणाले बरें. मी आणखी एकदोन दिवस येथें आहेच.

थोड्या वेळानें महाराजही आले व स्वामीस साष्टांग दंडवत घातला. स्वामींनी ऊठ म्हटल्यावर उठून हात जोडून उभे राहिले व बसण्याची आज्ञा मिळाल्यावर बसून नम्रपणानें शंका विचारली कीं, श्रीमद्भगवद्गीता अ० १३ श्लोक २० यावरील भाष्यांत शंकराचार्यांनीं सांख्यांच्या २५ तत्वांचा अंगिकार करून "इतरेषांचानुपलब्धेः" या ब्रह्मसूत्रावरील शारीरभाष्यांत त्या तत्वांची श्रुतिपुराणांत कोठेंच उपलब्धि नाहीं असें म्हटलें आहे हें कसें ?

या प्रश्नाकडे लक्ष्य न देतां स्वामींनीं उलट प्रश्न केला कीं तुझेही कांहीं परमेश्वर, काल, वगैरे संबंधाचे वाद आहेत असें मी ऐकतों. ते वाद काय आहेत ? महाराज म्हणाले माझे कसचे वाद ? आचार्यांनींच त्यांचा निर्णय केलेला आहे. माझें म्हणणें एवढेंच कीं मी ईश्वरकारयित्र वाद, कालबलीवाद, नियतायुर्वाद व चवथा प्रारब्धवाद हे मानीत नाहीं. असें म्हणून महाराजांनीं ब्रह्मसूत्रांतील प्रमाण पत्तेसूदसांगितलें. ते स्वामींनीं कबूल केलें. पुढें स्वामी मंडळीशीं क्षेमकुशलादि गोष्टी करूं लागले. महाराजांनीं त्यांस पुन्हां आपल्या शंकेचें स्मरण दिलें. त्यावर स्वामींनीं श्रीकंठ भाष्य पहावयास सांगितलें. महाराज म्हणाले तें मी वाचलें आहे. त्यांत माझ्या प्रश्नाचें उत्तर नाहीं. असें म्हणून श्रीकंठ भाष्याचें पुस्तक महाराजांनीं मागवून टीका त्यांना वाचवून दाखविली. तेव्हां स्वामी म्हणाले हें कसें झालें कोण जाणे ? श्रीकंठाचा असे प्रश्न सोडविण्याचा अधिकार आहे. पुढें आणखी कांहीं टीकाकारांचीं नांवें सांगून महाराज म्हणाले कीं, त्यांच्या टीकांतही या प्रश्नाचें उत्तर नाहीं. नंतर स्वामी पुन्हां इकडल्या तिकडल्या गोष्टी परिचित मंडळीशीं बोलूं लागले व पुन्हां महाराजांनीं प्रश्नाचें स्मरण दिलें. स्वामी म्हणाले मला पोथी सोडून पाहण्याला चाळीस वर्षें झालीं. पुन्हा पाहूं तेव्हां उत्तर देऊं. आज बरेच दिवसांत ही ओळखीची मंडळी भेटली आहे तर त्यांचें क्षेमकुशल विचारलें पाहिजे. वाद ऐकण्याकरितां जमलेल्या मंडळीला जेव्हां दिसून आलें कीं आतां वाद होत नाहीं तेव्हां सर्व मंडळी उठून गेली.

त्याच दिवशीं पुन्हां रात्रींचे बारावर दोन वाजण्याच्या सुमारास महाराज स्वामींकडे जाऊन ते निजले असतां त्यांची पायचेपी करूं लागले. स्वामी म्हणाले हें काय ? महाराज म्हणाले मी शूद्र असल्यामुळें सेवा हा माझा धर्मच आहे. त्यावर स्वामी म्हणाले कीं तुमच्या प्रश्नांची मी योग्य उत्तरें दिल्यावांचून तुम्हीं असें काम करावें हें मला प्रशस्त वाटत नाहीं. महाराज म्हणाले:—ह्यांत मोठेसें गूढ आहे अशांतली गोष्ट नाहीं. ते आपण केव्हांही सांगूं शकाल. माझा धर्म मी करतो. त्यांत

आपल्याला वाईट वाटण्याचें कारण नाहीं. असें म्हणून पुन्हां पाय चेपूं लागले व पाय चेपतांना नम्रपणानें योगाभ्यासाच्या एका प्रक्रियेविषयीं प्रश्न केला कीं या रीतीनें अभ्यास करीत असतां अमुक प्रतिबंध येतो तो कसा टाळावा व पुढें कसें जावें ? यावर स्वामींनीं असें उत्तर दिलें कीं या प्रक्रियेच्या रीतीनें मी गेलों नाहीं म्हणून या संबंधानें मी कांहीं सांगूं शकत नाहीं. तुमच्या विद्वत्तेविषयीं माझी खातरी झाली. शारीरक भाष्य वगैरे मीही वाचलें आहे, परंतु इतक्या मार्मिक रीतीनें त्याचा विचार मी केला नाहीं. गोंदवलेकरांनीं तुमच्या विषयीं माझें मन कलुषित केलें होतें म्हणून मी पहिल्याप्रथम तुमच्याशीं उपेक्ष्यवृत्तीनें वागलों. महाराज म्हणाले मी स्त्रीवेश घेत असल्यामुळें त्यांचा मजवरील आक्षेप योग्यच आहे, परंतु माझें हें व्यसन आतां सुटूं शकत नाहीं. यावर स्वामी म्हणाले कीं भक्तीच्या विषयांत स्त्रीवेश घेण्यांत मुळींच वाद नाहीं. नरसीमेहतेही स्त्रीवेश घेत होते. ही विद्या तुम्हास जन्मसिद्धीनें प्राप्त झाली असल्यामुळें श्रुतीचा उच्चार करण्यासही कांहीं हरकत नाहीं.

दुसरे दिवशीं सकाळचे सुमारें ९–१० वाजतां स्वामी संध्या करीत बसले होते. महाराजही सन्निध बसले असून कांहीं मंडळीही परस्परांचें भाषण ऐकण्यास येऊन बसली होती. इतक्यांत तेथें मुंबईहून दोघे गृहस्थ येऊन 'गुलाबराव' महाराज कोठें आहेत ? म्हणून विचारूं लागले, व महाराजांकडे मंडळींनीं बोट दाखविल्यावर ते म्हणाले, आपली कीर्ति ऐकून आम्हीं आलों. पारकीय शास्त्रांसंबंधाच्या आमच्या कांहीं शंका आहेत त्या आपणास विचारणें आहे. महाराज म्हणाले स्वामींपुढें मी काय सांगणार ? स्वामी म्हणाले पारकीय शास्त्रांसंबंधाचें आलोचन मी बऱ्याच वर्षांपासून सोडलें आहे. गुलाबराव त्या शंकांचें उत्तर देतील. महाराज म्हणाले आपली आज्ञा असल्यास मी उत्तर देतों. स्वामींनीं आज्ञा दिल्यावर महाराजांनीं त्या शंकांचीं सविस्तर प्रमाणसूद उत्तरें देऊन पारकीय ग्रंथ व ग्रंथकारांचा नामनिर्देशही सांगितला व नंतर आपल्या आर्यग्रंथांतील त्याच विषयांवरील माहिती सांगून दोहोंची तुलना करून

दाखविली. ही महाराजांची सर्व शास्त्रांत अकुंठित गती पाहून सर्व मंडळी चकित झाली. स्वामी तर अत्यंत प्रसन्न होऊन महाराजांचें प्रत्येक भाषण संपतांच ' अद्‌भुत आहे ' असें म्हणूं लागले.

नंतर " आपलें इष्ट काय ? " असा स्वामींनीं महाराजांस प्रश्न केला. महाराज म्हणाले, श्रीज्ञानेश्वर महाराज माझे गुरु आहेत व श्रीकृष्ण माझे पति आहेत. हें ऐकून त्यांच्या यक्षिण्यादि साधनाविषयीं स्वामींची शंका दूर झाली. कारण यक्षिण्यादि क्षुद्र देवता राजस प्रकृतीच्या असल्यामुळें त्यांच्यापासून सात्विक ब्रह्मज्ञान मिळूं शकत नाहीं व असें क्षुद्रसाधन करणारे एका विवक्षित ठिकाणीं बसूनच प्रश्नांचीं उत्तरें देत असतात.

तिसरे दिवशीं स्वामींची काशीस जाण्याची तयारी झाली. महाराज रेलवे स्टेशनावर त्यांस पोंहचाविण्यास गेले होते. निरोप घेते वेळीं महाराज त्यांस नमस्कार करूं लागले असतांना तुम्ही असें करूं नका, असें बोलून स्वामींनीं त्यांस जवळ बसविलें व म्हणाले कीं सत्यापासून न ढळतां जगाचें कार्य करणारे श्रीकृष्ण व नारद असे दोघेच इतिहासांत प्रसिद्ध आहेत; तिसरे आपण दिसतां. आपल्या विद्येची कीर्ति ऐकून फक्त एक दिवसाकरितां म्हणून मी येथें आलों होतों परंतु आपल्या अद्‌भुत विद्येला लुब्ध होऊन तीन दिवस राहिलों. आपण कोणहि असा. एकवेळ काशीस येऊन आपण माझा आश्रम पवित्र करावा व मला अंतकाळीं आपली भेट व्हावी एवढीच विनंती आहे. आपण विचारलेली शंका प्रत्यक्ष शंकराचार्यांवरच पूर्वपक्ष आहे. त्याचें उत्तर मी काय देणार ? काशीसारख्या ठिकाणीं विद्वन्मंडळीची सभा भरवून त्यांच्यासमोर हा प्रश्न विचारल्यास कोणी उत्तर दिलें तर देईल. आपल्या विद्येची किंमत करणारे पुरुष तेथें आहेत. असें म्हणून मोठ्या प्रेमानें स्वामींनीं महाराजांचा निरोप घेतला.

## छिद्गांव येथील हकीकत.

छिदगांव गंजाल हा रा० रा० विठ्ठल भास्कर केकरे यांचा मालगुजारी गांव आहे. विठ्ठलरावांची हकीकत मागें शके १८२७ त आलेली आहे. ते यावेळीं छिदगांवास होते व ह्यांहून अनायासे जवळ असल्यामुळें श्रीमहाराजांस आपल्या गांवीं मोठ्या भक्तिभावानें नेऊन सुमारें १५ दिवस त्यांनीं सत्समागमाचा लाभ घेतला. येथें महाराज असतांना एक चमत्कार घडला तो येणेप्रमाणेः—

ज्येष्ठ वद्य १२ चे दिवशीं सोमवारीं महाराजांनीं मंगलस्नान केलें होतें व स्नानसमयीं गाणीं[1] वगैरे होऊन तो दिवस विशेषच आनंदाचा गेला. विठ्ठलरावांचे चुलत बंधु रा० बळवंत माधव केकरे वगैरे मंडळीही त्यावेळीं छिदगांवींच होती. दुसरे दिवशीं पहाटेचे सुमारें ५ वाजतां बळवंतराव महाराजांचे दर्शन घेण्याकरितां माडीवर गेले. तेवेळीं महाराज झोंपाळ्यावर तक्याशीं टेंकून निद्रिस्त असलेले त्यांस दिसले. महाराज फक्त धोतर नेसलेले असून त्याशिवाय आंगावर कांहीं नव्हते व त्यांच्या कपाळास कुंकवाचा टिळा नेहमींप्रमाणें लागलेला दिसला. या पूर्वीं सुमारें १५ मिनिटें अगोदर बळवंतरावांची बहीण गं० बहेनाबाई त्याच माडीवर महाराजांचें दर्शन घेऊन आली होती. इतक्यांत दुसऱ्या माडीवरून बाबासाहेब ( विष्णुपंत धामापूरकर ) उतरले, त्यांस बहेनाबाई सांगूं लागली कीं इतक्या दिवसांत आज महाराजांचें मला चांगलें दर्शन झालें. बाबासाहेब म्हणाले कोठें ? बहेनाबाई म्हणाली विहिरीजवळच्या माडीवर. बाबासाहेब म्हणाले रात्रींचे तीन वाजल्यापासून महाराज भाऊकाकाचे माडीवर असून आम्ही सर्व मंडळी तेव्हांपासून तेथेंच आहोंत. बहेनाबाई म्हणाली माझ्या म्हणण्यावर तुमचा विश्वास नसल्यास दादास (बळवंतरावास) विचारा. बळवंतरावही बहेनाबाईप्रमाणेंच महाराजांचें दर्शन आपल्यास झाल्याचें प्रतिज्ञेवर सांगूं लागले. पुन्हां बहेनाबाई विहिरीजवळच्या

---

१ स्त्रीगीत संग्रह पृ० ९५ गाणीं १०८५ ते १०९२ पहा.

माडीवर जाऊन पाहूं लागली तों तेथें महाराज नव्हते. हळुहळु विठ्ठलरावादि सर्वच मंडळी पुढें भाऊकाकांचे माडवरून उतरली. त्यांचा व बळवंतरावांचा वरील गोष्टीसंबंधानें मतभेद पडला. नंतर ती गोष्ट महाराजांचे कानावर गेली. तेव्हां ते म्हणाले कीं, एकच व्यक्ति एका वेळीं दोन ठिकाणीं दिसणें शक्य नाहीं. परंतु पुढें बऱ्याच दिवसांनीं या गोष्टीचें महाराजांनीं विठ्ठलरावांस एका पत्रांत स्मरण दिलें आहें, तें वाक्य असें:—[1] " तुमच्या येथें बळवंतरावाला मी दोन रूपांनीं प्रत्यक्ष दर्शन दिल्याचें आपणांस आठवत असेलच.परंतु असें चमत्कारावर दृष्टि देणें उपयोगाचें नाहीं. "

छिदगांवाहून परत आल्यावर सुमारे एक महिनाभर महाराज हर्दा येथें राहिले. कधीं कधीं महाराज परोक्ष व्यक्तींस उद्देशून कांहीं भाषण करीत असत याविषयीं मागें उल्लेख आलेला आहे. तसेंच येथेंही "बायको मेली तरी अजून येतच नाहीं" हें वाक्य महाराज कधीं कधीं मोठ्यानें म्हणतांना मंडळींनीं ऐकलें आहे.

सौ० मायबाईची ( मनकरणिका आईची ) प्रकृति आलीकडे बरीच क्षीण झालेली होती. तिला आम्लपित्ताची बाधा असून दोन चार दिवसांतुन एखादे वेळीं गुरळी पडत असे. नाना कविमंडन हे वैद्य असून महाराजांच्या सहवासांत त्या शास्त्रांत त्यांची अधिक प्रगति झालेली होती व प्रसंगीं औषधी उपचार वगैरे महाराज त्यांच्याकडूनच करवीत असत. त्यांस महाराज वारंवार म्हणत कीं मनकरणिकाला औषध दे. हिची प्रकृति बिघडणार आहे; मेली तर मी जबाबदार नाहीं. पुढें एके दिवशीं मायबाईला वांती होऊन ती मूर्च्छित पडली. इकडे श्रीकृष्णजन्माष्टमी जवळ आली होती. तेव्हां महाराज नानास म्हणाले कीं जन्माष्टमी यावलीची करावयाची. आकाजीबापूस विचारून मला तार करा. नाना गेले व दोन चार दिवसांनीं तार केला. नंतर महाराज सर्व

---

१ सूक्तिरत्नावलि सप्तम यष्टि पृ० १२ पहा.

सह ह्यांहून निघाले व उमरावतीस पोहचल्यावर नानाचे येथें
र्ची पालखी करून यावलीस जावयास निघाले. निघण्याचे वेळीं
ा म्हणाले कीं चांगलें औषध बरोबर घे. आपल्या मंडळींत एक
भयंकर बिमार होणार आहे. घरून निघाल्यानंतर महाराजांनीं
नानास औषध घेतलें काय म्हणून विचारलें. नाना तें विसरले
त्यांस घरीं परत पाठवून महाराजांनीं औषध आणविलें. यावलीस
ार नवरात्राचे प्रथम दिवशीं देव मांडावयाचे. तेवेळीं महाराजांनीं
देव मांडविले. तेच दिवशीं रात्रौ मायबाईला पुन्हां भयंकर वांती
ा मूर्च्छित झाल्या. कांहीं वेळानें सावध झाल्या पण औषध घेण्या-
ां तोंड उघडणें त्यांस कठीण पडे. ज्ञानेश्वर महाराजांचें तीर्थ घेण्याकरितां
तोंड उघडीत. माधानास महाराजांनीं निरोप पाठविला. पाटील-
सखाराम आपास घेऊन आले. इकडे मंडळीलाही महाराजांनीं
वगैरे दिला होता. परंतु शेवटीं मायबाईची प्रकृति अति-
बिघडून श्रावण वद्य ४ थीचे दिवशीं त्यांनीं इहलोकाचा
केला.

मायबाईच्या निरपेक्ष वात्सल्यास लुब्ध झालेली सहवासांतली मंडळी
याकरितां शोकाविष्ट झाली. पाटील बोवाही शोक करूं लागले. पाटील-
स महाराज म्हणाले, तुम्ही चिंता करूं नका. अनंता तुमच्याकरितां
व अंतकाळीं तुम्हांस शिवदर्शन होईल. नंतर महाराजांनीं सर्वांस
तबोध करून हातीं टाळ घेतला व सुमारें एक प्रहरपर्यंत प्रेमळ पद्यांनीं
ांतास आळविलें.

मायबाईंनीं पाळलेला पतिधर्म व शिष्यधर्म त्यांस अत्यंत भूषणावह
न इतरांस परम अनुकरणीय आहे. वटभरणाचे वेळीं त्यांनीं
राजांस दिलेलें अभिवचन अक्षरशः पाळून परमार्थांत उत्तम साह्य
, संसारांतल्या अडचणींस अगदीं दाद न देतां पतिसेवेंत चित्तवृत्ति
ंदित ठेविली व सद्विद्यादानाच्या कर्तव्यांत सहवासांतल्या आश्रित
ळीवर पुत्रवत् प्रेम करून त्यांचें सर्व प्रकारें संगोपन केलें.

मायबाईची मुद्रा अभ्यासांत गढलेली व दृष्टि नासाग्र असून त्यांची रहाणी अगदीं साधी असे. पूर्वींचे दिवस पालटून आतां महाराजांचें वैभव वाढलें असतांही भारी वस्त्रप्रावरणांची किंवा दागदागिन्यांची इच्छा त्यांनीं केव्हांच केली नाहीं. पतीची सेवा, त्यांस स्वहस्तें जेऊं वगैरे घालणें, त्यांजबरोबर गाणीं म्हणूं लागणें, उच्च व मधुर स्वरांत ज्ञानेश्वरीचें नित्य प्रेमानें पठण करणें, महाराज रागावले असतांना अती शांत राहून त्यांच्या वृत्यनुकूल वागणें, मंडळीची दगदग सोसणें, भजन निरूपणादिकांत रात्रभर जागून मंडळी जेथल्या तेथें झोंपत पडली असतां त्यांच्या आंगावर पांघरूण घालून त्यांची काळजी घेणें, इत्यादि गोष्टींत ही पुण्यशील साध्वी अहोरात्र गढलेली असे.

सौ० मायबाईचें कंठमाधुर्य महाराजांच्या तोडीचें असून गाणीं वगैरे म्हणण्याच्या प्रसंगीं त्यांचा आवाज महाराजांच्या आवाजांत मिळून जात असे व हा त्यांचा गीतप्रसंग मोठा अपूर्व व बहारीचा वठून श्रोतृवृंदास त्या आनंदांत तल्लीन करीत असे. तेवेळीं सर्वत्रांच्या मुखांतून ‘ फारच मंजूळ ’ असे उद्गार निघत असत.

आपल्या सहवासांतील स्त्रिया व पुरुष मंडळींत कोणाच्या हातून चुकी झाल्यास त्याला ताळ्यावर आणण्याची मायबाईत शक्ति होती व सर्वांस त्यांचा वचक असे. विशेषतः मंडळींतील स्त्रीवर्ग सन्मार्गगामी होण्यास त्यांचें आचरण फार उत्तेजक होतें.

एखाद्या अपरिचित् मनुष्यालाही मायबाईला पाहून काय वाटत असे याविषयीं रा० रा० विठ्ठलराव केकरे यांचे उद्गार मागें आलेच आहेत.

मायबाईच्या शिक्षणासंबंधानें महाराजांनीं किती काळजी घेतली याविषयींचा उल्लेख मागें आला आहे. वेळोवेळीं त्यांच्या वृत्तीचें निरीक्षण करून सुधारणा करण्याचा प्रयत्न करणें हें तर महाराजांचें ब्रीदच होतें. गरोदर स्थितींत स्त्रियांच्या मानासिक विचारांचा परिणाम गर्भावर होत

असतो[1] हें जाणून महाराजांनीं तिला श्रीकृष्णमूर्तीचें ध्यान सांगितलें होतें व कुन्हा येथें श्रीकृष्णजन्माष्टमीचे उत्सवप्रसंगीं महावाक्योपदेश केला होता. मुलगा झाल्यानंतर, पुत्राचे ठिकाणीं आईचा मोह असला तर " या माता सा पुनर्भार्या " या श्रुतीवचनाप्रमाणें तिला दुसरे जन्मीं त्याची पत्नि व्हावें लागतें, हें जाणून हरतऱ्हेनें तिच्या चित्तांतला पुत्रमोह महाराजांनीं काढून टाकला होता व पुढें तिच्या और्ध्वदेहिक प्रसंगीं तिला ज्ञानयोग्य शरीर प्राप्त होण्याचा संकल्प करून पिंड दिला. असो. याप्रमाणें मायबाईची इहपरलोकची यात्रा अत्यंत सफल झाली.

सौ० मायबाईवर महाराजांचा अत्यंत प्रेम होता. तोच पुढें शोकरूपानें परिणाम पावून जगन्नाथराय पंडितादि महात्म्यांच्या शोकाप्रमाणें " लोकवत्तुलीलाकैवल्यम् " या न्यायानें त्यालाही एक प्रकारचें उदात्त व गंभीर स्वरूप प्राप्त झालें. ते महाराजांचे शोकपरिप्लुत काव्योद्गार येणेंप्रमाणें आहेतः—

## आर्या—पत्निप्रेमपराग.

माणिकर्णिके प्रियेग तुजवांचुनि फार जीव तळमळतो । मज दीन चातकावर केव्हां न कळे दयाजलद वळतो ॥ १ ॥ अवघे विषय विसरलों विद्याही मिळविली स्मरेनागे । परि योगीं अनाहतसम मम हृदयीं बोलणें तुझें जागे ॥ २ ॥ लाजत मराळ होते तव गतिला कुंभिनीवरी असतां । एवढि सुकुमार कशी एकट चढलीस पूर्णपद रस्ता ॥ ३ ॥ मजविण आन न जाणे ऐसी तव बुद्धि फार सरलागे । अवचित परि मज कैसें फसवुनि पर पुरुष राम वरला गे ॥ ४ ॥ निर्दय कळलीस पुरी एकट टाकुनि मला महावळसीं । गुप्त मनांत वसोनी स्वप्नीं वैरिणि अश्रू-

---

१ यासंबंधानें सार्थ श्रीचरकसंहितेंत शारीरस्थानांत अध्याय २ श्लोक २३ मध्यें पुढील वचन आढळतें:—" गर्भोपपत्तौतु मनः स्त्रिया यं जंन्तुं व्रजेत् तत्सदृशं प्रसूते । "

नियां छळिसी ॥ ५ ॥ कीं मी अंध असुनिही तुज सुंदरी करविं करविलें काम । त्या कोपें रुसुनीयां मज सोडुनि सेविलें परधाम ॥ ६ ॥ वारंवार तुझें घे नांव वाटला म्हणोनि अपमान ! पुन्हां न परि करिन असें मजवरिंचा देईं सांडुनी मान ॥ ७ ॥ अल्प अशा अपराधा प्राणसखे द्यावया महाशिक्षा । तव कोमळ हृदयाला कोणी दिधली नवीन गुरुदिक्षा ॥ ८ ॥ देवी देवी म्हणुनी अक्षय वांछित दयाचि तव होतो । शेवटिं रुसलीस परी वैराग्याविण असाचि भव होतो ॥ ९ ॥ रामहि जानकि शोधी कोठुनि मग मी विरक्त तद्दास । यास्तव कांते त्वांही हृदयांतुनि सांडिजे न मम आस ॥ १० ॥ यक्षनिरोपीं अमला घन व्हाया दूत घेन मम नमना । यास्तव असशिल तेथें वरानने पाठवीत मी स्वमना ॥ ११ ॥ परलोकीं तुज शक्ति जाणाया म्हणुनि विनावि अळुमाळ । क्षमा करुनि अन्याया पुढिले तरि जन्मिं घालि मज माळ ॥१२॥ विलासललिते हृद्वनीं सकंटकहि परि गुलाब फुल पाळी । सौरभ मिळेल तुजचीं जीवन सुकवूनि न पाकळ्या गाळी ॥ १३ ॥

तात्पर्य, " पाहेपां अनुरागें भजे । जे प्रियोत्तमें मानिजे । ते पतिहूनि काय न वानिजे । पतिव्रता ॥ " या ज्ञानेश्वर महाराजांच्या वचनाप्रमाणें मायबाईची योग्यता होती. मायबाईचा भाऊ रा० दत्तात्रय गणाजी भुयार यास पुढें महाराजांनीं आपल्या सहवासांत बाळगून व त्याचें लग्न वगैरे करून देऊन त्याचा प्रतिपाळ केला.

सौ० मायबाईचें और्ध्वदेहिक करण्याकरितां महाराज माधानास गेले होते व देऊरवाड्यास पयोष्णीच्या तीरावर यथाविधि क्रिया वगैरे केली. मायबाईच्या अस्थि दहा दिवसांच्या आंतच महाराजांनीं आकाजीबापू बरोबर प्रयागास पाठविल्या होत्या. ग्रंथवाचन लेखनादि नित्य व्यासंगाकरितां उपयोगी पडणारी नेहमींची मंडळी हरिभाऊ वगैरे बरोबर होतेच. गंगाधर मुळेही नुकताच आलेला होता. मुलाचें ( अनंताचें ) संगोपन करण्याकरितां सारजा आजी ( सौ० मायबाईची आई ) येऊन राहिली होती. पुढें देऊरवाडा, मोठा सिरसगांव इ० ठिकाणीं कांहीं

दिवस फिरून एकदोन दिवस महाराज बह्मरामच्या पहाडावर राहिले. हें या प्रांतांत एक रम्य ठिकाण असून कार्तिकांत येथें यात्रा भरत असते. पुढें दसरा माधानचा करून नरक चतुर्दशीचे दिवशीं महाराज देऊरवाड्यास नृसिंह मंदिरांत राहिले. हा प्रदेश महाराजांचा लहानपणचा एकांतवासाचा होय. तेच दिवशीं यावलीहून आकाजीबापू महाराजांस दिवाळीकरितां नेण्यास गाड्या घेऊन आले होते. मध्यरात्रीं महाराज सिद्धेश्वरावर जाऊन निजले, व बऱ्याच वेळानें उठून सिद्धेश्वरापाशीं "आदौ कर्मप्रसंगांत कलयति कलुषं मातृकुक्षौ स्थितं माम् ।" इ. अपराधक्षमापन स्तोत्राचीं एकदोन आवर्तनें उच्च स्वरानें म्हणून परत नृसिंहमंदिरांत गेले व तेथून आकाजीबापूच्या विनंतीवरून यावलीस परत गेले. सिद्धेश्वराचें ठिकाण गांवाबाहेर असल्यामुळें रात्रींचे वेळीं जाणारास भीति उत्पन्न करते व जवळील गर्दीत भूतें आहेत असें तेथील लोक सांगतात. महाराज तेथें निजले असतांना जवळ असलेल्या आकाजी बापू वगैरे कांहीं मंडळीस असे कांहीं प्रकार भासल्यामुळें ते भीतिग्रस्त झाले होते, परंतु महाराजांच्या स्तोत्रपठणानें त्यांची ती भीति दूर झाली व परत जातांना वातावरणांत पसरलेला बुक्क्याचा उत्तम सुगंध त्यांस येऊं लागला.

प्रतिवार्षिक क्रमाप्रमाणें कार्तिक शुद्ध द्वादशीस तुलसीविवाहाचे दिवशीं महाराजांचा श्रीकृष्णाशीं विवाहोत्सव मोठ्या थाटाचा झाला. त्या सुमारास सौ. रंगूबाईही यावलीस आली होती. ती या प्रसंगांत श्रीकृष्णाची बहीण झाली होती.

"बायको मेली तरी अश्रू येतच नाहीं" हे शब्द ज्या परोक्ष व्यक्तीस उद्देशून महाराज कधीं कधीं बोलत असत, ती व्यक्ति आतां कार्तिक वद्य १३ चे दिवशीं श्रीमहाराजांचे सन्निध उपलब्ध होऊन त्यांच्या कृपाछायेंत राहूं लागली. ती व्यक्ति म्हणजे लेखक—"मिलिंद."

यावलीहून सुमारे ८ कोसावर पिंगळाई म्हणून एक देवीचें स्थान टेंकडीवर आहे, तेथें मंडळीसह महाराज मार्गशीर्ष शुद्ध १२ स दर्शनास गेले व दुसरे दिवशीं देवीची पूजा, नैवेद्य ब्राह्मणभोजन वगैरे करून

परत आले व कात्यायनीव्रत जवळ आलें होतें म्हणून उमरावतीहून मंडळीसह वाठोड्यास निघून गेले.

कात्यायनी व्रताकरितां या वर्षीं हरदा, छिदगांव, नागपूर वगैरे ठिकाणाहून मंडळी आली होती. वार्षिक क्रमाप्रमाणें ३३ दिवसांनीं व्रताची सांगता झाल्यावर शुक्लेश्वराचें दर्शन वगैरे घेऊन नंतर महाराज नागपुरास गेले व तेथें १५–२० दिवस राहून यावलीस परत आले. यावेळीं नागपूर येथें महाराज लिंबाचा पाला खाऊन रहात असत.

यावलीस पुढें दोन तीन महिनेपर्यंत राहून महाराजांनीं सौ० रंगुबाईस योगवासिष्ठाचें निरूपण सांगितलें. तें फार सुलभ व गोड होतें.

मंडळीला खेळण्याकरितां यावली येथें महाराजांनीं एक क्रीडापट तयार केला, त्याचें नांव श्रौतक्रीडाविशेष. तो खेळण्याच्या शास्त्रीय माहितीचें एक पुस्तकही त्यांनीं तयार केलें. त्यांत खेळण्याचे नियम, खेळाचे वेळीं करावयाच्या भावना, इत्यादि आधारें खेळाची उपपत्ति व फलश्रुती वगैरे संपूर्ण गोष्टींचा विचार केलेला आहे.

पहिल्या प्रथम महाराज जेव्हां उमरावतीस जमनाबाईच्या येथें जाऊं लागले होते तेव्हां तेथें त्यांची व यावलीचे गणपतरावबापू अवचित यांची ओळख झाली व त्यांस गणपतरावाचे हातची पोळी आवडत असे, वगैरे विषयीं उल्लेख मागें सिरसगांवप्रकरणांत आलेला आहे. हे गणपतराव सरळ मनाचे व भाविक गृहस्थ होते. आपल्या संसारिक वासनांचा बोजा त्यांनीं महाराजांवर केव्हांही टाकला नाहीं. या निरपेक्ष प्रेमाचें फळही त्यांस महाराजांकडून उत्तम मिळालें. नित्य पठणाकरितां महाराजांनीं त्यांस ज्ञानेश्वरी प्रसाद दिली व होईल तेवढी फुरसत करून आपल्या सहवासांत राहण्याची आज्ञा करून त्यांस वेदान्तादि शास्त्रचर्चेचें श्रवण करविलें. याशिवाय त्यांजवरील संसारिक संकटांचेंही महाराजांनीं अकल्पित निवारण केलें. त्यापैकीं एक गोष्ट यावेळीं महाराज यावलीस असतांना घडली ती अशी:—

गणपतरावांची एक पुतणी उपवर झालेली होती व तिचे राक्षसगण असल्यामुळें लग्नाचें कोठेंच जुळेना. घरांत कर्ते गणपतरावच होते. शेवटीं मोठ्या प्रयासानें एक स्थळ मिळालें व तिथीनिश्चयही ठरला. उभय पक्षाकडील तयारी होऊन वराकडील मंडळी यावलीस येऊन दाखल झाली. लग्नतिथी फक्त दोनच दिवस राहिली, इतक्यांत महाराजांनीं गणपतरावास बोलावून हें लग्न अवश्य मोडण्याविषयीं आग्रहपूर्वक सांगितलें व वराकडील मंडळीनें तुमची निंदा केली तरी सहन करा व त्यांनीं केलेला खर्च ते भरून मागतील तर मी भरून देतो; पण लग्न मोडाच असें निक्षून सांगितलें. गणपतरावानें त्याप्रमाणें लग्न मोडलें. वराकडील मंडळी परत गेली व जातेवेळीं त्यांचा तात्पुरता हिरमोडही झाला. परंतु दोनतीन दिवसांनींच मुलगा संपल्याची तिकडून बातमी आली. पुढें महाराजांनीं एक स्थळ पसंत करून लग्न करण्यास आज्ञा दिली व त्यांच्या आज्ञेप्रमाणें लग्न झालें. वधूवरें हल्लीं सुखरूप नांदत आहेत.

दुसरी एक गोष्ट पुढील संवत्सरांत घडलेली आहे व ती गणपतरावांनीं आपल्या सहीनिशीं महाराजांच्या ' अदृश्यदीपिकेंत ' लिहून दिली आहे. ती येणेंप्रमाणें:—

" माझा भाचा नामें माधवराव कावलीकर याजवर इं. पिनल कोडाच्या १४७।१४८ कलमाप्रमाणें आरोप आला होता व त्याच्या दहा साथीदारांसह त्याला कैदेची शिक्षा झाली होती. तेव्हां मी नागपूर येथें अपील करण्याकरितां गेलों. अपीलाच्या दोन तीन तारखा झाल्यावर वकीलांच्या तक्रारी झाल्या व निकालाकरितां मुकद्दमा तहकूब राहिला. निकाल कोणत्या दिवशीं होणार याचा नेम नसल्यामुळें मी सेंदूरजणें येथें गेलों. तेथें तारीख १६।१।०८ रोजीं गुरुवारीं सायंकाळीं मी जेऊन निजलों असतां दोन प्रहर रात्रीनंतर मला स्वप्न पडलें कीं श्रीगुरुमूर्ती गुलाबरावबाबा माधवरावाला घेऊन आले आणि म्हणाले " हा माधवराव आला. " असें सांगून महाराज मागच्या मागेंच निघून गेले व माधवराव आपल्या पूर्वीच्या कपड्यांसह तेथेंच उभा राहिला. मी महाराजांचे

मागें जातों तों ते अदृश्य झाले व मी चकित होऊन एकदम जागा झालों. तेथून तिसऱ्या दिवशीं म्हणजे शनिवारीं मला माधवराव सुटल्याचें समजलें व दुसऱ्याच दिवशीं ( रविवारीं ) मी कावलीस गेलों. त्याच दिवशीं माधवरावही घरीं आला व त्यानें सांगितलें कीं वर दिलेल्या तारखेस म्हणजे गुरुवारींच मला सोडण्याचा कोर्टाचा हुकूम झाला परंतु तेथून तो हुकूम सेशन कोर्टांत व तेथून अव्वल कोर्टांत व तेथून जेलमध्यें आल्यावर माझी सुटका झाली. याला एक दोन दिवस लागले. मात्र स्वप्न दिसलें त्याच दिवशीं हुकूम आला ही गोष्ट खरी आहे. ”

पुढें शके १८२१ सांत महाराजांचा मुक्काम मंडला येथें असतांना गणपतरावही तेथें आले होते व महाराजांनीं त्यांस बरेच दिवस परत जाऊं दिलें नाहीं. गणपतरावही मृगनक्षत्र लागलें तरी शेतीवाडीच्या कामाकडे दुर्लक्ष्य करून महाराजांच्या सहवासांत स्वस्थ राहिले व महाराजांनीं जेव्हां जाण्याची आज्ञा केली तेव्हांच ते परत घरीं गेले. त्यावर्षीं त्यांस इतर वर्षापेक्षां पीकही चांगलें आलें. असो.

माधानाहून उमरावतीस आल्यापासून “ वर्णाश्रमधर्मावर अतिशय जोर देऊन ” महाराज “ साधारणतः ” वागूं लागले होते व त्यांची अमानित्वादि शीलसंपत्ति अढळ होती त्यामुळें ‘ मी शूद्र आहे ’ असें स्पष्ट सांगून ते कोणास—विशेषतः ब्राह्मणांस—नमस्कार करूं देत नसत. पुढें प्रियपत्नीचा वियोग झाल्यामुळें “ परस्त्रीवर आपलें मन जाऊं नये, परस्त्रीगमन आपल्या हातून घडूं नये ” असें त्यांस फार वाटूं लागलें म्हणून पूर्वीचा योगाभ्यास धारण करावा असा त्यांनीं निश्चय केला व माधानाप्रमाणेंच निद्रेमध्यें सर्व कांहीं करण्याचा त्यांनीं क्रम ठेविला. याविषयींची विशेष माहिती पुढें ‘ स्वभावविवेचन ’ प्रकरणांत येईल.

चक्कर, भोंवरा, कोयाळ, भिंगरी वगैरे बाललीलेचे खेळ व बालवृत्ति तर महाराजांपासून केव्हांच विलय झाली नाहीं व वेदशास्त्रचर्चा, भगवद्भजन व निरपेक्ष दयावृत्ति ही तर त्यांची सहज लीला होती. याप्रमाणें या पराभवनाम संवत्सरांतील वृत्तांत आहे.

येथपावेतों वर्णन केलेल्या महाराजांच्या स्वैरबोधकथामृतसिंचनानें अंकुरित होऊन वाढीस लागलेलें माधुर्यभजनाचें बीज उत्तरोत्तर मनोहर वृक्षरूपानें विस्तार पावून त्याचा " संप्रदाय सुरतरु " कसा भरारला व त्याचें संरक्षण करण्याकरितां परमतच्छेदक व माधुर्यपरिपोषक विचारांनीं परिप्लुत अशी ग्रंथसंपत्ति व संरक्षक मंडळी निर्माण करून संसारतप्त जनांस त्याची सुशीतल छाया देण्याकरितां महाराजांनीं पुढील आठ वर्षांत किती आस्थापूर्वक प्रयत्न केले हें आगामी वृत्तांतावरून कळून येईल.

---

श्रीज्ञानेश्वर माउली समर्थ.

शके १८२९ प्लवंगनाम संवत्सरे. इ० स० १९०७–१९०८



पुढें मधुराद्वैत प्रतिपादक वाङ्मय निर्माण करून त्याचा विशेष प्रसार करण्याची आपली उत्कट इच्छा या संवत्सरारंभीं महाराजांनीं प्रगट केली व तिची पूर्ति करण्याकरितां त्यांच्याच संमतीनें श्रीनिवासशास्त्रीप्रभृति मंडळीनें नागपूर येथें श्रीज्ञानेश्वर प्रासादिक मुद्रणालयाची स्थापना करून त्यांचे भक्तिपदतीर्थामृतादि ग्रंथ 'सूक्तिरत्नावलि' या नांवानें छापण्यास आरंभ केला. या कार्यास चांदा येथील रा० रा० बळवंतराव देशमुख वकील व मंडल्याचे विठ्ठलराव केकरे वकील वगैरे मंडळींनीं उदार-पणानें साह्य केलें.

ग्रंथ लेखन, वाचन वगैरे करितां हरिभाऊ केवले, गंगाधर मुळे, व्यंकटेश नारायण देशपांडे, गोविंद रामचंद्र भक्त वगैरे नेहमीं जवळ राहणारीं मंडळी होतीच. महाराजांचें ग्रंथलेखन वाचन वगैरे काम करून श्रीकृष्णजन्माष्टमीसारख्या उत्सव प्रसंगीं, दरगुरुवारीं पालखीचे वेळीं व आणखी इतर वेळीं होत असलेली महाराजांची कविता ही मंडळी मोठ्या साक्षेपानें व दक्षपणें लिहून घेऊन संग्रह करूं लागली. त्यांत हरि-

भाऊ केवले यांची लेखनशैली शीघ्रगतीची असल्यामुळें महाराजांच्या पुष्कळ काव्यसंग्रहाचें श्रेय त्यांजकडेच आहे.

फुरसतीअंतीं मधून मधून महाराजांचें दर्शन घेऊन जाण्याचा काशीराव बापूजी देशमुख यांचा क्रम चालूच होता. या खेपेसही महाराज यावली येथें असतांना ते दर्शनास आले होते. यावेळीं त्यांजवर महाराजांचा जो एक अनुग्रह झाला त्याचें वर्णन ते येणेंप्रमाणें करितात:—

" इसवी सन १९०७ सालचे उन्हाळ्यांत ( अंदाजा एप्रिल महिन्यांत ) महाराज यावली तालुके उमरावती येथें रा० आकाजी बापूसाहेब देशमुख यांचे येथें होते. तेथें मी त्यांचे दर्शनास गेलों. माझा एकुलता एक मुलगा चांगला वागत नसून उडाणटप्पूपणा करीत असल्यामुळें त्याचेपासून मला बराच त्रास होत होता. त्याला सुधारण्याविषयीं महाराजांना यापूर्वी अनेक वेळां मी विनंती केली होती. सबब यावेळीं माझे मुलासंबंधानें महाराजांनीं मला प्रश्न केला कीं गोपाळ आतां कसा वागत असतो ? त्याची कांहीं सुधारणा झाली आहे काय ? त्यावर निराशेनें मी उत्तर दिलें कीं महाराज आपण सर्व जाणतच आहांत. मी स्वतः अमले तोंडानें काय सांगावें ? महाराज हंसले आणि म्हणाले खरोखरच तुम्हांला या मुलापासून फार त्रास झाला. बरें असो. तुम्हांला एक चांगला गुणवान् व तेजदार पुत्र होईल. आणि त्याचेपासून तुम्हाला चांगलें सुख होईल.

मला संततिमुळें व इतर कारणांमुळें संसारांत बराच त्रास झाला होता. सबब महाराजांस हात जोडून मी उत्तर दिलें. " महाराज संततीचें सुख मी पूर्णपणें भरून पावलों आहे. आतां मला पुत्र वगैरे कांहीं नको. " त्यावर महाराज पुन्हां म्हणाले " मी म्हणतो तसा पुत्र तुम्हांस खात्रीपूर्वक होईल असें तुमचे आवाजावरून दिसतें. " मीं पुन्हां उत्तर दिलें " मला पुत्र नको हेंही मी खात्रीपूर्वकच म्हणतो. " तिसऱ्यानें पुन्हां महाराज निश्चयात्मक स्वरांत म्हणाले " तुम्हाला पुत्र

होणारच व तो लवकरच होणार हें मी अगदीं निश्चयपूर्वक म्हणतों." त्यावर पुन्हां निश्चयपूर्वक पहिल्या सारखेंच उत्तर देण्याच्या बेतांत मी होतो. इतक्यांत रा० नाना कविमंडन जे तेथेंच उभे होते ते मध्येंच मला म्हणाले "कायहो, महाराज आग्रहपूर्वक पुन्हां पुन्हां तुम्हांला आशिर्वाद देत असतां तुम्ही त्यांचे इच्छेचे आड कां येता? तथास्तु म्हणण्यांत तुमचें काय जातें?" त्यांचें हे शद्ब ऐकतांच मी चपापलों; आणि नंतर मी तथास्तु म्हटलें. पुढें थोडकेच दिवसांनीं महाराजांनीं मला एक मंत्र दिला व दररोज त्या मंत्राचा नियमित जप करण्याची आज्ञा दिली. त्याप्रमाणें मी सुरू केलें. थोडकेच दिवसांनीं गर्भ राहून आश्विन वद्य १० संवत १९६६ म्हणजे इ० स० १९१० रोजीं पुत्रजन्म झाला. याचे पूर्वींची माझीं ९–१० मुलें आठवे महिन्यांत जन्मून पाहिले दिवशींच गेलीं. हा मुलगा मात्र पूर्ण ९ महिन्यांचा होऊन जन्मला. तो निरोगी असून चांगला बुद्धिवान आहे. त्याचें जातक महाराजांनींच केलें व त्यांनींच पुरुषोत्तम हें त्याचें नांव ठेविलें आहे."

याप्रमाणें अधिक चैत्रमास संपत पावेतों यावलीस राहून नंतर महाराज चार आठ दिवसांकरितां रा०शिवरामजी पेठे यांच्या विनंतीवरून मोरशीस गेले. तेथें त्यांचे बंधू रा०रामकृष्ण पेठे हे ईश्वराचें अस्तित्व न मानणाऱ्यांपैकीं एक होते म्हणून महाराजांनीं बऱ्याच वर्षांपूर्वीं त्यांस ईश्वरास्तिक्य वाद समजाऊन देण्याचा उपक्रम केला होता. पुन्हां या खेपेस तोच वाद उपस्थित करून व 'नऊ वर्षांपूर्वीं मी तुम्[illegible]माण मा सांगितलें होतें त्याच्यापुढें आतां सांगतों, अशी प्रस्तावना क[illegible]ण झाली महाराजांनीं ईश्वराचें अस्तित्व सप्रमाण सिद्ध करून दिलें [illegible] सावधागिरीनें येतेवेळीं महाराज खांबित बेलोऱ्यास एक दिवस राहिले [illegible]व्या बाजूस महारा- बळवंत देशपांडे जे पूर्वीं माधानास मास्तर होते [illegible]रितां व मानही न हाल- सौ० रंगुबाई हे उभयतां रहात होते. त्यांस [illegible] तों मला असें आढळलें कीं देऊन महाराज यावलीस परत आले व राम[illegible]जारीं अगदीं मला चिकटून बसले

जाऊन रा० वासुदेवराव मुळे यांच्या येथें रामजन्मोत्सव केला.

नागपुरास महाराजांच्या ज्ञानेश्वर मुद्रणालयांत वेद० श्रीनिवास शास्त्री यांनीं सूक्तिरत्नावलीची प्रथम यष्टी छापण्याचें काम प्रकाशक या नात्यानें सुरू केलें होतें. त्या यष्टीकरितां “ श्रीमद्भगवद्गीतासंगती ” या नांवाचें ५१५ ओव्यांचें एक प्रकरण आठ दहा तासांच्या एका बैठकींत लेखन करवून महाराजांनीं छापावयास दिलें व “निदिध्यासन प्रकाशाचे” कांहीं समासही तयार करून दिलें. याशिवाय ज्ञानेश्वरीनिरूपण वगैरे नित्यक्रम चालू होताच.

गत संवत्सराच्या ज्येष्ठ महिन्यांत महाराज छिंदगांवीं असतांना तेथल्या केकरे कुटुंबांतील ज्या मंडळीस महाराजांचा सत्सहवास लाभला त्यांत रा० रा० विष्णु बापूजी धामापूरकर हेही होते व तेव्हांपासून त्यांची महाराजांचे चरणाचे ठिकाणीं दृढ निष्ठा आहे. विष्णुपंत हे इ० स० १९०१ सालांत बी. एस्. सी. ची परीक्षा पास होऊन आलीकडे पुण्याजवळील खडकी येथील सरकारी शेतकी कॉलेजांत अभ्यास करीत होते व हल्लीं ते उन्हाळ्याचे सुटींत महाराजांचे दर्शनार्थ नागपूर येथें आले होते. अशा प्रकारें फुरसतीअंतीं ते कधीं कधीं महाराजांकडे आले म्हणजे त्यांजबरोबर ‘ फिजिकल सायन्स ’ “ ऑकल्ट सायन्स ” इ० सायन्स विषयांवर महाराज बराच वेळ चर्चा करीत बसत व नानाप्रकारच्या आशंका घेऊन त्यांस अडवीत व नंतर त्यांचें समाधान करीत असत. या खेपेसही ते महाराजांस कांहीं प्रकरण वांचून दाखवीत असतांना म[illegible]हाराजांनीं त्यांस जो एक प्रयोग करून दाखविला त्याची हकीकत त्यांच्याच ([illegible] विष्णुपंताच्या) सहीनें महाराजांच्या ‘अदृश्यदीपिकेंत’ लिहिलेली आहे ती अशीः—

“ पुढील गोष्ट जरी [illegible]मीं स्वप्न म्हणून लिहितों तरी तें स्वप्न नसून अगदीं जागृतींत घडलेली गोष्ट आहे.

शनिवार ता० २ मे इ० स० १९०७ रोजीं रात्रीं म्हणजे आदितवार तारीख

३ चे पहाटेस चार वाजतां मी वे० मा० श्रीनिवासशास्त्री यांचे घरच्या माडींत श्रीसद्गुरु गुलाबराव महाराजांना उमरावतीचे प्रख्यात वकील रा० खापर्डे यांनीं मायर साहेबांच्या "Human personality" नांवाच्या पुस्तकाचा सारांश थोडक्यांत एका वहींत लिहिला आहे, तो वाचून मराठींत सांगत होतों. हें सांगत असतां श्रीगुरुमहाराजांना थोड्या वेळांत झोंप लागली. श्रीगुरु महाराजांना झोंप लागलीसें पाहून मी सांगणें बंद केलें व स्वतः मनाशीं पुढें वाचूं लागलों. अदमासें पाव तासानें माझ्या डोळ्यांपुढील वही न दिसतां तेथें कोणी मनुष्याचा गुडघे व पावलें यांच्यामधील भाग दिसूं लागला. हें काय म्हणून मी दचकलों व भीति उत्पन्न झाली व वर नजर फेंकतों तों सद्गुरुमूर्तीच तेथें उभी असलेली दिसली. मी आपली दृष्टि पुन्हां एकवेळ खालून वर व वरून खालीं फेंकली. इतक्यांत ती मनोहर मूर्ति तेथून नाहींशीं होऊन आंथरुणावर परत जातांना पाहिली. मीं तिकडे पाहूं लागलों. तेव्हां एक शरीर आंथरुणावर निजलें आहे व दुसरें बसलें आहे असा देखावा दिसूं लागला. दोन्ही शरीरांचा कमरेपासून खालचा भाग मात्र एक. याप्रमाणें कांहीं कौतुक, आश्चर्य भीति, आनंद अशा पुष्कळ विकारांनीं गाठलेली माझी दृष्टि त्या मूर्तीवर सरासरी बराच वेळ लागून होती. पुढें ती मूर्ति एकदम दिसेनाशी झाली.

दुसरे दिवशीं ही गोष्ट मी श्रीगुरूंना विदित केली पण त्यावर त्यांनीं कांहींच लक्ष्य दिलें नाहीं. त्यामुळें मी पुन्हां ती त्यांचेपुढें काढली नाहीं.

दुसरे दिवशीं रात्रीं त्याचवेळीं, त्याच जागीं, त्याच माडींत, तेंच पुस्तक वाचीत आम्ही तसेच होतों. मी सांगत होतों तें भाषांतर कांहीं वेळ ऐकल्यावर मला महाराज म्हणाले मी आतां स्वप्नांत जातों. तूं वाच. त्याप्रमाणें मी मराठींत सांगणें बंद केलें. पुढें लगेच मला पहिल्या दिवसाची आठवण झाली व पुन्हां तसेंच तर कांहीं दिसणार नाहींना? म्हणून विशेष सावधगिरीनें वाचीत बसलों. सरासरी पांच मिनिटांनीं मला आपल्या डाव्या बाजूस महाराजांचें आंग दिसूं लागलें. तेव्हां कांहीं हालचाल न करितां व मानही न हालवितां मी डावीकडे नजर फिरवून पाहूं लागलों तों मला असें आढळलें कीं महाराज आपले पाय पोटाकडे घेऊन माझे शेजारीं अगदीं मला चिकटून बसले

आहेत. त्यांचें अर्धें शरीर तर माझ्या शरीरांतच शिरलें आहे व डोकावून मी वाचीत आहे ती वही वाचीत आहेत. हा देखावा मी यावेळीं विशेष स्वस्थ चित्तानें व किंचितही न भीतां चांगला पाहिला. परंतु पूर्वीप्रमाणेंच एक दोन मिनिटांचे आंत तो नाहींसा झाला. हा नाहींसा झाल्यावर थोड्याच वेळानें महाराजांनीं उठून मला विचारलें ' काय झालेंरे ? ' तेव्हां घडलेली हकीकत मी त्यांना सांगितली. तेव्हां ते म्हणाले मी मुद्दाम तुला हा प्रयोग करून दाखविला. ”

एके दिवशीं महाराजांची वेदान्तचर्चा चालली असतांना रा० गणपत खंडो भालेराव हे महाराजांस म्हणाले कीं संसारांत स्त्रीपुत्राकरितां द्रव्यार्जन करून त्यांस पोसणें हाही परोपकारच आहे. त्यावर उत्तरादाखल महाराजांनीं पुढील पद केलें.

स्त्रीपुत्राणां कृपयैव संसारं करोमि नान्यथा स्वार्थमित्याशंक्योत्तरमाह:—

पद

कधितरि हरशिलरे । कितिकांवरी करुणा करशिल ॥ धृ० ॥ देतां स्त्रीपुत्रातें धनजन । मार्गीं किती संहरशिलरे ॥ कितिकांवरी० ॥ १ ॥ रुसतां बाइल पहिली मग तूं । लग्नें कितितरी करशिलरे ॥ २ ॥ पाहुनि यमदंडाच्या बंडा । शेवटीं मागें सरशिलरे ॥ ३ ॥ पापें धन मेळवुनी अंतीं । घर चोरांचें भरशिलरे ॥ ४ ॥ ज्ञानेश्वर प्रभु तात न नमुनी । संसृति किंपरि तरशिलरे ॥ कितिकांवरी करुणा करशिल ॥ ५ ॥

पुढें भालेरावला महाराजांनीं सांख्यसाराचें निरूपण सांगितलें व बाबु प्रियनाथ मुकरजीपासून प्रो० जगदीश चंद्र बोस यांचे Response in living andnon-living व Plant response हे दोन ग्रंथ समजून घेतले. मुकरजी हे यावेळीं नागपूर येथील मॉरिस कॉलेजांत सायन्सचे प्रोफेसर होते. हे मोठे प्रेमळ भगवद्भक्त होते व महाराजांच्या परिचयामुळें स्वत:स धन्य मानीत होते. त्यांजपासून वरील ग्रंथ समजू

घेतांना महाराजांनीं त्यावर स्वबुद्धीनें नोट्स लिहून त्या विषयाची समीक्षा केली. ती पाहून मुकरजी आश्चर्यचकित् झाले व महाराजांस ईश्वरी विभूति मानूं लागले. आंग्लभाषेंतील पारिभाषिक शद्ब संस्कृतांत नवीन बसविण्याची मुकरजीस फार आवड असे. वरील ग्रंथ महाराजांस समजाऊन देतांना Mirror Golvanometer हा शद्ब त्यांस नडला, तेव्हां तत्काल महाराजांनीं " सदर्पण तडित्प्रवाहमापकयंत्र " हा नवीन संस्कृत शद्ब बनविला. तेव्हां मुकरजींस त्यांच्या बुद्धिमत्तेविषयीं आश्चर्य वाटलें.

महाराजांच्या ' अदृश्य दीपिके ' विषयीं या पूर्वीं एकदोन वेळां उल्लेख येऊन गेलेला आहे. हिचा आरंभ या सुमारास नागपूर मुक्कामींच झाला. जडशास्त्राच्या आटोक्यांत न येणाऱ्या, सत्य, व कोठेंना कोठें तरी नेहमीं घडत असणाऱ्या जगांतील अद्भुत चमत्कारांचा संग्रह लेखकांच्या सहीनिशीं यांत करण्याचा प्रयत्न केलेला आहे. स्वतः महाराजांच्या व त्यांच्या परिचित् मंडळीच्या संबंधाच्याही पुष्कळ गोष्टी यांत लिहिलेल्या आहेत.

बाबू प्रियनाथ मुकरजीचा व महाराजांचा पहिल्याच भेटीस विलक्षण प्रेम जुळला व हा प्रेम जन्मांतरीय आहे असें परस्परांनीं बोलूनही दाखविलें. याच वेळीं नागपूर येथील मॉरिस कॉलेजांत नवीन युरोपियन प्रिन्सिपालची योजना झाली होती. त्याच्याशीं बेबनाव होऊन मुकरजींनीं आपल्या सायन्सच्या प्रोफेसरीच्या जागेचा राजीनामा दिला व नागपूर सोडून ते कलकत्यास गेले. मुकरजी कलकत्त्यास जाण्याचे अगोदर महाराज मधून मधून त्यांच्याकडे जात असत. मुकरजी बाबूंनीं राजनिामा दिला ते दिवशींही महाराज त्यांच्याकडे गेले होते. त्यावेळीं त्यांना घरींच असलेले पाहून महाराजांनीं कारण विचारलें तेव्हां मुकरजी म्हणाले " आज हमारी मुक्ति होगई. " मुकरजी पुढें कलकत्त्यास गेल्यावर महाराजांस त्यांनीं एकवेळ आग्रहपूर्वक तेथें बोलाविलें. म्हणून ज्येष्ठ वद्यांत बरोबरच्या मंडळीसह महाराज कलकत्त्यास गेले व तेथून

मुकरजींचें ' धर्मादा ' म्हणून रहाण्याचें गांव आहे तेथेंही एकदोन दिवसां-करितां गेले होते. मुकरजींच्या पत्नीचेंही महाराजांवर अत्यंत पुत्रवत् प्रेम जडलें व महाराज धर्मादास गेले त्याच्या एक दिवस अगोदर तिला स्वप्नांतही महाराजांचें दर्शन झालें होतें.

कलकत्त्यास महाराजांचा मुक्काम सुमारें ८–१० दिवस होता. येथेंही मोठमोठ्या विद्वान मंडळीशीं महाराजांचीं भाषणें झालीं व महाराजांच्या अपूर्व विद्येस ते लुब्ध झाले.

कलकत्त्यास असतांना तेथल्या मत्स्यभक्षणाच्या रूढीमुळें व बाजारांतील दाळतांदुळादि आवश्यक पदार्थांसही मत्स्यसंसर्ग लागत असल्यामुळें महाराज तेथें नुसता दुग्धाहार करून रहात असत.

कलकत्त्याहून नंतर महाराज जगन्नाथपुरीच्या यात्रेस गेले. हें भैरवीचक्र असल्यामुळें " प्राप्ते तु भैरवीचक्रे सर्वे वर्णाः द्विजातयः । " या वचनाधारें सर्व मंडळीसह महाराजांनीं श्रीजगन्नाथांचा प्रसाद एकत्र बसून ग्रहण केला. परंतु ब्राह्मण मंडळीस पाणी मात्र शूद्रांच्या हातचें पिऊं दिलें नाहीं.

जगन्नाथपुरींतील गोवर्धन मठाचे शंकराचार्यांशीं व महाराजांशीं परस्पर भेटीअंतीं परिचय होऊन संभाषणादि प्रकार झाला. ती हकीकत पुढें महाराजांनीं मुमुक्षु वर्तमानपत्राच्या ता० २५ सप्टेंबर इ. स. १९१२ च्या अंकांत " शिवगंगा मठाधिपति आचार्यचरणीं विनंती " या लेखांत पाश्चात्य क्षेपकवादाचा संस्कार कर्णोपकर्णीं आचार्यांच्याही मनावर कसा झाला आहे, हें दाखवितांना प्रसिद्ध केली आहे ती येणेंप्रमाणेंः—"मागें चारपांच वर्षांपूर्वीं मी जगन्नाथाला गेलों होतो तेव्हां तेथील शंकराचार्यांचें व माझें प्रत्यक्ष भाषण झालें. त्यांत ते म्हणाले कीं, उपलब्ध असलेलीं सांख्यसूत्रें खास कपिलाचीं नव्हत ! कारण सांख्यकारिकेच्या तुकड्यासारखीं तीं दिसून पडतात. तेव्हां मी त्यांना म्हटलें कीं " ईश्वरासिद्धः " इत्यादि जीं सूत्रें आहेत त्या विषयाचा कारिकांमध्यें नामनिर्दे-

शही नाहीं. तेव्हां सूत्रें कारिकांचा तुकडा आहेत असें कसें म्हणतां येईल ? यावर नवीन लोकांचें हें म्हणणें आहे माझें नाहीं असें आचार्यांनीं म्हटलें. हे आचार्य फार सरळ असून गुरुस्थानीं मला पूज्य आहेत, परंतु अशा प्रकारचें प्रतिपादन धर्माचार्यांच्या मुखांतून निघालें म्हणजे मजसारख्या शूद्राला तर " ब्राह्मणोऽस्य मुखमासीत् " इत्यादि पुरुषसूक्तांतील मंत्र व " स्त्रीशूद्रद्विजबंधूनां त्रयी न श्रुतिगोचरा " इत्यादि पुराणांतील श्लोक सर्व मागून लुच्च्या लोकांनीं घातले आहेत असें म्हणण्याला कांहींच प्रत्यवाय रहाणार नाहीं. " असो.

यात्रेहून परत आल्यावर कांहीं दिवस महाराज नागपुरासच राहिले. यावेळीं त्यांनीं F. W. Myers या अमेरिकन ग्रंथकाराचा Human Personality किंवा Survival of Soul after bodily death हा ग्रंथ मॉरिस कॉलेजांतील फिलॉसफीचे प्रोफेसर रॉयबाबू यांजपासून समजून घेतला व पूर्वक्रमाप्रमाणें त्यावरही त्यांनीं आपले समीक्षापूर्वक विचार लिहून काढले.

पुढें श्रीकृष्णजन्माष्टमी व सौ० मायबाईचें वार्षिक श्राद्ध जवळ आलें होतें म्हणून श्रावणांत महाराज माधान येथें गेले. हे दोन्ही प्रसंग माधानास करून दिपवाळीपर्यंत माधान, देऊरवाडा, काजळी इ० ठिकाणीं राहिले. काजळी येथें महाराजांनीं योगप्रभावाचें निरूपण सुरू केलें होतें, तें पुढें माधान येथेंही होऊं लागलें. माधानला हें निरूपण शिवमंदिरांत बहुतकरून उत्तर रात्रीं होत असे. योगसूत्राचें विवरण प्रथम सांगून नंतर महाराज भक्तांची रीति कथन करीत असत. योगप्रक्रियेनें साध्य होणाऱ्या गोष्टी भक्तिमार्गांत भक्तांना नुसत्या निस्सीम भगवत्प्रेमामुळें किती सौलभ्यानें मिळतात हें मोठ्या मार्मिक रीतीनें सोदाहरण व सोपपत्तिक महाराज सिद्ध करीत. तेवेळीं लेखक—मिलिंद—नुकताच महाराजांच्या सहवासाला राहूं लागला होता. भक्तांची रीति सिद्ध करण्याकरितां पूर्व संतांचीं वचनें जेव्हां महाराज प्रमाणार्थ बोलून दाखवीत तेव्हां शिवमंदिराचा तो रम्य प्रदेश, प्रभातकालचा प्रशांत समय,

मधुरशीतल वायु व महाराजांची छंदोमय रसाळवाणी यांचें ऐक्य होऊन मिलिंदचित्ताला अभूतपूर्व आनंदाचें भरतें येत असे व महाराजांच्या चरणकमलाची नित्य नूतन आवडी उत्पन्न होत असे. हीं निरूपणें पुढें वाठोड्यास गेल्यावरही तेथील कात्यायनी व्रतोत्सव संपतपर्यंत चाललीं होती. समाधीपादाच्या एकंदर ४४ सूत्रांचें निरूपण याप्रमाणें झालेलें आहे.

काजळी येथें असतांना आपल्या ज्ञातिबांधवांसही वेदान्तशास्त्राच्या कांहीं युक्त्या वगैरे महाराजांनीं सांगितल्या व भोजनप्रसंगीं "ज्ञानेश्वर माउलीचा" घोष, श्लोकरूपानें प्रश्नोत्तरें वगैरे नित्यक्रमाच्या योगानें त्यांस सत्समागमाचा लाभ दिला. चित्तोपदेशाचे श्लोक व सद्वैजयंतीच्या आर्या येथील भोजनाचे वेळांतच बहुतेक झालेल्या आहेत.

"घोडा घे म्हणजे तुझा उदयकाल होईल" हे शब्द कोणा एका परोक्ष व्यक्तीस उद्देशून महाराज येथें केव्हां केव्हां बोलत असत. याचें प्रत्यंतर पुढें असें कळलें कीं, हे शब्द आकाजीबापू देशमुख यावलीकर यांस उद्देशून होते. ह्यावेळीं पैशाच्या संबंधानें ते फारच अडचणींत आले होते व घोडा घेतल्यानंतर ती त्यांची अडचण दूर झाली.

पुढें दिवाळीस महाराज उमरावतीस आले व थोडे दिवस तेथें राहून कात्यायनीकरितां वाठोड्यास गेले. वाठोडा येथें असतांना महाराजांनीं स्वतः पार्थिव पूजनाचा नित्य नियम सुरू करून मंडळींतील माणसांसही पार्थिव देण्याचा उपक्रम केला, व संप्रदायक्रमाप्रमाणें हरिहरभक्तीचें स्थापन करण्याचा मनांतला फार दिवसांचा हेतु सिद्धीस नेला. तशींच मंडळीला चांगदेवपासष्टी व सांख्यकारिका यांचीं निरूपणें सांगितलीं व पाश्चिमात्य तत्ववेत्त्यांच्या मतांची व थिऑसफीची समीक्षा करून वासुदेवराव मुळें यांस ती पत्रद्वारें कळविली. याशिवाय श्रीमद्भागवताच्या प्रथम स्कंधावर प्रियलीलामहोत्सव नांवाची गद्यपद्यात्मक टीकाही येथेंच महाराजांनीं सुरू केली.

---

१ सूक्तिरत्नावलि द्वि० यष्टि उत्तरार्ध पृ० ३३ पहा.

महाराजांच्या स्वरपरीक्षा ज्ञानाविषयीं येथें एक गोष्ट आढळून आली ती त्यांच्या ' अदृश्यदीपिकेंत ' लेखकाच्या हस्ताक्षरानें व सहीनें लिहिलेली आहे ती अशीः—

" आजरोजीं ( सोमवार ता० १०।२।०८ ) दुपारचे सरासरी २ वाजतां महाराज नित्यक्रमाप्रमाणें भागवताचें प्राकृत निरूपण नुकतेंच आटपून बसले असतां बाहेर एक भिकारी ओरडला. महाराजांनीं त्याला कांहीं भिक्षा वाढायला सांगून नंतर म्हणाले त्याच्या छातींत कांहीं दुःख आहे कीं काय तें विचारा. मी स्वतःच तें विचारायला गेलों. तो म्हणाला सुमारे सात वर्षांपूर्वीं दुष्काळाचे वेळीं मी वेडा झालों होतों तेव्हां गोट्यानें मी छाती बडवून घेतली होती. तेव्हांपासून छातींत कधीं कधीं दुखत असते. या इसमाचें नांव दसऱ्या, जात महार, रहाणार मलकापूर, वय सरासरीं ३७।३८ इतकें आहे. हा भिक्षा मागत फिरत असतो. "

एका गृहस्थाचा आवडता मुलगा संपल्यामुळें त्याला शोक झाला होता व तो मुलगा पुन्हां परत मिळण्याचा कांहीं मार्ग असल्यास पहावा म्हणून तो वाठोड्यास महाराजांकडे कात्यायनीव्रतांत आला होता. त्याला महाराजांनीं येथून एक पत्र पाठविले आहे. त्यांत मृत मनुष्य कोठें व कसे पाहतां येतात हें सांगून प्रयत्नानें व तपानें प्रतिसृष्टिसारख्या मोठमोठ्या गोष्टीही सिद्ध होऊं शकतात, याविषयीं प्रतिपादन केलेलें आहे.

---

श्रीज्ञानेश्वर माउली समर्थ.

## शके १८३० कीलकनाम संवत्सरे. इ० स० १९०८–१९०९.

कात्यायनीव्रतोत्सव संपल्यानंतर पुढें पांचसहा महिनेपर्यंत महाराज वाठोड्यासच होते. रामनवमीही तेथलीच झाली. येथें असतांना "अंत-

---

१ सूक्तिरत्नावलि० द्वि० यष्टि उत्तरार्ध पृ० ३८ पहा.

र्विज्ञानसंहिता'' म्हणून महाराजांनीं अलौकिकविद्येसंबंधीं कांहीं नवीन सूत्रें संस्कृतभाषेंत रचून एका एका सूत्राचें स्पष्टीकरण व्याख्यानरूपानें करण्याचा उपक्रम केला. हीं व्याख्यानें "अलौकिक व्याख्यानमाला" या नांवानें सूक्तिरत्नावलीच्या पांचव्या वर्षांत छापून प्रसिद्ध झालीं आहेत. या व्याख्यानांतील विषय नेहमींप्रमाणें नवीन व श्रुतियुक्तिअनुभवप्रचूर असून शेवटीं पारकीय तत्वज्ञानाची समीक्षा करीत करीत पुढील वाक्यानें उपसंहार केला आहे:—"झाला तितक्या रीतीनें सर्व पारकीय दृश्य अदृश्य शास्त्रांचा विचार करून, प्रियबांधवहो! आपण जसे लिंगशरीरापर्यंत येऊन पोंहचलों आहों, तसे त्या शास्त्राचे निर्माणकर्तेंहि पोंहचले नाहींत. म्हणून असाच विचार कितीही चालू ठेविला तरी ह्याच्यापुढें आपल्याला वेदांतिक पद्धतीवांचून जाणें शक्य नाहीं."

—अलौकिक व्याख्यानमाला. पृ. १६०—

अस्तु. वाठोड्याहून पुढें महाराज शिंगणापुरास गेले व तेथें थोडे दिवस राहून वैशाखांत बापूगडीचे लग्नाकरितां आकोला येथें गेले. बापूगडीचें लग्न करूं नका, असें श्रीनिवासशास्त्री यांस महाराजांनीं पूर्वीच सुचविलें होतें व बापूगडीचीही इच्छा नव्हती, तथापि सहज लग्नाचा योग जुळून आल्यामुळें श्रीनिवासशास्त्रींनीं अनुमोदन दिलें होतें. बापूगडीला पुढें लवकरच क्षयरोगाची भावना झाली व त्याची पत्नीही क्षयरोगानें संपली. या लग्नासंबंधानें महाराज एके ठिकाणीं म्हणतात:—"त्याच्या (बापूच्या) लग्नाविषयीं शास्त्रीबोवांनीं मला विचारलें, परंतु मी करूं नका असें सांगितलें. तथापि त्यांनीं (श्रीनिवासशास्त्री यानीं) कोणत्या तरी रीतीनें माझ्या तोंडांतून "ठीक आहे" असें म्हणवून घेऊन बापूचें लग्न केलें.

तळेगांव दशसहस्र येथील रा० रा० गिरराव केशवराव कमेटी हे याच सुमारास बिमार होऊन अत्यवस्थ झाले होते व वैद्य, डाक्तर, यांनींही त्यांची आशा सोडली होती. तेव्हां त्यांच्या सासऱ्यांनीं महाराजांकडे

वाठोड्यास येऊन त्यांस वांचविण्याची विनंती केली. महाराजांनीं ज्ञानेश्वर महाराजांचें तीर्थ पाठविलें. त्यानें त्यांस आराम पडला व हळुहळु दुरुस्त झाले. पुढें त्यांस महाराजांनीं पार्थिव दिला.

जेष्ठ व आषाढ हे दोन महिने उमरावतीस राहून श्रावणांत जन्माष्टमीकरितां रा० रा० गोविंदराव किडे यांच्या विनंतीवरून महाराज कारंजास गेले व जन्माष्टमी तेथली करून भाद्रपदांत हर्द्यास गेले.

हर्द्याहून जवळच चारवा येथें गुप्तेश्वरमंदिरांत एकदां महाराजांचा मुक्काम झाला. तेथें रा० रा० भगवंतरावभय्या म्हणून एक पेनशनर नाझर आहेत, यांनीं उपनिषदें व आचार्यांचीं त्यांवरील भाष्यें वगैरे बरींच वाचलीं आहेत; ते वेदांतासंबंधानें शंका वगैरे विचारण्यास महाराजांकडे येत असत. त्यांनीं एके दिवशीं प्रयत्नप्रारब्धवादाचा विषय काढला व आचार्यांच्या भाष्यांतील तद्विषयक परस्पर विरोध दाखवून म्हणाले कीं, हा वाद अनादि असल्यामुळें याचा निर्णय होणें अशक्य आहे. महाराजांनीं तत्काल आचार्यांच्या भाष्यांतील विरोधी स्थळें कागदावर टिपून घेऊन दोन्ही वचनांचा समन्वय केला व प्रयत्नवादाचें उत्तम मंडन करून भगवंतराव भय्यांस ते पटवून दिलें. तें टिपण येणेंप्रमाणें:—

अथ श्रीमदाचार्यैः स्ववचनाविरोधःपरिन्हियते । ईश्वराधीनएव जीवः पुण्यपापेकरोति नस्वतंत्र इतिकौषीतकि भाष्ये । पूर्वकृतधर्माधर्म संस्कारवशादिति गीताभाष्ये । एवंविरोधे सति उच्यते । यो न्यायानुगृहीतोदृष्टान्तः स बलवान् यद्यथेहेत्यादिन्यायानुगृहीतश्रुतिवत् । न्यायो युक्तिप्रतीतिः ; सोऽपि कश्चिच्छ्रुत्यनुकूलस्तत्प्रामाण्यस्थापकश्चेत् अन्याश्रुतिरपियुक्त्यनुकूला व्याख्येयाइति सूत्रभाष्याभ्यामवगम्यते । सूत्रंतु “ कृतप्रयत्नापेक्षस्तुविहितप्रतिषिद्धावैय्यर्थ्यादिभ्यः ” भाष्यंचैवम्—परायत्तेऽपिहिकर्तृत्वेकरोत्येवजीवः कुर्वंतंहि तमीश्वरःकारयति । अपिच पूर्वप्रयत्नमपेक्ष्येदानींकारयति पूवतरंचप्रयत्नमपेक्ष्य पूर्वमकारयादित्यनादित्वात्संसारस्येत्यनवद्यम् । कथं पुनरवगम्यते कृतप्रयत्नापेक्षईश्वरइति । विहित प्रतिषिद्धावैय्यर्थ्यादिभ्यइत्याह ।

एवंहि ' स्वर्गकामोयजेत् ' 'ब्राह्मणो न हंतव्यः' इत्येवं जातीयकस्याविहितस्यप्रतिषिद्धस्यचावैय्यर्थ्यं भवति । अन्यथातदनर्थकंस्यात् । ईश्वरएव विधिप्रतिषेधयोर्नियुज्येतात्यंतपरतंत्रत्वाज्जीवस्य तथा विहितकारिणमप्यनर्थेनसंसृजेत्प्रतिषिद्धकारिणमप्यर्थेन । ततश्च प्रामाण्यंवेदस्यास्तमियात् ।

अर्थ—भगवान् आचार्यच आपल्या वचनांचा विरोध नाहींसा करितात. ईश्वराधीनच जीव पापपुण्य करतो, स्वतंत्र करीत नाहीं, असें ते कौषीतकि भाष्यांत म्हणतात व पूर्वजन्मकृत धर्माधर्माचे जसे संस्कार असतील त्याप्रमाणें जीव करितो असें तेच गीताभाष्यांत म्हणतात; असा स्ववचनविरोध प्राप्त झाला असतां, सूत्रभाष्यावरून त्यांच्या म्हणण्याचा भाव असा दिसतो कीं, न्यायानुगृहीत दृष्टान्त न्यायानुगृहीत श्रुतीप्रमाणें बलवान् समजावा. न्याय म्हणजे युक्ति. तीहि युक्ति श्रुत्यनुकूल असून तिचें प्रामाण्य स्थापन करणारी असल्यास त्या श्रुतीच्या विरोधी भासत असलेल्या दुसऱ्या श्रुतीहि त्या युक्त्यनुकूल लावाव्या; ईश्वरकृतप्रयत्नाच्या अपेक्षेनें करवितो, असें मानल्यासच विहितप्रतिषिद्धाचें अवैय्यर्थ्य ठरतें, असा सूत्रार्थ असून त्यावरील भगवान् आचार्यांचे भाष्याचा अर्थ असा आहे:—

जीवकर्तृत्व ईश्वरपरतंत्र असलें तरी जीव स्वतंत्र कर्ता आहेच. करीत असलेल्या जीवालाच तो करावयाला लागतो; किंबहुना संसार अनादि असल्यामुळें पूर्व प्रयत्नाच्या अपेक्षेनें आतां जसें करावितो त्याप्रमाणें पूर्वतर प्रयत्नाच्या अपेक्षें त्यांनीं पूर्व प्रयत्न करविला असें जाणावें. पुनः परमेश्वर कृतप्रयत्नापेक्षी आहे हें कशावरून तर विहितप्रतिषिद्धाच्या सार्थकतेवरून समजावें. असें मानलें असतांच "स्वर्गकामो यजेत्" इत्यादि विधिप्रतिषेध सांगणारें शास्त्र सार्थ ठरतें; नाहींतर अनर्थक ठरतें. ईश्वरच जर प्रयत्नापेक्षेशिवाय विधिप्रतिषेधाच्या ठिकाणीं जीवाला अत्यंत परतंत्रतेस्तव नियुक्त करील तर विधिप्रमाणें चालणाऱ्याला

दुःख व निषिद्ध वागणाऱ्याला सुख देतो, असें मानावें लागेल व मग वेदाचें प्रामाण्यच बुडेल.

पुढें थोडे दिवस हरदा, पलासनेर येथें राहून आश्विन महिन्यांत महाराज छिदगांवास गेले व पुढें चार महिने तेथेंच राहिले. दसरा, दिवाळी व कात्यायनी तेथलीच झाली.

चांद्याचे नारायण पैकाजी पंडित हे मागें एक वेळ कात्यायनी उत्सवाकरितां वाठोड्यास आले होते व तेव्हांपासून महाराजांच्या सत्समागमाचा लाभ घेण्याविषयीं त्यांस आवडी उत्पन्न झाली होती. या वेळींही ते कात्यायनी व्रताकरितां छिदगांवास आले होते व येथून दृढ निश्चयपूर्वक ते महाराजांच्या सहवासाला राहूं लागले व महाराजांचें स्नान, पूजा, भोजन ग्रंथलेखन वाचनादि सर्व प्रकारच्या परिचारकर्मांत पुरस्कार घेऊन मनोभावानें एकनिष्ठपणें त्यांची सेवा केली व त्यांच्या कृपेनें आत्यंतिक श्रेय संपादन केलें.

या कात्यायनी उत्सवाकरितां हरद्याहून जी मंडळी आली होती, त्यांत रा० रा० वामनराव चारेवकरांबरोबर पुण्यांतील नामदेव शिंपी ज्ञातीचा एक सुमारें १५ वर्षांचा मुलगा आला होता. त्याचें नांव दत्तु. याचा भाविकपणा पाहून महाराजांनीं त्याला अनुग्रह दिला, मद्यमांस आजन्म वर्ज्य करण्याचें त्याजकडून कबूल करून घेतलें, त्याला नित्य पठणाकरितां ज्ञानेश्वरी प्रसाद दिली, व ‘ दत्तु ’ या नांवानें त्याला गंडांतर असल्याचें सांगून “ ज्ञानेश्वर ” असें त्याचें नांव ठेविलें. पुढें पांचसहा महिन्यांनीं हा ‘ दत्तू ’ एका मोठ्या भुजंगाच्या तावडींतून सुटून त्याचें गंडांतर टळलें व “ ज्ञानेश्वर उद्धव मांढरे ” हें त्याचें नांव रूढ झालें. पुढें त्याला पूर्वजन्मार्जित उपासनेच्या साह्यानें ह्या जन्मीं स्वसांप्रदायिक श्रीकृष्णोपासनेचा मार्ग सुलभ करून देणारा उपाय सांगून सर्वतोपरी महाराजांनीं त्याचें संगोपन केलें. अशा रीतीनें शरणागताला अभयदान देण्याविषयीं महाराजांच्या अनेक गोष्टी आहेत.

येथून परिचित् व प्रेमळ मंडळीशीं महाराजांचा संबंध जसजसा वाढत चालला, तसतसें सद्विद्यादानाचें क्षेत्रही वाढलें. वृत्तिनिरीक्षणपूर्वक परमार्थमार्गांत हळुहळु परिचित् मंडळीची प्रगति करण्याच्या हेतूनें त्यांस पत्रें पाठवून, निरूपणें सांगून व काव्यप्रबंधादि रचना करून शिक्षण देण्याचा महाराजांचा क्रम आतां वाढत्या प्रमाणावर सुरू झाला. छिदगांव येथील शाळेच्या मुख्यशिक्षकास महाराजांनीं हिंदी भाषेंत गीतेचें निरूपण सांगितलें. तसेंच केकरे यांच्या कुटुंबांतील मंडळीस गीता, ज्ञानेश्वरी, सांख्यसुरेंद्रादि निरूपणें चालूच होतीं. जवळच्या मंडळीस वेदान्त व भक्ति यांतील रहस्यांचें निरूपण, आचार्यांच्या मनीषापंचकादि स्तोत्रांचें आपल्या प्राकृत मधुर भाषेंत पद्यरूप भाषांतर, गुरुवारचे पालखीच्या वेळचे अभंग व समस्यापूर्ति वगैरे काव्यशास्त्रादि विनोद यांची बहार तर नेहमींचीच होती. नवीन ग्रंथांचें लेखन व मुद्रणही चालू होतें च.

येथल्या कात्यायनीच्या उत्सवाचे वेळची एक गोष्ट सांगावयाची राहिली. त्या सुमारास कांहीं दिवसपर्यंत एका विवक्षित दिशेकडे तोंड करून " उदासीन ही वृत्ति जीवीं धरावी—रडरे लेका रड—" असे शब्द महाराज मोठ्यानें उच्चारित असत.त्याचा प्रत्यय लवकरच आला.विष्णुपंत धामापूरकर हे रायपुराहून छिदगांवीं आले, तेव्हां त्यांचे हजार बाराशे रुपयांचे दागिने वगैरे माल छिदगांवच्या स्टेशनावर रात्रीचे वेळीं चोरीस गेला.

यावेळीं महाराजांनीं रा० रा० विठ्ठलराव केकरे यांस व त्यांच्या कुटुंबांतील मंडळीस अधिकारानुरूप परमार्थशिक्षण देण्याच्या उद्देशानें लिहिलेलीं संस्कृत श्लोकबद्ध अशीं सुंदर पांच पत्रें आहेत तीं फ़ारच वाचनीय व मननीय आहेत. परमार्थोन्मुख वृत्ति होऊन जे अभ्यासाला लागले आहेत· त्यांना भक्त्युद्बोधार्थ सांख्ययोगवेदान्ताचें रहस्यमय विवेचन शिकविणें व चित्त संसारांत आसक्त असून जे कंटाळून विकारवश होऊन संसार सोडूं पाहतात त्यांस दक्षपणानें नीटनेटका संसार

करून भगवत्प्रेमानें हळुहळु वैराग्य संपादन करावयास शिकविणें व सामान्य अधिकाराच्या मंडळीस मातृपितृसेवा, पतिसेवादि स्वधर्माचरणाचें महत्व शिकविणें, याप्रमाणें सर्व धोरणें संभाळून मुख्य माधुर्यप्रेमबोधक युक्ति व संप्रदायनीति न सोडतां मोठ्या कुशलपणानें शिक्षण देण्याची हातवटी या पत्रांत दिसून येते. उदाहरणार्थ, पहिल्या पत्राच्या वेवटीं ( सप्तम यष्टि पृ० ५।६ ) संसारांत धन्यता कोणास येते या शिषयीं स्त्रीपुरुषचातुर्याच्या ज्या ओव्या महाराजांनीं लिहिल्या आहेत त्यांवरून संसारदक्ष व नीतिमान स्त्रीपुरुषांचें वृत्तिज्ञान त्यांस किती सूक्ष्म रीतीचें होतें याची उत्तम साक्ष पटते. या ओव्यांच्या शेवटीं महाराज म्हणतातः—" धर्म अर्थ काम । हे विरुद्ध असती परम । परी जेथ स्त्रीपुरुषांचा धार्मिक प्रेम । तेथ विरोध नाहीं ऐसें भारतीं ॥ असो स्त्री अथवा पुरुषा । जंव नाहीं तीव्र मुमुक्षा । तंव सोडुनी संसारविशेषा । विटंबना करूं नये ॥ पंचज्ञानेंद्रियें सहावें मन । यांचें न करितां निर्दळन । होऊनियां विकाराधीन । संसार सोडणें विटंबू ॥ अंतरीं परमार्थ धरावा । बाहेरी व्यवहार करावा । आवडी भगवंत भजावा । हळुहळु मिळवावा विराग ॥ जोंवरी विकारी आपुलें चित्त । तोंवरी दुर्जनासी करूं नये मात । आपुलें निर्विकारी होतां चित्त । मग दुष्ट सुधारणार्थ किंचित् यत्न कीजे ॥ आधीं प्रपंच करावा नेटका । मग साधावें परमार्थविवेका । तीव्र मुमुक्षा नसतां देखा । हाचि मार्ग उत्तम ॥ "

वरील ओव्यांत " अंतरीं परमार्थ धरावा । बाहेरी व्यवहार करावा । आवडी भगवंत भजावा । हळुहळु मिळवावा विराग ॥ " ही महाराजांची ओवी अत्यंत महत्वाची आहे. कारण तींत ' सद्बुद्धि ' शिकविली आहे. श्रीमद्भगवद्गीतेंत भगवंतांनीं अर्जुनाला सांगितलेली 'व्यवसायात्मिका बुद्धि' हीच होय. या ' सद्बुद्धीचें ' महात्म्य श्रीज्ञानेश्वरमहाराज असें वर्णन करितातः—

जैसी दीपकळिका धाकुटी । परी बहु तेजातें प्रगटी । तैसी सद्बुद्धि हे थेंकुटी । म्हणों नये ॥ पार्था बहुतीं परी । हे अपेक्षिजे विचारशूरीं । जे

दुर्लभ चराचरीं । सद्वासना ।। आणिकासारिखा बहुवस । जैसा न जोडे परिस । कां अमृताचा लेश । दैवगुणें ।। तैसी दुर्लभ सद्बुद्धि । जिये परमात्माचि अवधि । जैसा गंगेसि उदधि । निरंतर ।। तैसें ईश्वरावांचुनि कांहीं । जिये आणिक लाणी नाहीं । ते एकचि बुद्धि पाहीं । अर्जुना जगीं ।। येर ते दुर्मती । जे बहुधा असे विकरती । तेथ निरंतर रमती । आविवेकिये ।। म्हणोनि तया पार्था । स्वर्ग संसार नरकावस्था । आत्मसुख सर्वथा । दृष्ट नाहीं ।।

योगवासिष्ठांत ज्ञानाच्या ज्या सात भूमिका सांगितल्या आहेत त्यांतली " शुभेच्छा " नामक आद्य भूमिका आणि वरील " सद्बुद्धि " ही एकच होत. " सद्बुद्धि " विषयीं सोपपत्तिक शास्त्रीय विवेचनाचें एक संस्कृत श्लोकबद्ध पत्र महाराजांनीं श्रीयुत बाळकृष्ण भास्कर केकरे यांस पाठविलें आहे. त्याचा उल्लेख पुढें यावयाचा आहे. अंतःकरणांत भगवत्प्रेमाची आवडी असणें हेंच सर्व सिद्धींचें मूळ आहे असें तुकाराम महाराजही म्हणतातः—" नलगे सायास जाणें वनांतरा । सुखें येतो घरां नारायण ।। ठायींच बैसोनी करा एकचित्त । आवडी अनंत आळवावा ।। "

तुकाराम महाराजांच्या पूर्णाधिकारी शिष्या मातोश्री संत बहिणाबाई यांचे वरील विषयावरील सुंदर उद्गार पहाः——अभंग——भक्ति हें कारण साधन वरिष्ठ । रोकडें वैकुंठ हातीं वसे ।। १ ।। स्थिर करी चित्त प्रेम अखंडीत । पावसी अच्युत पद पाहे ।। २ ।। भक्तीपाशीं ज्ञान वैराग्य आंदणें । सर्वही साधनें लया जाती ।। ३ ।। बहेणि म्हणे भक्ति विरक्तीचें मूळ । चित्त हें निश्चळ करी कां रे ।।४।।

भक्ति म्हणजे काय ? हें मातोश्री पुढल्या अभंगांत सांगतातः—संताचे वचनीं दृढ जया भाव । भक्ति अभिनव हेचि खरी ।। १ ।। सांगितली खूण आइके जो मनीं । पावेल निर्वाणीं तोचि एक ।। २ ।। संताचें वचन शास्त्राचे आधारें । भक्तीचे निर्धारें दृढ व्हावें

॥ बहेणि म्हणे संतपायीं जया आर्त । ह्याचि भक्तिपंथ
वा ॥ ४ ॥

राजांचें खरेंखुरें मनोगत व त्यांच्या शिकवणीचें मर्म मातोश्रीच्या
दोन अभगांत पूर्णपण बिंबलेलें आहे. तात्पर्य, सद्गुरुप्रेमाची चटक
रून मनोभावानें त्यांची आज्ञा पाळण्यास तत्पर असणें हीच
होय. तिच्या साह्यानें परमार्थ निधानाचें मुख्य अंजन जें वैराग्य तें
संपादन करण्याची युक्ति वरील ओव्यांत महाराजांनीं
ली आहे. याचें विशेष स्पष्टीकरण पुढील पत्रांतही दृष्टीस

ढील पत्रांतील विषय म्हटलें म्हणजे, सर्व स्त्रियांनीं ब्रह्मनिष्ठ
पुरुषाचे ठिकाणीं पुत्रभावना करून त्यांची भक्ति करणें, ज्ञानीपुरु-
सर्व स्त्रियांचे ठिकाणीं अंबाबुद्धि करणें, श्रीकृष्णपत्नि या नात्यानें
ांचें अनध्यस्तविवर्तत्व व सांख्य, योग आणि वेदान्त
न्ही शास्त्रांतील युक्तींची भक्तिविषयक योजना, हे होत.
त्यांत महत्वाच्या रहस्यमय निरूपणांतील कांहीं उतारे येथें
-

यष्टि पृ० ७ यांत महाराज म्हणतात:—
देवी सर्व भूतेषु मातृरूपेण संस्थिता । इति सप्तशतीवाक्यात् सर्व-
जगत् ॥ ७ ॥" जी देवी सर्वभूतांचे ठिकाणीं आईरूपानें वास करीत
सप्तशतींतील वाक्यावरून सर्व जगत मला अंबारूप असल्यामुळें
ां स्त्री अंबारूपच वाटते.

—सर्वांनांच पुत्रभावना ठेवण्यास सांगण्याचें काय रहस्य आहे या
त्तर भगवान् रामकृष्ण परमहंस कोणत्याही स्त्रीला अंबा समजून जे
ाढीत असत त्यांत आहे.

पुरुष व सत्पुरुष हे दोघेही स्त्रियांना पूज्य मानतात. पण नीच
ांच्या सौंदर्यामुळें व आपल्या भोगार्थ मान देतात; व सत्पुरुष अंबा

समजून मान देतात. याविषयीं पाश्चिमात्य लोकांना उद्देशून व आपल्या गुरूला वंदन करून स्वामी विवेकानंदांनीं जे उद्गार काढले आहेत ते येथें देतोः—

We hear in the west about worshipping woman, but this usually for youth and beauty. This man ( रामकृष्ण परमहंस ) meant by worshipping woman, that to him every woman's face was that of Blissful mother and nothing but that. I ) विवेकानंद ) myself have seen this man standing before those women whom society would not touch, and falling at their feet bathed in tears, saying " Mother, in one form thou art in the street and in another form thou art the universe. I salute thee, mother I salute thee. "

भाषांतरः—युरोपीय देशांत स्त्रियांना पूज्य मानतात, असें आपण नेहमीं ऐकत असतो. पण हें पूजन म्हणजे नेहमीं तारुण्याचें व सौंदर्याचेंच असतें परंतु ह्या पुरुषाला ( भगवान् रामकृष्ण परमहंसाला ) स्त्री पाहिल्याबरोबर ती आपली अखंड सुखदात्री अंबाच आहे, ह्याशिवाय दुसरें कांहींच वाटत नसे. ज्यांना लोक स्पर्शही करीत नसत, अशा स्त्रियांच्या पुढें उभें राहून त्यांच्या पायां पडतांना व डोळ्यांतून घळघळ अश्रुधारा वाहात आहेत, अशा स्थितींत, हे अंबेजननी ! ह्या रूपानें तूं रस्त्यांत दिसते आहेस; परंतु दुसऱ्या रूपानें, तूंच विश्व झाली आहेस. हे आईग ! मी तुला नमस्कार करतो, मी तुला नमस्कार करतो ! असें म्हणतांना ह्या सत्पुरुषाला मी स्वतः पाहिलें आहे. हे उद्गार स्वामी विवेकानंदांनीं इंग्लिशमध्यें " My master " नामक ग्रंथांत लिहिले आहेत. अशा प्रकारें कोणतीही स्त्री भगवान् रामकृष्ण परमहंसाला अंबारूप वाटत असे. पुनः ते म्हणत असतः—' One day is gone, mother, and thou dost not come ' ' आई ! एक दिवस गेला, अजून तूं येत नाहींस ' यावरून त्यांची भक्ति दिसून येते. ' One day of my short life has gone and 1 have not Known the truth. ' ' या माझ्या क्षणिक आयुष्यांतील एक दिवस व्यर्थ गेला पण अझून मला सत्य समजलें नाहीं. ' यावरून त्यांची जिज्ञासा दिसून येते.

पुढें महाराज म्हणतातः—

कथमेकोहि सर्वासां पुत्रो भवितुमर्हति ।
नैषा शंका प्रकर्तव्या जगतो भाव रूपतः ॥

अर्थ—परंतु आई कदाचित् अशी शंका करतील कीं एकच पुरुष सर्व स्त्रियांचा पुत्र कसा होऊं शकतो पण ही शंका करण्याचें प्रयोजन नाहीं. कारण सर्व जगतच भावनारूप आहे.

यापुढें, जगत भावनारूप म्हणजे कल्पित असूनही खरें कां वाटतें याचें वेदान्तयुक्तीनें स्पष्टीकरण करून महाराज म्हणतातः--( पृ० ११ )

अतः सर्व ब्रह्मरूपे भावना परिकल्पितम् ।
दृष्टिसृष्टि विवादेन द्वुतं सिध्यति नान्यथा ॥

म्हणून एका परब्रह्माचे ठिकाणीं हें जगत भावनेनें कल्पित आहे हें प्रत्यक्ष सिद्ध असल्यामुळें तीन सत्ता मानणाऱ्या वेदान्त्यांच्या मतापेक्षां दृष्टिसृष्टिवादच सम्यक् आहे. कारण त्यावांचून भावनामय जगत आहे हें दुसऱ्या रीतीनें चांगलें समजत नाहीं.

दृष्टिसृष्टि विवादोऽयं सर्व वेदान्तसंमतः ।
श्रुत्यायुक्त्या स्वानुभूत्या ज्ञात्वा त्वं सुखिनी भव ॥

सर्व वेदान्तामध्यें हा दृष्टिसृष्टिवादच श्रेष्ठ आहे व योगवासिष्ठादि ग्रंथांत तोच उत्तम सांगितला आहे. याविषयीं वासिष्ठांत एक विपश्चिताख्यान आहे. त्या विपश्चितानें अविद्या केवढी आहे हें पाहण्याकरितां आपल्या भावनेनें अग्नी-पासून चार शरीरें निर्माण करून चार दिशेनें शोध केला व तुमच्या येथें बळवंतरावाला मी दोन रूपांनीं प्रत्यक्ष दर्शन दिल्याचें आपणांस आठवत असेलच. परंतु असें चमत्कारावर दृष्टि देणें उपयोगाचें नाहीं. कारण चमत्कारांत सांपडलेला मनुष्य ब्रह्मवस्तूला सोडून आश्चर्यानें वाहत जातो. असो. सर्व जगत् भावनामय आहे हें आपल्या तर्कानें, वेदवाक्यानें व अनुभवानें जाणून सुखरूप हो. आतां भावनामय जर जगत आहे तर वाईट भावना करून दुःखांत कां पडावें ? चांगली भावमा करणेंच श्रेयस्कर आहे.

पुढें रुद्रयामल तंत्रांतील दिव्य भावना, नरभावना व पशुभावना व त्यांचीं लक्षणें सांगून दिव्यभावनेविषयीं महाराज म्हणतातः—

दिव्यभावात् भवंत्याशुत्याखढा योगसत्तने ॥

तिसरी जी दिव्य भावना आहे ती साधूंच्या ठिकाणीं व ईश्वराचे ठिकाणीं करितां येते. कारण साधु व परमेश्वर ह्यांच्यामध्यें भेद नाहीं असें " तस्मिन्स्त-ज्जने भेदाभावात् " ह्या नारदसूत्रांत सांगितलें आहे. ही दिव्यभावना केली असतां जीव ब्रह्मविद्येच्या राज्यावर लवकर बसतात.

आतां संसारांत राहून ही दिव्यभावना आपोआप साधण्याचा उपाय सांगतातः—

यावद्बुद्धिर्विमग्नास्यात् संसारे बांधवान्विते ।
तावन्नदिव्यभावोऽतो ज्ञानिनं भावयेत्सुतम् ॥

मुलें, सुना, भाऊ इत्यादिकांनीं पूर्ण संसारामध्यें जोंपर्यंत चित्त गुंतलें असतें, तोंपर्यंत दिव्यभावना करतां येत नाहीं. म्हणून ज्ञानी पुरुषाच्या ठिकाणीं पुत्र-भावना करावी. म्हणजे दिव्यभावना आपोआप साधते. ज्याप्रमाणें भ्रमराचें ध्यान करून भ्रमरच होतो.

पुढें, संसारांतील कुपुत्र असोत किंवा सुपुत्र असोत ते मोक्ष देणारे होत नाहींत हें दाखवून, " आत्मावै पुत्रनामासी " या श्रुतीवचनाप्रमाणें आत्म्याचें ज्ञान ज्याला झालें आहे अशा ब्रह्मनिष्ठालाच पुत्र समजावें व वरील विप-श्चिताच्या दृष्टांतानें व गणेश पुराणांतील " एकोऽहं पंचधा जातो " या वचनानें एकही पुरुष तीव्र भावनाबलानें सर्वांच्या गर्भांत जाऊं शकतो हें युक्तीनें समजून घ्यावें, असें सांगितलें आहे.

आतां, जीवानें ईश्वरधर्म सांगणें म्हणजे आसुरकोटींत जाणें होय. या शंकेचें निराकरण करण्याकरितां " शास्त्रदृष्ट्यातूपदेशो वामदेववत् " या व्याससूत्राचें प्रमाण देऊन महाराज म्हणतात कीं, महात्म्या वामदेवाला गर्भांतच ज्ञान झालें तेव्हां त्यानें आपल्या ठिकाणीं ईश्वरधर्म घेऊन सर्वांस बोध केला अशी कथा वेदांत आहे. ह्याप्रमाणें कोणीही ईश्वरधर्म घेऊन परमार्थ वाढविण्यास हरकत नाहीं. आतां तुम्हाला असें वाटेल कीं मला ज्ञानाचा अभिमान आहे परंतु

आपल्या जवळ दोन पैसे असल्यास आहे म्हणणें अभिमान नव्हे, तर नसून आहे म्हणण्यांत अभिमान आहे. दुसरें, चांगला अभिमान असणें ह्याची तातांनीं ( ज्ञानेश्वरमहाराजांनीं ) प्रशंसा केली आहे. " जे अभिमान वाहती आंगीं । आम्ही हरीचे भूषावयालागीं ॥ "

सारांश, याप्रमाणें श्रुतीनें, युक्तीनें व स्वानुभवानें, आपले ठिकाणीं पुत्रभावना ठेवण्यास सांगून नंतर केवळ व्यावहारिक पुत्राप्रमाणें ही भावना न ठेवतां महात्म्यज्ञानानें ईश्वरभावनाही जागृत ठेवतां यावी म्हणून प्रथम वसुदेवदेवकीचें उदाहरण देऊन महाराजांनीं श्रीकृष्णाचें अनध्यस्त विवर्तत्व सिद्ध केलें आहे, व जीवाप्रमाणें परमात्मा गर्भांत जन्म घेत नसून केवल भावनेनेंच त्याला पुत्र मानावें लागते व एकाच वेळीं भगवंतापासून पुत्रसुख, मोक्ष व भक्तिसुख मिळविण्याकरितां पुत्रभावना, ब्रह्मभावना व प्रेम हीं तिन्ही त्याच्या ठिकाणीं ठेविलीं पाहिजेत या विषयीं, श्रीमद्भागवतांतील श्लोक प्रमाण घेऊन सुंदर विवेचन केलें आहे व भगवंताचें गर्भांत येणें, देवकीला आठवा गर्भ राहिला इ० गोष्टी अविद्येनें भासत असून त्या अविद्येचा भगवंताला जसा स्पर्श नाहीं तसा त्याच्या भक्तालाही नाहीं म्हणून भगवंताचें गर्भांत येणें वगैरे गोष्टी केवळ विनोदमात्र आहेत असा देवांच्या स्तुतीचा भावार्थ दर्शविला आहे.

श्रीद्भागवतांतील श्लोकद्वयांचें असें रहस्यमय विवरण करून, श्रीकृष्णाप्रमाणें आपलेही ठिकाणीं प्रेमपूर्वक पुत्रभावना व ब्रह्मभावना ठेवून स्त्रियांनीं परमगतीला प्राप्त व्हावें, म्हणून स्वतःचें आधिकारिकत्व स्पष्ट करण्याकरितां महाराज म्हणतातः—

इति श्लोकद्वयं सम्यक् प्रोक्तं भागवते हितम् । ममापि कृष्णपत्नित्वादधिकारस्तथास्तिहि ॥

याप्रमाणें हे दोन श्लोक भागवतामध्यें कल्याणप्रद सांगितलें आहेत. आतां हे श्लोक देवाविषयीं आहेत अशी शंका करूं नये. कारण मी श्रीकृष्णाची पत्नि असल्यामुळें माझेही ठिकाणीं तो अधिकार सहजच येतो.

दंपत्योरेकरूपत्वं प्रोक्तंचानुभवामृते ।
'यतस्तदीयेति' सूत्रं प्रमाणं नारदस्यहि ॥ ( संधिः—छांदसः )

परंतु तूं जरी श्रीकृष्णाची पत्नि आहेस तरी पतीपेक्षां पत्नीचा अधिकार कमी असतो अशी शंका मात्र करूं नये. कारण इतर लोकांप्रमाणें आमचा पतिपत्नि संबंध संसाराकरितां नाहीं तर तो ज्ञानमय आहे. श्रीमत्सद्गुरु ज्ञानेश्वरमहाराज अमृतानुभवांत म्हणतात:—"जो प्रियूचि प्राणेश्वरी । उलथे आवडीचे सरोभरी । चारुस्थळीं एकाहारी । एकांगाचा ॥ " आणि ज्याअर्थी साधु ईश्वराचेच असतात त्याअर्थी त्यांच्यात व ईश्वरांत भेद नाहीं असें नारदसूत्रही प्रमाण आहे.

अतो मां नंदनं मत्वा तीर्त्वैतन्मरणार्णवम् ।
ब्रह्मज्ञानं परं प्राप्य व्रजस्व परमांगतिम् ॥

आतां तुला पुष्कळ माता असल्यामुळें कितीकांचे ठिकाणीं प्रेम ठेवूं शकशील अशी शंका करूं नये. कारण मी जें तुम्हां सर्व स्त्रियांना माता म्हणतों तें कांहीं मी आपल्या करितां म्हणत नाहीं. तर तुमच्या सर्वांच्याच हिताकरितां म्हणतो. कारण मला तुम्हांला माता म्हणून तुमच्या जवळून कांहीं मिळवावयाचें नसतें; तर उलटें तुम्हांलाच ब्रह्मज्ञान करून द्यावें लागतें.

दुसरें, पुष्कळ आया आहेत हा भेद तुमचेच ठिकाणीं आहे. पण मला सर्व स्त्रियांचे ठिकाणीं भगवती अंबाच भरली आहे असें वाटते. निरनिराळेपणा हा देहबुद्धीनें वाटत असल्यामुळें देहबुद्धि राखून माझे ठिकाणीं पुत्रभावना ठेवणें अशक्य आहे. माझे ठिकाणीं पुत्रभावना ठेवल्यावर माझ्या ज्या दुसऱ्या आया आहेत त्या व मी एकच हीही भावना त्याबरोबरच वाढत गेली पाहिजे. तात म्हणतात:—"मी झालिया संभवे । भक्ति माझी ॥ "

आतां हा मार्ग दुस्तर आहे खरा; परंतु या वांचून तुम्हांसारख्या साध्वी स्त्रियांना दुसरा तरणोपायच नाहीं. तेव्हां तुम्ही माझे ठिकाणीं पुत्रभावना ठेवून माझ्या ज्या दुसऱ्या आया आहेत त्या व मी एकच आहे असें मानीत जाल तेव्हां तुम्ही अंबेस जाऊन मिळाल व अंबेस जाऊन मिळाल्यावर जीवब्रह्मैक्य सहजच झालें. हा मार्ग जरी कठीण आहे तरी येथें निराश होण्याचें कांहीं

कारण नाहीं. हळु हळु अभ्यास मात्र करीत जावा. म्हणजे अधिकारानुरूप लवकरच फलसिद्धि होईल. म्हणून हे आई! मला पुत्र मानून व ब्रह्मज्ञान प्राप्त करून घेऊन या जन्ममरणरूपी सागरांतून पार होऊन परम गतीला प्राप्त हो.

वरील निरूपणासंबंधानें सू० र० द्वि० यष्टि उत्तरार्धाच्या सूचना-प्रकरणांत महाराजांनीं म्हटलें आहेः—"आणि कांहीं पत्रीं निश्चिती। मियां पुत्रभावें स्त्रियांस सांगितली स्वभक्ति। तयाचा अभिप्राय कीं मजप्रती। व्हाव्या सर्व युवती अंबिका॥"

येथपर्यंत स्त्रीवर्गाच्या उद्धारार्थ वात्सल्यभक्तीचें निरूपण झाल्यावर पुढें ब्रह्मनिष्ठांची सर्वत्र समबुद्धि झाली असतां मग त्यांना स्त्रियांचे ठिकाणीं अंबाभावना करून उपासनामार्गाचें अवलंबन करण्याचें प्रयोजन काय? अशी आशंका घेऊन त्याविषयीं महाराजांनीं तात्विक निरूपण केलें आहे व त्यांत व्रजगोपिकांची श्रीकृष्णाविषयीं "सएवाहं" भक्ति व नंदयशोदेची "ममैवासौ" भक्ति यांचेंही स्वरूप ओघानें स्पष्ट केलें आहे.

सांख्य, योग, वेदान्ताचें रहस्य तर एकंदर पांचही पत्रांत मधुराद्वैत-दृढीकरणार्थ महाराजांनीं उत्तरोत्तर विस्तारपूर्वक निरूपण केलें आहे. सारांश, या पत्रपंचकांत अनेकविध सुंदर प्रक्रिया, युक्त्या व विवरणादि प्रकार प्रकट करणाऱ्या महाराजांच्या भक्तिप्रेमरसपूर्ण अभिनव वाग्झरीचें कोठवर वर्णन करावें? त्याकरितां मूळ पत्रेंच वाचलीं पाहिजेत. तथापि एवढें मात्र येथें म्हटल्यांचून रहावत नाहीं कीं, प्रियलीलामहोत्स-वांतील शुकरंभासंवादांत रंभेच्या मुखांतून महाराजांनीं वदविलेल्या "तुम्हां ऐसे संतजन। स्त्रियांस पावन करिती वात्सल्य सांगोन। पुरुषांस पावन करिती उपदेशून। आपण नारायणस्वयें होती॥" या उद्गारांचें मनो-भिराम चित्र वरील पत्रांत पहावयास मिळतें. असो.

यावेळीं जवळच्या मंडळीस महाराजांनीं हरदा येथें रमाबाई लष्करवाले यांच्या येथें ठेवून त्यांना सकाळचे ६ पासून रात्रौ ११ वाजेपर्यंत स्नान,

संध्या, भोजन, वेदांतचर्चा, देवदर्शन, आरती वगैरे नित्याचरणाचे नियम बांधून दिले होते व नारायणराव पंडित व गंगाधर मुळें यांस मंडळीवर देखरेख करण्याचें काम नेमून दिलें होतें व स्वत: आपण जरूरीच्या एकदोन मंडळीसह कधीं छिदगांवास व कधीं हरद्यास रहात असत.

असा क्रम चालू असतांना, सद्गुरुसेवेच्या आवडीनें आपोआप सत्व-वृद्धि कशी होत जाते हें दाखविणारी एक गोष्ट यावेळीं हरदा येथें घडून आली, ती अदृश्यदीपिकेंत हरिभाऊ केवले यांच्या सहीनें लिहिली आहे. ती अशी:—

शनिवार ता० २३।१।०९ रोजीं (म्हणजे माघ शुद्ध द्वितीयेचे दिवशीं) संध्याकाळीं महाराज छिदगांवास गेले. ते दिवशीं रात्रौ सुमारें साडेदहा वाजतां सौ० रंगुबाई (रमाबाईच्या) माडीवर निजली असतांना एकाएकीं हासूं लागली व मधून मधून झोंपेंत कांहीं बोलूंही लागली. त्याच माडीवर नानाजी कविमंडन, मी, (हरिभाऊ केवले) व्यंकटराव, नारायण पंडित वगैरे आम्ही जागे होतो व आम्हांस तें ऐकून आश्चर्य वाटलें. व्यंकटराव मला म्हणाले "आईला जागी करा." त्यावरून नारायण पंडित यानें तिला उठवून बसविलें असतां ती म्हणाली मला त्रास देऊं नको. निजूं दे. त्यावर मी म्हटलें कीं तुम्ही तिला निजूं द्या. घाबरण्याचें कांहीं कारण नाहीं. असें म्हटल्यावर ती पुन्हां निजली. पुढें सरासरी अर्ध्या तासानंतर पुन्हां ती पूर्ववत् मधून मधून हासूं लागली व वा महाराज, वा महाराज, असें मधून मधून म्हणूं लागली. तेव्हां मी तिला विचारलें कीं महाराज कोठें आहेत? ती म्हणाली पहा समोरच पाटीवर बसले आहेत. तेव्हां त्रिपुरवार म्हणाले, तेथें कोण कोण मंडळी आहे हें तिला विचारा. तसें विचारलें असतां ती म्हणाली महाराज, दुर्गाआई व गंगाधर असे बसले आहेत व महाराज दुर्गाआईशीं छानदार गोष्टी बोलत आहेत. तेव्हां मी विचारलें कीं तेथें त्रिपुरवार, मी व नारायण पंडित आहेत काय? ती म्हणाली दिसत नाहींत. याप्रमाणें मधून मधून हंसणें सरासरी तास दीड तास चाललें होतें. त्यानंतर ती म्हणाली कायग काकू तूं अशी दूर कां बसलीस? तेव्हां मी म्हटलें काकू कोठें आहे? ती म्हणाली आतांच खालीं गेली.

ढें पुढें तर ती सारखीच हंसूं लागली. ती इतकी कीं सारखा पाऊण ! तेव्हां मी तिला उठवून बसविलें. ती म्हणाली तुम्हीं मला कां महाराजांचें फारच चांगलें निरूपण मी ऐकत होतें. मी विचारलें कीं निरूपण चाललें होतें ? ती म्हणाली स्मरत नाहीं. नंतर दुसरे ाराज छिदगांवाहून येथें आले. त्यांनीं सांगितलें कीं खरोखर असाच दिवशीं रात्रीं त्याच वेळीं होत होता व सौ० दुर्गा आईही त्या रात्रीं त होती.

तर सुमारें १५ दिवसांनीं महाराज मथुरावृंदावनाच्या यात्रेस निघाले. बरोबर फक्त दोन तीनच माणसें त्यांनीं यावेळेस ोतीं. बाकीची मंडळी पूर्ववत् हरदा येथेंच होती. महाराजांच्या ांत घडलेल्या गोष्टी:—

रद्याहून निघाल्यावर मध्यंतरीं इटारसीच्या स्टेशनावर सौ० दुर्गा- लक्ष्मणराव केकरे हे मंडल्यास जात असतांना महाराजांस भेटले. र महाराजही नैनपूरच्या स्टेशनापर्यंत गेले होते. वाटेंत जबलपू- शनाजवळील मुशाफरखान्यांत महाराज उतरले असतां तेथें ७—१८ वर्षांचा एक आंधळा मुलगा मोठ्यानें रडत होता. ोणी पैसा, खाऊ, वगैरे देऊं लागले असतां तें न घेतां तो रडूं लागे. इतक्यांत महाराज पटकन आपल्या जागेवरून उठले ाजवळ जाऊन बसले व गुढघ्यावर गाल ठेवून त्याच्याशीं येणें- बोलूं लागले:—मुला तूं रडूं नको. तुला काय पाहिजे तें बोल. ा म्हणाला माझा भाऊ मला सोडून गेला. मला त्याच्याकडे महाराज म्हणाले तो तुला सोडून गेला असतांना पुन्हां त्याच्या- ाला जातोस ? मजबरोबर चल. मी तुझी सर्व प्रकारें उत्तम ठेवतो. मुलाला तें म्हणणें रुचलें नाहीं. इतक्या वेळांत तेथें ो गर्दी जमली होती त्यांत तेथले स्टेशनमास्तरही होते. सर्वांस ौतुक वाटलें. महाराजांची मंडळी बेल फुलें वगैरे आणावयास गेली तीही परत आली. पुढें स्टेशनमास्तर व तेथले आणखी एक

गृहस्थ यांस सांगून त्या मुलास त्याच्या भावाकडे पाठविण्याची महाराजांनीं व्यवस्था केली.

२. ग्वाल्हेरला गेल्यावर स्वानंदसाम्राज्यकर्ते श्री० रामराव कृष्ण जटार यांच्या भेटीस महाराज गेले होते. स्वानंदसाम्राज्यांत स्पेन्सरप्रभृति पारकीय तत्त्वज्ञान्यांच्या ग्रंथासंबंधानें जो भाग आहे त्याविषयीं त्यांचें व महाराजांचें कांहीं भाषणही झालें. परंतु आपल्या पूर्वपत्रव्यवहाराचें त्यांस महाराजांनीं स्मरण दिलें नाहीं.

३. इकडे हरदा येथें महाराजांच्या मंडळीपैकीं सौ० रंगुबाईस दोन तीन दिवसांपासून ताप येत होता. एके दिवशीं मध्यरात्रीच्या सुमारास तिचा ताप उतरूं लागून ती बेशुद्ध झाली. पुढें सुमारें दीड तासांनीं ती कांहींशीं शुद्धीवर आली परंतु नुकतीच थोड्यादिवसांपूर्वींप्रमाणें सत्वातिरेक मानस स्थितींत जाऊन मधून मधून हंसूं लागली व पुढील उद्गार बोलूं लागली:—

वा महाराज, काय प्रभा आहे ! निळी निळी प्रभा दिसते ! देवाची मूर्ति किती साजरी आहे ! मंडळीपैकीं एकानें तिला विचारलें महाराज तेथें आहेत काय ? उत्तर—आहेत. प्रश्न—कोणत्या वेषांत आहेत ? उत्तर—स्त्री वेषांत. पुन्हां उद्गार—वा महाराज, काय प्रभा आहे ! निळी निळी प्रभा दिसते ! नाचत आहेत ! देवाची मूर्ति काय साजरी आहे ! वा महाराज वा ! अरे पहानारे ! डोळे असून तुम्ही कां नाहीं पहात ! बेटे लोक संसारांतच गढून रहातात ! ही मजा कोणीच पहात नाहीं ! वा काय रास आहे ! ! निळूभाऊ धर्माधिकारी तिला यावेळीं म्हणाले—आतां महाराज कोठें आहेत ? उत्तर—आतां दिसत नाहींत. त्यांत मिळून गेले ! ! प्रकाश किती सुंदर निळा निळा आहे ! सुंदर नाद ऐकूं येत आहे ! !

कमळाचें झाड पहा किती सुंदर आहे ! झाडावर देव वस्त्र घेऊन गेले ! गोपी उघड्याच उभ्या आहेत. केश पाटीवर मोकळे आहेत ! गोपी वस्त्र मागत आहेत. गाणें म्हणत आहेत ! नंदाजी के लाल देव मेरे कपडे !

वा काय प्रकाश आहे ! देवाची साजरी मूर्ति आहे ! तुम्ही यावळींत देवाला

---

१ ही गोष्टही मागल्याप्रमाणेंच अदृश्य दीपिकेंत लिहिली आहे.

बांधीत होते, आतां पहाबरें देवाचा कसा थाट आहे ? देवाकडे पहाण्याची कोणाची छाती नाहीं ! ( हे उद्गार महाराजांस उद्देशून आहेत. मागें यावली येथें असतांना एक वेळ महाराजांनीं पूजेंतल्या श्रीकृष्णमूर्तीस दोरीनें बांधून तें रंगूबाईस कळविलें. तेवेळीं ती घरांत दुसरीकडे कांहीं काम करीत होती व महाराज इतर मंडळीसह आकाजी बापूच्या घरीं दुसऱ्या बैठकींत होते. रंगुबाईनें तेथें येऊन देवास दोरीनें बांधलेलें पाहतांच ती फार मोठ्यानें रडूं लागली व महाराजांस प्रार्थना करून देवास सोडविण्याविषयीं आग्रह करूं लागली. नंतर देवास महाराजांनीं सोडल्यावर तिला बरें वाटून ती आपल्या कामास लागली. असा खेळ कधीं कधीं करून महाराज जवळील स्त्रियांचा वात्सल्य प्रेम वाढविण्याचा प्रयत्न करीत. ) देवाचे पाय किती सुंदर आहेत ! कोमल आहेत ! पायांत बांकी आहेत ! घुंगरू आहेत! वा कसे साजरे पाय आहेत ! तिला लेखक म्हणाला, त्या साजऱ्या पायावर नमस्कार कर बरें. हें ऐकून निजल्या निजल्याच दोन्ही हात जोडून मान वांकवून तिनें नमस्कार केला. नंतर म्हणाली—देवाची नाभी कशी साजरी आहे ! व्यंकटेश स्तोत्रांत सांगितल्याप्रमाणेंच आहे ! देवाचें वक्षस्थळ कसें चमकत आहे ! कानांत कुंडलें चमकत आहेत ! वा देव हांसत आहेत ! बासरी किती गोड वाजवीत आहेत ! वा महाराज वा ! देवाच्या हातांत पावा आहे × × पुन्हां ती हंसूं लागली. कारण विचारलें असतां आणखी जास्तीच हंसूं लागली व म्हणाली देवानें राधेच्या कानांतलीं कुंडलें काढून घेतलीं. याप्रमाणें प्रकार दिवस निघेपर्यंत चालला होता. पुढें ती चांगली जागृत स्थितींत आल्यावर, पाहिलेल्या देवाच्या लीलांची आठवण करून रडत असे व पुन्हां पुन्हां पूर्व-स्थितींत जाऊन आनंदानें हंसणें व लीला वर्णन करणें हा तिचा क्रम चालू होई. यामुळें मंडळीला बरें न वाटून तिची प्रकृत्ति अधिक बिघडेल या भीतीनें त्यांनीं वृंदावनाला महाराजांकडे विद्युत्संदेश पाठवून ही स्थिती कळविली. त्याचें महाराजांकडून उत्तर आलें कीं घाबरण्याचें कांहीं कारण नाहीं. मी लवकरच येतों.

रंगुबाई ज्यावेळीं प्रथम बेशुद्ध झाली, त्यावेळीं तिकडे महाराज प्रवा-

सांत आगगाडींत बसून चालले असतांना एकाएकीं स्तब्ध बसले. विष्णुपंत धामापुरकरांनीं हाका मारल्या तरी बोलले नाहींत. नंतर कांहीं वेळानें एकदम महाराज मोठ्यानें ओरडले व म्हणाले कीं ही मुलगी ( रंगुबाई ) मजकडे आली आहे. ती संपली काय ? मी तिला हरद्याला परत पोंचवून आलों.

वृंदावनाला पोंचल्यानंतर महाराज तेथें त्रिरात्र राहिले. तेथें श्रीमद्भागवतांतील रासपंचाध्यायीवर महाराजांचीं ओवीबद्ध प्रवचनें व स्फुट अभंग पदें वगैरे झालीं व नंतर महाराज हरद्यास परत आले.

परत आल्यानंतर सौ० रंगुबाईच्या प्रकृतीसंबंधानें विचारपूस होऊन, ब्रह्मज्ञानाचा निश्चय न करितां नुसत्या सत्वगुणानें विकारवश होऊन चित्त एकाग्र करण्याविषयीं तिला महाराजांनीं दोष दिला व आत्मज्ञानाकडे अनुसंधान ठेवण्याविषयीं उपदेश केला.

पुढें फाल्गुन मासांत एकवेळ महाराज आळंदीसही जाऊन आले.

---

श्रीज्ञानेश्वर माउली समर्थ.

## शके १८३१ सौम्यनाम संवत्सरे. इ० स० १९०९–१०.



चैत्रांत रामनवमी करितां महाराज छिपानेर येथें रा० रा० रामचंद्र शामराव केकरे यांच्या विनंतीवरून गेले होते. तेथें मंडल्याहून गणेश प्रसाद म्हणून एक गृहस्थ महाराजांकडे आला होता. त्यास महाराजांनीं सुमारें १५ दिवसपर्यंत आपल्या सहवासांत राहवून घेतलें व पुढें तो मंडल्यास परत गेल्यावर त्याला हिंदी भाषेंत दोहा, चौपाई वृत्तांत एक लहानसें पत्रोत्तर पाठविलें.

थम प्रयत्नवादाची महती वर्णन करून नंतर चित्ताचे दोष निवृत्त करण्याकरितां सुंदर निगमार्थ सांगितला हिंदी कविता फार सुरस आहे. सूक्तिरत्नावलि द्वि० यष्टि ७ पद्य.

महाराज मंडल्यास गेले व श्रावणापर्यंत तेथें राहिले. शके ोडा येथें आरंभ केलेलीं भागवताच्या प्रथम स्कंधावरील ारूपणें येथें बहुतेक रोज तालसुरांत होत असत. ह्या ार बरेच दिवसपर्यंत चालली होती व प्रथम स्कंध प्रियलीलामहोत्सव '' या नांवानें तीं निरूपणें छापून याशिवाय येथें ब्रह्मसूत्रावर महाराजांनीं फार सुलभ व निरूपणें कांहीं दिवस सांगितलीं. विठ्ठलराव केकरे यांचा भाचा मांजरेकर हा नुकताच बी. ए. ची परीक्षा पास होऊन ा होता. त्याला ''सर्वमान्य धर्माची कल्पना'' या विषयावर नरूपणें महाराजांनीं सांगितलीं.

ठेंही असले तरी त्यांची जुनी ओळखीची मंडळी व होईल तेवढा वेळांत वेळ काढून त्यांचीं गोड निरूपणें असत. या नियमाप्रमाणें मंडला येथेंही नवी जुनी बरीच होती. ही मंडळी कधीं कधीं नुसते तार्किक पद्धतीचेही ांस विचारीत व महाराजही त्यांची उत्तरें योग्य व न त्यांचें समाधान करीत. अशा प्रकारचीं कांहीं प्रश्नोत्तरें

न्ममरणपरंपरा पाहण्याची इच्छा कशानें तृप्त होईल ? नें. कारण जन्ममरण परंपरा कोणत्याच प्रमाणांनीं प्रत्यक्ष नाहीं. प्रत्यक्ष प्रमाणानें सिद्ध करतां येत नाहींत अशा जगांत आहेत. उदा० गुरुत्वाकर्षण आपल्यास कोणत्या नें समजतें ? स्वप्नांतील गोष्टी जेव्हां जागृतींत आठवतात प्रत्यक्ष प्रमाण कामीं येत नाहीं. स्मृतीच फक्त कामीं पडते.

म्हणून प्रत्यक्ष प्रमाणानें जन्ममरणपरंपरा सिद्ध होऊं शकत नाहीं तर स्मृतीच वाढविली पाहिजे व स्मृति वाढविण्याला योग केला पाहिजे. म्हणजे मन तितकें व्यापक केलें पाहिजे. प्रश्न––त्रिवेणींत देह ठेवल्यानें मोक्ष होतो असें वचन आहे तर ज्ञानाशिवाय मोक्ष होतो काय ? उत्तर––त्रिवेणींत देह ठेवल्यानें देवलोकाची प्राप्ति होते व तेथें सद्गुरु-पासून ज्ञान होऊन मुक्ति होते. प्रश्न––त्रिवेणींत पशुपक्ष्यादिकांचा देह पडला असतां त्यांनाही मोक्ष होतो काय ? उत्तर––नाहीं. परंतु वस्तु-महात्म्यामुळें त्यांना पुण्यलोक प्राप्ति होऊन पुण्य क्षीण झाल्यावर ते खालीं पडतील. प्रश्न––योग्याचा देहपात कां होत नाहीं ? उत्तर––यो-ग्याचा देहपात होतो परंतु इतरांस त्याचा देहपात झाला असें वाटत नाहीं. कारण त्याचा नवीन देहही पूर्वसदृशच असतो. दुसरें, आपण ज्याला देहपात किंवा मरण म्हणतों त्याचा अर्थ इतकाच कीं पूर्वसदृश देह आपणास जेव्हां दिसत नाहीं तेव्हां त्या देहाचा पात झाला किंवा तो देह मेला असें आपण म्हणतों. उदा० आपण गाडींत बसून प्रवास करीत असतां प्रत्येक स्टेशनावर गाडी थांबते. पण तीच गाडी व तेच उतारू आपणास दिसत असल्यामुळें विशेष फरक वाटत नाहीं. पण आपण इष्ट स्टेशनावर उतरून गाडी निघून गेली म्हणजे गाडी गेली असें म्हणतो. पण ती गाडी व त्यांतले उतारू जसेचे तसेच असतात. त्याप्रमाणें प्रत्येक जीवाचा देह क्षणोक्षणीं नवीन होत असतो परंतु वेगाति-शयामुळें भ्रमानें आपल्यास तोच देह आहे असें भासतें संसाराचीही अशीच वस्तुस्थिति आहे. संसार हा क्षणांत अनेक वेळ उत्पन्न होऊन नाश पावतो. त्यांतील सुखदु:खेंही तशींच भासमात्र आहेत. पण अज्ञा-न्याला तीं सत्य वाटून तो मोहांत पडतो व ज्ञानी हा सर्व ब्रह्माचा विलास समजून आनंदांत राहतो. सुंदरदास म्हणतात:––

ज्ञानी अरु अज्ञानीकी क्रिया सब एकसीही ।
अज्ञ आशवान, ज्ञानी आश न निराश है ॥
अज्ञ जोई जोई करै, अहंकार बुद्धि धरै ।

ज्ञानी अहंकार बिनु, करत उदास है ॥
अज्ञ सुखदुःख दोऊ, आपविषे मानि लेत ।
ज्ञानी सुखदुःखकूं न, जानै मेरेपास है ॥
अज्ञकूं जगत यह, सकल संताप करै ।
ज्ञानीकूं सुंदर सब, ब्रह्मको विलास है ॥

प्रश्न---श्रीकृष्ण परमात्मा ईश्वर होते तर त्यांनीं भारतीयुद्धांत मेलेल्या दुर्योधनादिकांना जिवंत कां नाहीं केलें ? उत्तर---त्यांना जिवंत केलें असतें तर संसारच वाढविला असता. मग संसार अनित्य आहे व विषय दुःख देणारे आहेत असें विषयदोषदर्शन होऊन जीवांना जें वैराग्य व्हावयाचें तें न होतां त्यांस संसारच नित्य वाटला असता.

दुसऱ्या एकानें तर महाराजांस पुढील मौजेचा प्रश्न विचारलाः--प्रश्न---शेंडी कां ठेवावी ? उत्तर---रोमकूपांचें पोषण केसांनीं होतें. कांहीं जागीं कमी केसं असल्यानेंच रोमकूपांचें पोषण होतें. उदा० छाती. कांहीं ठिकाणीं जास्तच केस असावे लागतात. शेंडीच्या जागीं केस लांब असावे लागतात. मेंदूचे इच्छित व अनिच्छित असे दोन भाग आहेत. शेंडी राखली नाहीं तर अनिच्छित मेंदूला विकार होईल. म्हणून शेंडी राखून इतर केस काढावे लागतात. स्त्रियांचा अनिच्छित मेंदू डावीकडे असतो. त्यांना केस जास्त वाढवून भांग केल्यानेंच मेंदूची शक्ति उत्तम राहते. दुसरें, केसाग्रानें पृथ्वींतला औषधी रस शोषून येतो. म्हणून केस लांब ठेवून त्यांचें अग्र पाठांवर पडावें.

ता० ८।५।०९ रोजीं ब्रह्मसूत्र शांकरभाष्याचें निरूपण झाल्यावर एकानें महाराजांस पुढील प्रश्न विचारलाः---

प्रश्न---शास्त्री पंडितादिकांना इतक्या सुलभ रीतीनें वेदान्त विषय समजाऊन देतां येत नाहीं याचें कारण काय ? उत्तर---कोणताही विषय दुसऱ्यास चांगल्या रीतीनें समजाऊन देण्याकरितां त्या विषयापेक्षां अधिकतर विज्ञानवत्ता पाहिजे. सद्गुरु " शाब्देपरेच

निष्णांत " अशा प्रकारचे पाहिजेत. नुसते श्रोत्रीय किंवा नुसते ब्रह्म-निष्ठ राहून उपयोग नाहीं. श्रोत्रीय म्हणजे विद्वान. नुसता विद्वान असला व निष्णात नसला—त्याला विषयापेक्षां अधिकतर विज्ञानवत्ता नसली— तर त्याला शिष्याची उपाधी ओळखतां येत नाहीं. वेद ईश्वरानें केले पण वेदापेक्षां अधिकतर विज्ञानवत्ता ईश्वराचे ठिकाणींआहे म्हणून ईश्वर सर्वज्ञ आहे. सद्गुरुही महावाक्यबोधानें शिष्याला ज्ञान करून देतात व महा-वाक्य वेदांतलेंच आहे. त्याअर्थीं सद्गुरूचे ठिकाणींही अधिकतर विज्ञान-वत्ता आहे. म्हणून सद्गुरु जीव नसून ईश्वरच आहेत. अधिकतर विज्ञान-वत्ता म्हणजे अग्नीनें वस्त्र धुवून आणा असें वाक्य कोणी उच्चारलें असतां एकदम आपल्यास तें पटत नाहीं. कारण जलानें वस्त्र भिजतें हें आपण अनेक वेळां पाहिलेलें आहे. येथें वाक्यापेक्षां आपली विज्ञान-वत्ता अधिक झाली. ( अधिकतर विज्ञानवत्ता ही ईश्वरानुग्रहावांचून किंवा श्रीगुरुकृपेवांचून नुसत्या शास्त्राध्ययनानें किंवा सृष्टिनिरीक्षणानें येत नाहीं हें महाराजांनीं संप्रदाय सुरतरूंत उत्तम सिद्ध केलें आहे)

त्याच दिवशीं दुपारचे तीन वाजतां देवार्चनकालीं महाराजांनीं " एवं व्रतः स्वप्रिय नामकीर्त्या " हा श्रीमद्भागवतांतला श्लोक म्हणून त्याचें असें विवरण केलें.—

आपला प्रियभाऊ, पिता, किंवा जिवलग मित्र गांवास गेला असतांना ज्याप्रमाणें शोक होतो तसा शोक भगवंताविषयीं झाला असतां सहज वृत्ति स्थिर होऊन आनंद उत्पन्न होतो व तो आनंद नित्य राहतो. ज्याला कोणतेंही साधन करवत नाहीं, विरक्ति नाहीं, इंद्रियदमन नाहीं त्यानें भगवंताविषयीं शोक करावा. म्हणजे त्याचीं इंद्रियें आपोआप लीन होतात. मात्र असें त्यानें व्रतच धारण केलें पाहिजे. मग असा अभ्यास वाढतां वाढतां " उन्मादवन्नृत्यति लोकबाह्यः " अशी त्याची स्थिती होते.

याप्रमाणें आषाढ अखेरपर्यंत मंडला येथें राहून पुढें महाराज राय-पुरास गेले व मार्गशीर्षपर्यंत तेथें राहिले. श्रीकृष्णजन्माष्टमी, व दसरा

दिवाळी तेथलीच झाली. रा० रा० बाळकृष्ण भास्कर केकरे, चिंतामणराव तांबे, राजीमवाले वकील, पावगसकर, नारायण सदाशिव कुसरे वकील, केशवराव बक्षीमास्तर, नारायण दाजीबा वाडेगांवकर, नारायण मनोहर वाडेगांवकर मेडिकल प्रॅक्टिशनर, वगैरे तेथली मंडळी महाराजांच्या नवीन परिचयाची झाली. रा०रा० रघुनाथराव भगाडे हेही त्यावेळीं रायपूर येथेंच मुनसफ होते. यांचा व महाराजांचा पूर्वपरिचय होता.

" स्वत: निष्पाप असून आपला अपमान होतांना शास्त्रकार त्याला अमृत पिणें म्हणतात " या अमानित्व तत्वाला अनुसरून व स्वाभाविक बालभावाच्या खेळकर वृत्तीमुळें, बहुशः लहान मुलांप्रमाणें बोबडें बोलणें, कुत्र्याप्रमाणें भुंकून नक्कल करणें, नवीन अपरिचित् मंडळी जमली म्हणजे कधीं कधीं " दारू आण " म्हणून मोठ्यानें म्हणणें इत्यादि गोष्टी महाराज गमतीनें करीत असत. त्याचा परिणामही पुष्कळ वेळ महाराजांना इष्ट असा होऊन अपरिचित् मंडळीच्या चलबिचल वृत्तींची मौज दृष्टीस पडत असे. असाच कांहींसा प्रकार एकवेळ येथेंही झाला. महाराजांच्या अनुयायी मंडळीपैकीं विष्णु बापुजी घामापुरकर हे यावेळीं रायपुराजवळील लभांडी येथील सरकारी शेतीवर ओव्हरसीयर होते. त्यांजकडे एकवेळ महाराज गेले असतां त्यांजपाशीं असलेला साहेब लोक घालतात तसा एक टोप महाराजांस दिसला. तो त्यांनीं मागून घेऊन जवळ बाळगला व एखादे वेळीं लहर लागली म्हणजे भोजनोत्तर सडकेवर शतपावली करतांना तो डोक्यास घालीत असत व नंतर तेथूनच पुस्तकें वगैरे पाहण्याकरितां सार्वजनिक ग्रंथसंग्रहालयांत जात असत. एके दिवशीं महाराज याप्रमाणें साहेबी टोप घालून लायब्ररींत पुस्तकें पहात बसले असतां तेथें एक गृहस्थ आले व त्यांनीं महाराजांविषयीं तेथल्या इतर मंडळीस कोण काय ? म्हणून प्रश्न केला व महाराजांचें नांव कळल्यावर त्यांच्या जवळ जाऊन ते म्हणाले महाराज, चांद्याच्या गणपतीबोवांच्या मुखानें मी आपली

सत्कीर्ति ऐकली आहे. हें ऐकतांच महाराज मोठ्यानें म्हणाले "कोण आहेरे दारू-आण." तें ऐकून हे साहेबी टोप घालतात त्या अर्थी दारूही पीत असले पाहिजेत असें त्या गृहस्थास वाटून तेथून ते निघून गेले. पुढें गुरुवारचे पालखीचे वेळीं महाराजांचे तात्कालिक स्फूर्ति-जन्य नवीन अभंग ऐकून त्यांचा पूर्वग्रह बदलला व दुसरे दिवशीं "गुला-बराव महाराज हे विसाव्या शतकांतले तुकाराम महाराज आहेत" असे त्यांचे उद्गार निघाले. असो.

नवीन परिचयाच्या मंडळीला महाराजांचा सहवास जसजसा होऊं लागला तसतसे ते त्यांच्या विद्येला लुब्ध होऊन निरूपणें ऐकण्यास तत्पर राहू लागले व वेळांत वेळ काढून अनेक विषयांवर महाराजांशीं चर्चा करून त्यांच्या ज्ञानाचा लाभ घेऊं लागले. रा० रा० नारायण दाजीबा डिस्ट्रिक्ट जड्ज यांनींही अशा रीतीनें पंचदशीवर महाराजांबरोबर चर्चा केली.

श्रीकृष्णजन्माष्टमीच्या उत्सवप्रसंगीं वरील चिंतामणराव तांबे प्रभृति मंडळीच्या साह्यानें जागेची व्यवस्था वगैरे स्वतंत्र व उत्तम होती.

उत्सव झाल्यावर हिंदी भाषा बोलणारा एक नैय्यायिक पंडित महा-राजांकडे आला होता. त्याच्याशीं महाराजांचा वाद चालला असतांना संयोगाविषयीं प्रश्न निघून महाराज म्हणाले कीं, घटाचा व भूमीचा अत्यंत संयोगच होऊं शकत नाहीं. कारण त्यांच्यामध्यें आकाश असतें व लहान लहान जंतू (जीव) त्यांतून जाऊंही शकतात; असें असतांना न्यायशास्त्रांत संयोग कसा मानतात हें मला समजत नाहीं. याचें समाधान तो नैय्या-यिक करूं शकला नाहीं.

याच सुमारास दुसरा एक हिंदी तरुण पंडित महाराजांच्या विद्येची कीर्ति ऐकून वाद करण्याकरितां आला होता. तेवेळीं महाराज रा० रा० बाळकृष्ण भास्कर केकरे ए० अ० कमिश्नर यांच्या माडीवर निजले होते. त्यावेळीं तेथें रा० रा० चिंतामणराव तांबे, र० मा० भगाडे मुनसफ व

कुसरे, राजीमवाले वकील वगैरे बरीच मंडळी जमली होती. वेळ रात्रींची सुमारे ११ वाजतांची होती. कांहीं वेळपर्यंत तो पंडित व मंडळी बसल्यानंतर मध्यंतरी महाराजांना थोडा जाग आल्यावर कोण आहे? असा त्यांनीं प्रश्न केला. तोंच "कानि कानि शास्त्राण्यधीतानि भवता" असा प्रश्न त्या पंडितानें विचारला. महाराज पडल्या पडल्याच म्हणाले, हा कोण संस्कृत बोलतो? मला संस्कृत येत नाहीं. असें म्हणून महाराज पुन्हां झोंपूं लागले. आणखी थोड्या वेळानें महाराजांनीं कोण आहे? म्हणून पुन्हां विचारतां त्या पंडितानें हिंदी भाषेंत महाराजांस एक प्रश्न विचारला. त्याचें महाराजांनीं खंडण करून पूर्वपक्ष केला. याप्रमाणें कांहीं वेळ जीं प्रश्नोत्तरें झालीं तीं कांहीं महाराजांच्या झोंपेच्या तंद्रेंत व कांहीं जागृतींत अशीं झालीं. एवढ्याच प्रश्नोत्तरांनीं "महाराजका अध्ययन बहोत है" असे उद्गार त्या पंडितानें काढले. पुढें महाराज उठून बसले व आपल्या स्वयंविद्या प्रभावानें त्याला सहज कुंठित केलें. तो पंडितही अत्यंत प्रसन्न झाला व "कीर्ति के अनुसारही महाराजकी विद्या अगाध है." असें म्हणून त्यानें निरोप घेतला. महाराजांनींही रुपया नारळ वगैरे आपल्या नेहमींच्या पद्धतिप्रमाणें त्याला देऊन त्याचा योग्य सत्कार केला.

गीता, ज्ञानेश्वरी, प्रियलीलामहोत्सव वगैरे निरूपणें चालू होतींच. "गुरुचरण कौमुदी" म्हणून पंचदशीवर एक नवीन टीका येथें महाराजांनीं लिहिण्यास आरंभ केला.

रायपुरांत यावेळीं एका साधूचें प्रस्थ बरेंच वाढलें होतें. परंतु त्याचें गुप्त अनीतीचें आचरण कोणास माहीत नव्हतें. महाराज येथें आल्यावर त्यांनीं तो सगळा प्रकार युक्तीयुक्तीनें बाहेर परिस्फुट केला, तेव्हां तेथल्या चालक मंडळींत त्या साधूची नाचक्की होऊन त्यांनीं तेथून त्याला हांकून दिलें.

आलीकडे मध्यप्रांतांत वर्धा येथें एक नवीन 'रामदासी' म्हणविणारा पंथ निघून बऱ्याच सुशिक्षित लोकांत त्याचा प्रसार होऊं लागला होता.

श्रीधरबोवा परांजपे बी. ए. हे या पंथाचे प्रवर्तक असून वर्णाश्रमधर्म व सदाचारादि वेदविहित क्रिया न पाळतां नुसत्या नामस्मरणावर विश्वास ठेवून अंत्यवर्णाशीं खानपानादि व्यवहार केला तरी हरकत नाहीं असें त्यांचें मतव्य होतें. श्रीधरबोवाचा मुक्कामही यावेळीं श्रीकृष्णजन्माष्टमी प्रीत्यर्थ रायपूर येथेंच होता व कीर्तन प्रसंगीं अस्पृश्य स्त्रियांनाही श्रोतृ-समूहांत एकत्र बसण्याविषयीं त्यांचा आग्रह होत असल्याबद्दल लोक सांगूं लागले. अशा आचरणासंबंधानें महाराजांशीं वाद करण्याबद्दल तेथील कांहीं मंडळींनीं श्रीधरबोवास म्हटलें व त्यांनींही ती गोष्ट कबूल केली. परंतु वादाच्या प्रसंगाची तयारी होतांच सध्यां वाद करण्याची समर्थांची मला आज्ञा नाहीं असें श्रीधरबोवांनीं सांगून वाद करण्याचें टाळलें. असो. पुढें महाराजांनीं रा० रा० रघुनाथराव भगाडे यांस एक संस्कृत श्लोकबद्ध पत्र पाठवून त्यांत या संप्रदायाचा दोष दाखविला आहे.

तें पत्र सूक्तिरत्नावलीच्या सप्तम यष्टींत ५८ व्या पृष्ठावर छापलें आहे. त्यांतील कांहीं श्लोक येथें घेतों:—

सद्धर्मान्वितयोपास्त्या मनश्चांचल्यमुत्सृजेत् ।
सद्धर्मरहितं नाम वृथा स्यादिति मे मतिः ॥१२॥

आपल्या विहित कर्मासह परमेश्वराची उपासना करून मनाचें चांचल्य दूर करावें. स्वधर्माचरणावांचून नामस्मरण व्यर्थ आहे असें मला वाटतें.

विपरीतं प्रशंसंति भोगसौलभ्यवादिनः ।
शारीरान्मानसं कर्म सुलभं न कदापिहि ॥१३॥

केवळ विषयभोगच जास्त सुलभ करण्याकरितां नामसुलभ आहे असें कर्म-रहित भक्तिवादी म्हणत असतात. परंतु शारीरिक कर्मापेक्षां मानसिक कर्म आपणांस कधीं तरी सुलभ वाटतें काय ? मला तर वाटत नाहीं.

तथापि सुलभा भक्तिः प्रवदंत्यंधदृष्टयः ।
बत तेषां कुतो धैर्यं जनतादुःखदायकम् ॥१४॥

तथापि प्रेमादि मानस भागच जिच्यांत जास्त आहेत अशी भक्तिच

शारीरिक कर्मापेक्षां जास्त सुलभ आहे असें कित्येक मूर्ख लोक सांगत फिरत असतात.

कुमारं मातृभुंजानं यथातातोप्युपेक्षति ।
भक्तिवादिनमुन्मत्तं तद्वदीशोप्युपेक्षति ।। १५ ।।

मातृगामी मुलाची ज्याप्रमाणें बाप उपेक्षा करितो तद्वतच ईश्वर देखील भक्तीच्या पांघरुणाखालीं वाटेल तसें करणाराची उपेक्षा करितो.

भोगानां सुलभत्वार्थं भक्तिर्यद्युपदिश्यते ।
किमीशेन तदा कार्यं वनितावयवं भजेत् ॥१६॥

केवळ विषयभोग वाढविण्याकरितांच जर भक्तीचा उपदेश असेल तर ईश्वराचें काय करावयाचें ? खुशाल वेश्येच्या घरीं जाऊन तिच्या अवयवांचें पूजन करीत पडावें.

सद्धर्मानारब्धभूता भक्तिर्येनोपदिश्यते ।
पाचयेत्तप्ततैलेन मूढं तं भोगवर्धकम् ॥१७॥

उत्तम प्रकारच्या वर्णाश्रम धर्मानें जिचा आरंभ नाहीं अशी भक्ति सांगून केवळ विषयभोगप्रवृत्ति वाढविणाऱ्या मूर्खांनां तापलेल्या तेलाच्या कढईंत टाकून शिजवावें.

इत्यादि प्रकारें वरील पत्रांत महाराजांनीं या संप्रदायाचा तीव्र निषेध करून वर्णाश्रमाचाराचें महत्व उत्तम प्रतिपादिलें आहे.

असो. पुढें कार्तिकांत आळंदीस जाऊन आल्यानंतर मार्गशीर्ष वद्यांत महाराज उमरावतीस आले व तेथून सुमारें आठ कोसांवर थूगांव आहे तेथें प्रातिवार्षिक कात्यायनी व्रतोत्सव करून पौषमासारंभीं पुन्हां रायपुरास परत गेले.

इकडे महाराजांच्या नागपूर येथील अनुयायीं मंडळीपैकीं एका गृहस्थाचें मनःस्वास्थ्य यावेळीं कांहीं विशेष कारणानें बिघडलें होतें व ती गोष्ट रायपूर येथें महाराजांस कळली. त्यामुळें आठदहा दिवसांनींच रायपुराहून महाराजांस नागपुरास जावें लागलें.

लेखक मिलिंद यावेळीं महाराजांच्या आज्ञेवरून त्यांच्या ज्ञानेश्वर मुद्रणालयांत काम करण्याकरितां नागपूर येथेंच राहिला होता व त्याला तेथें ताप येऊं लागला होता. परंतु महाराजांचें आगमन होतांच त्याचा ताप बरा झाला.

चांद्याचे बळवंतराव देशमुख वकील हे यावेळीं नागपुरास कांहीं कामाकरितां आले होते. त्यांस महाराजांसंबंधानें एक यथार्थ स्वप्न यावेळीं पडलें तें त्यांच्या सहीनें अदृश्यदीपिकेंत लिहिलें आहे तें असें:— " ता० २१ १-१० रोजीं मला नागपूर येथें पहाटेला असें स्वप्न पडलें कीं, माझी व श्रीगुलाबराव महाराजांची गांठ पडली. ह्या दिवशीं महाराज रायपूर येथें होते. ते दुसरे दिवशीं म्हणजे ता० २२-१-१० इसवी रोजीं नागपूर येथें आले व स्वप्नांत दिसल्याप्रमाणें त्यांचे दर्शनाचा लाभ घडला. "

नागपुराहून एकदोन दिवसांनीं महाराज छिंदगांवाकडे गेले व सुमारें दीडमाहिना छिंदगांव, हरदा व अजनास (होळकर स्टेट) इतक्या ठिकाणीं राहून फाल्गुन शुद्ध पूर्णिमेस प्रयागला गेले. रा० रा० बाबूराव तांबे हे यावेळीं प्रयाग येथें बी. एल्. च्या परीक्षेकरितां शिकत होते, त्यांस पाठविण्याकरितां महाराजांनीं संस्कृत गद्यपद्यात्मक एक पत्र लिहून ठेविलें होतें तें त्यांस यावेळीं दिलें.

या पत्रांत ललितशास्त्राची (Aesthetics) उत्तम वैदान्तिकपद्धतीची शास्त्रीय मीमांसा असून ललितकलेचा माधुर्यप्रेमांत सुंदर विनियोग सांगितला आहे व गुरु व शास्त्र यांचे योगानें जो हें ललितकलेचें रहस्य जाणतो तोच प्रेमानें श्रीकृष्णाचें यजन करितो व त्याहून इतर सर्व जीव संसारांत पडतात असें शेवटच्या श्लोकांत म्हटलें आहे. तो श्लोक असा:—य एतदभिजानाति रहस्यं गुरुशास्त्रतः । स कृष्णं यजतेऽन्यस्तु निमज्जति भवार्णवे ॥ वरील पत्र सप्तम यष्टींत ७९ व्या पृष्ठावर छापलें आहे.

यावेळीं प्रयाग येथील प्रसिद्ध पंडित आदित्यराम भट्टाचार्य यांच्या

एका फार दिवसांच्या शंकेचें महाराजांनीं निरसन केल्यामुळें पंडितजीचा महाराजांचे ठिकाणीं अतिशय प्रेम जडला. तो वृत्तांत येणेप्रमाणें:— पंडितजीची व महाराजांची प्रथम भेट झाली तेव्हेळीं पंडितजी त्यांस म्हणाले कीं मला सगुण भक्तीची फार आवडी असून ती भक्ति ज्ञान झाल्यावर रहात नाहीं असें सर्व ज्ञानी पुरुष प्रतिपादन करितात व श्रुतीस्मृतींचा अभिप्रायही असाच दिसतो. त्यामुळें माझें मन अस्वस्थ असून अशा भक्तिरहित ज्ञानाविषयीं आदर वाटत नाहीं. बद्रीनारायण, हरिद्वार, हिमालयादि स्थानें पहात मी फिरलों व मोठमोठे योगी, सिद्ध व ज्ञानी पुरुष पाहिले परंतु तेही असेच सांगतात. या संबंधानें आपण मला विशेष कांहीं सांगू शकाल काय ? त्यावर महाराजांनीं उत्तर दिलें कीं खऱ्या भक्तीचा अधिकार ज्ञान झाल्यावांचून येतच नाहीं. ज्ञानपूर्वकालीं जी भक्ति असते तिला शास्त्रांत उपासना म्हणतात. असें उत्तर देऊन त्यावर महाराजांनीं पंडितजीस सुमारे तीन दिवसपर्यंत निरूपण सांगितलें. हें निरूपण फार बहारीचें होतें. निरूपण प्रसंगीं ओघानें जेव्हां योगशास्त्राचा विषय निघाला तेव्हां 'ईश्वरप्रणिधानाद्वा' या पातंजल सूत्रांतील 'वा' हें पद विकल्पार्थी नसून निश्चयार्थीच आहे हें महाराजांनीं पंडितजीस उत्तम रीतीनें पटवून दिलें व योगाभ्यासाच्या एका प्रक्रियेवर बोलतांना अमुक भूमिकेवर अमुक अडचण येत असते असें अनुभवप्रचूर भाषण जेव्हां महाराज करूं लागले तेव्हां तर पंडितजी अत्यंत प्रसन्न होऊन आश्चर्यचकित झाले.

याप्रमाणें प्रयागची यात्रा करून पांचसात दिवसांनीं महाराज पुन्हां छिदगांवास परत आले.

---

श्रीज्ञानेश्वर माउली समर्थ.

शके १८३२ साधारणनाम संवत्सरे. इ० स० १९१०–१९११.



रामनवमी छिदगांवची करून पुढें सुमारे दोन अडीच महिनेपर्यंत महाराज तेथेंच राहिले.

छिदगांवास एके दिवशीं सकाळचे ६–७ वाजतां महाराज रा० दत्तात्रेय खापरे यांजबरोबर "सायन्स" विषयावर बोलत बसले होते. इतक्यांत 'बोस' नांवाचे कोणी बंगाली गृहस्थ एम्. ए. च्या पहिल्या परीक्षेस बसलेले हुशंगाबादेहून महाराजांकडे आले व त्यांनीं "बार्कुलेच्या" फिलॉसफींतलि कांहीं शंका महाराजांस विचारल्या. त्यावर महाराजही त्यांच्याशीं बोलूं लागले. हें त्यांचें परस्पर भाषण सकाळचे सुमारे ८ वाजल्यापासून तों दुपारचे सुमारे ४ वाजेपर्यंत, एकंदर सुमारें नऊ तासपर्यंत चाललें होतें. महाराजांच्या भाषणाचा त्या गृहस्थाच्या मनावर चांगला परिणाम झाला व तत्वज्ञानाचें मूळ शोधलें असतां तें श्रद्धामय आहे अशी त्याची खात्री होऊन महाराजांविषयीं त्याची आदरबुद्धि विशेष वाढली.

या सुमारास महाराजांनीं रा० रा० शांताराम गणेश रेंगे (मु० अजनास) यांस एक पत्र पाठविलें आहे. त्यांत आत्म्याचें नित्यत्व युक्तीनें सिद्ध केलें आहे. ( द्वि० यष्टि. उत्तरार्ध पृ० ४५ पहा. )

यावेळीं नाना कविमंडन हे उमरावतीस होते. ते ज्येष्ठ शुद्धांत आपले एक मित्र रा० रा० लक्ष्मणराव सराफ यांस बरोबर घेऊन छिदगांवास आले व विनंतीपूर्वक महाराजांस उमरावतीस घेऊन गेले.

उमरावतीस आल्यावर महाराज लक्ष्मणराव सराफ यांचे घराजवळील श्रीअंजनीतनयाचें मंदिरांत राहूं लागले.

[illegible]दास यांनीं एक वेळ महाराजांस सिद्धसंत-

भेद विचारला होता व सिद्ध हे पूर्वसंस्कारानें होतात व संत भक्तीनें होतात असें कोणाचें म्हणणें दर्शविलें होतें. हें म्हणणें बरोबर नसून सिद्ध व संत हे दोन्ही शद्ब भक्तांविषयींच असून ते दोघेही एकच आहेत हें स्पष्ट करण्याकरितां यासुमारास एक पत्र महाराजांनीं श्रीनिवासशास्त्रीस पाठविलें आहे. हें गद्यपद्यात्मक संस्कृत भाषेंत असून सातव्या यष्टींत ६५ व्या पृष्ठावर छापलें आहे. यांत सत्वगुणानें धर्माची उत्पत्ति, सगुण भगवद्ध्यानानें सत्ववृद्धि, चार प्रकारचा सत्वोत्कर्ष, त्यांचें अंतर्बाह्य स्वरूप व लक्षणें, साधु व अवतार यांमधील भेद व त्यांच्या ठिकाणीं राहणारा सत्वोत्कर्ष, सत्पुरुष व जीवन्मुक्त पुरुष यांना लोककल्याणोपयोगी आचरण ठेवण्याची आवश्यकता, ज्ञानानंतरही भगवद्भक्तीची आवश्यकता इ० विषयांचें फार सुंदर विवेचन आहे.

यानंतर थोडे दिवस तापाच्या आजारानें महाराजांची प्रकृति अस्वस्थ होती.

महाराजांचे माधानचे लहानपणचे शिक्षक रा० रामराव बळवंत देशपांडे हे केव्हां केव्हां त्यांच्या सहवासाला येऊन रहात असत. यावेळींही ते उमरावतीस महाराजांकडे आले होते. प्रकृति साधारण सुधरल्यावर एके दिवशीं रात्रौ महाराजांनीं पुनर्जन्मविषयक कांहीं माहिती रामरावांस सांगितली व मंडळींतील कांहींजणांचीं जन्मांतरेंही सांगितलीं.

पुढें श्रावण वद्यांत श्रीकृष्णजन्मोत्सवाकरितां महाराज बिलासपुरास गेले व उत्सव आटपल्यावर पौषवद्यापर्यंत बिलासपूर व रायपूर येथेंच त्यांचें वास्तव्य होतें. विशेषतः रायपूर येथें त्यांचें रहाणें याखेपेस अधिक झालें. दसरा व दिवाळी रायपूरचीच होऊन कात्यायनीव्रतोत्सव बिलासपूरचा झाला.

पुन्हां रायपूर येथें नेहमींप्रमाणें महाराजांची वेदांतविषयक चर्चा वगैरे चालू झाली. श्रीमद्भागवताच्या द्वितीय स्कंधावरील टीकाही (प्रियलीलामहोत्सवनांवाची) येथें महाराजांनीं सुरू केली. मागल्या खेपेस ज्यांचा

परिचय झाला होता त्या मंडळीबरोबर निरनिराळ्या विषयांवर चर्चाही होत असे व या चर्चेंत सुसंस्कारद्वारानें मंडळीच्या मनावर सद्‌बुद्धीचें बीजारोपण करून देण्याचा गुण तर महाराजांच्या वाणींत उपजतच होता. कांहीं दिवसांपूर्वी महाराजांनीं रा० रा० बाळकृष्ण भास्कर केकरे यांस एक संस्कृत श्लोकबद्ध पत्र पाठविलें आहे. त्यांत नास्तिकांच्या जडवादादि (materialism) कारणांचें निरसन व वेदांताच्या चेतन कारणवादाची सिद्धि असून अनादि विषयवासनेचा रोध करण्याविषयीं व "सद्वासना" जागृत करण्याविषयीं सोपपत्तिक शास्त्रीय विवेचन थोडक्यांत सुंदर केलें आहे. त्या पत्रांतील कांहीं निवडक श्लोक येथें घेतो:—

मनसो मृदुसंवेगो वासनाशद्बभाग्भवेत् ।
मध्यमः स्वप्नभानंस्याज्जगद्भानंतु तीव्रता ॥१८॥

अर्थ—मनाचा मृदुसंवेग याला वासना म्हणतात व मध्यसंवेगानें त्या वासनेनुरूप स्वप्नांत प्रत्यक्ष गोष्टी दिसतात व तीव्र संवेगानें जागृतींत दिसतात. या प्रमाणें हें जगत् आपल्या मनाच्या तीव्र संवेगानें उत्पन्न झालें आहे.

पूर्वजन्मस्मृतिर्नास्ति मैवमाशंक्यतां कदा ।
बाल्यस्यापि स्मृत्यभावात्स्वाभावस्तत्रकिन्नहि ॥ १९ ॥

स्मृति नाहीं म्हणून पुनर्जन्म नाहीं असें म्हणतां येत नाहीं कारण आपल्याला बाल्यावस्थेची तरी काय स्मृति आहे? व ती नाहीं म्हणून बाळपणीं आपला अभाव होतां असें म्हणतां येत नाहीं.

स्वाज्ञानाद्वासनाकर्म तस्यध्यानाज्जनिर्मृतिः ।
"ध्यायतीवेति" वेदोक्तिर्वासनाबंधनं महत् ॥ २० ॥

मागें सांगितलेल्या अनादि अविद्येच्या योगानें आपल्या स्वरूपाची विस्मृति व त्यामुळें वासना व कर्म होत असून त्या वासनेच्या तीव्र ध्यानानें जगत् भासतें व सुखदुःखें होतात. "ध्यायतीवेति" या श्रुतीवरून वास्तविक हें कांहींच होत नसून वासनेच्या ध्यानानेंच सर्व घडून येतें असें सिद्ध आहे. याप्रमाणें वासनारूपी हें एक मोठें बंधनच आहे.

विवेकपूर्वकज्ञानात् ध्यानाद्भवविपर्ययात् ।
अत्यंत दुःख संबाधः परमानंद संस्थितिः ॥ २१ ॥

विचारानें व युक्तीनें नीट समजून घेऊन व हें जें बंधनकारक ध्यान याच्या उलट ध्यानानें तिन्ही दुःखांची अत्यंत निवृत्ति व परमानंदाची प्राप्ति होते.

विवेक सांख्यनिर्धारात् ध्यानयोगाद्विशेषतः ।
ज्ञानं वेदांततः किंतु देशिकोक्ति व्यवस्थया ॥२२॥

सांख्यशास्त्रानुसार पुरुष असंग आहे अशा तऱ्हेचा विचार करून योगानें तसेंच ध्यान करावें. ज्ञान वेदान्तशास्त्राध्ययनानेंच होतें. गुरु सर्वत्रच पाहिजे. कारण गुरुवाक्यावांचून परस्पर शास्त्रामध्यें काय रहस्य आहे हें कळत नाहीं.

दुःखं स्वभावतो द्वेष्यं तन्नाशेच्छा प्रजायते ।
देहादिभ्योप्यात्मरत्याधिक्यादानंदतात्मनि ॥ २३ ॥

दुःख हें साधारणतःच कोणाला आवडत नाहीं व म्हणूनच त्याच्या नाश क
इच्छा असते व सर्वांपेक्षां आपणच आपल्याला जास्त प्रिय आहोंत. आहे व
सुखाच्या आड येणाऱ्या सर्व वस्तू आपल्याला नकोशा होतात. या सांप्र-
रोगां वगैरेनीं ग्रस्त झाला असतां नकोसा होतो. परंतु आपण आ लोक पिनल-
नकोसे होत नाहीं. भिन्न होऊं शक-

संस्कार विषयाभ्यासं साकारोपासनाज्जहि । वाटला तदनुसार
ध्यातृध्येयैक्यतावाप्तौ निरालंबे मतिः स्थि

सर्व विषयांपेक्षां अत्यंत सुंदर अशा सगुणरूप मू व याविषयीं कोणा-
जन्मांतील विषयाच्या अभ्यासानें झालेल्या संस्कार लेखीं प्रमाणं कोणास
ध्याता व ध्येय एक होऊन त्यांतील सगुणपणा जाऊन निर्गुण सांप्रदायाचाच प्रश्न
स्थिर होते.

तथापि पुनरुत्थाने भाति विश्वस्य सत्यता ।
कर्तव्यं तन्निरासार्थं वेदान्तश्रवणादिकम् ॥ २८ ॥

तथापि पुन्हां व्युत्थान झालें असतां जग खरें वाटतें. त्याकरितां श्रवण-

मनन निदिध्यासनेंकरून वेदान्ताभ्यासच केला पाहिजे. म्हणजे रज्जूवर सर्पा-भास झाला असतां तेथून पळून गेल्यास तो दिसणार नाहीं. परंतु, येथें सर्प दिसला होता अशी बुद्धि राहते, आणि रज्जूच्या ज्ञानानें त्याचा बाध झाला असतां तशी बुद्धि रहात नाहीं.करितां ज्ञानच आवश्यक आहे.

श्रोतव्यं गुरुशास्त्राभ्यां मंतव्यंचोपपात्तिभिः ।
ध्येयं सततया वृत्या ज्ञातव्यं स्वानुभूतितः ॥ २९ ॥

श्रीगुरु व शास्त्र यांपासून श्रवण करावें. युक्तींनीं मनन करावें व मननानें ठसलेल्या सिद्धांताचें सतत चिंतन करणें याला निदिध्यासन म्हणतात. ब्रह्माचा जो साक्षात्कार होतो तो अनुभवाशिवाय कोणत्याच रीतीनें गम्य नाहीं.

उपदेशक्रमो राम व्यवस्थामात्रपालनं ।
ज्ञप्तेस्तु कारणं शुद्धा शिष्य प्रज्ञेतिहि स्मृतिः ॥३१॥

श्रीवसिष्ठमुनि सांगतात रामा, बरोबर व्यवस्था लावून देणें हेंच ५. ...चें काम आहे. जाणणें केवळ शिष्याच्या बुद्धीवर अवलंबून असते. असतों

मुख्य कोण ...बरोबर अशा रीतीनें चर्चा होत असतां एके दिवशीं या होत ?
...एक गृहस्थ चर्चा ऐकण्यास आले नव्हते. त्यांची आठवण
अशा तऱ्हेनें ...च्या येथें श्राद्ध असल्यामुळें त्यांचें येणें झालें नाहीं असें
तयार आहे असें गुळे... श्राद्ध हें काय आहे ? व ... कां केलें पाहिजे ? याविषयीं
स्वलाक्स्पर्शादि सर्वथैव नि... करे यांनीं प्रश्न विचारला. त्यावर महाराजांनीं
शास्त्रांनीं सिद्ध करून देण्यास ...न तो विषय तेथील मंडळीस सयुक्तिक व
णादि प्रक्रिया इत्यादिकांच्या ... , काव्यसंबंधीं कांहीं माहिती रा.बाबूराव तांबे यांस
परांजप्यांचें भाषण ऐ... करितां महाराजांनीं नवीन " काव्यसूत्रें " रचलीं.

जवळ राहणाऱ्या मंडळीला कोणी विनाकारण दोष दिलेला महाराजांना सहसा खपत नसे. याचें एक उदाहरण यावेळीं रायपूर येथें घडून आलें. एका गृहस्थाच्या मनांत महाराजांचे आवडते शिष्य नारायणराव पंडित यांच्याविषयीं कारण नसतांना कांहीं किंतु आल्याचें महाराजांस

खात्रीपूर्वक समजतांच त्या घरून ते एकदम निघून दुसऱ्या ठिकाणीं गेले व तेथून नागपुरास गेले. ही गोष्ट पौष वद्यांतली आहे.

माघ महिन्यांत महाराज नागपुराहून चांद्यास गेले. माघ व फाल्गुन हे दोन महिनें चांद्यास मोठ्या आनंदाचे गेले. महाशिवरात्रीचा उत्सव, रंगपंचमी, हिंगळाज देवीच्या वनांत गोवर्द्धनोत्सव, नवीन गोवर्द्धनोद्धरणाख्यानाची बहार व वनभोजनाचा थाट वगैरे प्रसंग मोठे प्रेक्षणीय झाले. सौ० रंगुबाईला योगवासिष्ठाचें निरूपण वगैरे सांगणेंही चाललें होतें.

---

श्रीज्ञानेश्वर माउली समर्थ.

## शके १८३३ विरोधनाम संवत्सरे. इ० स० १९११–१९१२.

रामनवमीचा उत्सव, गोपाळकाला वगैरे चांद्याचाच झाला. प्रत्ये[illegible] द्वादशीस काला करण्याचा नियमही येथूनच सुरू झाला. काल्याचे [illegible] आहे यांज- "गायी गोपाळ यमुनेचे तटीं," "चला बाई पांडुरंग पाहूं वा[illegible] नाहीं; इ० तुकाराम महाराजांच्या अभंगावर मधुराद्वैतबोधक ओवीतून आम्हांला महाराज नवीन म्हणत, तीं फार गोड असत. [illegible] व तेच दिवशीं

वर्धा येथील नवीन रामदासी संप्रदायासंबंधानें यावे[illegible] [illegible]वळलें होतें व त्या संप्रदायाचे संस्थापक श्रीधर[illegible], [illegible]थम मुमुक्षु पत्रांत व नंतर केसरी पत्रांत क[illegible] [illegible]गले होते. [illegible]ारें कर्मरहित उपस[illegible]

पुढें वैशाखारंभीं महाराज जेव्हां चांद्याहून नागपुरास गेले त[illegible] मित्रमंडळी व [illegible]ही. [illegible]ीधरबोवांच्या विरुद्ध लोकमत बरेंच क्षुब्ध झालें होतें व त्यांस बहिष्कार [illegible]ाकण्याकरितां हरिभ० परायण मोतीबाबा जामदारप्रभृति प्रमुख धार्मिक [illegible]ागरिकांची एक सभा झाली. याच सुमारास वांई येथील प्रसिद्ध राम-

दासी व गोभक्त हरिभक्तिपरायण चवंडेबुवाही तेथें आले व महाराजांच्या दर्शनास येऊन या नवीन संप्रदायाचा मोड करण्याच्या कामांत पुढाकार घेऊन आपणास साह्य करण्याविषयीं त्यांनीं विनंती केली. महाराजांनीं ती गोष्ट मान्य केली.

पुढें ता० १३ व १४ जून १९११ इ० रोजीं श्रीधरबोवा हे नागपुरास आले असतां चवंडेबोवांनीं त्यांस बोलाविलें व शुक्रवार तलावावरील राममंदिरांत सभा होऊन तेथें घडलेला वृत्तांत मुमुक्षु पत्राच्या ता० २९ जूनच्या अंकांत छापून प्रसिद्ध झाला. तो असा:—

## परांजपे बुवा.



रा. रा. मुमुक्षुकर्ते यांसः—सा. न. वि. विशेष. सांप्रतचा काल विद्वत्तेचा असून नुसत्या श्रद्धेपेक्षां तार्किक पद्धतीनेंच प्रत्येक गोष्टीची मीमांसा करण्याकडे ५. विभूषित मनुष्यांची प्रवृत्ति दिसून येते, व तर्कपद्धतीच्या कोटिक्रमांतून छानून झाल असतां मतच ग्राह्य करण्याचा प्रघात बहुशः सर्वत्र दृष्टोत्पत्तीस येतो. ही मुख्य कोण विद्वानांची झाली, परंतु भक्तिमार्गाचा प्रसार करून संसारी होत ? ध्यें अधिकारी करण्याचा प्रयत्न करणाऱ्या विद्वानांची गोष्ट अशा तऱ्हेनें आहे. त्यांच्या ठिकाणीं विद्वत्ता व अनुभव म्हणजे शास्त्रीय तयार आहे असें गुलें यत्व व ब्रह्मनिष्ठता म्हणतात, हे दोन्ही गुण वास्तव्य स्वलास्पर्शादि सर्वथैव नि अनुभवद्वारां ते साधकाचें संशय निरसन करीत शास्त्रांनीं सिद्ध करून देण्यास मग सत्पुरुषाच्या व्यक्तिविषयक आचरणाकडे णादि प्रक्रिया इत्यादिकांच्या नाकं सुचरितानि तान्येव त्वयोपास्यानि ” ह्या राज्यांचे भाषणायवचनाला अनुसरून साधक त्यांच्या उपदेशाप्रमाणें वागत असतो.

अशी वस्तुस्थिती मला माहित असल्यामुळें परवां येथील शुक्रवार तलावाजवळील राममंदिरांत जो प्रकार घडून आला त्याचा उलगडा माझ्या अल्पमतीला होत नसल्यामुळें आपल्या पत्रांत प्रसिद्धीकरितां मी पाठवीत आहे. आ-

पल्या वाचकांपैकीं कोणी त्याचा विचार करून योग्य उत्तर कळविल्यास फार उपकार होतील.

हल्लीं ह्या शहरांत सातार्‍याकडील ह. भ. प. बाळकृष्ण महाराज चौण्डे रामदासी हे आले आहेत व वऱ्हाडांतील प्रसिद्ध सत्पुरुष श्रीगुलाबराव महाराज यांचाही मुकाम हल्लीं येथेंच आहे. ह्याच सुमारास वर्धा येथील हनुमानगडावर राहणारे नवीन रामदास सांप्रदायाचे उत्पादक प्रो. श्रीधर विष्णु परांजपे बी. ए. हेही येथें दोन दिवसांकरितां येऊन गेले. ता. १३ व १४ जून रोजीं त्यांचा मुक्काम येथें होता. ता. १३ रोज मंगळवारीं ते राममंदिरांत चौण्डे महाराजांनीं बोलाविल्यावरून त्यांना भेटण्याकरितां आले. त्या प्रसंगास चौण्डे महाराजांनीं यांना विचारिलें कीं, " अंत्यजाबरोबर अन्नव्यवहार व रजस्वलास्पर्शादि वेदबाह्यआचार करण्याचा तुमच्यावर लोकांचा आरोप आहे तो सत्य आहे काय ? तो सत्य असल्यास रामदासी सांप्रदायाला ही मोठी काळिमा आहे. यावर आपलें म्हणणें काय आहे ? " यावर रा. परांजप्यांनीं उत्तर दिलें " आपण म्हटलेल्या गोष्टीप्रमाणें मी वागत असतों व तसें कां वागतो याविषयीं आहे प्रमाणें आहेत. दुसरें, रामदासी सांप्रदायाचा अधिकार आपणांसच यांजला नाहीं असें तुम्हांस वाटणें योग्य नाहीं ! कारण दासबोध हा जो नाहीं; यांचा मुख्य प्रमाणभूत ग्रंथ आहे त्याचा अर्थ,ज्याप्रमाणें वकील न आम्हांला कोडांतील कलमांचा भिन्नभिन्न.अर्थ करितात त्याचप्रमाणें भिन्न व तेच दिवशीं तों; म्हणून माझ्या मताप्रमाणें त्याचा जो योग्य अर्थ मला माझें वर्तन आहे, यांत मला कांहींच वावगें वाटत नाहीं, बिरोबर वाद करण्यास माझी तयारी आहे. यावर पाहिजे असल्यास तीं देखील मी देऊं शकतो. यांत नुसतारें कर्मरहित उपसपून वर्णाश्रमविषयक प्रश्न असल्यामुळें चौण्डे महाराजांनीं श्रीगुलाबराव महाराजांस त्या प्रसंगास पाचारण केलें व तेंही निमंत्रणास मान देऊन सभास्थानीं (राममंदिरांत) आले. त्या प्रसंगीं ह.भ.प. कृष्णबोवा पातुरकर, रा. गोविंदराव भेदार,रा.सदाशिवराव सुभेदार,वेद.शा.सं. श्रीनिवासशास्त्री हरिदास वगैरे ३०।४० गृहस्थ तेथें होते. गुलाबराव महाराज येतांच रा. परांजप्यांनीं त्यांच्या पायांवर

डोकें ठेवून नमस्कार केला, व गुलाबराव महाराज बसल्यानंतर चौण्डे बुवांनीं परां-जपे यांजविषयींची लोकवार्ता त्यांच्या कानावर घातली. तेव्हां गुलाबराव महा-राज चौण्डे बुवांना म्हणाले, "नुसत्या लोकवार्तेवरून परांजपे यांवर असा आरोप ठेवणें प्रशस्त नाहीं; आणि म्हणून अशा दृष्टीनें विचार न करितां जर आपल्याला बो[illegible]वयाचें असेल तर प्रथम आपण वर्णाश्रम मानावयाचें किंवा नाहीं, याविषयीं विचार करूं." हें भाषण गुलाबराव महाराज किती शांतपणें करीत होते हीं त्या वेळीं लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट होती. ते पुढें म्हणाले, वर्णाश्रम मानावयचे ते गुणकर्मांनें मानावयाचें किंवा जन्मकर्मांनें मानावयाचें हें आपण पाहूं. ह्याच्या निर्णयार्थ त्यांनीं सात मुद्दे काढलें ते असेः—१. प्रमाणपर्यालोचना. २. प्रमाण मानावयाचें तें प्रत्यक्ष, अनुमान किंवा शाब्द यापैकीं कोणतें मानावयाचें? शाब्द-प्रमाण मानावयाचें असल्यास शब्दाचा एकांश प्रमाण मानावयाचा किंवा सर्वांश प्रमाण मानावयाचा? ३. धर्मानें ऐहिक विषयप्राप्ति आहे किंवा पारलौकिक विषयप्राप्ति आहे? ४. वर्णव्यवस्था प्रमाणजन्य आहे किंवा भ्रांतिजन्य आहे? अ[illegible] वर्ण हा शरीरांत असतो किंवा अंतःकरणाश्रित असतो किंवा आत्माश्रित ५. [illegible] झाले? ६. जन्मकर्मपर वाक्यांचा व गुणकर्मपर वाक्यांचा समन्वय. ७. वाक्य असतो [illegible]तें व गौण कोणतें? वाक्याची स्वविषयाहून अन्यत्र गती कोठें मुख्य कोण[illegible] होते?

अशा तऱ्हेनें [illegible]ही [illegible]णी बोलणार असल्यास मी त्याच्याशीं वाद करावयास तयार आहे असें गुल[illegible]बराव महाराज म्हणाले. ते असेंही म्हणाले की, 'रज-स्वलास्पर्शादि सर्वथैव नि[illegible]षिद्ध आहेत हें मी प्राचीन व आधुनिक दोन्हीही शास्त्रांनीं सिद्ध करून देण्यास [illegible] तयार आहे. तसेंच लययोग, हठयोग, नामस्मर-णादि प्रक्रिया इत्यादिकांच्या [illegible]नुभवाविषयींही मी वाद करीन." त्यावर रा. [illegible]पांचे भाषण [illegible]ण्यास सर्व मंडळी आतुर होती. परंतु त्यावर कांहींच न बोलता त मौन धारण करून माळ ओढीत बसले व मधू[illegible] मधून गुलाबराव महाराजांस नमस्कार करीत होते! जमलेल्या मंडळींपैकीं कांहींजणांनीं गुलाब-राव महाराजांच्या प्रश्नास उत्तरें देण्यास त्यांना बरेचदां आग्रहपूर्वक विनंति केली, तथापि त्यांनीं आपलें मौन शेवटपर्यंत सोडलें नाहीं किंवा लेखी प्रमाणें

देऊं असें चौंडे महाराजांपाशीं जें पूर्वी ते बोलले होते तीही प्रमाणें त्यांनीं दिलीं नाहींत ! ! असा प्रकार सुमारें तासभर चालला होता. शेवटीं गुलाबराव महाराज म्हणाले ' हें कांहींच बोलत नाहींत तेव्हां माझा नाइलाज आहे. मी मात्र जन्मकर्मानें वर्णाश्रम मानणारा आहे. ' हा पहिल्या दिवशींचा प्रकार झाला. दुसरे दिवशीं म्हणजे ता. १४ जून रोज बुधवारीं रा. परांजपे हे डॉ. परांजपेप्रभृति स्वकीयमंडळीसह सकाळचे सुमारें ८।९ वाजतां पुनः राममंदिरांत चौंडे महाराजांच्या भेटीला आले व त्यांच्यांशीं कडाक्याचा वाद करूं लागले. यावर गुलाबराव महाराजांना बोलावणें पाठवितो असें चौंडे महाराज म्हणाले असतां " गुलाबराव कुणबी आहेत हें तुम्हांला माहीत आहे काय ? " असें रा. परांजपे म्हणाले, व डॉ. परांजपे म्हणाले कीं, गुलाबरावमहाराज शूद्र असल्यामुळें त्यांना वर्णाश्रमविषयक वाद करण्याचा अधिकार नाहीं व ते बोलतील तर त्यांना आम्ही बंद करूं, तथापि चौंडे महाराजांनीं गुलाबरावमहाराजांना बोलावणें पाठविलेंच; परंतु ते येण्यापूर्वीच रा. परांजपे व त्यांची मंडळी तेथून निघून गेली ! गुलाबरावमहाराज आल्यावर त्यांना हा प्रकार कळविण्यांत आला. तेव्हां चोहों वर्णांला वर्णाश्रमविषयक वाद करण्याचा अधिकार आहे किंवा नाहीं याचाच आपण विचार करूं, असा निरोप त्यांनीं रा. परांजपे यांजकडे पाठविला. परंतु " ते थोर आहेत, [illegible] इतकें माझें शास्त्राध्ययन नाहीं; त्यांच्यांशीं बोलण्यास मी कोणत्याही रीतीनें योग्य नाहीं, म्हणून आम्हांला त्यांच्याशीं वाद कर्तव्य नाहीं " असें उत्तर त्यांनीं पाठविलें ! व तेच दिवशीं वर्धेकडे निघून गेले.

नागपूर, } आपला,
१८।६।११ } ' प्रेक्षक '

नंतर महाराजांनीं वर्णाश्रमविषयक निरूपणांच्याद्वारें कर्मरहित उपासनेचे दोष दाखवून नागपूर येथील डॉ० परांजपे, त्यांची मित्रमंडळी व वर्धा येथील मंडळी यांस धर्माचें यथार्थ स्वरूप समजाऊन दिलें व वैदिक धर्माकडे त्यांचीं मनें वळविण्याचा प्रयत्न केला. ता० १६ जुलाई १९११ इ० रोजीं श्रीयुत भवानीशंकर नियोगी एम्. ए. यांनीं आपल्या कांहीं मित्रमंडळीसह नागपूर येथें डॉ० परांजपे यांच्या माडीवर रात्रौ जमून

महाराजांस कांहीं शंका विचारल्या. तेवेळीं महाराजांबरोबर वेद. श्रीनिवास-शास्त्री, रा० गोविंदराव सुभेदार, रा० वासुदेवराव मुळे, दत्तात्रेय खापरे-प्रभृति सुमारें ३०।४० मंडळी तेथें होती. तीं प्रश्नोत्तरें येणेंप्रमाणें:—

प्रश्न—इहलोक व परलोक यांतील हितसंबंध काय आहे? उ०—ह्यांतील हितसंबंध भिन्न आहेत. प्रश्न—ते परस्पर विरुद्ध आहेत काय? उत्तर—नाहीं. ते एकाहून एक उच्च आहेत. प्र०—कशावरून? उ०—परलोक म्हणजे काय हें तुम्हास समजल्यास हें कळून येईल. प्र० परलोक म्हणजे काय? उ०—परलोक म्हणजे काय हें जर तुम्हास माहीत नव्हतें तर तुम्ही परलोक व इहलोक ह्यांतील संबंध विचारले कसे? प्रश्न करतांना धर्मी एक असून प्रकारक अंशाविषयीं मात्र विवाद असतो. प्र०—जो लॉजिशियन Logician असेल त्याची गोष्ट अशी होईल, पण ज्याला लॉजिकचा गंध नाहीं त्यानें कसें करावें? उ०—जो अत्यंत अज्ञानी असतो त्याला प्रश्नच करतां येत नाहीं व जो अत्यंत ज्ञानी असतो त्याला प्रश्नांची गरज नसते. म्हणून ज्याला सामान्यतः ज्ञात व विशेषे-करून अज्ञात वस्तु असते तोच प्रश्न करीत असतो. ही गोष्ट लॉजि-शियन व इतर या सर्वांना सारखीच लागू आहे. तेव्हां तुम्ही जो प्रश्न केला त्यांत परलोकसंबंधाची तुमची काय कल्पना आहे? प्रश्न—शारीरिक क्रिया व मानासिक क्रिया आपण ज्या शक्तीच्या योगानें करतो ती शक्ति पार-लौकिक आहे असें आम्ही म्हणतों व तिला जाणणें म्हणजेच परमार्थ अथवा अध्यात्म ज्ञान होय. उ०—हें तुम्ही केवळ श्रद्धेनें मानतां. श्रद्धेनें म्हणजे तुम्हांस स्वतः ज्ञात नसतां शास्त्रावर विश्वास ठेवून. ह्या शक्तीचें ज्ञान आपणाला कशाला पाहिजे? ही शक्ति आपणाहून अभिन्न असेल तर तिच्या ज्ञानाची गरज नाहीं व भिन्न असून अज्ञात असेल तर ती आहे असें आपल्यास म्हणतां येणार नाहीं. अशा प्रकारची श्रद्धा मला नको आहे. प्रश्न—म्हणजे केवळ अज्ञानी असून जो मुमुक्षु आहे त्यानें प्रश्नच करूं नये असें झालें. उत्तर—पहा आपल्या बोलण्यांत व्यर्थ शद्बच फार येतात. आपणाला मोक्षाची

काय कल्पना आहे? कारण निरानिराळ्या पंथांत मोक्ष निरनिराळा मानला आहे. आपली मोक्षाची कल्पना एक असून मी दुसऱ्याच मोक्षाविषयीं उत्तर दिलें तर तें चालेल काय ? प्रश्न बरोबर लॉजिकलच असला पाहिजे. प्रश्न—अशा प्रकारें प्रत्येक शद्वाची व्याख्या देत गेल्यास वर्षानुवर्ष लागून आपण conclusion वर कधींच येणार नाहीं. उत्तर—असें मात्र नाहीं. ज्या गोष्टी लोकप्रवृत्तीला धरून असतात त्यांची व्याख्या देण्याची गरज नसते. परंतु ज्या लोकप्रवृत्तीला धरून नसतात त्यांची मात्र व्याख्या दिलीच पाहिजे. नाहीं तर एकाचें म्हणणें दुसऱ्याला कळणारच नाहीं. आपण प्रथमत: जो प्रश्न केला त्यांत इहलोकाची व्याख्या देण्याची गरज नाहीं. कारण तो शद्व लोकप्रवृत्तीला धरून आहे. परंतु परलोक या शद्वाचा अर्थ संदिग्ध असल्यामुळें त्याचें मात्र आपणाला explanation दिलेंच पाहिजे. मी लॉजिकाशिवाय एक पाऊलही पुढें चालणार नाहीं. प्रश्न—Academical discussion करितां असें चालणें योग्य आहे. पण नेहमींच लॉजिकनें चालून उपयोग नाहीं व हें शक्यही नाहीं. माझें तर मत असें आहे कीं सर्व लोक नेहमीं व्यवहारांत श्रद्धेनेंच चालत असतात. उत्तर—नाहीं. मी असें म्हणतों कीं सर्व लोक व्यवहारांत श्रद्धेनें चालत नसून उलट लॉजिकनेंच चालत असतात. प्रश्न—असेंच जर आहे तर difference of opinions राहिला नसता. माझ्या मतानें difference of opinions असणें अपरिहार्य आहे. उत्तर—नाहीं. लॉजिकनें चालल्यास difference of opinions कधींच रहाणार नाहीं. आपणास जो difference दिसतो त्याचें खरें कारण हें आहे कीं त्यांत ते आपले स्वत:चे emotions मिळवितात असल्यामुळें conclusions एकसारखे येत नाहींत. ही चूक Logic ची नसून उलट श्रद्धेचीच आहे. प्रश्न—एवढाले greatest thinkers लॉजिकनें चालले नाहींत असें कसें म्हणतां येईल ? त्यांचे ways of thinking निरनिराळे असल्यामुळें conclusions निरनिराळे येणें स्वाभाविक आहे. बार्कलेनें

आपल्या विचाराची दिशा निराळीच धरल्यामुळें materialism
जे conclusions आहेत त्यांवर तो आला नाहीं व निराळा ए
Idealism च त्यानें स्थापित केला. उत्तर—अहो तुम्ही यां
greatest thinkers कां म्हणतां हेंच मला समजत नाहीं. त्यां
लेखांत emotions कशा मिसळल्या आहेत हें मी तुम्हांस पदोप
दाखवून देईन. बार्कलेचीही गोष्ट तशीच झाली आहे. हा dualist
Idealist होता. त्यानें ईश्वर आहे असें प्रथमच गृहीत केलें असल
मुळें व विचारानें हा स्वतः Idealist असल्यामुळें त्याचे co
clnsions विसंगत असे दिसतात. ही चूक लॉजिकची नसून त्या
श्रध्देचीच होय. अशा प्रकारच्या चुका सर्वांनींच केल्या असल्या
त्यांच्यांत difference of opinion दिसून येतो. प्रश्न—तर
बरोबर लॉजिकनें चालणारा कोणीच नाहीं असें म्हणावें लागेल, आ
हेंच बरोबर आहे. प्रत्येकांत विचाराचा अंश कमी असून श्रध्देचा अं
पुष्कळ असतो व त्यामुळेंच हे different Schools झाले आहे
ज्याची ज्यावर श्रध्दा असते त्यावरच तो आपल्या विचाराची मांड
करीत असतो व ही गोष्ट सार्वत्रिक आहे. उत्तर—स
Philosophers श्रध्देनें गेले असा माझ्या म्हणण्याचा अर्थ न
पाश्चात्यांत स्पेन्सर व कांट व आपल्या इकडे श्रीहर्ष शंकराचार्यादि अ
strictly लॉजिकनेंच गेले व त्यामुळें त्या सर्वांचे conclusions
अगदीं बरोबर आले आहेत.! प्र० ठीक आहे. Academically
बरोबर आहे पण व्यवहारांत मात्र यांचा कांहींच उपयोग नाहीं. के
लॉजिकनेंच चालल्यास कधींच कार्य होणार नाहीं. greatest m
of the world हे श्रध्दाळूच होते असें त्यांच्या चरित्राकडे पाहिल
दिसून येईल. उत्तर—असें मात्र नाहीं. जगांतील प्रत्येक मनुष्य अ
आपल्या परी लॉजिकनेंच चालत असतो. परंतु जेव्हां तो त्यांत आ
श्रध्दा मिसळतो तेव्हां मात्र त्याच्या हातून चुका होतात. ही गोष्ट साम
लोकांची झाली. परंतु ज्यांना तुम्ही greatest men म्हणतां त्यांच

तर श्रध्देपेक्षां लॉजिकचाच अंश अधिक असतो. आणि म्हणूनच त्यांच्या हातून एवढालीं मोठमोठीं कार्यें होतात. उदाहरणार्थ एखाद्या एंजिनीयरला पूल करावयाचा असल्यास तो श्रध्देनें कसाही करीत सुटत नाहीं. तर प्रथमतः आपल्या मनांत लॉजिकली त्याची सप्रमाण रचना आणून मग पूल करण्यास सुरुवात करतो. असें केलें नसतें तर तो पूलच मोडून पडला असता. प्रश्न—आपल्याला तर असेंच वाटतें कीं जगांत एवढाले जे आणीबाणीचे प्रसंग घडून आले ते श्रद्धेनेंच झाले. मोठमोठाले शूर कधीं लॉजिक करीत बसले होते ? उत्तर—शूरांतही लॉजिक होतें आणि म्हणूनच ते शूरही पण झाले. कोणत्या ठिकाणाहून कसा वेध घ्यावयाचा, कोठें संधान केलें असतां काय कार्य होईल इत्यादि लढाईस अवश्य लागणाऱ्या गोष्टी तंतोतंत लॉजिकली जर माहित नसल्या तर आंतून बऱ्याच चुका होतील. सारांश, शूरांतही Logic होतेंच. प्रश्न—तर मग सगळेच Logical thinkers झाल्यावर त्यांत मत-भेद कां ? उत्तर—असें मात्र नाहीं. माझ्या म्हणण्याचा अर्थ इतकाच कीं प्रत्येकजण आपआपलें काम लॉजिकली करीत असतो व जेव्हां तो चुकतो तेव्हां तेथें श्रद्धा असते. प्रश्न—थिऑरिटिकली जरी लॉजिकचें काम पडत असलें तरी Practically त्याचा कांहीं विशेष उपयोग आहे असें मला वाटत नाहीं. जसें फिजिक्समध्यें कांहीं assumptions घेऊन त्यांवर materialists नीं फिजिक्सची सर्व उभारणी केली आहे व त्यामध्यें Practically कांहींच बाध आलेला दिसत नाहीं. उत्तर—येथें तुम्ही चुकतां. मी फिजिक्सवर बरेच ग्रंथ वाचले आहेत व मला अॅटमिक थियरीपासून आतांच्या डॉ० डॉड्सच्या इलेक्ट्रन थियरी-पर्यंतची सर्व माहिती आहे. प्रथम जेव्हां अॅटम थियरी होती तेव्हां असें दिसून आलें कीं त्या थियरीनें बऱ्याच गोष्टींचें explanation देतां येत नव्हतें. उदा० एकाबोरम् व दुआबोरम् ह्यांच्यामध्यें कोणता दुवा आहे हेंच त्यांना सांगतां येत नव्हतें व म्हणूनच त्यांनीं अॅटमिक थिअरी सोडून इलेक्ट्रन थियरीचा स्वीकार केला आहे. Thompson नें एका

व्हाक्युअम् टयूबमध्यें हैड्रोजन व ऑक्सिजन ह्यांचे Atoms, electricity च्या साह्यानें विभागून असें ठरविलें आहे कीं ह्या दोन्ही द्रव्यांत एकाच जातीचे परमाणू आहेत व असेच सर्व elements मध्यें सारख्याच जातीचे परमाणू सांपडतात व ह्यानांच आतां electrons अशी संज्ञा आहे. प्रश्न—सायन्स हा माझा province नव्हे. उत्तर—बरें, फिलॉसफी, पोलिटिकल एकॉनमी अगर वाटेल तो दुसरा विषय आहे त्यांत विचारा. प्रश्न—आपण लॉजिकनें चुकी व्हावयाची नाहीं ह्मणतां पण induction मध्यें दहापांच उदाहरणें पाहून त्यावरून एक सिद्धांत काढतात ही श्रद्धा नव्हे काय ? व ह्यांत चुकी होणार नाहीं काय ? उत्तर—आपण ह्मणतां ही गोष्ट general सिद्धांताची आहे. Universal सिद्धांताची नाहीं. Universal सिध्दांत कधींच खोटे व्हावयाचे नाहींत. जनरल सिध्दांताला अपवाद असतात. पण Universal सिध्दांताला अपवाद नसतात. प्रश्न—असें आपण कसें ह्मणतां ? रोजच्या रोज नवीन थिअरीज होत आहेत, एक सिध्दांत जाऊन त्याच्या जागीं दुसरा सिध्दांत येत आहे व खरेपणा कोठेंच दिसत नाहीं. उत्तर—जे सिध्दांत केवळ method of agreement नें ठरविलें असतात तेच असे बदलत असतात. जे सिध्दांत method of agreement व method of difference ह्या दोन्ही रीतींनीं सिद्ध झाले आहेत ते कधींच बदलत नाहींत. केवळ method of agreement नें जे सिध्दांत ठरलेले असतात ते जनरल असतात. पण Universal truths ह्या दोन्ही रीतींनी सिध्द असतात. अशाच Universal truths वर आपल्या धर्माची एकंदर उभारणी केली आहे. प्रश्न—ठीक आहे. Logic नसतेंच असें कांहीं मी म्हणत नाहीं. पण त्याबरोबर श्रध्दाही असली पाहिजे. निव्वळ Logic नेंच भागत नाहीं. उत्तर—येथें मात्र आपण भयंकर चुकी करतां. लॉजिक व श्रध्दा हे तुह्मी भिन्न मानतां किंवा अभिन्न मानतां ? अभिन्न मानल्यास केवळ नाममात्रच वाद होईल. भिन्न मानल्यास आतांपर्यंतच्या सर्व अडचणी

पुन्हां येतील. एकाच मनुष्यास श्रध्दा एक करावयास सांगेल व लॉजिक दुसरें करावयास सांगेल. एकाच्या अनुरोधानें दुसरें चालतें ह्मटल्यास मनुष्य केवळ लॉजिकनेंच किंवा केवळ श्रध्देनेंच चालतो असें ह्मणणें बरें. दोन्हीही मानण्याची कांहीं गरज नाहीं. आतां मनुष्य केवळ श्रध्देनेंच चालतो असें ह्मटल्यास प्रत्येकजण आपआपल्या श्रध्देंत स्वतंत्र होईल व असें झाल्यास कोणास कोणी कांहीं म्हणण्याचा अधिकार राहणार नाहीं. म्हणजे तुम्हांस आमचीं socialism चीं तत्वेंच बरोबर आहेत, त्याप्रमाणें तुम्ही चाला असें दुसऱ्यास म्हणतां येणार नाहीं. ह्या सर्व अडचणी केवळ श्रद्धेनेंच सर्व चालतात असें मानल्यानें येतात. प्रश्न—कां ? आम्ही जरी श्रद्धेनें चाललों तरी तें जर दुसऱ्यास बरें वाटेल तर त्यानें करावें असें सांगण्यास काय हरकत आहे ? उत्तर—त्याची ज्या ठिकाणीं श्रद्धा असते ती सोडून तो ती दुसऱ्या ठिकाणीं कां ठेवील ? प्रश्न—आम्ही त्याला त्याच्या श्रद्धेंत व आमच्या श्रद्धेंत काय फरक आहे, किती फायदा आहे हें समजून सांगूं. मग त्यानें वाटेल तर स्वीकारावें किंवा स्वीकारूं नये. उत्तर—तुम्हा जें समजून सांगूं म्हणतां तें तरी लॉजिकनेंच सांगणार कीं नाहीं ? कसेंही केलें तरी तुम्हांला लॉजिक झुगारून देतां येणार नाहीं. माझें म्हणणें काय हें तुम्हांला समजलेंना ? प्रश्न—होय. आपला stand point मला कळला. उत्तर—आतांपर्यंत आपण जो वाद केला तो योग्यच आहे. आपण परस्पर मित्र आहोंत. आपण कोणतेही प्रश्न विचारले तरी मला त्यांत कांहीं वाटत नाहीं. पण समजा आपण जेव्हां मघां असें म्हटलें कीं आम्ही श्रद्धेनेंच कोणतीही गोष्ट घेत असतों व दुसऱ्याला तसें करण्यास समजून सांगतों तेव्हां एखादा कुत्सित असता तर त्यानें ह्या तुमच्या म्हणण्याचा असा अर्थ केला नसता काय ? कीं ह्यांना वाटेल तसें करावयाला पाहिजे. दुसऱ्याला मात्र हे लॉजिक सांगतात. आपण मी श्रद्धा मानतों असें म्हणत होतां व असें कां म्हणून विचारलें असतां त्याचें कारण आपण लॉजिकली देण्याचा प्रयत्न करीत होतां. असो. आतां माझें म्हणणें आपणाला पटलेंना ? प्रश्न—होय.

आपला stand point काय आहे हें मला कळलें.

असो. ह्यानंतर लवकरच डॉ० परांजपे व भवानीशंकरप्रभृति मंडळींनी श्रीधरबोवांच्या यथेष्टाचरणाचे प्रकार "श्रीधरबोवा परांजपे" या नांवाच्या एका चोपड्यांत छापून लोकांत प्रसिद्ध करून त्यांच्या संप्रदायाशीं असलेला आपला संबंध तोडून टाकला.

या खेपेस महाराज नागपुराहून वर्धा येथें गेले असतांना तेथें पुढील गोष्ट घडली:—वर्ध्यास महाराज रा० गोविंदराव गाडे डाक्तर यांच्या येथें उतरले होते. त्यांच्या घरासमोरच एक मद्रासी गृहस्थ रहात होते. हे बी. ए. असून ब्यारिस्टरीच्या परीक्षेकरितां विलायतेस जाणार होते. ते एके दिवशीं रात्रीं महाराजांचें भोजन आटपल्यानंतर त्यांच्याशीं भाषण करण्याच्या इच्छेनें तेथें आले. त्यांना मराठी भाषा स्वतः बोलतां येत नव्हती. परंतु दुसऱ्यानें बोललेली मात्र समजत होती. महाराज त्यांना म्हणाले तुम्हांला जें विचारण्याचें असेल तें तुम्ही इंग्रजींत विचारा. मी मराठींत त्याचीं उत्तरें देतों. अशा रीतीनें बहुतेक रात्रभर उभयतांचें भाषण होऊन तो विषय महाराजांनीं त्यांना समजाऊन दिला. भाषण प्रसंगीं दुभाषा कोणी नव्हता. विषय पारकीय 'सायन्स्' science संबंधी होता. ही गोष्ट महाराजांचे मुख्य शिष्य नारायणराव पंडित यांच्या समक्ष घडलेली त्यांनीं सांगितल्यावरून येथें नमूद केली आहे. नारायणराव पंडित हे एफ्. ए. पर्यंत इंग्लिश शिकलेले असून इंग्रजी भाषा चांगली समजतात. वरील संभाषणप्रसंगावरून बराच काळ लोटल्यामुळें तो संवाद आतां त्यांस सविस्तर स्मरत नाहीं.

पुढें श्रावणमासांत श्रीकृष्णजन्मोत्सवाकरितां महाराज चांद्यास गेले व प्रतिवार्षिक क्रमाप्रमाणें उत्सव काला वगैरे तेथला केला.

तेथें रा० दाजीसाहेब देवईकार व बळवंतराव देशमुख वकील यांनीं कलंकी[1] ब्राह्मणांस जातींत घेण्याविषयीं चळवळ चालविली होती तिला

---

[1] नागपूर, वरोडा व चांदा येथील कांहीं ब्राह्मण मंडळी नागपूरकर रघोजीराव भोसल्यांच्या वेळेपासून जातिबहिष्कृत आहेत त्यांस कलंकी म्हणतात.

अनुमोदन देऊन महाराजांनीं असें मत दिलें कीं क्षुल्लक बाबीकरितां आपआपसांत द्वेष माजविण्यापेक्षां प्रायश्चित्तद्वारा त्यांस ब्राह्मण समाजांत घेऊन ब्राम्हणसंघ जास्त दृढ करणें चांगलें.

येथें नित्य भजन समयीं महाराजांचे नवीन अभंग वगैरे होत असत त्यांत जुन्या कर्माग्रही शास्त्रीपंडितांस उद्देशून पुढील प्रश्नरूप अभंग झालेला आहे:—

कोण तो प्रसंग दुःखामाजीं सुख । आनंदाचे चोख वाटूं लागे ॥ १ ॥ कोण तो प्रसंग विषयीं उदास । कैवल्याची आस हारपते ॥ २ ॥ कोण तो प्रसंग चित्तीं तळमळ । परि कांहीं फळ वांछा नाहीं ॥ ३ ॥ सोडवावे प्रश्न शास्त्री पंडितांनीं । कैं न पितां पाणी तृप्ति होय ॥४॥ कोण तो प्रसग जड होय श्वास । संधी समाधीस मन वीटे ॥५॥ ज्ञानेशकन्येतें उत्तर न देतां । शास्त्री म्हणवीतां पडो कीडे ॥६॥

भाद्रपद वद्यांत उमरावतीस परत जातांना वाटेंत महाराज वर्धा येथें उतरले. ते दिवशीं गुरुवार होता. पालखीचे वेळीं जे नवीन अभंग झाले त्यांत कर्म उपासना व ज्ञान या तिन्ही कांडाचा सारभूत असा एक अभंग झाला तो असा:—

सांडूंनये कदा आपुलें उचित । दुःखाचे पर्वत पडलियाही ॥ १ ॥ नाहीं नाहीं जगा माय श्रुती ऐसी । येर अविश्वासी मार्ग नाना ॥ २ ॥ वर्णाश्रमाचारें नियमा शरीर । नियमी अंतर उपासना ॥ ३ ॥ ज्ञानें ब्रह्मरूप भासताती भूतें । नाहीं या परौतें जाणायाचें ॥ ४ ॥ हाचि हातां आला कांडत्रयसार । सखा ज्ञानेश्वर अंतर्बाह्य ॥ ५ ॥

नंतर भाद्रपद वद्य १२ च्या काला उमरावतीचा करून विजया दशमी-करितां महाराज माधानास गेले.

यावेळीं माधान येथील रा० केशव बाळकृष्ण पांडे हे क्षयरो-

गानें अत्यासन्न होऊन थोड्या दिवसांचे सोबती राहिले होते. यांच्या-विषयीं मागें माधान प्रकरणांत उल्लेख आलाच आहे व महाराज यांस काका म्हणत असत हेंही सांगितलेंच आहे. यांची थोडी मागील हकी-कत अशी आहे कीं घरची गरीबी असल्यामुळें त्यांचें लग्न वगैरे झालें नव्हतें. त्यामुळें ते नेहमीं उद्विग्न असत. एके दिवशीं महाराजांस ते म्हणाले कीं माझी लग्नांत इच्छा आहे. कसेंही करून माझें लग्न होईल असें आपण कराल तर बरें होईल. तेव्हां महाराजांनीं त्यांस विचारलें कीं त्यांत सुख आहे काय ? केशवराव म्हणाले संसार न होवो पण एकदां माझें लग्न मात्र झालें पाहिजे. तेव्हां महाराज म्हणाले कीं तुमचें लग्न होईल पण संसार होणार नाहीं. त्याप्रमाणें त्यांचें लग्न तर झालें पण स्त्री वयांत येण्याच्या पूर्वींच त्यांस क्षयाची भावना झाली. तोच क्षय वाढून आतां त्यांची अशी स्थिती झालेली होती. पूर्वीं त्यांस महाराजांनीं निश्चलदासांचा ग्रंथ विचारसागर वगैरे समजाऊन दिला होता. परंतु त्यांचें आचरण मात्र फारसें सुधरलें नव्हतें. आतां महाराज त्यांच्या भेटीस गेले असतां मागील कृत्यांविषयीं पश्चात्ताप होऊन केशवराव रडूं लागले. तेव्हां त्यांस अभय देऊन महाराज म्हणाले कीं तुम्ही धैर्य सोडूं नका. सत्पुरुष जे असतात ते एकवेळ अंगिकार केल्यावर हातचें सोडीत नाहींत. कितीही दुर्गुणी असला तरी दुर्गुणांची उपेक्षा करून त्याला हळुहळु सुधारण्याचा ते यत्न करितात. असें त्यांस धैर्य देऊन रोज महाराज त्यांच्या जवळ प्रहर प्रहर बसत व भक्ति, ज्ञान, वैराग्य-पर उत्तम उत्तम निरूपणें सांगून भगवद्ध्यानाचा अभ्यास त्यांच्या मनावर दृढ करून देत असत. "अपिचेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक् ।" व "अंतकालेच मामेव स्मरन्मुक्त्वाकलेवरम् ।" हे दोन श्लोक महा-राजांनीं आपल्या निरूपणास आधार घेतले होते. महाराज म्हणाले, दुष्कर्मांमुळें भूतयोनी झाली तरी हे शंकरा, मी तुमचा गण होऊन सेवा करीन अशी दृढ भावना ठेवा. इत्यादि प्रक्रियामय सुंदर उपदेश महा-राजांनीं त्यांच्या मनांत ठसवून दिला व आपल्या सान्निध्यानें अंत-

कालीं त्यास कृतकृत्य करून "मायबापाहूनी होऊं कृपावंत" हें संतवचन यथार्थ केलें.

माधान, काजळी, देऊरवाडा व तेथील पयोष्णीचा प्रवाह, नृसिंह-मंदीर व सोमतीर्थ सिद्धेश्वरादि स्थानें हे पूर्वीचे महाराजांच्या बालक्रीडेचे रम्य प्रदेश होत व येथल्या हल्लींच्याही त्यांच्या लीला रमणीय होत्या हें निराळें सांगावयाला नको.

एके गुरुवारीं महाराजांनीं नृसिंह मंदिरांत पालखी काढली. त्यावेळीं "रक्षिला प्रल्हाद ज्या बिरुदासाठीं । धरूनीयां पोटीं कळवळा ।।" इ० नृसिंहस्तुतीपर अभंग, आरती वगैरे बहारीची झाली.

पुढें दिवाळीस मंगलस्नानादि उत्सव माधान येथील शिवमंदिरांत मोठ्या थाटाचा झाला. तें वर्णन पुढें सुल्हत्प्राप्तिप्रकरणांत पहावें.

या सुमारास एलिचपूर येथें श्रीयुत महादेव प्रसाद म्हणून पोलिसचे असि० सुपरिटेंडेंट होते. ते ता० २९।१०।११ इ० रोजीं माधान येथें शिवमंदिरांत महराजांचे दर्शनास आले होते. त्यांनीं वर्णजाति-विषयक प्रश्न विचारल्यावरून महाराजांनीं त्यांस तद्विषयक माहिती सांगितली त्यांतील सारांश असाः—

वर्ण गुणकर्मावरून मानावे किंवा जन्मकर्मावरून मानावे याविषयीं मीमांसाः—चित्ताचे मृदु, मध्य व तीव्र संवेग असतात. अंतःकरणाच्या तीव्र संवेगावर जन्म व मध्य संवेगावर गुण अवलंबून असतात. जन्म शरीराश्रित असतो व गुण अंतःकरणाश्रित असतात. " जात्यंतर परि-णामः प्रकृत्यापूरात " या योगसूत्राचें प्रमाण देऊन पुढें महाराज म्हणाले कीं ज्या गुणाचा अंतःकरणांत तीव्रसंवेग होईल तदनुसार शरीराचे परमाणू बदलतात, तोच जन्म होय.

नंतर मुसलमानी धर्माविषयीं कांहीं चर्चा झाली. महाराज म्हणाले सर्वच धर्म ज्याचे त्याला श्रेयस्कर आहेत. हिंदुधर्माचा व मुसलमानी धर्माचा एकच सिद्धांत आहे. येथें महाराजांनीं एका फार्शी कवीचें वचन म्हणून दाखविलें व

त्याचा अर्थ असा सांगितलाः—नांव पाण्यावर राहिली तर ती तारते पण नांवेंत पाणी राहिलें तर नांव बुडते, त्याप्रमाणें तूं बायकामुलें वगैरे संसारांत राहिलास तर तरशील पण बायकामुलें वगैरे संसार तुझ्यांत राहिला तर मात्र तूं बुडशील. महाराज म्हणाले हिंदुधर्माचाही सिद्धांत असाच आहे. मी मुसलमानांस त्यांच्याच धर्माप्रमाणें वागावयास सांगतों व हिंदूंस वेदाप्रमाणें वागावयास सांगतों. वेदाच्या अर्थावर संयम केल्यानें मला श्रुतीज्ञान होतें. इतर शास्त्र संबंधानें, वेदांत शास्त्रविषयक भाषा मला जगांतली कोणतीही समजते. व्यवहार भाषा समजण्याविषयीं मी व्यर्थ खटपट करीत नाहीं.

याप्रमाणें चर्चा श्रवण करून महादेव प्रसाद म्हणाले आपल्या विद्येची कीर्ति मी ऐकली त्याहून मला विशेष अनुभव आला.

ज्ञानेश्वरीचीं निरूपणें वगैरे नेहमींप्रमाणें चालू होतीच. देऊरवाड्याला भूताटकीविषयीं प्रसिद्ध असलेल्या गढींत कधीं कधीं मंडळींला बरोबर घेऊन महाराज फिरावयाला जात, तेवेळीं निरनिराळ्या शास्त्रीय विषयांवर चर्चा होत असे. पुढे पुढें रात्रौ बहिर्दिशेलाही तेथेंच जात व मध्यान्ह-रात्रींपर्यंत तेथें बसत. तेवेळीं सायन्स, स्पिरिचुआलिझम् वगैरे पारकीय ग्रंथांचें वाचन वगैरे चालत असे. आमांशादि व्याधीमुळें त्यांस इतका वेळ शौचाला लागत असे.

ता० १८।११।११ रोजीं रात्रौ पूजेचे वेळीं नमस्कार करीत असतांना "ठीक आहे आपले आज्ञेप्रमाणें करतो" असें बोलून महाराजांनीं योगसूत्रांचे चारही पाद नवीन म्हटलें.त्यांतील शेवटल्या सूत्राचा अभिप्राय असा होता कीं "अशाकरितां पातंजलयोगाहून हा योग श्रेष्ठ आहे व याचें श्रवण मनन करणाराला तो लौकर साध्य होईल." शेवटीं फलश्रुती सांगून सूत्रें समाप्त केलीं. महाराजांच्या वाणीचा वेग यावेळीं फारच जलद असल्यामुळें सूत्रें लिहिलीं गेलीं नाहींत.

मार्गशीर्षांत महाराजांनीं देऊरवाडा येथें कात्यायनी व्रतोत्सवाला

ारंभ केला. पंचदशी, योगवासिष्ठ वगैरे नवीन निरूपणेंही ालू झालीं.

ता० २७ नोव्हेंबर रोजीं रात्रौ फराळानंतर ग्रंथाध्ययनासंबंधानें महा-ाजांनीं फार उपयुक्त माहिती सांगितली. तर्क वगैरे कसे काढावे ? ात्मप्रतीतिपूर्वक तर्क काढून ते बरोबर आहेत काय अशा बुद्धीनें गुरूला ेचारले असतां ते त्यांतील चुक्या दाखवितात, स्वतःच्या बुद्धीचा उप-ोग करावा इ० गोष्टी त्यांत होत्या.

ता० १५ दिसेंबरला रायपुरास. पावणस्कर यांस महाराजांनीं एक त्र पाठविलें. त्यांत श्रीमद्भागवताच्या अभ्यासाविषयीं व रासक्रीडेच्या पपत्तीविषयीं फार सुंदर विचार केलेला आहे. हें पत्र सूक्तिरत्नावली सप्तम ष्टि पृ० १०४ वर छापलें आहे.

ता० १७ दिसेंबरला रात्रौ पंचदशीचें निरूपण आटपल्यानंतर " ध-र्मोऽपि मुमुक्षूणामिह पापएव " या आचार्यांच्या गीताभाष्यांतील वचनाचें हाराजांनीं विवेचन केलें. त्यावर रा० गोपाळ लक्ष्मण पाध्ये यांनीं प्रश्न ्चारल्यावरून वेदांतश्रवण कोणी करावें, धर्माचरण कोणीं करावें, श्वरी कृपेचें फळ काय ? आरूढपतित कोण, धर्मबंधनें कशाकरितां ाहेत, धर्माचरण व्यर्थ केव्हां होतें, इत्यादि विषयांचें महाराजांनीं फार दर विवेचन केलें.

ता० २२ दिसेंबर रोजीं व्रतमंडपांत रात्रौ सर्व मंडळीसह महाराज सले असतांना रासक्रीडेच्या कथानकाविषयीं मिलिंदानें एक शंका ्चारली. तिचें महाराजांनीं समाधान केल्यानंतर वेद० श्रीनिवास ास्त्री यांनीं " जहुर्गुणमयं देहं " या भागवत वचनांतील गुणमय " शद्वाचा अर्थ विचारला. त्यावरून पुढील प्रश्नोत्तरें ाली:—

प्रश्न—गुणमय देह म्हणजे काय ? उत्तर—लिंगशरीर. प्रश्न—वासना-य झाल्यावर रास खेळण्याची प्रवृत्ति कशी संभवते ? उत्तर—जीवन्मु-

त्ताला पूर्व संस्कारबलानें वासना प्रवृत्त करितात. याविषयीं विवेचन करितांना महाराजांनीं भागवतांतील अध्याय काढून पुष्कळ वेळपर्यंत निरूपण केलें. त्यांत, कर्तृत्व अहंकार धरूनच साधन सांगण्यास वेदांची प्रवृत्ति कां आहे, अध्यास शद्बमूलक व इंद्रियमूलक दोन प्रकारचा कसा असतो, शद्बमूलक अध्यासाचें स्वरूप, वेदद्रष्टुत्व जात्यंतर परिणामानें कसें येतें, मनाचा लय व मनाची एकाग्रता यांत काय भेद आहे, परोक्षज्ञान होण्याला शद्बश्रवणाची कशी आवश्यकता आहे व तें सत्संगानेंच कसें होऊं शकतें, इत्यादि गोष्टींचें उत्तम स्पष्टीकरण होतें.

याप्रमाणें ज्ञानियांची स्थिती, ज्ञानी व भक्त यांमधील भेद व दोघांसही विदेहमुक्तीचा समान लाभ इत्यादि विषयांवर शंकासमाधानपूर्वक रोज चर्चा होत असे.

"इंग्रजी भाषा मंत्ररहित आहे" असें एक वाक्य महाराजांच्या पत्रांत आलेलें आहे, त्यावर S. K. Walimbe नांवाच्या एका गृहस्थानें शंका घेऊन देऊरवाड्यास महाराजांस पत्र पाठविलें. त्याचें उत्तर महाराजांनीं ता० ८ १।१९१२ रोजीं पाठऊन त्याचें समाधान केलें. हें पत्र सप्तम यष्टींत १०८ व्या पृष्ठावर छापलें आहे.

क्षत्रिय–मराठा–शिक्षण परिषदेची ह्यावर्षीची बैठक नागपूर येथें होणार होती. तिच्या वतीनें चारपांच गृहस्थांचें एक डेप्युटेशन महाराजांस परिषदेस बोलावण्याकरितां देऊरवाड्यास आलें होतें. त्यांच्या विनंतीस मान देऊन व्रतसमाप्तीनंतर येण्याचें महाराजांनीं कबूल केलें. परंतु प्रवासांत अत्यंत आवश्यक अशा एक दोन मनुष्यांस आयत्या वेळीं ताप आल्यामुळें त्यांचा निरुपाय झाला. ही गोष्ट त्यांनीं परिषदेच्या व्यवस्थापकास विद्युत्संदेशानें कळविली होती. परंतु त्यांस तो संदेश न पोंचल्यामुळें तेथल्या मंडळीचा गैरसमज झाला असावा असें दिसतें. कारण पुढें ता० १८।१।१९१२ तारखेचें एक पत्र डेप्युटेशनमध्यें हजर असलेल्या

गृहस्थाकडून महाराजांस आलें, त्यांत सरसकट महाराजांस व ंया जवळील ब्राह्मणमंडळीस दोष दिलेला आहे. तो मजकूर येणें- णें:—" आपण परिषदेला येण्याबद्दलचें खात्रीलायक वचन देऊन ा व एकंदर सर्व मंडळीचा असा फजीता करण्यांत आपला काय हेतु ाल तो मला समजत नाहीं. महाराजांनीं दिलेलें वचनाचा भंग कसा ा याचें प्रत्येकास सखेदाश्चर्य वाटूं लागलें व अखेरीस नामधारी ब्राह्म- ांच केवळ आपमतलबीबुद्धीनें व द्वेषबुद्धीनें फांसे मांडून ही आमची ापर्वणी बुडविली असे उद्गार सर्वांचे तोंडून सहजच निघूं लागले. ाण त्याचा अनुभव डेप्युटेशनचे मंडळीला अगोदरच येऊन चुकला ा. (हा अनुभव कसा काय होता हें पत्रांत स्पष्ट केलेलें नाहीं) ातु. अशा केवळआपमतलबी लोकांच्या नकली फाशांत अगाध सामर्थ्य- ा महाराज कसे अडकले गेले व एकदां दिलेलें वचन कसें पाळलें ाी याचेंही मंडळीला आश्चर्यच वाटलें. × × × मराठा मंडळीचे दुर्भा- चे दिवस अझून संपले नाहींत म्हणूनच " मकडीके जालेमें अटका शेर " या म्हणीप्रमाणें ही असंभवनीय गोष्ट संभवली. × × स्वार्थ- धु व आपल्यावरून जग ओळखणाऱ्या कोत्या समजुतीच्या कित्येक ह्मण म्हणविणारे गृहस्थांच्या निराधार द्वेषमूलक तर्कांप्रमाणें ब्राह्मणांचे रुद्ध एक शब्दसुद्धां परिषदेंत उच्चारला गेला नाहीं. इतकेंच नाहीं तर ांचे गोडवे मात्र अनेक प्रकारें गाईले गेले. यावरून कोणते लोकांचें तःकरण कोणते प्रकारचें आहे याचें अंतर्बाह्य सूक्ष्म निरीक्षण महारा- ांनींच आपले ज्ञानदृष्टीनें करावें. " इ० इ०

पुढल्या वर्षीही नाशिक येथील मराठापरिषदेची निमंत्रणपत्रिका तिचे ice President श्री० खासेराव जाधव यांजकडून महाराजांस दा मुक्कामीं आली होती परंतु पूर्वोक्त ब्राह्मणद्वेषाच्या भीतीमुळें महाराज ले नाहींत.

असो. कात्यायनीव्रतोत्सवानंतर थोडे दिवस देऊरवाडा व कुऱ्हा येथें ास्तव्य करून पुढें माघवद्यांत महाशिवरात्रीचे उत्सवाकरितां महाराज

माधानास गेले. तेथें आपल्या कुलपरंपरागत शिवमंदिरांत शिवरात्र्युत्स थाटाचा करून फाल्गुन शुद्धांत प्रयागाला जाण्याकरितां माधानाहू उमरावतीस आले. माधानाहून निघतांना आपण पुन्हां प्रयागाहून पर येणार नाहीं अशा प्रकारची महाराजांनीं लीला दाखवून प्रेमी जनां वियोगोपलालन वृत्तीस भरती आणली. उमरावतीस आल्यावर ते कैलासमानससरोवराचे दर्शनाविषयीं प्रसिद्ध असलेले सत्पुरुष गजाननरा नाटेकर ऊर्फ हंस हे आले होते त्यांची महाराजांनीं भेट घेतली.

बिन्हार्डी परत आल्यावर "द्रष्टा श्रीगुरुमूर्ति । न रिघता दृश्यपथीं तरी का ह्या उपास्ती । आकळता तो ॥" या ज्ञानेश्वरीच्या ओवीव महाराजांचें निरूपण झालें. त्यांत श्रीगुरूचें अनध्यस्त विवर्तत्व व प्रेमा तिशयानें त्यांचा अंतःकरणांत आविर्भाव इत्यादि विषयांचें मोठें प्रेम भरित व मार्मिक प्रतिपादन होतें.

पुढें सोमवार ता० २६।२।१२ रोजीं सकाळीं ९-३० च्या गाडी प्रयागला जाण्याकरितां महाराज उमरावतीहून निघाले व मध्यंतरीं मुंबई पुणें व आळंदी करून हरद्यास गेले. यावेळीं मुंबईस प्रत्याभिज्ञाहृदय शिवतत्वविमार्षिणी हे दोन ग्रंथ नुकतेच निर्णयसागर छापखान्यांत छाप ल्याचें महाराजांस कळलें होतें म्हणून त्यांचा शोध करून ते दोन्ही ग्रंथ महाराजांनीं विकत घेतले, व शिवाय झेंदावेस्ता वगैरे कांहीं पारशी धर्माचेही ग्रंथ घेतलें.

हरद्याहून पंडित व दिनकर गोखले या दोघांस बरोबर घेऊन महा राज प्रयागला गेले व एक अहोरात्र तेथें राहून पुन्हां हरद्यास परत आले. यावेळीं नाना कविमंडन हरद्यासच राहिले होते व महाराज पुन्ह प्रयागावरून परत येत नाहींत अशा समजुतीनें त्यांनीं शोक करून मोठा आकांत केला.

श्रीज्ञानेश्वर माउली समर्थ.

शके १८३४ परिधावीनाम संवत्सरे. इ० स० १९१२–१३.

——*०*——

पुढें कांहीं दिवस महाराजांचें वास्तव्य हरदा येथेंच झालें. रामनवमीही तेथलीच झाली. तेथें वर्ध्याच्या परांजपे प्रकरणासंबंधाची माहिती एका गृहस्थानें त्यांस सांगितली. त्यासंबंधानें तात्विक विचाराचें एक पत्र महाराजांनीं नागपुरास रा. रा. वासुदेवराव मुळें यांस पाठविलें. तें सूक्ति० सतम यष्टींत पृ. ९४ वर छापलें आहे. या पत्रांत मुक्त पुरुष व दांभिक साधु या दोघांच्याही खऱ्या स्वरूपाचा निश्चय न कळल्यामुळें धार्मिक मनुष्याच्या मनाची कशी स्थिती होत असते, या घोटाळ्यांतून पार पडण्याला ज्ञान व उपासना या मार्गांच्या अवलंबनाची रीति, स्वतः आपण परांजप्यांच्या उलटपक्षाचे असण्याचें कारण, कोठें कधींही न फसण्याला दृढ निष्ठा व प्रबल वैराग्य यांचें महत्व, इत्यादि गोष्टींचा सुंदर मार्मिक विचार केलेला आहे.

वैशाख शुद्धांत यावलीचे आकाजीबापू देशमुख यांच्या मुलीच्या लग्नाची निमंत्रण पत्रिका आल्यावरून महाराज यावलीस गेले होते. परत येतांना उमरावतीस लक्ष्मीकांत प्रासादिक संगीत नाटकमंडळींतील रा. गोखले व चिंतोपंत नामक दोन गृहस्थ महाराजांचें दर्शनास आले होते. त्यांनीं नाट्यकलेसंबंधानें महाराजांशीं बराच वेळ चर्चा केली. तेवेळीं महाराजांनीं नाट्यकलेचा मुख्य उद्देश—चांगल्या व वाईट गोष्टींचे परिणाम जसे इतिहासांत घडले असतील तसे यथार्थ दाखविणें—असा सांगितला व भगवत्प्रीत्यर्थ अभिनय वगैरे करण्याविषयीं व देवाच्या उत्सवाकरितां पडदे वगैरे करण्याविषयीं शास्त्राची आज्ञा, नीलमण्याच्या भुकीचा रंग करून पडद्यावर नदीचे वगैरे उत्तम सीन दाखविणें, रत्नाची भुकी व सोन्याचें पाणी यांच्या योगानें अक्षय्य रंग तयार करणें इत्यादि उपयुक्त माहिती सांगितली. दुसरे दिवशीं महाराज हर्द्याकडे परत गेले.

हर्दा येथें रा. रा. कृष्णराव नारायण रेगे जहागिरदार हे एक विद्याव्यासंगी गृहस्थ आहेत. हे आर्यसमाजिस्ट आहेत. आपल्या गांवीं येणाऱ्या साधु, संत, योगी इत्यादिकांस भेटून सत्यान्वेशन जिज्ञासेनें त्यांच्याबरोबर शास्त्रचर्चा करण्याची यांस आवडी असे. परंतु त्यांस नास्तिक व तर्कटी समजून ते त्यांची उपेक्षा करीत. पुढें महाराजांची व त्यांची भेट होऊन महाराजांचें श्रुती, युक्ति व अनुभवयुक्त भाषण जेव्हां त्यांनीं ऐकलें तेव्हां त्यांना फार आनंद वाटला व महाराजांचे ठिकाणीं त्यांचा प्रेम जुळला. फुरसतीच्या वेळांत महाराजांकडे येऊन वेदशास्त्रपुराणादि अनेक विषयांवर महाराजांस त्यांनीं प्रश्न विचारावेत व महाराजांनींही त्यांच्या प्रश्नांचीं योग्य विनतोड उत्तरें देऊन त्यांची जिज्ञासा तृप्त करावी. पुढें आर्यसमाजाचा मुख्य ग्रंथ जो सत्यार्थप्रकाश त्यासंबंधानें चर्चा करून त्यांतील कांहीं दोष महाराजांनीं सप्रमाण दाखवून दिले व यांत विचारपूर्वक एकही गोष्ट लिहिलेली नाहीं असें आपलें मत सांगितलें व 'स्वप्ननिद्राज्ञानालंबनम् वा' व 'विषयवतीवाप्रवृत्तिरुत्पन्ना मनसः स्थिति निबंधिनी' ह्या दोन पातंजलयोगसूत्रांनीं अलोकवाद त्यांस पटवून दिला.

पुढें एके दिवशीं मूर्तिपूजेचा विषय निघाला असतां पुढील युक्तीनें महाराजांनीं मूर्तिपूजा सिद्ध केली:—

व्यापकता आणि भिन्नता एके ठिकाणीं राहूं शकत नाहींत व तसें मानल्यास नित्य व अनित्य अशा विरोधी गुणांचें एके ठिकाणीं अस्तित्व मानावें लागेल. व्यापकता मानली तर भेद नाहींसा झाला पाहिजे. भेद सत्य वाटतो तोंपर्यंत विशिष्ट उपाधींचे ठिकाणीं सत्वगुणाची अभिव्यक्ति मानली पाहिजे. अशा युक्तीनें मूर्तिपूजेची आवश्यकता सिद्ध होते.

अशा रीतीनें कृष्णराव हे उत्तरोत्तर महाराजांच्या विद्येला लुब्ध होऊन व्याकरण, भागवत, भारत, वेद, वेदांगें, गृह्यसूत्र, वाल्मिकीरामायण, ज्योतिष, वैद्यकी इत्यादि निरनिराळ्या विषयांवर रोज होईल तितका वेळ काढून त्यांच्याशीं चर्चा करूं लागले. विशेषतः मनुस्मृती संबंधानें अधिक चर्चा करण्याचा त्यांचा परिपाठ असे. या चर्चेंत महाराजांपासून

त्यांस रोज नवीन नवीन माहिती मिळूं लागली व त्यामुळें इतक्या दिवसांच्या आपल्या विद्याव्यासंगाचें कृष्णरावांस सार्थक वाटलें. महाराजही त्यांचा मान ठेवून त्यांस काका म्हणत.

कृष्णरावकाकाचा विष्णु या नांवाचा एक नातू आहे. त्याला क्षयाची भावना होऊन दुसरी स्टेज लागली होती व त्याची वाढ खुंटून डाक्तर व वैद्य यांनीं त्यास असाध्य ठरविलें होतें. त्याला महाराजांनीं अभय दिलें व स्वतःच्या देखरेखीखालीं औषधी उपचार सुरू करून हळुहळु त्याला दुरुस्त केलें. तो मुलगा आतां चांगल्या स्थितींत असून त्याची वाढ वगैरे झालेली आहे.

महाराजांच्या विद्वत्तेविषयीं हर्दा येथील कांहीं ब्राह्मण मंडळीस मत्सर वाटून कोणत्यातरी रीतीनें त्यांचा तेजोभंग करण्याविषयीं त्यांची गुप्त खटपट चालली होती. मागें कृष्णानंदसरस्वती आले होते तेव्हां हा इच्छा पूर्ण होण्याची त्यांस कांहीं आशा वाटत होती, परंतु उलट कृष्णानंदांनींच महाराजांच्या विद्येचें अभिनंदन केल्यामुळें मत्सरी मंडळीचा हिरमोड झाला. पुढें श्रीवासुदेवानंदसरस्वती हे महाराजांच्या विद्येविषयीं अमुक म्हणतात तमुक म्हणतात अशा प्रकारच्या गोष्टी महाराजांच्या कानावर येऊं लागल्या. त्यांचा उल्लेख महाराजांनीं एका पत्रांत मनोरंजनार्थ करून मत्सरग्रस्त मनुष्याला आपल्यास विद्वान् ठरवितांना कशा अडचणी येतात याचें मोठें मजेदार वर्णन केलें आहे. अशीच एक गप्प मागील वर्षी महाराज चांद्यास असतांना तेथेंही त्यांच्या कानावर आली होती. त्याचेंही निराकरण महाराजांनीं एका पत्रांत प्रेमळ शद्बांनीं केलेलें आहे. असो.

पुढें मार्गशीर्षांत महाराजांचें कात्यायनीव्रत सुरू असतांना हर्द्याला सोहागपुरचा एक नैय्यायिक आला होता. त्याच्याशीं महाराजांचा वाद व्हावा या विषयीं तेथील मंडळींनीं पुष्कळ खटपट केली. परंतु महाराजांनीं

१, २:—श्रीवासुदेवानंद सरस्वतीविषयीं व सोहागपूरच्या नैय्यायिकाविषयीं वृत्तांत सूक्तिरत्नावली सप्तम यष्टि पृष्ठे १००, १०२ व १३३ पहा.

लेखी वाद करण्याची इच्छा दर्शविल्यावरून तो प्रसंग घडून आला नाहीं. परंतु नारायणराव पंडित, बापूगडी वगैरे मंडळी त्या नैय्यायिकाकडे जाऊन त्याच्याशीं चार विभूविषयीं बोलणें करून आली. हा सगळा प्रकार महाराजांनीं एका पत्रांत लिहिलेला आहे तो येणेंप्रमाणें:—

"विशेष सूचना—हर्ष्याला असतांना सोहागपूरचा एक नैय्यायिक आला होता. त्याच्याशीं माझा वाद व्हावा अशी तेथील मंडळींनीं पुष्कळ खटपट केली; पण लेखी वाद करण्याला मी तयार आहे, बोलण्याचा वाद करण्याला तयार नाहीं असें मी तीन कारणामुळें उत्तर दिलें. पहिलें कात्यायनीव्रतांत वेळ नव्हता. दुसरें कारण तो म्हणाला "मला प्रश्नच करावा मी त्याचें उत्तर देईन. मी मात्र प्रश्न करणार नाहीं" व तिसरें कारण मला व्याकरण म्हणजे कौमुदी येत नाहीं हें. तथापि पंडित, बापू वगैरे मंडळी या चार विभूविषयीं प्रश्न विचारण्यास त्याच्याकडे गेली होती. या विभूच्या प्रश्नावर त्यांनीं यांचा निष्क्रियसंबंध आहे असें उत्तर दिलें. पण निष्क्रियसंबंध पडला मीमांसकाचा; मी उत्तर मागितलें होतें न्यायांतून; आणि न्यायशास्त्रांतच उत्तर देण्याविषयीं तो आग्रह करीत होता. पण लेखी वाद करण्यास तो तयार नाहीं. या घोळाघोळींत बापूचें काम स्पृहणीय झालें. असो. तो भेदाधिकारापर्यंत वेदांतग्रंथ वाचले असें म्हणत होता. पण विभुचतुष्टयाच्या प्रश्नाचें तर्कसंग्रहासारख्या लहानशा ग्रंथानें होणारें समाधान मीमांसकाच्या निष्क्रिय संबंधाचा आश्रय करून करण्याची बुद्धि झाली. पण निष्क्रिय संबंधाचें न्यायानेंच उलटें उत्तम खंडन केलें आहे, आणि तें इतकें उत्तम आहे कीं पुनः त्या निष्क्रियसंबंधाचें मंडन आजपर्यंत कोणा मीमांसकाच्यानें झालेंच नाहीं. इ० इ० "

या सुमारास उमाजी नायकाचें चरित्र नुकतेंच छापून प्रसिद्ध झालें होतें. तें वाचीत असतांना त्यासंबंधाचे आपले विचार महाराजांनीं रा० रा० भय्यासाहेब तांबे यांस पाठविलेल्या एका पत्रांत नमुद केले आहेत ते येणेंप्रमाणें:—" मी सध्यां एक पुस्तक वाचीत आहे. हें पुस्तक

म्हणजे कांहीं तत्वशास्त्र नव्हे किंवा परलोकाची वाट दाखविणारें एखादें धर्मशास्त्रही नव्हे. हें एका गरीब व शूर माणसाचें चरित्र आहे. पैसा व स्त्रिया प्रसंगीं कशा घातक होतात, ब्रह्मज्ञान, भगवद्भक्ति, आणि वैराग्य या तीन गोष्टी बाजूला ठेवून बाकीचा व्यवहार पाहिल्यास सद्गुण व दुर्गुण कशास म्हणावें हें निश्चितपणें कळणें कठीण आहे. कारण दैवानें यश आल्यास दुर्गुणी पुरुष व्यवहारांत सद्गुणी बनतो व दैव प्रतिकूल झाल्यास अपयशी पुरुष दुर्गुणी बनतो. मातींत टाकून दिलेलें सुवर्ण जसें मळत नाहीं त्याप्रमाणें दैवानें अपयशाखालीं झांकलेल्या पुरुषाचे सद्गुणही लोकांना मोहून टाकीत असतात. "सूतो वा सूतपुत्रोवा योवा कोवा भवाम्यहम् । दैवायत्तं कुले जन्म मदायत्तं तु पौरुषम् " हें कर्णाचें एका नाटकांत दिलेलें म्हणणें अक्षरशः खरें आहे. इत्यादि उत्तम गोष्टी ह्या पुस्तकांत मला वाचण्याला मिळाल्या. हें पुस्तक उमाजी नायकाचें चरित्र होय. × × बायकांतील कजागपणा व पुरुषांतील परोत्कर्षासहिष्णुत्व हे दोन दोष ज्या दिवशीं निघून जातील त्या दिवशीं नियम्य नियामकाची आवश्यकता मुळींच लागणार नाहीं. असो."

इतक्या कालावधींत महाराजांची दैवीविद्या, निस्सीम स्वार्थत्याग, योगशक्ति, अहेतुक दयाप्रवाह, भजनपूजन निरूपणादि नित्यपुण्यमय चर्चा व कात्यायनी, जन्माष्टमी आदि मंगलोत्सव यांच्या प्रभावानें सनातन आर्यधर्माचें शुद्ध स्वरूप लोकांच्या हळुहळु निदर्शनास येऊन महाराजांवर त्यांचें प्रेम अधिकाधिक जडूं लागलें व महाराजांची अत्यंत साधी व सरळ वागणुक व मिळून मिसळून हंसतखेळत परमार्थपर निरूपणें सांगण्याची त्यांची शैली यामुळें त्यांच्या प्रसादवाणीला लोक लुब्ध होऊं लागले. परंतु प्रेमाला मर्यादामार्गीय वळण देऊन अंतःकरणांत सद्भक्तिबीजांकुर रुजविण्याची सुसंधि आयती मिळाली असतांना तिचा लाभ करून घेण्याची सद्बुद्धि फारच थोड्या भाग्यवानांस झाली. आमच्या सारख्यांवर चमत्काराची इच्छा, विद्याकूतूहल, सलगीचा अतिरेक, लोकलाज, मानीपणा इत्यादि विघातक वृत्तीच बहुतेक पगडा

बसवूं लागल्या. काय करावें दुर्दैव आमचें ! आमची भाग्यहीनता ! "कां कमलकंदा आणि दर्दुरीं । नांदणुक एकेचि घरीं । परी पराग सेविजे भ्रमरीं । येरां चिखलची उरे " या दृष्टांतांतील दर्दुराच्या साम्यतेस आम्ही जाऊन बसलों. तथापि वृत्तिविद्येचे महाराज पूर्ण ज्ञाते असल्यामुळें सर्वांवर समान प्रेम ठेवून " धर्म, प्रेम व त्यांतील गुर्वाज्ञापूर्वक व्यवस्था या तीनच गोष्टी आत्यंतिक श्रेय संपादनास आवश्यक आहेत हें मोठ्या कंठरवानें अधिकाधिक आमच्या निदर्शनास आणून देण्याचा प्रयत्न करूं लागले. आगामी वृत्तांतावरून हें विशेष स्पष्ट रीतीनें कळून येईल.

मागील कात्यायनीचे वेळीं देऊरवाड्यास कांहीं शूद्र लोकांनीं क्षुल्लक कारणावरून ब्राह्मण मंडळीशीं तंटा उपस्थित केला होता. ती गोष्ट महाराजांच्या लक्ष्यांत होतीच. त्यानंतर कांहीं स्वज्ञातीय लोक आपले शिष्य म्हणवून वर्णाश्रम महाराजांना मान्य नाहींत, ब्राह्मण व इतर जाती एक झाल्या पाहिजेत असें गुप्तपणें वऱ्हाडाकडील खेड्यांत सांगत असतात, असेंही त्यांच्या कानीं आलें. या प्रकाराला आळा घालण्याकरितां महाराजांनीं केसरी व मुमुक्षु पत्रांत एक पत्र[1] प्रसिद्ध केलें व यापुढें आपल्या भेटीकरितां व कात्यायनी व्रताकरितां येणारानांही कांहीं निर्बंध घालून कोणी आपलें शिष्यत्व बळानें आपणावर ओढूनच घेत असल्यास त्यानें आपल्या ग्रंथांच्या विरुद्ध तरी जाऊं नये असें सर्वांस जाहीर केलें.

कांहीं गृहस्थांनीं योगशाळेकरितां ( महाराजांजवळून योग शिकण्याकरितां ) वर्गणी करून ते पैसे महाराजांजवळ ठेविले होते व पुढें तेच गृहस्थ महाराजांवर मिथ्या आरोप करूं लागले म्हणून सयाजी विजयाच्या ता० २ नोव्हे० १९१२ च्या अंकांत जाहिरात देऊन त्यांस महाराजांनीं कळविलें कीं मी योग शिकविण्यास नायक असल्यामुळे आपआपले पैसे

---

१ हें पत्र सूक्तिरत्नावलि सप्तम यष्टि पृ० १११ वर छा० आहे.

व्याजासुद्धां परत घेऊन जावे व इतके दिवस मजवर विश्वास ठेवून फस-ल्याबद्दल क्षमा करावी.

वरील गृहस्थांच्या वृत्तीची मीमांसा यानंतर महाराजांनीं एका पत्रांत अशी केलेली आहे:—

" पुष्कळ मंडळी प्रथम माझ्याशीं बोलणें करितात व नंतर मनांतील कामना वगैरे न सोडतां व आपले विकार व लौकिकाची चाड तितकीच्या तितकीच कायम ठेवून मनुष्य जन्मांतही मृत्यूची भीति न बाळगतां मजपासून योगाभ्यासांची अपेक्षा करितात. "

कोणी महाराजांच्या शुद्ध उपकारक हेतूंचा विपर्यास करून उलट त्यांच्याविषयीं आपला अविश्वास व्यक्त करूं लागले. अशा मंडळी विषयींही क्षमावृत्ति धारण करून दयायुक्त अंतःकरणानें त्यांच्या वृत्तिगत दोषांचें निरीक्षण करीत सयुक्तिक विचारसरणीनें त्यांस सामान्य व्यवहार कक्षेच्या पलीकडील सुंदर, निष्कंटक व विस्तीर्ण परमार्थपथ महाराजांनीं पत्र-लेखनद्वारानें स्पष्ट दाखवून दिला व अशा वृत्ती उत्पन्न होण्याची सकारण शास्त्रीय मीमांसा सांगून त्या वृत्तींच्या शुद्धीचा सुंदर उपाय सांगितला. उदाहरणार्थ सप्तम यष्टींतील १७ वें पत्र पहावें. या पत्रांतील महाराजांचें पुढील शब्द सर्व धर्मसंस्थापक महात्म्यांच्या शिक्षणाचें सारसर्वस्व असून साधकांस ते अत्यंत चिरस्मरणीय आहेत:—

" कैवल्यापुरतीच सात्विक वृत्ति कशी वाढवावी हें बहुप्रासंगिक असल्यामुळें गुरुवांचून केवळ शास्त्राच्या हातांत नाहीं. शास्त्र प्रमाण-प्रवीण आहे. प्रक्रियाप्रवीण नाहीं. ह्या गोष्टीचे अज्ञानादि अनेक कारणांमुळें प्रेम करणाऱ्या पासून देखील बहुशंकापूर्वक ताप होतो व तो कोणत्याही निस्पृह महात्म्याला होईल असें माझें मत आहे. धर्म, प्रेम व त्यांतील गुर्वाज्ञापूर्वक व्यवस्था या तीन गोष्टींच्या समुच्चयानेंच साधक पुरुषाला आपला मार्ग स्पष्ट कळूं लागतो. एखादें न्यून असल्यास सगळीकडे आंधारच होऊन रहातो. "

याशिवाय आणखीही परिचित् मंडळींना या सुमारास महाराजांकडून गेलेलीं पत्रें नेहमींप्रमाणें फार बोधप्रद व मननार्ह आहेत. रा० रा. चिंतामण मोरेश्वर ऊर्फ भय्यासाहेब तांबे यांस महाराजांनीं पाठविलेलें अभंगात्मक पत्र संसारचिंतेनें ग्रस्त झालेल्यांस विशेष उपकारक आहे. वर्ध्यांचे श्रीधरबोवा परांजपे यांच्या संबंधानें एका पत्रांत लिहितांना महात्म्यांच्या अलोकाचरणाचें रहस्य सांगितलें आहे तेंही फार लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे.

वेद० श्रीनिवास शास्त्री हरिदास यांचा मुलगा बापूगडी याला प्रथम भेटीच्या वेळीं महाराजांनीं पाटणा येथील मेडिकलस्कूलमध्यें शिकण्याकरितां जाऊं नको, गेलास तर विघ्न येईल असें सुचविलें होतें. परंतु तिकडे दुर्लक्ष्य करून तो पाटण्यास शिकावयास गेला याविषयीं मागें उल्लेख आला आहे.

त्याला पुढें क्षयरोगाचा प्रादुर्भाव होऊन तो रोग दुसऱ्या स्टेजपर्यंत वाढला व तेथील प्रिंसिपाल यांनीं तो असाध्य ठरवून यापुढें अभ्यासाचे श्रम करण्याची त्याला मनाई केली त्यामुळें बापूला परत यावें लागलें. तेव्हांपासून महाराजांनीं त्याला आपल्या सहवासांत ठेवून घेतलें व खाणें पिणें, गरम कपडे वगैरे गोष्टींची सर्व प्रकारें उत्तम व्यवस्था ठेवून रोज तीर्थ देण्याचा क्रम सुरू केला व त्याला दुरुस्त केलें. त्यानंतर एकवेळ आपली प्रकृति डाक्तरकडून तपासविली असतां लंग टिशूज भरून येत आहेत असें डाक्तरचें मत पडल्याविषयीं बापू सांगूं लागला. पुढें दोन तीन वर्षेपर्यंत तो महाराजांच्या सहवासांत राहिल्यावर आतां आपण दुरुस्त झालों कांहीं स्वतंत्र उद्योग वगैरे करावा असें वाटून व महाराज आपणांस जाऊं देणार नाहींत म्हणून त्यांस न कळवितां एके दिवशीं तो घरीं निघून गेला. ही गोष्ट महाराजांस कळल्यावर त्यांनीं त्यास परत येण्याविषयीं निरोप पाठविला. व तूं मजजवळ न राहिल्यास तुला पुन्हां रोग होईल असेंही त्यास कळविलें. परंतु तो ऐकत नाहीं असें पाहून प्रेमामुळें महाराजांनीं मुद्दाम मनुष्य पाठवून त्याला आपल्याजवळ

आणविलें. परंतु पुन्हां बापूगडी घरीं परत गेला. याप्रमाणें एकदोन वेळ झाल्यावर महाराजांचा निरुपाय झाला. बापूगडी घरीं राहून स्वतंत्र वैद्यकीचा धंदा करूं लागला. कांहीं दिवसांनीं त्याला पुन्हा रोग उद्भवून पूर्ववत झाला. महाराज त्याची वारंवार आठवण काढून हळहळ करीत, परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं. पुढें व्याधिदोषामुळें बापूची बुद्धि चंचल होऊन आज अमुक करूं, उद्यां तमुक करूं, असे निरनिराळे उद्योग सुरू झाले. या भरांत मुंबई, पुणें वगैरे ठिकाणीं व शिरडीच्या साईबाबा-कडे वगैरे तो कांहीं दिवस फिरला व कानपूर येथील वैद्यसम्मेलनांत जाऊन त्यानें व्याख्यान वगैरे दिलें. नंतर त्यानें मधुराद्वैतसंप्रदायास धरून ईशावास्योपनिषदावर टीकात्मक संस्कृत निबंध लिहिण्याचें योजिलें. परंतु व्याधि प्रभावानें व महाराजांच्या आज्ञाभंगदोषामुळें बुद्धि क्षीण झाल्या कारणानें पूर्वपरंपरेला सोडून स्वतंत्र नवीन मताचें त्यांत तो प्रतिपादन करूं लागला व आपल्या मित्रमंडळींतही त्या मतांचा प्रसार करून त्यांचा बुद्धिभेद करूं लागला. यावर्षीं हर्दायेथील कात्यायनी उत्स-वास तो आला असतांना त्यानें आपला लिहिलेला निबंधाचा भाग महा-राजांस वाचून दाखविला. त्यांतील पुष्कळ गोष्टींसंबंधानें त्याचें व महा-राजांचें भाषण चालत असे. याप्रसंगीं महाराजांनीं त्याला आपल्या नेह-मींच्या शास्त्रसमन्वित वाणीनें निरूपणें सांगून त्याच्या विचारसरणींतले दोष काढून टाकण्याचा प्रयत्न केला. हीं निरूपणें फार महत्वाचीं व उत्तमोत्तम असून त्यांत सर्वसंप्रदायपद्धतींचें व गुरुसेवेचें रहस्य सुलभ रीतीनें सांगितलें असल्यामुळें त्यांतील मुख्य मुख्य गोष्टींचा येथें संग्रह करतो:—

## बापूगडीला उपदेश.

महाराज म्हणाले, सगळीं धर्ममतें व सगळेच पंथ चांगले आहेत व प्रत्येकानें जें ठरवून ठेवलें आहे तें ध्येय त्याला मिळते. ज्या मार्गानें ज्याचें मन तयार झालें असेल त्याहून अन्य मार्ग त्याला हितावह नाहीं. मात्र ध्येय एका मार्गाचें व साधन भलतेंच असें केल्यानें इष्ट ध्येय मिळणार

नाहीं. यज्ञोपवितावांचून गायत्रीमंत्राचें फल किंवा वाममार्गानें वैदिक कर्माचें फल मिळणें शक्य नाहीं व तसा कोणाचा आग्रहच असला तर त्याचें तें फलही त्या त्या मार्गाच्या फलाहून भिन्न असें मिळून नुसतें शब्द-मात्र सादृश्य राहील व त्याचा तो मार्गही स्वतंत्र तयार होईल. ज्या मार्गाचा ज्यानें अनुभव घेऊन फल मिळविलें आहे तेंच फल ज्याला साध्य करून घेणें असेल त्यानें त्या मार्गप्रवर्तकाचें वचन—आज्ञा—डोळे मिटून पाळलें पाहिजे; तेथें मात्र तर्क उपयोगी नाहीं, अंधश्रद्धाच ठेविली पाहिजे व आपल्याहून भिन्न मार्गानें जाऊन भिन्न फल मिळविण्याचा ज्यांचा प्रयत्न असेल त्यांनांही त्यानें उपसर्ग देतां कामा नये. आपल्या मार्गाला उपसर्ग लाऊं पाहणाराला आपणही तितकाच उपसर्ग देऊन प्रतिकार करणें हें सामान्य मनुष्याचें व दुसऱ्याचा उपसर्ग सहन करून आपला मार्ग न सोडणें हें उत्तम मनुष्याचें कर्तव्य आहे.

निरनिराळ्या अनंत मार्गांचे जरी पंथ असले तरी सर्वांविषयीं समबुद्धि ठेवणें ज्याला साधलें असेल तोच आचार्य किंवा जगद्गुरु होण्याला पात्र होईल. आचार्यांनीं सर्व पंथांला जिंकून वैदिक मार्ग स्थापन केला अशी जरी लोकांत प्रसिद्धि आहे तरी त्यांनीं पुन्हां निरनिराळ्या पंथांच्या आचा-र्यांना आपआपलीं मतें स्थापन करण्याची अनुज्ञा दिली ही वस्तुस्थिति आहे व ती आनंदगिरींच्या शांकरदिग्विजयांत लिहिली आहे. आनंदगिरी आचार्यांच्या समकालीन असल्यामुळें त्यांनीं लिहिलेलें चरित्र विद्यारण्यकृत शांकरदिग्विजयापेक्षां जास्त प्रमाण आम्ही मानतों. कितीही भिन्न पंथ असले, नवीन निघाले, किंवा पुढें निघतील तरी सर्वांविषयीं सारखी समता ठेवणें हेंच अद्वैत मताचेंही लक्षण आहे. नाहींतर त्याचा अद्वैत-पणाच राहणार नाहीं. "रुचीनां वैचित्र्यादृजुकुटिलनानापथजुषां । नृणा-मेको गम्यस्त्वमसि पयसामर्णव इव ॥" या वचनाप्रमाणें सर्व मार्ग सत्यच आहेत, असत्य कांहींच नाहीं, असा निश्चयच समतेचें लक्षण आहे.

आतां वेदमार्गाला सोडून जे पंथ किंवा मार्ग आहेत त्यांना वैदिक

मोक्ष मिळेल किंवा नाहीं हा प्रश्न स्वतंत्र आहे. फलाच्या शाश्वतीसंबंधांत तरतम भाव राहील पण फल मात्र ज्याला त्याला त्या त्या मार्गानें ठरलेलें मिळेल व त्याचा जो प्रवर्तक असेल त्याची आज्ञा निमूटपणें पाळणें हें कांहीं आपलें स्वातंत्र्य गमावून दुसऱ्याचें मत लादून घेणें नव्हे. ज्याला त्या मार्गानें जावयाचें नाहीं तो अर्थातच त्या मार्गानें जाणार नाहीं व म्हणून तोही परतंत्र होणार नाहीं. मी परांजप्यांच्या मंडळीला दोष देतो तो ह्याचकरितां. त्यांची मनें त्याच मार्गानें तयार होत होतीं. म्हणून. त्यांना तो मार्ग सोडणें इष्ट नव्हतें. आतां मी जो परांजप्यांचा निषेध केला तो नवीन मनुष्याच्या वैदिक मताला उपसर्ग लागू नये म्हणून सारांश, अढाऊ झाड उपयोगाचें नाहीं. तें ज्याला त्याला प्रतिबंध करील व तें कोणीही तोडावें. परंतु बागेंत व्यवस्थेनें रहात असलेलें झाड कोणी तोडूं पाहील तर मात्र त्याला प्रतिकार करावा.

मी उपनिषत्कालांतील ऋषींचें जें मत कीं, जीवन्मुक्तीला भक्तीची आवश्यकता आहे त्या मताचें मधुराद्वैत संप्रदायानें प्रतिपादन करीत आहे, व तें मत ज्याला खोडावयाचें असेल त्यानें माझ्या समक्ष खोडावें. माझ्या मागें कोणी खोडूं पाहील तर त्याचा कसा प्रतिकार करतां येणार ? तो तें वाटेल तसें खोडील व त्याचेंच मत कदाचित् इतर सामान्य मनुष्यांत मान्यही होईल.

एक म्हणतो मी धर्मानें मोक्ष मिळवीन, दुसरा म्हणतो ज्ञानानें मिळवीन, तिसरा म्हणतो मातृपितृभक्तीनें मिळवीन. या सर्वांचेच निश्चय खरे आहेत व निश्चयानें त्यांना ती ती वस्तु प्राप्तही होईल. "ज्याको ज्यापर सत्य सनेहू । सो तेहि मिलत न कछु संदेहू ॥" असें तुलसीदास म्हणतात. परंतु एक ध्येय ज्यानें ठरविलें त्यानें त्याकरितां इतर सर्व धर्माधर्मांचा त्याग करून नरकही भोगण्यास तयार झालें पाहिजे. तरच तो स्नेह सत्य समजला जाईल. "सर्वधर्मान् परित्यज्य मामेकं शरणंव्रज ॥" "त्यजधर्ममधर्मंच उभे सत्यानृते त्यज ॥" इत्यादि वचनें याविषयीं प्रमाण आहेत.

महाराजांचें पुढील निरूपण किंवा भाषण यद्यपि बापूगडीला उद्देशून झालेलें आहे, तथापि इतर अत्यंत निकटवर्ती मंडळीचाही त्यांत संबंध येत असून महाराजांवर त्यांचा जो राजस स्वरूपाचा प्रेम होता त्याला शुद्ध सात्विक असें धार्मिक स्वरूप देण्याचा त्यांत उदात्त हेतु असल्यामुळें तें येथें सारांशरूपानें घेणें अवश्य वाटतें. तें भाषण असें:—

तुम्ही मला सामान्य जीवांहून वरिष्ठ व ज्ञानी मानतां यांत संशयच नाहीं. कारण तसें नसतें तर घरदार सोडून तुम्ही मजकडे आलाच नसता. मला ज्ञानी समजून जो तुम्ही मजवर प्रेम करितां, तो आरंभीं जरी सात्विक स्वरूपाचा असला तरी तोच रजस्तमांत पर्यवसान पावण्याचा संभव आहे. कारण मला त्रास किंवा दुःख होऊं नये हें तुमच्या प्रेमाचें आतांचें स्वरूप आहे. पण अशा रीतीचें प्रेम देहाला धरून असल्यामुळें गुरुभक्तीचें खरें स्वरूप जी आज्ञापालनरूपी मर्यादामार्गीय भक्ति तिजकडे तुमचें दुर्लक्ष्य होतें व आपल्यापासून महाराजांना त्रास होतो हें आपल्याच्यानें पाहवत नाहीं म्हणून थोडें दूर राहून प्रेम केलेलें बरें असें तुम्हाला वाटूं लागतें. ह्या प्रेमाची पराकाष्ठा, तुम्ही माझ्या देहावसानानंतर मजबरोबर आपल्याला दहन करून घेण्यांत जरी केली, तरी तें तुमचें प्रेम राजस स्वरूपाचेंच होईल, ज्ञानोपदेशपर्यवसायी होणार नाहीं. नंदयशोदेनें अति तीव्रतर देहशोषणादि तपानें श्रीकृष्णाकरितां पूर्वजन्मीं देह झिजविला, त्यामुळें पुढल्या जन्मांत त्यांना श्रीकृष्ण तर मिळाले पण नुसतें अपत्यप्रेमच त्यांना श्रीकृष्णाकडून मिळालें व त्याजकडून त्यांनीं गायी राखण्याची सेवा करून घेतली. परंतु तपाचें सुकृत संपण्याबरोबर देव मथुरेस निघून गेले.

तद्वत्, अवतार समजून तुम्ही मजवर प्रेम करीत असलां तर तुम्ही त्या प्रेमबलानें मजकडून गायी राखण्यासारखी संसारिक सेवा करवून घ्याल. ज्ञानी समजत असलां तर मला पुढें जन्मच येणार नाहीं, पण तुम्हांला मात्र तुमच्या भावनेनें व आतां मजवर केलेल्या प्रेमानें माझ्यासारखा अज्ञानी पुतळा मिळेल व तो तुमची सेवा करील. याला उदाहरण श्राव-

णाचें. श्रावण पूर्वजन्मीं कपोतपक्षी होता. वणवा लागला असतां त्याच्या आईबापांनीं त्याला वणव्यांत सोडून देऊन आपला जीव वाचविला होता व दुसऱ्या एका कपोतपक्षाच्या जोडप्यास त्याची दया येऊन त्यांनीं वणव्यांत आपल्या पंखांनीं त्याला झांकून त्याच्यासह ते जळून मेले होते. त्या पूर्वसंबंधानें दुसऱ्या जन्मीं तो कपोतपक्षी श्रावण झाला व तें जोडपें त्याचे आईबाप झाले व श्रावण त्यांस कावडींत बसवून तो कावड तो स्कंधावर वाहत होता. पण पूर्व कर्म संपण्याबरोबर तो दशरथाच्या हातून मारला गेला.

मला तुम्ही आधिकारिक मानीत असले तरीही अशा राजस प्रेमानें मी पुढले जन्मीं तुम्हांस मिळेन पण ज्ञानोपदेश न करितां अवतारा-प्रमाणेंच नुसती सेवा करीन व सुकृत संपल्याबरोबर निंघून जाईन. मला बद्ध तर तुम्ही समजत नाहींच कारण तसें असतें तर तुम्ही मजकडे आलाच नसता.सारांश,कोणत्याही रीतीनें मी तुमच्या स्वाधीन होऊन वागावें असें तुम्हाला वाटणें इष्ट नाहीं. तर माझी आज्ञा पाळण्यांतच तुमच्या प्रेमाचें पर्यवसान झालें पाहिजे. महाराजांनीं आमच्या मतानें वागावें असें तुम्हांला वाटत असलें व असें वागूनच कल्याण होतें अशी तुमची समज असली तर तुम्ही अजिबात माझ्यावरचा प्रेम काढून टाकून दुसरा महात्मा पहा. पण कोणीही असला तरी आज्ञापालनपूर्वक जोंपर्यंत श्रवण घडणार नाहीं तोंपर्यंत तें प्रेम मोक्षपर्यवसायी न होतां सांसारिक बंधनच होईल. वासुदेवानंद सरस्वतींस किंवा आणखी कोणा महात्म्याला याविषयीं विचारा किंवा तप करून हरिहरांना विचारा तेही असेंच सांगतील.

पण माझ्यावरलें प्रेम काढून टाकणें आतां तुमच्या हातीं राहिलें नाहीं. कारण महाराजांची प्रकृति सुधरावी व ती सुधरण्याकरितां आम्ही सांगतों तसें महाराज वागत नाहींत म्हणून तुम्ही दूर रहाण्याची खटपट करीत आहांत.

दूर राहून गुरूवर प्रेम करणें शक्य आहे पण त्याला पुष्टिमार्गीय प्रेम म्हणतात व तो ज्ञानीयांवांचून इतरांस साध्य नाहीं. तुम्ही ज्ञानी झालों

नाहीं. कारण महाराजांनीं आमच्या म्हणण्याप्रमाणें वागावें अशी देहबुद्धि-विषयक मोहमयी वृत्ति तुमचे ठिकाणीं आहे. माझी प्रकृति बिघडणें माझ्या प्रारब्धाच्या स्वाधीन आहे व थोडीशी मी हठानेंही बिघडवितो. मी हठच केला तर तुमचें कांहीं चालणार नाहीं. म्हणजे मला प्रतिबंध तुम्ही करूं शकणार नाहीं. पण प्रकृति बिघडल्यावर मंत्र, औषधी वगैरे उपाय करणें तुमचें कर्तव्य आहे. तें न केलें तर तुम्ही दोषी व्हाल.

दूर राहून मर्यादामार्गीय प्रेम होणें शक्य नाहीं. कारण देहाहून भिन्न होण्याला उपदेशसाध्य वर्तन पाहिजे व तें आज्ञापालन होय. तें दूर राहून साधणार नाहीं व आमच्यापासून महाराजांना त्रास होतो तर दूर राहिल्यानें तो टळेल ही राजसवृत्ति असल्यामुळें अशा प्रेमाचा परिणाम उपदेशपर्यवसायी न होतां पुढील जन्मीं मजकडून सेवा घेणें हाच त्याचा परिणाम होईल,हें वर सांगितलेंच आहे.परंतु जवळ राहूनही नुसता देह-विषयक प्रेम नको आहे. मर्यादामार्गीय प्रेमच तुम्हीं केला पाहिजे. आम-च्या सांगण्याप्रमाणें महाराजांनीं वागावें व आमच्या स्वाधीन रहावें, महा-राजांनीं मात्र आमची परीक्षा पाहूं नये किंवा आज्ञापालनांत अथवा योग्य-वर्तन करण्यांत आम्ही चुकलों तर महाराजांनीं रागाऊं नये अशा प्रकारचा प्रेम उपदेशसाध्य होत नाहीं.

नामदेवाचा प्रेम कांहीं कमी नव्हता. डोकें फोडून दगडाची मूर्ति त्यानें जेवविली. पण ज्ञानप्राप्तिकरितां देवानें त्याला विसोबा खेचराकडेच पाठविलें. पण अर्जुनाला देवानें गीतेचा उपदेश केला.

म्हणून आज्ञापालनपूर्वक प्रेम केला पाहिजे. कांहीं मंडळी स्वतःला मुक्त समजून माझें निरूपण ऐकत नाहींत. हा विषय आपण ऐकलाच आहे असें त्यांस वाटतें अशी माझी त्यांच्याविषयीं समजूत झाल्यास माझा काय दोष ? कांहीं मंडळी दूर राहूनच प्रेम करूं व महाराजांचे ग्रंथ वाचून आपली सुधारणा करूं अशा मताची आहे. यावरून गुरूच्या सा-

ह्यावांचून नुसत्या ग्रंथवाचनानें ज्ञान होणें शक्य आहे असें त्यांच्या मतानें ठरूं पाहते.

गुरु आपणच कल्पिलेले आहेत, हा दृष्टिसृष्टिवादाचा सिद्धांत आहे. त्याचा अर्थ जर तुम्ही भलताच करून आपल्या भावनेनें महाराजांना आम्ही वाटेल तेव्हां मिळवून आपली सुधारणा करून घेऊं अशा घमेंडीनें आज्ञापालन करण्याला चुकाल तर भयंकर परिणाम होईल. दूर राहून भावनेनें मला मिळवून ज्ञानप्राप्ति करून घेण्याचा प्रयत्न करणें म्हणजे मागली अनेक जन्माची मृदु भावना जी याजन्मीं तीव्र झालेली आहे ती सोडून आतां पुन्हां मृदु भावना तीव्र होतपर्यंत अनेक जन्मपरंपरा भोगण्याचा प्रयत्न करणेंच होय. शंका—एकलव्यानें एकाच जन्मांत भावना तीव्र केली. समाधान—त्या भावनेनें त्याला कुत्र्याच्या तोंडांत बाण कसे भरावे ही शस्त्रविद्याच मिळाली. ब्रह्मास्त्रासारख्या मंत्राची अस्त्रविद्या त्याला भावनेनें मिळाली नाहीं व मिळणें शक्यही नाहीं. एकाच जन्मांत प्रारब्ध टाळण्याचा प्रयत्न सामान्य मनुष्याला शक्यच नाहीं. "सर्व मनुष्यप्रयत्नाचें पर्यवसान एका जन्मीं ब्रह्मज्ञान करून घेण्यांतच होणें शक्य आहे व धर्म, प्रेम व आज्ञापालन यांच्या समुच्चयपूर्वक संतसेवा हीच त्याची योग्य दिशा होय."

तुम्ही म्हणाल, आमच्या वृत्तींतील दोष पाहून तदनुसार नियम बांधून द्या व त्याप्रमाणें आम्ही वागतो किंवा नाहीं हें आपण आमच्या म्हणण्याप्रमाणें शांत वृत्तीनें वागून एकदोन वर्षे पहा. तर शौचमुखमार्जनादि बाह्य शारीरवृत्तीच जर रोज तुमच्या हातीं रहात नाहींत तर अंतःकरणाच्या वृत्ती तर घटकेंत अनेक उठणाऱ्या आहेत व तदनुसार योग्य उपाय करून त्यांचे दोष घालविण्याची खटपट मलाच केली पाहिजे. असें असतांना वर्ष दोन वर्षांचे नियम मला कसे बांधून देतां येणार ?

कांहीं मंडळी ( पंडितादि ) माझ्या आज्ञेनुसार वागून तापांत माझ्या

हातावर माती व पाणी टाकणें वगैरे गोष्टींनीं माझी प्रकृति जास्त बिघड-वितात व त्यामुळें त्यांना मोक्ष न होतां उलटा नरक होईल, असें तुम्ही समजत असल्यास तुमच्या अकल्याणाची आज्ञा करून तुम्हांस नरकप्राप्ति करून द्यावी इतका मी कांहीं दुषखुळा नाहीं व ते ( पंडि-तादि ) गुरु समजून माझी आज्ञा पालन करीत असल्यामुळें त्यांना नरक होणेंही शक्य नाहीं. अशा तुमच्या भलभलत्या समजुतीमुळें एक तर तुम्ही आपलें नुकसान करून घेतां व प्रथम ज्यांच्या सोईनें वागून त्यांची राग-निवृत्ति करण्याचा मी यत्न केला आहे व आतां द्वेषनिवृत्ति करण्या-करितां त्यांना थोडें कडक रीतीनें वागवून आज्ञापालनमर्यादेवर आणण्याचा सुसमय आला आहे अशा कांहीं नवीन मंडळीचाही गैरसमज करून त्यांना त्या भूमिकेवरून खालीं पाडण्याचें श्रेय घेतां.

तुमच्या अकल्याणाची आज्ञा मी तुम्हांस कधींच करणार नाहीं. उदा० माझें शीर कापा असें मी तुम्हांस कधींच सांगणार नाहीं. पण अशाही कांहीं कथा वेदांत आहेत व त्यांचा अभिप्राय निराळा म्हणजे शिष्यकल्याणार्थच आहे. उदाहरणार्थ, हयशिर ऋषीची कथा. हे ऋषी ब्रह्मवेत्ते होते. एकदां अश्विनीकुमार त्यांचेकडे गेले व ज्ञानोपदेश मागूं लागले. ऋषीनें त्यांस तप करून या म्हणजे ज्ञानोपदेश सांगतों असें आश्वासन दिलें. ते तपाला गेल्यानंतर इंद्र तेथें आला व त्या ऋषीला ज्ञानोपदेश मागूं लागला. ऋषी म्हणाले तुला वैराग्य झालें नाहीं म्हणून तूं उपदेशाला पात्र नाहींस. स्वर्गभोग, इंद्राणीचा भोग इत्यादिकांत तुझें चित्त आसक्त आहे. विषयसुखाचा आनंद तुला जो आहे तोच कुत्र्या-सही आहे. यज्ञादि कर्मांनीं दिव्य भोग मिळविले म्हणून विषयानंद कांहीं अधिक नाहीं. कुत्रीशीं रममाण होण्यांत जो आनंद कुत्र्याला आहे तोच आनंद इंद्राणीशीं रममाण होण्यांत तुला आहे. विशेष नाहीं. इंद्राला वाटलें कीं ज्या अर्थी हा ऋषी वैदिक कर्मांची निंदा करतो त्या अर्थी हा पाखंडी असला पाहिजे. असें वाटल्यावरून इंद्र ऋषीला म्हणाला तुम्ही आजपासून कोणाला ज्ञानोपदेश कराल तर मी तुमचें शीर कापून

नेईन. ऋषी म्हणाले बरें आहे. हा तुझा माझ्यावर उपकारच झाला. कारण ज्ञानोपदेशाची प्रवृत्तीही आपण ज्ञानी व दुसरा अज्ञानी, आपण गुरु व दुसरा शिष्य अशा देहाभिमानानेंच होत असते. ती माझी देहबुद्धि त्वां नाहींशी केलीस. आतां मी मौन धरितों. याप्रमाणें ऋषींनीं मौन स्वीकाल्यानंतर अश्विनीकुमार तपाहून परत येऊन ज्ञानोपदेश मागूं लागले. त्यांस एकवेळ ऋषी आश्वासन देऊन चुकले होते.त्यांस इंद्राबरोबर झालेलें सर्व भाषण सांगून ऋषी म्हणाले, मी इंद्रालाही वचन दिलें आहे व त्यापूर्वी तुम्हालाही दिलें आहे. म्हणून तुम्हांला मी ज्ञानोपदेश करतो परंतु इंद्र विघ्न करील यास्तव असें करा. तुम्ही माझें शीर कापून घेऊन घोड्याचें शीर मला लावा. मग मी तुम्हास ज्ञानोपदेश करण्याचा संकल्प केल्याबरोबर इंद्र माझें शीर कापून नेईल. तेव्हां माझें पूर्व शीर तुम्ही मला लावून द्या. म्हणजे मग निर्विघ्नपणें तुह्मांस ज्ञानोपदेश करतां येईल. याप्रमाणें केल्यावर पुन्हां दुसरे वेळीं जेव्हां इंद्र शीर कापण्यास आला तेव्हां ऋषी संतापून त्याला ह्मणाले दोन वेळ शीर कापण्याची प्रतिज्ञा नव्हती ह्मणून तूं आतां येथून चालता हो.

महाराजांच्या वरील निरूपणांतील कांहीं गोष्टींचा संबंध समजण्याकरितां त्यांची आलीकडची शारीरिक स्थिती व नित्यचर्या यांची थोडी माहिती येथें सांगितली पाहिजे. माधानाहून महाराज प्रथम उमरावतीस आले ते वेळीं त्यांची शारीरिक स्थिती चांगली होती व पुढील दोन तीन वर्षांत तर फारच चांगली झाली. परंतु पुढें उत्तरोत्तर त्यांची प्रकृति खालावत जाऊन आलीकडे ती बरीच क्षीण झालेली होती. तथापि ग्रंथ लेखनादि कामें जोरानें चालूच होती व उपासना व ज्ञानमार्गाबरोबर मृज्जलादिकांनीं शरीरशुद्धि वगैरे क्रियामार्गाचा प्रकारही वाढला होता. तशीच मंडळीच्या मनांतील द्वेषवृत्ति काढून टाकून आज्ञापालनरूपी मर्यादामार्गीय प्रेम शिकविण्याकरितां आईच्या रोषयुक्त प्रेमाप्रमाणें थोडी वरपंगी क्रोधवृत्तीही महाराजांनीं धारण केली होती. इकडे महाराजांची बिघडलेली प्रकृति सुधरून तळ्यावर यावी म्हणून जवळची मंडळी व

विशेषत: नानाजी कविमंडन, बापूगडी वगैरे काळजीपूर्वक खटपट क[illegible]
लागले. परंतु खाण्यापिण्याच्या बाबतींत महाराजांचा नियम नसल्या[illegible]
मंडळीला वाईट वाटत असे. यांत मंडळीचा महाराजांवरील प्रेम रजो
गुणात्मक कसा होता हें वरील निरूपणांत त्यांनीं स्पष्ट केलें आहे.
आपली प्रकृति उत्तरोत्तर बिघडण्याचें कारणही त्यांनीं एके ठिकाणीं [illegible]
लिहून ठेविलें आहे:— "उमरावतीच्या पूर्वी कोणी मला जेव म्हण[illegible]
नसल्यामुळें ज्या वेळीं व ज्या दिवशीं मला भूक लागेल तेव्हां मी जेवी[illegible]
असे. मनकराणिका ( पत्नि ) संपल्यानंतर शोकाच्या बलानें व मा[illegible]
श्रमानें मला अजीर्ण होऊं लागलें व व्यायामही वर्ज्य झाला. पोटां[illegible]
पित्त श्लेष्मामीश्रित होऊं लागलें. त्यामुळेंही भूक नाहीं म्हणून मी बरो[illegible]
जेवीत नसे. माझ्या वर्तनाचा मंडळीच्या मनावर आधींच परि[illegible]
झाल्यामुळें मी मुद्दाम जेवीत नाहीं असें नाना वगैरे मंडळीला वाटत असे.
माझा समज आहे कीं मी आपल्या मताप्रमाणें वागूं लागलों म्हणून
आतांपर्यंत वाचलों. दुसऱ्या वैद्यादिकांच्या म्हणण्याप्रमाणें मी वाग[illegible]
असतों तर आतांपर्यंत माझे कित्येक श्राद्ध होऊन गेले असते. असो.
या कारणांशिवाय मध्यंतरीं बरेच दिवस धौतिबस्ती वगैरे महाराजांच[illegible]
योगक्रिया सुटल्या होत्या व पूर्वीचा एकांतवास,स्वच्छंद विहार वगै[illegible]
पुष्कळ कमी झाला होता. त्यामुळेंही प्रकृतीवर परिणाम झा[illegible]
होता.

ज्या आपल्या वर्तनाचा मंडळीच्या मनावर परिणाम झाला असें [illegible]
म्हटलें आहे तें वर्तन महाराज सांगतात:—" जेव्हां मी एकटा मा[illegible]
कडे रहात असे तेव्हां खोटें बोलण्याचें काम मला पडत नसे. परंतु उ[illegible]
रावतीपासून माझ्या निरूपणाचा कोणाच्या मनावर कमी व कोणा[illegible]
मनावर अधिक परिणाम ठसावत चालला व त्यामुळें कांहीं माणसें [illegible]
मजजवळ राहूं लागलीं. त्या मंडळीची खाण्यापिण्याची व्यवस्था जमवि[illegible]
ण्याकरितां आणि माझे कात्यायनी, अष्टमी व शिवरात्री या व्रतांकरि[illegible]
आणि पुस्तकांकरितां मला जी पैशाची गरज पडली ते पैसे मिळवि[illegible]

करितां व मंडळी सुधरण्याकरितां मला थोड्याशा असत्याभासरूपी वाणीचा आश्रय करणें भाग पडलें. त्या आचरणाचाही मंडळीच्या मनावर परिणाम झाला. शाळेंतील विद्या येण्यापूर्वी तेथील मुलांचे वाईट गुण लौकर येतात. अशीच कांहीं अंशींमंडळीची स्थिती झाली.'' असो.

पौषमासारंभीं महाराज उमरावतीस गेले व तेथून त्यांनीं नागपूरच्या मंडळीस एक पत्र पाठविलें. आतांपर्यंत महाराजांचे कांहीं ग्रंथ छापून प्रसिद्ध झाले होते व त्यांचें वाचन, चर्चा वगैरे विशेषें करून नागपूरच्या मंडळींत होऊं लागली होती. या चर्चेला थोडी नवीन विचाराची संवय लावण्याच्या हेतूनें साक्रेटिसाच्या प्रश्नोत्तर पद्धतीचा उपक्रम करून कांहीं न्यायाचे प्रश्न या [1]पत्रांत महाराजांनीं विचारले आहेत व या प्रश्नांचें उत्तरही न्यायशास्त्रांत निष्कर्षत: आहे असें सांगून ते प्रश्न सोडविण्याचा प्रयत्न करितांना शद्बांचा अर्थ मात्र शास्त्रकारांनीं घेतला असेल तोच घेण्याविषयीं सूचना केली आहे व ग्रंथकाराचें म्हणणें काय आहे हें योग्य न समजून घेतल्यामुळें पुष्कळ वेळां शद्बांचे विपरीत अर्थ मनांत कसे येतात व यामुळेंच अर्धवट् नवीन वादकांच्या हातून होणारे वेदान्तसंबंधीं शद्बांचे अर्थविपर्यास, त्यांचे अयोग्य शद्बार्थ प्रयोग, योगवासिष्ठासारख्या वेदान्त ग्रंथांच्या भाषांतरकारांच्या चुका, व बार्क्ले, फिष्टे, हीगेल इत्यादि युरोपियन ग्रंथकारांवर झालेला त्यांचा दुष्परिणाम, आजकालच्या वेदान्त वाचणारांची वेदान्तज्ञानाविषयीं खेदकारक स्थिती इ० गोष्टींचें सोदाहरण स्पष्टीकरण करून शद्बाचा फलत:, तात्पर्यत:, आणि शक्तित: अर्थ कोशांतून किंवा आपल्या ग्रंथांतून समजून घेऊन नंतर आपल्याशीं चर्चा करण्याबद्दल जीव तोडून विनंती केली आहे व केव्हां केव्हां आपल्या सहज बोलण्यांत येत असलेल्या एखाद्या शास्त्रावरील आक्षेपाचें उत्तर त्या शास्त्रांत नाहीं अशा समजुतीनें मंडळीचा त्या शास्त्राविषयीं उग च अनादर कसा होतो व त्या शास्त्राचा विचार करणाऱ्या पंडिताचीही निरनुभव प्रवृत्ति कशी

---

१ सूक्तिरत्नावली सप्तम यष्टि पृ० १२५ पहा.

दिसून येते याचें एक उदाहरण सांगून, आपण क
आक्षेपाचें उत्तर त्या शास्त्रांत खरोखरच नसतें हेंही स्पष्ट
याच पत्रांत सोहागपूरच्या नैय्यायिकाविषयीं मजकूर अ
मागें आला आहे.

उमरावतीला थोडे दिवस महाराजांचा मुक्काम हो
त्यांनीं भक्तितत्वविवेकनामक ग्रंथाचें लेखन करून अ
ह्याचें विषयवार वर्गीकरण करण्यास सुरुवात केली.

एके गुरुवारीं (ता० १३–२–१९१३ रोजीं) प
नवीन अभंग झाले त्यांत आजपर्यंत आपण देवाशीं जीं
केलीं त्याची क्षमा मागितली आहे. तो अभंग असा:—

बोलिल्या बोलाची मागताहे क्षमा। सख्या मेघःश्याम
मागिल्या भक्तांचा पाहुनीयां रोष। मीही काव्यघोष तै
करावया तुझी कारुण्यकविता। दुर्भाग्य अनंता पुरे म
बोलणार आजपासुनीयां। तुज देवराया भलतें मी॥ ४
स्वामी ज्ञाननाथा। वाहते मी माथा पायांवरी॥ ५॥

वरील अभंगांत केलेली "नाहीं बोलणार आजप
देवराया भलतें मी" ही काव्यप्रतिज्ञा यापुढें मह
मोडली नाहीं.

पुढें महाशिवरात्रीच्या प्रातिवार्षिक उत्सवाकरितां
गेले. उत्सव आटपल्यावर पारण्याचे दिवशीं ब्राह्मणभोज
नंतर सायंकाळचे सुमारे ५ वाजतां तेथें राहणारा पात्रा
वृद्ध माहार महाराजांचे दर्शनास येऊन मोठ्या प्रे
नमस्कार केला. याला महाराजांनीं लहानपणीं एका वि
वाहिलें होतें तेव्हांपासून त्याचा महाराजांचे ठिकाणीं
महाराजांनींही मोठ्या प्रेमपूर्वक त्याची विचारपूस करून
प्रसाद दिला, एक चांदीची आंगठी दिली व आजपासून

नित्य श्रीकृष्णाचें नामस्मरण करीत जा म्हणजे तुला पुढें उत्तम जन्म येईल असें सांगितलें. ही महाराजांची आज्ञा त्यानें फार प्रेमानें मान्य केली व मरेपर्यंत ती पाळण्याचें कबूल केलें.

फाल्गुनांत रा० रा० रामराव बळवंत देशपांडे महाराजांचे बाळपणचे शिक्षक यांची द्वितीय कन्या सौ० मथुरा इचें लग्न जुळलें. यांच्या मोठ्या मुलीचा विवाहप्रसंगही येथेंच (माधानांत) महाराजांचे हस्तें साजरा झाला होता. तसाच हा प्रसंगही त्यांच्याच सान्निध्यांत फार उत्तम रीतीनें सिद्धीस जाऊन रामरावांस मोठी धन्यता वाटली.

या सुमारास माधान येथें नानेराज महाराज पाथ्रीकर ह्मणून मानभावांचे एक महंत महाराजांच्या विद्येची कीर्ति ऐकून त्यांच्या भेटीस आले होते. तेवेळीं महाराज रा० दलपतजी पाटलाचे वाड्यांत बसले होते. तेथें परस्परांचें संभाषण होऊन महानुभावधर्मविषयक चर्चा झाली त्यांत "सत्पद तें ब्रह्म चित्पद ती माया। आनंदपदीं जया म्हणती हरी" ॥ या एकनाथ महाराजांचे अभंगांत महानुभावांचें महावाक्य आहे असें नानेराज महंतांनीं कबूल केलें.

आपल्या नेहमींच्या क्रमाप्रमाणें येथूनही महाराजांनीं दोन तीन पत्रें नागपुरास पाठविलीं आहेत. एका पत्रांत, उत्सवादि प्रसंगीं जो काला होत असतो तेवेळीं पाय धुवून व बिछायतीवर वगैरे न बसतां काला घेण्याचा निर्बंध आपल्या मंडळीनें पाळावा असें लिहून सध्यांची काला घेण्याची रूढी वर्णसंकरकारक कशी हें सांगितलें आहे व कात्यायनी प्रसंगांत आपल्या कित्येक सांप्रदायिक मंडळीकडून घडलेल्या एका चुकीचा उल्लेख केलेला आहे.

दुसरें पत्र सामाजिक धर्मसुधारणेसंबंधीं असून नागपूर येथील समाजधुरीण डॉ. बा० शि० मुंजे यांच्या प्रश्नांस उत्तर म्हणून लिहिलें आहे. हे प्रश्न त्यांनीं वेद० श्रीनिवासशास्त्री हरिदास यांच्या द्वारानें पाठविले होते; व त्यांत "वेदान्त सर्वतोमुखीं झालाच आहे पण धर्माचें ज्ञान

सर्वतोमुखी करून द्यावें. केसरीच्या लेखाकडे जशी सर्वांची दृष्टि ज
तशी धर्माच्या लेखाकडे सर्वांची दृष्टि जावी आणि सर्व समाजाचा तुल
त्मक समन्वय व्हावा " हा मुख्य हेतु दर्शविला होता. या विषय
महाराजांनीं प्रथम खंड व द्वितीय खंड असे दोन भाग करून प्र
खंडांत, अनादि वैदिक परंपरेनें चालत आलेला वेदान्ताध्ययनाचा न
सोडून वेदान्ताचा विचार करणाऱ्या आधुनिक लोकांचें वर्गीकरण के
आहे व त्यांचें प्रमादमूलक हेतुवैचित्र्य व त्यांच्या विचारसरणींतील दे
मोठ्या मार्मिक रीतीनें वर्णन करून शेवटीं "अशा स्थितींत वेदा
सर्वतोमुखी झालाच आहे असें लिहून त्याची उपेक्षा करणें धाडस होय
असें आपलें मत दिलें आहे. दुसऱ्या खंडांत धर्मशद्वाची मीमांसा कर
समाजसुधारकांस अभिमत असलेला भौतिक अभ्युदय materi
prosperity धर्मद्वारां मिळविण्याची दुर्घटता सिद्ध केली आहे
धार्मिक लेखांविषयीं केसरीचा दृष्टांत विषम आहे हें सयुक्तिक दाखवि
आहे. शेवटीं भौतिक अभ्युदय वाढविण्यास न्यायवैशेषिकांतून जुनें भौति
शास्त्र material science काढून नवीनही शोध लावण्याची शक्य
व दिशा सुचवून या दिशेनें प्रयत्न केल्यास ५०।६० वर्षांतच अभ्युद
दृष्टीस पडेल असें वचन दिलें आहे.

या विषयासंबंधानें पुढील संवत्सरांतही महाराजांनीं कांहीं पत्रें लिहिल
आहेत. त्यांत पूर्वी आपल्या इकडे भौतिक शास्त्र अतिशय सुधारलेलें हों
पण सध्यां त्याची परंपरा अगदीं नष्ट झाली आहे हें सप्रमाण दाखवू
त्या शास्त्राचें पुनरुज्जीवन करण्याचीं साधनें वगैरे सुचविलीं आहेत. य
पत्रांचा निर्देश पुढें येईल.

तिसऱ्या पत्रांत मध्वाचार्यांच्या मतावर पूर्वपक्ष आहे. हें पत्र महारा
जांनीं वेद. श्रीनिवासशास्त्री यांस लिहिलेलें असून त्यास कारण अ
घडलें कीं मध्वाचार्यांचा मुक्काम या सुमारास नागपूर येथें कांहीं दिव
झाला होता. त्यावेळीं आचार्यांकडे बरीच जिज्ञासु मंडळी जाऊन शास्त्र
चर्चा करीत असत. या प्रसंगांत श्रीनिवासशास्त्री यांनाही आचार्यांक

जाऊन कांहीं प्रश्नांचा ऊहापोह करण्याची इच्छा झाली. परंतु त्या चर्चेस महाराजांवांचून महत्व येणार नाहीं हें जाणून व महाराजांस बोलावलें असतां ते येतीलच असा नियम नव्हता म्हणून त्यांची ती इच्छा मनांतली मनांतच राहिली. ही गोष्ट रा० गोपाल लक्ष्मण पाध्ये यांजकडून पुढें महाराजांस कळल्यावरून त्यांनीं हें पत्र लिहिलें आहे. या पत्रांत मध्वाचार्यांशीं वाद कोणत्या विषयावर सोयीचा झाला असता ती दिशा दाखवून जीवेश्वरभेदासंबंधानें पूर्वपक्ष मांडतांना शाद्बप्रमाणाविषयीं—वेदाविषयीं—ज्या कोट्या केलेल्या आहेत त्यांचें खंडण स्वानुपयुक्त मायावृत्तिनियमान्वयें करतां येतें व तें आपणास माहित आहे असें महाराजांनीं सुचविलें आहे. वरील तिन्ही पत्रें सप्तम यष्टींत छापलेलीं आहेत. पृ० अनुक्रमें १३४, १३६, १४४. पहा.

यावेळीं माधानास महाराजांचीं वऱ्हाडी भाषेंत श्रीकृष्णजन्मवर्णनपर कांहीं नवीन गाणींही झालेलीं आहेत. तीं वऱ्हाडांत माडीपूर्णिमेच्या दिवसांत कुणब्याच्या बाया म्हणत असतात त्या चालीवर असून प्रत्येक चरणाच्या शेवटीं "सयनाजी" असें पालोपद आहे.

---

श्रीज्ञानेश्वर माउली समर्थ.

शके १८३५ प्रमाथीनाम संवत्सरे. इ० स० १९१३–१९१४.



रामनवमी माधानची करून पुढें दोन अडीच महिनेपर्यंत महाराज माधान, सिरसगांवबंड, कुऱ्हा या भागांतच राहिले. यावेळेस महाराज बहुतकरून जवळ एकतारी बाळगित असत. हातीं एकतारी आहे, मुखानें ज्ञानराज माउलीचें नामस्मरण चाललें आहे, " धांवरे व्रजराया । किती अंत पहासी " ।। इत्यादि नवीन प्रेमळ पद्यमय वाणीनें भगवं-

ताला आळवीत आहेत, व वैशाख मासाच्या प्रखर उन्हांतून मार्ग क्र आहेत, असा या वेळचा बहुतेक थाट असे. सिरसगांवबंड येथें मुक्क असतांना धनलोभी शिष्याचे वर्णनपर एक कुशिष्याख्यान महाराज अभंगवृत्तांत रचलें.

या संवत्सरांतील महाराजांच्या पत्रव्यवहारांत सार्वजनिक धर्मनी शिक्षणाचा भाग विशेष दिसून येतो. धर्मग्लानीच्या काळांत मान जीवाची होणारी संशयग्रस्त स्थिती, बुद्धियोग देणारें भगवद्ध्यान सु बुद्धिनाश करणाऱ्या विषयध्यानाचें प्राबल्य, धर्माच्या नांवाखालीं अधर्मा प्रसार, शास्त्रविहित सत्तर्कांचा लोप होऊन कुतर्की बुद्धिवादाचें प्राब व भोळ्याभाविकांच्या श्रद्धेवर होणारे त्याचे आघात, पूर्वपरंपरारहित वे न्तादि शास्त्रांचें अध्ययन व त्यापासून येणारी "क्रियेवांण वाचालता" इत्य दि धर्मसंकटकालीन आपत्तींची जाणीव पूर्व धर्मस्थापकांनीं आपल्या प्रभा शाली श्रुतिशिर वाणीनें समाजांत उत्पन्न करून व त्यांच्या भेदभ्रमा छेद करून सनातन धर्मजाग्रति करण्याची जशी खटपट केली तशी महाराजांनींही समाजांत सांप्रत रूढ असलेल्या धर्मनीतिविषयक दोषां आविष्करण करून व केवळ स्वार्थैकपरायण वृत्तीनें परमार्थज्ञानाचा आभा दाखविणारा गुरुवर्ग, साधुवर्ग, योगीवर्ग व नुसतें ब्राह्मण म्हणवून घे ण्यासाठीं ब्राह्मणांशीं व्यर्थ कलह माजविणारा ब्राह्मणेतर वर्ग इत्यादि कांच्या मनोव्यापाराचें निरीक्षण व परीक्षण या पत्रव्यवहारांत करून जुना भक्तिपरंपरेची वाट निष्कंटक करण्याची खटपट केलेली आहे. या पत्रांच सारांश थोडक्यांत यथाक्रम पुढें देतो:--

गुरु म्हणविणाऱ्या दांभिक साधु वर्गाची परमार्थज्ञानाची कसोट पाहण्याच्या हेतूनें आरंभीं "प्रश्नकदंब" म्हणून एक ओवीबद्ध प महाराजांनीं नागपूरस्थ मंडळीस पाठविलें आहे व त्यांत तें पाठविण्याच हेतु असा दर्शविला आहे:—

---

१ सप्तम यष्टि पृ० १५७ पत्र २४ पहा.

" सर्व धर्म व भक्ति न मानून वेदान्ती म्हणविणारांची परीक्षा पाहण्याकरितां हा मी प्रश्नकदंब लिहीत आहे. × × योगावांचून जे ब्रह्मसुख आम्हांला मिळालें म्हणतात त्या द्विरेफांना आमचें कांहीं म्हणणें नाहीं.परंतु जे जिज्ञासु आहेत त्यांनीं सद्गुरूपासून काय विचारलें पाहिजे तेंच प्रश्न या लेखांत मी लिहीत आहे. × × याच्यायोगानेंच आम्हांसारख्या लोक मारून खाणाऱ्यांची नाडी हातांत येणार आहे × × तो ( प्रश्नकदंब ) मराठींत लिहिण्याचें कारण असें कीं संस्कृतवेत्ते वादामध्यें जी लबाडी करितात ती त्यांना करतां येऊं नये. मला या प्रश्नांचें उत्तर देण्याचा प्रसंग आल्यास मी तुकारामबोवाचे अभंगानें सुद्धां देईन. पुष्कळ संस्कृतवेत्त्यांनीं बोलतांना मला ज्या शिव्या दिल्या आहेत त्यामुळें त्यांच्याशीं बोलण्याचा मला कंटाळा आला आहे. भगवान् श्रीमच्छंकराचार्य स्वतः अनुभवस्वरूपच होते, परंतु वादी कोणी त्यांना अनुभवी भेटला नाहीं. माझ्या प्रश्नांचें उत्तर मराठींत दिलें पाहिजे.मला संस्कृत येत नाहीं. इ० " हे प्रश्नकदंब एकंदर चार आहेत व त्यांत सामान्य शब्दवादापासून न्याय, योग, वेदान्त, भक्ति आदिशास्त्रांपर्यंत अनुभवाचे प्रश्न विचारलेले आहेत. अशाच प्रकारचे प्रश्न यापूर्वी महाराजांनीं कृष्णानंदप्रभृतींस विचारले आहेत व त्याचें सारभूत तत्व " संप्रदायसुरतरूंत " येणेप्रमाणें नियत करून ठेविलें आहे:—ओवी—पूर्वीं मी भाष्यांतील आक्षेप काढून । वेदान्ताभिमानीयांसी करीत होतो भाषण । कीं कोणीतरी उत्तर द्यावें भाष्य समजून । परी अवघेचि मान डोलवित होते ॥ यास्तव मज आलें कळून । कीं ज्ञान नोहे सद्गुरुरहित शास्त्र वाचून ॥ × × ×

सारांश, " तद्विद्धि प्रणिपातेन " या भगवदाज्ञेप्रमाणें सद्गुरुसेवापूर्वक संप्रदाय परंपरागत ज्ञानाभ्यास न करतां नुसतीं पुस्तकें वाचून योगी, वेदान्ती, किंवा भक्त बनणें शक्य नाहीं या त्रिकालाबाधित तत्वाचेंच पुनरुज्जीवन करण्याच्या हेतूनें महाराजांनीं वरील प्रश्नकदंबांची योजना केलेली आहे. असो.

आर्यधर्माचें भव्य, उदात्त, व उज्वल स्वरूप संप्रदायपरंपरेनेंच काय: राहणें शक्य आहे व पूर्वाचार्यांची कीर्ति निष्कलंक ठेवणें हें संप्रदा‍ि कांचें मुख्य कर्तव्य आहे हें तत्व पुढील पत्रांत महाराजांनीं प्रतिपाद केलें आहे. ( पत्रांक २२ ). न्यायवैशेषिक शास्त्रांतून जडशास्त्र mater. ial Science काढून स्वपद्धीचा ग्रंथ रचतां येईल. असें आपलें म डॉ० मुंजे यांना कळविण्याकरितां महाराजांनीं हें पत्र लिहिलें आहे अशा प्रकारचा ग्रंथ रचावयाचा असल्यास तो " मूळाचें भाषांतररूप " न होतां " भाषांतराचें मूळरूप " झाला पाहिजे अशी आस्था न बाळ- गल्यामुळें कांहीं संस्कृत ग्रंथकारांनीं कशा विचित्र चेष्टा केल्या आहेत व त्यामुळें वैशेषिक व जडशास्त्र यांना कायमचें वैकल्पिकत्व कसें आलें आहे हें सप्रमाण सिद्ध करण्याकरितां न्यायशास्त्रावरील न्यायप्रदीप नामक ग्रंथाची महाराजांनीं समीक्षा केली आहे. त्यांतली महाराजांचीं पुढील अभिप्राय वाक्यें वाङ्मय मर्मज्ञांस मननार्ह आहेतः—" यांत (न्यायप्रदीपांत) न्यायाचे तात्पुरते विषय सर्व आले असून ग्रंथकारानें पाश्चात्य समन्व- याची खटपट केली आहे. ती ग्रंथकाराच्या विद्वत्तेची दर्शक असली तरी महामुनि अक्षपाद व कणादकीर्तीला उज्वल करणारी नाहीं. स्वतःचें नांव करून घेणें गौण कर्णाला देखील सुलभ आहे. पण तेवढ्यानें तो योग्यतेस चढला तरी कुळाचें नांव होत नसतें. कुळाच्या नांवाकरितां परंपरागत सचोटी दाखवावी लागते. तेव्हांच तें कुल पुढें हजारों पिढींना सन्मार्ग दाखविणारें होतें. जड शास्त्राचे ग्रंथ हक्सले, टिंडाल, जेम्स इत्यादिकांचे पाठ करून एखादा संस्कृत ग्रंथ लिहिला तर त्यांत लिहि- णारा गुणग्राहक व अव्याहत श्रम करणारा आहे असें कोण म्हणणार

---

१ मूळाचें भाषांतर म्ह० आंग्ल ग्रंथांवरून स्वभाषेंत किंवा संस्कृत भाषेंत केलेला ग्रंथ व भाषांतराचें मूळ म्हणजे आंग्ल ग्रंथ आर्यग्रंथांची भाषांतरें आहेत असें स्पष्ट दाखविणाऱ्या पद्धतीचा ग्रंथ. हें पुढें महाराजांनीं स्पष्ट केलें आहे.

नाहीं ? पण अखेर तें ठरणार वैश्याचेंच काम. सर्व जगत व्यापारी बनविण्याचाच त्याचा उद्देश. परंतु निजभावाची व औदार्याची खूण यांत सांपडावयाची नाहीं. कोणत्याही कुलांत असून स्वतः वर येणें मोक्षसाधक होईल कदाचित् पण अभ्युदयाकरितां कीर्तिदिवाकर परंपरेनेंच मेघानाच्छादित ठेवित आलें पाहिजे. × × अलीकडे समन्वय शब्द फार बोकाळला असून पतिव्रता व वेश्या एका पंक्तीला बसविण्यापर्यंत त्याला वाचकत्व येऊं लागलें आहे. " एकाधिकरणकाभिन्नवृत्तित्वेसति संप्रदाय विच्छेदराहितत्वेसतिच पूर्वानेक फलोद्दिष्टभानंतरमेकफलजनकत्वं समन्वयलक्षणम् " हें त्याचें स्वरूप आतां लुप्त होत चाललें आहे. सर्व जातीचा एककार करणें याचें नांव जसें अद्वैत रूढ झालें आहे, तसें बालाचें, महात्म्याचें, वेश्येचें, वेड्याचें वाक्य कोणत्यातरी अर्थानें एकत्र मिळविणें यालाच समन्वय म्हणणें आतां रूढ झालेलें आहे. यामुळें कांहीं दिवसांनीं प्रत्येकाचें बोलणें शास्त्रच होईल कीं काय असेंही मन मांडे खाऊं लागलें आहे. ही गोष्ट बापूदेव शास्त्रीचे बीज गणितावरील ग्रंथ वाचल्यास कळून येण्यासारखी आहे. याचा स्पष्ट मासला वर नामनिर्देश केलेल्या न्यायप्रदीपांत आहे. आतां आमचें असें म्हणणें नाहीं कीं गुणाग्राहकतेनें कोणाचेही गुण घेऊं नयेत.परंतु मी अमुकाचें भाषांतर केलें आहे असें तरी स्पष्ट म्हणावें. आर्ष निरूपण करतांना नवीनांची घालघुसड करूं नये. "

याच पत्राच्या द्वितीय खंडांत महाराजांनीं न्यायप्रदीपकारावर एक प्रश्न टाकला आहे तो असा कीं योगियाला जर परमाणु दिसतात तर ते कणादाला दिसले असलेच पाहिजेत, आणि कपिल व पतंजली योगी होते मग त्यांना ते दिसून त्यांनीं त्याचा अंगिकार कां केला नाहीं ? वेदान्ति, सांख्य, व योगी यांच्यावर हा प्रश्न कसा येऊं शकत नाहीं तें सांगून नैय्यायिकालाच महाराजांनीं त्याचें उत्तर मागितलें आहे.

" आपण भाषांतरावरून ग्रंथ लिहित असतों " या नगरकराच्या

आक्षेपाचेंही निरसन याच पत्रांत महाराजांनीं सप्रमाण केलें आहे व मराठी ग्रंथ लिहितों म्हणून नगरकराचें तें नुसतें माझ्या विषयींचें मान होतें " असें म्हटलें आहे. पुढें आपला संस्कृत भाषेविषयीं अत्यंत आदर आहे तथापि तुकारामादिकांच्या ग्रंथांना तुच्छ सम धातुमात्र संस्कृतवेत्ते कोठें चुकतात तें स्पष्ट दाखवून व्याकरण हें व अनवश्यक आहे व आगमपूर्व सिद्धीला संस्कृत आणि मंत्रासिद्धील ज्ञानाला कोणतीही भाषा चालते असें आपलें मत दिलें आहे. तिसरें (पत्रांक २३) जैनमताच्या उद्घाटनासंबंधीं असून महाराजांची स न्वेषण जिज्ञासा त्यांत उत्तम दिसून येते. ते म्हणतात:—" नैक न्नसंभवात् " या सूत्रभाष्यांत जैनमताचें खंडन करतांना भगवान शं चार्यांनीं नित्यमुक्त, मुक्त व बद्ध असे जीवाचे तीन प्रकार जैनम मानतात असें म्हटलें आहे व त्या भाष्यावरील रत्नप्रभा, आनंदा भामती व ब्रह्मविद्याभरण या प्रसिद्ध टीकाकारांनींही तसेंच म्हटलें अ परंतु आपल्या प्रत्यक्ष पाहण्यांत आलेल्या प्राचीन १४ व अर्वाचीन अशा एकंदर १७ जैन ग्रंथांत दोनच प्रकारचे जीव जैनांना म आहेत असें स्पष्ट दिसतें व विद्यारण्य स्वामींनीं निरूपण केलेल्या जैन द नांतही दोनच प्रकारचे जीव सांगितले आहेत. तेव्हां आनंदगिरी प्र तींनीं वर दिलेले तीन प्रकारचे जीव जैनांना मान्य आहेत असें म्हटलें असावें ? अशी शंका काढून महाराज म्हणतात:—" भामत कल्पतरु नांवाची टीका आहे त्यांतही हें स्पष्ट केलें नाहीं. जेथें आम्ह संशय तेथें टीकाकारांनीं निरूपण करूं नये अशा प्रकारचीं उदाहरणें आ पल्याकडील ग्रंथाचींच मला मोजून हजार देतां येतील. तेव्हां आप लोकांच्या विद्याव्यासंगाचें मला आश्चर्य वाटतें. मर्जी प्रभूची. " या " शंकराचार्यांनीं जें जैन मताचें खंडन केलें आहे तें बरोबर नाहीं असा जैन पंडितांकडून येऊं पाहाणारा दोषारोप व जैनांच्या प्राच समयसार व अर्वाचीन सम्यकज्ञानदीपिका या दोन ग्रंथ झालेली शांकरवेदान्ताची भेसळ दाखवून व " सप्तभं

नया " विषयीं तत्वनिर्णयप्रासादकारांच्या म्हणण्याचें खंडण व भगवान शंकराचार्यांच्या म्हणण्याचें मंडन करून महाराजांनीं असें अनुमान काढलें आहे कीं " तीन प्रकारचे जीव मानल्यास आपल्या महत्वाच्या बाबी सोडून द्याव्या लागतात असें समजून जैन लोकांनींही ग्रथांत बदल केली असावी. " व " गुप्तरीतीनें जीवाचे तीन प्रकार अझूनही जैनांत मानले जात असावेत. " शेवटीं " आनंदगिरीप्रभृति खोटें बोलणारे नव्हते असें माझें पक्कें मत आहे. आर्यांचें म्हणणें योग्य आहे हें सिद्ध करण्याशिवाय मला व आपणप्रभृति माझ्या हितचिंतकांना दुसरें कोणतेंही काम नाहीं. योग, सांख्य, वेदान्त जें कांहीं असेल तें आमचें हेंच. म्हणून आपण कांहीं ओळखीच्या जैन पंडिताशीं गांठ घेऊन जीवाचे तीन प्रकार कोण्या ग्रंथांत सांगितले आहेत याचा उत्तम शोध करून आनंदगिरी प्रभृतीवरील कलंकसंभवना मिटविण्याकरितां मला कृपाकरून पत्रोत्तरीं कळवावें. " अशी महाराजांनीं श्रीनिवास शास्त्री यांस विनंती केली आहे.

यापुढील पत्र ( पत्रांक २५ पृष्ठ १७४ ) प्रयत्नप्रारब्ध वादासंबंधाचें असून वेदांताच्या दृष्टिसृष्टिवादान्वयें प्रयत्नवादाचे त्यांत शास्त्रीय विवेचनपूर्वक महाराजांनीं मंडण केलें आहे. नागपुराहून रा० गोपाळ लक्ष्मण पाध्ये यांजकडून नुकतेंच जें एक पत्र आलें होतें त्यांत प्रारब्ध आणि प्रयत्न यांच्या गुंतागुंतीचा संबंध दाखविला होता, त्याचा निर्णय करण्याकरितां हें पत्र महाराजांनीं लिहिलें आहे. यांत वैयक्तिक प्रयत्नाचें योग्य स्वरूप, तो फसण्याचें व त्यांत जय येण्याचें कारण, त्यांत निश्चयानें जय केव्हां मिळतो व नैसर्गिक प्रयत्नावर जय कशानें मिळतो या विषयीं प्रथम सांगून नंतर प्रयत्नवादाचा व दृष्टिसृष्टिवादाचा खरा अर्थ न समजल्यामुळें कशा चुका होतात त्याचें सोदाहरण स्पष्टीकरण करतांना अद्वैतासिद्धीसारख्या जल्प ग्रंथांत प्रतिपादलेल्या दृष्टिसृष्टिवादाची झालेली हानी, अन्य शास्त्राचे परिष्कार वेदान्त शास्त्रास लावून विचार करणारांचा हास्यास्पद प्रयत्न व त्यामुळें वेदान्त शास्त्रावर येणारे दोष,

नुसत्या चमत्कारांनीं धर्मनिश्चय करूं पाहणारांना चार्वाकापेक्षांही येणारी ह
कोटी, इ० गोष्टींचें तात्विक विवेचन केलें आहे व शेवटीं दृष्टिसृ
वादाचें यथार्थ लक्षणसूत्र सांगून " त्या वादांत यावत्दृष्टिप्रत्यक्षत्व
स्तव प्रयत्नवाद दैववादापेक्षां प्रबल आहे " असा सिद्धांत सां
तला आहे.

याच पत्राच्या दुसऱ्या भागाला महाराजांनीं अणुखंड हें नांव दे
व त्यांत आर्यभौतिकशास्त्र न्यायवैशेषिकांतून कसें काढतां येईल याविष
दिग्दर्शन करून मुंजे डाक्तरच्या पत्राला मागें दिलेल्या उत्तरांची बहुते
परिसमाप्ति केली आहे. यांत प्रथम न्यायाच्या " तत्वचिंतामणि
ग्रंथाची अंशतः समीक्षा असून न्यायसंबंधी विचाराचें बाबतींत त्या
अपूरेपणा दाखविला आहे; व न्यायाचा विचार भौतिक शास्त्राचे दृष्टी
कसा करावा ती दिशा दाखवितांना आपल्या इकडील गणित करण्याच
रीति, सदृश गणित, व कालगणणेची पद्धति या संबंधानें नव्या शि
लेल्या लोकांच्या म्हणण्यांतील चुका सोदाहरण व सप्रमाण दाखविल
आहेत व हीट, ( Heat) लाइट, (light) वगैरे फिजिक्सची प्रकर
न्यायांतून सांगतांना पारकीय सायन्सवर कसकसे आक्षेप येतात हे मोठ
मार्मिक रीतीनें शास्त्रीयमीमांसापूर्वक दाखविलें आहे; व आधुनिक सुशिक्षि
लोक जसें ईथरला ब्रह्म, electron theory ला वेदान्त व बोसच
रिस्पान्सला चैतन्य म्हणूं लागले आहेत, तसें आभासमात्र किंवा बह
विणारें आपलें म्हणणें नसून, तें भाषांतराच्या मूळाप्रमाणें, म्हण
Engish Science तंतोतंत संस्कृताचे भाषांतरच आहे हें सि
करून देण्याच्या धाटीचें असल्याविषयीं सांगून व शेवटीं, कोणकोणत
आर्यग्रंथांतील उपपत्ति व कलावचनें मिळून भाषांतराचें मूळरूप अ
आर्य भूतशास्त्र प्रयत्नाअंतीं तयार करतां येणे शक्य आहे व दुर्घटवृत्या
प्राचीन ग्रंथांवरून नवीन शब्द करण्याची आज्ञा व वैशेषिक शास्त्रांत शब्द
प्रमाण न मानतां प्रत्यक्ष व अनुमान हीं दोनच मानलेलीं प्रमाणें, इत्यादि
कांमुळें फिजिक्स तयार करण्याची मोठी सवड आहे हें सांगून, अर्वा

धार्मिक लोकांनीं व नव्याबांड तरुणांनीं सायंटिफिक धर्मांची अपेक्षा कर-ण्यापेक्षां सायंटिफिक वैशेषिक शास्त्राची अपेक्षा करावी असें आपलें मत दिलें आहे.

त्या पुढील पत्रांत (पत्रांक २६ पृ० १८९) धर्ममीमांसा असून ज्याचा धर्म त्याला श्रेयस्कर कसा आहे याचें प्रतिपादन आहे. या पत्रांतील मुख्य विषय असे:—धर्मांची निष्ठेपासून उत्पत्ति, जगांतील सर्व धर्मांचा कर्मशरण्य व ईश्वरशरण्य या दोन कोटींत अंतर्भाव, आर्यधर्मांचा विशेषेकरून ईश्वरशरण्य कोटींत अंतर्भाव, त्याचा उदात्तपणा व व्यापक दृष्टि, आर्यधर्माचे आगमिक व कल्पित असे दोन भेद, आगमाचें तत्व पाळण्यांत चुकीची शक्यता व अनेक धर्मांचा व पंथांचा उगम, चुकीची सर्वथा क्षमा करणें किंवा शिक्षा देणें याविषयीं इतर धर्मांचें व आर्य-धर्माचें म्हणणें, आर्यधर्मांतील ईश्वराचें स्वरूप, अनादि आगमाच्या दृष्टीनें केलेल्या चुकीचें फळ भोगल्याशिवाय वासनाप्रवाह दाबण्याची अशक्यता व अशा प्रमादशीलांना मिळणाऱ्या गतींतील तारतम्य, परांजप्यांच्या शिष्यांचें उदाहरण, स्वतःचा स्पष्ट व सत्यवक्तेपणा, नारदमुनींचें उदाहरण, आगमाच्या दृष्टीनें चुकलेल्यांची कल्पित धर्मांच्या द्वारानें गति, जन्म-जातीवादाचें थोडें महत्त्व, गुणकर्मवादाचा ऋषींसारख्या तीव्रसंवेगियांना उपयोग, निष्ठा ठेवतांना रागद्वेष केव्हां उत्पन्न होतात? चुकीचें फळ भोगून कंटाळा आल्यावर आपलें अध्यस्त स्वरूप सोडून देण्याकरितां अडचणींतून गति शोधण्याला कर्मशरण्य धर्मांत जीवाची अशक्यता व आर्यधर्मांत अशा अनंत गती शोधण्याचें सौलभ्य असल्यामुळें त्याची ईश्वर-शरण्य कोटींत गणना.

अशा रीतीनें संप्रदायिक व परिचित मंडळीच्या निमित्तानें पत्रद्वारा समाजशिक्षण देण्याचा महाराजांचा क्रम चालू असतांना जुन्या भोळ्या भाविकांच्या श्रद्धेवर तर्कटीविचारपद्धतीचे आघात पारकीय उदाराशिक्षण पद्धतीच्या सुधारणा यंत्रांतून होऊं लागले होते. त्यांचा वेग थांबविण्या-करितां वर्तमानपत्रीय लेखमालेची प्रतिक्रिया महाराजांस सुरू करावी

लागली. नुकताच अशा प्रकारचा एक लेख केसरी वर्तमानपत्राच्या ता
२२ व २९ एप्रील १९१३ च्या अंकांतून रा० रा० वामन परशुरा
फणसळकर यांनीं प्रसिद्ध केला होता. हा लेख मुमुक्षु पत्रांत प्रसि
झालेल्या ता० २० मार्च १९१३ च्या "तुकाराम महाराजांचें सदे
वैकुंठगमन" या लेखावर १९ कलमी प्रतिपक्ष असून वारकरीमंडळां
पूर्वापर चालत आलेल्या समजुतीवर एक मोठा आघातरूपच होता
मुमुक्षूच्या लेखांतील "पारसनीस, राजवाडे, केळूसकर प्रभृति अर्वाची
विद्वान व संशोधक यांस व सामान्यतः आधुनिकांपैकीं बहुतेकांस तुकारा
महाराज सदेह वैकुंठास गेले ही कल्पना मान्य नाहीं तथापि संतसज्जनां
परंपरा अशी आहे कीं, महाराज सदेह वैकुंठास गेले व महाराजांचे
प्रयाणासंबंधाचे अभंग हेंच सांगत आहेत." या व अशा प्रकारच्या
विधानांवर केसरींतील लेखकांचा कटाक्ष असून त्याचें त्यांनीं खंडन कर-
ण्याचा यत्न केला होता. त्यांच्या लेखांत विशेषतः "तुकोबांनीं हा मर्त्य
देह ह्या मर्त्यभूमींतच म्हणजे इंद्रायणीच्या डोहांत सोडून दिला असल
पाहिजे. त्यांनीं यदृच्छेनें इंद्रायणींत जलसमाधी घेऊन आपला मलमासांच
देह येथेंच विसर्जन केला. तुकाराम महाराज वैकुंठास सदेह गेले हें भोळ-
वट वारकऱ्यांचें मत असून ही हूल पिकविली गेली. निळोबाराय व रामे-
श्वरभट्ट यांच्या म्हणण्यांत कांहीं विशेष तथ्यांश नाहीं. ते अंधभक्तीनें जें
बोलले तो केवळ अर्थवाद आहे. सत्पुरुष भक्तिभावानें जें लिहितात तें
सवच खरें असतें असें नाहीं. त्यांत कवित्व, प्रेमातिशय, अर्थवाद वगैरे
गोष्टी असतात. मलमूत्रानें भरलेला हा ओल्या मातीचा देह वैकुंठांत
राहण्यायोग्य नाहीं. कारण तो दुर्गंधादिकांनीं पूर्ण आहे. आणि देवांचे
देह तेजोमय असतात व सौगंधिक असतात. पूर्व देहाचें रूपांतर देह
पडल्यावांचून होत नाहीं. चुडाला राणीनें आपला देह खोलींत कोंडून
ठेवून दुसऱ्या देहानें शिखिध्वजाला ज्ञानोपदेश केला, श्रीशंकराचार्यांनीं
अमरु राजाच्या शरीरांत प्रवेश केला, सनकादिक व पांडुरंगाची मूर्त्यादिक
तुकाराममहाराजांना प्रत्यक्ष दिसले नाहींत." इत्यादि मुख्य मुद्दे व युक्ती

असून देह टाकल्यावांचून त्याचें रूपांतर होत नाहीं असा त्यांचा सारांश काढला आहे व तदनुसार कांहीं वचनांचा अर्थही केला आहे.

या सर्व आक्षेपांचें निरसन महाराजांनीं मुमुक्षु वर्तमानपत्राच्या तारीख ८ मे १९१३ व ता० २९ मे १९१३ या दोन अंकांत विस्तृत व सप्रमाण लेख लिहून केलें आहे व आपल्या नेहमींच्या श्रुती, युक्ती, व अनुभवयुक्त प्रतिपादनशैलीनें भौतिक देह देवलोकीं रहाण्यास योग्य आहे, पूर्व देह न पडतां पार्थिव देह तैजसप्रधान करतां येतात व ते आकाशांतून देखील चालण्यास समर्थ असतात, तुकाराम महाराजांचा देह अवतारदेह होता व अवतारदेह मायाकार्य किंवा सात्विकभूतकार्य असल्यामुळें त्याला वैकुंठांत रहाण्यास हरकत नाहीं. इत्यादि गोष्टी सिद्ध करून तुकारामांनीं जलसमाधी घेतली या आक्षेपाचें निरसन केलें आहे व लेखकांनीं अर्थवादाचें केलेलें लक्षण अपुरें कसें आहे तें दाखवून अर्थवादाचें यथार्थ लक्षण सांगितलें आहे व तुकाराम महाराज वैकुंठास गेले या वाक्याचा भूतार्थवादांत समावेश होत असून त्याला स्वार्थीप्रामाण्य येत असल्यामुळें बळेंकरून तुकाराम महाराजांच्या सदेह वैकुंठ गमनाची सिद्धि कशी होते तें दाखविलें आहे. पुढें सत्पुरुषांच्या बोलण्यांतील काव्य देखील तीव्र संवेगानें सत्य होतें हें योगवासिष्ठाचें म्हणणें, देवतांचा व पूर्व लोकांचा समागम होत होता याविषयीं श्रीमच्छांकरभाष्याचें प्रमाण, ब्रह्मवेत्त्याचें सशरीर आकाशगमन श्रीमच्छंकराचार्यांना मान्य होतें याविषयीं सूत्रभाष्यांतील उदाहरण इ० प्रमाणें देऊन लेखकाच्या मुद्यांचें महाराजांनीं मार्मिक समीक्षण केलें आहे. त्याचें स्वारस्य कळण्याकरितां महाराजांचे दोन्ही लेखच साग्र वाचून पाहिले पाहिजेत.

असो. आतां पुन्हां पत्रव्यवहाराकडे वळलें पाहिजे. (सप्तम यष्टि. पत्रांक २७ पृ० १९३) या पत्रांत राजयोगासंबंधानें चर्चा आहे. यांतील विषयक्रम:—सर्वयोगप्रक्रियेंत राजयोगाची श्रेष्ठता, राजयोगाची व हठयोगाची सांगड व त्यांत येणारा निरनिराळ्या शक्तींचा निरोध. अभ्यास

आणि वैराग्य या दोहोंची निरोधास आवश्यकता. चित्ताच्या मूढ, क्षिप्तादि अवस्था संपून पूर्ण निरुद्धावस्था प्राप्त होण्याला संपूर्ण योग-शास्त्राचा थोडक्यांत क्रम. मृत्यूच्या भीतीचा निःशेष त्याग करण्याची आवश्यकता. मृत्यूची भीति सोडणाऱ्या लोकांच्या स्थितीविषयीं विचार. गीतेंत सांगितलेल्या जन्मजरादि दोषदर्शनांचा हेतु. योगाचा अधिकारी व योगांत पूर्णता मिळविणाराचे गुण. शारीरिक भयामुळें भक्ति सोपी व योग कठीण अशी बऱ्याच लोकांची चुकीची समजूत. सामान्य लोकांस भक्तिहून योगाचें सौलभ्य, रजोगुणाच्या अनादि प्रवृत्तीचा रोध करण्यांत सत्वगुणाचा अतिशय एकात्मक प्रबल वेग व स्थैर्य.

पत्रांक २८ पृ० १९७ यांत धर्मनिष्ठेविषयीं विचार आहे. मागें २६ व्या पत्रांत धर्माची मुख्यतः निष्ठेपासून उत्पत्ति सांगून स्वधर्मनिष्ठेचें महत्व सांगितलें होतें. या पत्रांत स्वधर्मनिष्ठा डळमळीत होण्याच्या कारणांची मीमांसा आहे. प्रथम संशयी विद्वानापेक्षां निष्ठावान् भोळ्या माणसाचीच अधिक योग्यता परमार्थांत किती आहे तें सांगून सांप्रतच्या काळांत लोकांची धर्मशून्यता,शास्त्रावर अर्धवट विश्वास ठेवणाराची स्थिति व त्याचें विपरीत फळ याविषयीं निरूपण केलें आहे. पुढें स्वधर्मावरील निष्ठा क्षीण होण्याला जगांस जीं साधारण कारणें घडतात त्यांपैकीं मुख्यतः कोणी साधु म्हणविणारा आपल्यास फसवील काय ? ही शंका व सामान्य नीति ईश्वराचे ठिकाणीं किंवा महापुरुषाचे ठिकाणीं आत्यंतिक असूं शकते असा फाजील विश्वास ठेवणें या दोन्ही संशयांचें सयुक्तिक निरसन करून न फसावें अशी इच्छा असल्यास विषयासक्ति सर्वथा सोडणें हा उपाय सांगितला आहे व खऱ्या निष्ठावंतांना अनेक ठेंचा लागल्या तरी त्या ठेंचांनीं त्याचें अदृष्टच नाहींसें होतें, निष्ठा नाहींशी होत नाहीं, पण धरून बांधून ठेवलेल्या निष्ठेचा मात्र अशा स्थितींत चुराडा होतो हा निष्ठेचा स्वभाव सांगितला आहे व सामान्य नीति साधकाकरितां असून त्यानेंही तिचा अभ्यास समुच्चयपूर्वक केल्यानेंच उपयोगी कसा होतो या-

—

विषयीं विवेचन करून श्रद्धा अढळ ठेवण्याचा मार्ग दाखवून दिला आहे.

पुढील दोन पत्रें ( पत्रांक ३० व २९ ) ब्राह्मण जातीशीं कलह कर-णाऱ्या इतर जातींची स्थिती सुधारण्यासंबंधाचीं असून आपणांस वेदविद्या शिकविली नाहीं एवढ्याच मुद्यावर व्यर्थ कलह करणारांस त्यांत प्रश्न विचारलेले आहेत व सरकारच्या दृष्टीनें व धर्मदृष्टीनें हें भांडण किती निरर्थक आहे हें सिद्ध करण्याकरितां त्या प्रश्नांचें सविस्तर विवरण करून मुद्देसूद चर्चा केलेली आहे. या दोन्ही पत्रांचा पूर्वापर संबंध कळण्या-करितां मागल्या सिरसगांव प्रकरणांतील सत्यशोधकांच्या वृत्तांताची आठ-वण केली पाहिजे. ( सिरसगांव प्रकरण पृ० ६७ पहा. ) त्यावेळीं सत्य-शोधकांनीं महाराजांस आपल्या समाजांत ओढण्याचे केलेले प्रयत्न, त्यांच्या सभेंत महाराजांनीं त्यांच्या मताच्या विरुद्ध केलेलें भाषण, " याला ब्राह्म-णांनीं शिकवून ठेविलें आहे, या पोराचें ऐकून आपल्या जातीचें काय पुरे पडणार आहे " असें त्यावर त्या मंडळीचें मिळालेलें प्रत्युत्तर, व " मोठ्या शहरांत जाऊन आपल्या वाणीचा परिणाम दाखविल्या शिवाय या नीच लोकांवर आपलें वजन बसणार नाहीं व फुकट आपलें नांव सत्यशोधकांत गणलें जाईल " असें वाटून " धर्मस्थापनेची आपली मूळची वृत्ति " यशस्वी करण्याच्या हेतूनें महाराजांचें उमरावतीस येणें इ० गोष्टींचा विचार केला असतां या पत्रांतील निरूपणाचें महत्व कळून येणार आहे व २९ व्या पत्राच्या शेवटीं महाराजांनीं काढलेले उद्गार (सप्तमयष्टि पृ० २०३ किती निःपक्षपाताचे व सार्थ आहेत याचीही साक्ष पटणार आहे. ते उद्गार हे:—" ( सत्यशोधक ) समाज स्थापन होतांना व्यक्तीच्या देखील मनांत हे विचार आले नाहींत व को-ल्हापूरच्या प्रकरणांत शंकराचार्यांनीं देखील काढले नाहींत तेव्हां हिंदुधर्माला कोणी कळकळीचा त्राता नाहीं असेंच म्हणावें लागतें. " असो.

महाराजांच्या बुद्धींत प्रमाणप्राविण्य, प्रक्रियाप्राविण्य, व श्रुतिस्मृत्यादि

ग्रंथांतून सारभूत तत्व ग्रहण करण्याची शक्ति इत्यादि गोष्टींचें सतत ऐक्य असल्यामुळें या पत्रव्यवहारांत अर्थांतच त्यांचा अत्यंत अल्पकाल जात असे. बाकीच्या वेळांत त्यांचें नेहमींचें ग्रंथलेखन, शास्त्रनिरीक्षण, वेदान्त चर्चादि कामें चालत असत. यावेळीं कांहीं दिवस महाराज कुऱ्हा येथें राहिले होते. शास्त्रचिंतनांत महाराजांची वृत्ति जशी रंगत असे तशीच ती लौकिक मनोरंजनाच्या कथा, कहाण्या, गाणीं वगैरे गोष्टींतही रममाण होऊन त्यांतून सारभूत तत्व काढण्यांत तत्पर रहात असे. याविषयीं मागें वर्णन आलेंच आहे. त्याप्रमाणें कुऱ्हा येथील महाराजांच्या कार्यक्रमांत शांकरदिग्विजयादि ग्रंथांचें जसें वाचन चालत असे व तात्विक गोष्टींचा ऊहापोह होत असे त्याप्रमाणेंच एखादे वेळीं रात्रींचे एक दोन प्रहर वाघ्यांचें गायन ऐकण्यांत खर्च होऊन " परात परमेश्वर देव भक्तांचा कैवारी । हरिभजनाला इसरू नको पावल अंतरीं ॥ " इत्यादि अशिक्षित कवींच्या प्रासादिक वाणींतील भक्तिरसाचेंही महाराज अभिनंदन करीत असत. याप्रमाणें चोख्यांचें भजनही महाराजांनीं एकदोन वेळ ऐकलें.

घरच्या वडील माणसांशींही महाराजाचें वर्तन किती चोख व न्यायीपणाचें असे याचें एक ताजें उदाहरण यावेळीं घडून आलें तें असें:—

मागें देऊरवाड्याच्या कात्यायनीचे वेळीं पुढील कांहीं विशेष सांप्रदायिक कार्यांवर नजर देऊन आपल्या वडिलोपार्जित मिळकतीचा हिस्सा महाराजांनीं पाटीलबोवा जवळून ( चुलत्याजवळून ) घेतला होता. हल्लीं महाराजांचा मुक्काम इकडील भागांतच असल्यामुळें पाटील बोवांची जेवणाखाणाची अव्यवस्था जाणून माधानास आपल्या इकडेच त्यांनीं त्यांची जेवणाची व्यवस्था ठेविली होती. इतक्यावरूनच पाटीलबोवांनीं पुन्हां पूर्ववत् एकत्र राहण्याविषयीं महाराजांस पत्रद्वारें कळविलें. या पत्राचें उत्तर महाराजांनीं पुढीलप्रमाणें कुऱ्ह्याहून पाठविलें.

तीर्थस्वरूप आपाजी ऊर्फ रघुजीपाटील माधान यांचे चरणीं

बाळकें गुलाब याचा त्रिकाळ चरणावर मस्तक ठेवून शिर सां० नमस्कार वि० वि०.

आपला घराचा निरोप मला कळला. आपली सेवा करणें माझें कर्तव्य आहे व तें मी माझ्याच्यानें होईल तेवढें करीन. परंतु ज्या कारणाकरितां चार लोकांसमोर धिंदवाडेपंचवाडे झाले त्यांत मला पुनः पडावें अशी इच्छा नाहीं. असें जर आपणास करावयाचें होतें तर लोकांजवळ माझ्याविषयीं विचित्र बोलण्याचें कांहीं कारण नव्हतें. आतां पुनः त्यांत पडल्यास पाटीलबोवाचें डबुलें सावडण्याकरितां महाराजांनीं त्यांना मिळवून घेतलें असें म्हटल्याशिवाय लोक सोडणार नाहींत. तेव्हां जिकडून लोकांचा शद्ब मजवर येणार नाहीं असें करणें बरें. मी जे आपली थोडीबहुत सेवा करण्याची इच्छा करितो ते कांहीं हिश्याकरितां नाहीं तर मी आपलें कर्तव्य समजतों म्हणून. आपला हिस्सावाटा आपण खुशाल विकून टाकून किंवा शंकराला अर्पण करून माझ्याजवळ येऊन रहावें. माझी व्यवस्था होते तशी आपलीही करीन. अनंताचें प्रारब्ध अनंताचें साथ. आपही मरगये डुबगई दुनिया. परंतु चार लोकांचा फुकट शद्ब घेणें ठीक वाटत नाहीं. यावर आपली इच्छा असेल तशी पत्रोत्तरीं कळवितील. ती० काकाजीनें ( बकारामजी ) देखील आपला हिस्सा कृष्णार्पण केल्यास मी नाहीं म्हणत नाहीं. पोरांना मात्र देऊं देत नाहीं. त्याबद्दल मी अडथळा केल्यावांचून रहणार नाहीं व आपणही खटपट करावी. तुम्ही आपले दोघांचेही हिस्से शंकराला वाहिल्यास फार बरें होईल. वरवर सांबजी सांबजी म्हणून पैसा झांकून ठेवल्यानें देव मिळत नाहीं. कळावें ही विनंती.

आपला उद्धट
गुलाब.

असा कार्यक्रम चालला असतांना वैशाख वद्य अष्टमीचे दिवशीं उत्तर रात्रीं महाराजांस श्रीनिवृत्तिनाथांचा दृष्टांत झाला. ही गोष्ट महाराजांनीं

अभंगवृत्तांत वर्णन करून रात्रभर भजन केलें व दुसरे दिवशीं ब्राह्मण भोजन वगैरे केलें.

यानंतर कुऱ्ह्याहून वैशाख वद्य १३ चे दिवशीं महाराजांनीं सर्व मंडळीसह उमरावतीस प्रयाण केलें व तेथून पादुका व देव सेठ अंबादास मारवाडी यांजबरोबर कांहीं मंडळीसह यावलीस पाठवून बाकीच्या मंडळीसह आपण नागपुरास गेले व तेथल्या मंडळीस सुमारे दोन महिने पर्यंत आपल्या सत्सहवासाचा लाभ देऊन आषाढ अखेर उमरावतीस परत आले.

उमरावतीहून पुन्हां सात पत्रें संप्रदायिक मंडळीला महाराजांकडून गेलेलीं आहेत. (सप्तम यष्टि पत्रें ३१ ते ३७) त्यांपैकीं पहिल्या दोन पत्रांत आलीकडील दांभिक साधुवर्गावर टीका असून वर्णाश्रमकर्म, भगवत्कीर्तन किंवा साधनचतुष्टयसंपत्ति यावांचून नुसतें हरिनाम घेऊन वाटेल तसें वागावयास शिकविणारा अशिक्षित वर्ग व संप्रदायपरंपरेनें वेदान्त विषय अनुभवारूढ करून न घेतां विद्यार्थ्यांप्रमाणें वेदान्ताचे ग्रंथ घडाघड पाठ म्हणून यथेष्टाचरण शिकविणारा सुशिक्षित वर्ग यांच्या दंभवृत्तीचें यथार्थ निरीक्षण केलें आहे, अशा प्रकारच्या लबाडीच्या कचाट्यांतून सुटून उदरंभरण करण्याचे दुसरे उपाय सुचविले आहेत व खरे वेदान्ती प्रारब्धाच्या भोगाबद्दल नाखुष असून आत्मनिष्ठ असूनही आपल्या चुका पहिले पासूनच कसे कबूल करीत असतात तें सांगून चहूंपायीं मोकळा वेदान्ती गुरु होण्यास पात्र होत नाहीं असें आपलें मत दिलें आहे.

तिसरें पत्र (पत्रांक ३३) उपासनामीमांसेविषयीं आहे. यांत अध्यात्मज्ञानाला मनुष्यजन्मच योग्य. थोड्या श्रमानें कोणाला आत्मप्राप्ति होते?

---

१ महाराजांची अभंगाची गाथा. अभंग २०४६ ते २०५० व ५२५ ते ५३९ पहा.

तीन प्रकारच्या मानसिक क्रिया व त्यांचें सौलभ्य कोणाला असतें ? चंचल मन जितकें जास्त तितकी बुद्धि मंद. वैदिककालीन ऋषींना पंचावयवी तर्काची अनवश्यकता. निर्विकारी दृढ श्रद्धेचें महत्व व तिचा अनिवार्य स्वभाव इ० गोष्टींचें निरूपण आलें आहे.

चवथ्या पत्रांत ( पत्रांक ३४ ) आधुनिक कालांतील वेदान्ताध्ययनाच्या हीन स्थितीविषयीं आणखी कांहीं अधिक उदाहरणें देऊन वेदान्त शिकतांना कोणत्या खबरदाऱ्या घेतल्या पाहिजेत याचें विवेचन आहे.

पांचवें व सहावें हीं दोन पत्रें (पत्रांक ३५ व ३६) भौतिक शास्त्रांत शिक्षकाची पदवी मिळविलेल्या एका गृहस्थास महाराजांनीं लिहिलीं आहेत. पूर्वी आपल्याकडे भौतिकशास्त्र अतिशय उज्वल व सुधारलेलें होतें, त्यांत विमानादिकांच्या यांत्रिक कला अत्यंत पूर्णतेस आलेल्या होत्या इ० गोष्टींचें नवीन सोपपत्तिक विवेचन या पत्रांत असून न्यायांतील अश्रौत असा परमाणुवाद मोक्षाकरितां नसून भौतिक उन्नतिकरितांच आहे व ह्या परमाणुवादादिकांचा उपयोग लोकांनीं भौतिक उन्नतिकडेच करावा असा आमच्याकडील महात्म्यांचा प्रायः ध्वनीरूप आशय, आपल्या न्यायसंज्ञक भौतिक शास्त्रापासून नास्तिकवाद वाढण्याचा असंभव, त्या शास्त्राची सध्यां नष्ट झालेली परंपरा व संस्कृत पंडितांकडून त्याच्या ( न्यायशास्त्राच्या ) पदार्थ खंडाला चालन मिळण्याची जरूरी, इत्यादि मुद्दे विचार करण्यासारखे आहेत व सध्यां हे आपले लेख बाल्यदशेंतले असल्यामुळें भौतिकशास्त्रज्ञांनीं व नैय्यायिक पंडितांनीं त्यांवर टीका न करितां त्यांचा विचार करून उत्तेजन द्यावें, त्यांत सुचविलेल्या प्रयत्नाच्या दिशेनें एखादा समाज काढून आपल्या सूक्ष्मबुद्धीचा उपयोग करावा, व या विषयावर एखादा स्वतंत्र ग्रंथ लिहून भाषांतराच्या मूळाप्रमाणें त्याला शोभा आणावी म्हणजे लोप झालेलें आपलें आर्य लोकांचें भौतिकशास्त्र पुनः उदयास आल्यावांचून रहाणार नाहीं असा महाराजांनीं आपला आशय व्यक्त केला आहे.

सातव्या पत्रांत ( पत्रांक ३७ ) अलीकडील धर्मसुधारकांच्या विपरीत हेतूचें समीक्षण असून इहलोकाकरितांच होईल त्या रीतीनें धर्माच्या सामुग्रींत फेरफार केल्यास धर्माची अगदीं खेदप्रद स्थिती कशी होते याविषयीं फार मार्मिक विवेचन केलें आहे. या पत्रांतील पुढील विधानें व विचार धर्मजिज्ञासु सज्जनांस चिरस्मरणीय होण्यासारखीं आहेत:— " धर्माचा अभ्यास केवळ धर्माकरितां करावयाचा असून कोणतेंही आमिष दाखवून त्याचा अभ्यास करविणें अगदीं निंद्य मानलें गेलें आहे. + + परंतु इहलोकाच्या सुखाकरितां इपापलेले कांहीं लोक आतां धर्माच्या चिंधड्या करीत आहेत खास. एखादा सुधारक पुढें आला कीं, मला दोन प्रकारची भीति वाटत असते. एकतर तो वैदिक धर्मापासून आपला पंथ निराळा काढील ही, व दुसरी धर्माचा अदृष्टसंबंध तोडून टाकून ऐहिक सुखाकडे झुकवील ही. " थियॉसफीसंबंधानें खरें ठरलेलें पूर्वीचें आपलें भविष्य. अशींच स्वामी विवेकानंदाविषयीं पूर्वीं आपल्यास पडत असलेलीं व आतां खरीं ठरलेलीं स्वप्नें. विवेकानंदाचा उदार धर्म व वरील दोन्ही प्रकारचें त्यांच्या मतांत दिसून येणारें धोरण. कबीर, नानक वगैरे नवीन पंथांचा थोडा स्वीकार. केवळ सामान्य नीतीच्या दृष्टीनें जुन्या धर्मावर टीका करणाऱ्या व अर्धा हिंदुधर्म स्वीकारून अर्ध्यावर टीका करणाऱ्या अनेक सुधारकांचा एककल्लीपणा. विवेकानंदांच्या हातून झालेला तसाच थोडासा प्रकार. लोककल्याणाकरितां मुद्दाम ग्रहण केलेले रागद्वेष व अनीति यांतील तारतम्य व या कसोटीप्रमाणें स्वामी विवेकानंदांच्या कांहीं धार्मिक व वैदान्तिक विचारांचें सप्रमाण समीक्षण व त्या विचारांच्या मूळाशीं दिसून येणारी स्वामींची श्रद्धारहित वेदाधिकाराची हांव. नुसत्या चमत्कारामुळें, नुसत्या बुद्धिमत्तेमुळें किंवा दोन्ही गोष्टीमुळें एखाद्या महात्म्यावर विश्वास ठेवण्याचा दोष व अधिकारान्वयें तिन्ही कांडाला अनुसरून उपदेश करणाऱ्यावर विश्वास ठेवण्याचा सुरक्षित मार्ग. देशकालानुसार आगमव्यवस्था व त्या व्यवस्थेंतही बुद्धीपेक्षां किंवा थोड्याशा चमत्कारापेक्षां आगमाचेंच प्राधान्य. असो.

या वेळीं महाराजांचा मुक्काम उमरावतीस असतांना देवास संस्थानचे अधिपती श्रीमंत तुकोजीराव महाराज पवार यांस त्यांच्या सहवासाची इच्छा उत्पन्न होऊन त्यांनीं त्यांस दोन विद्युत्संदेश व पत्र पाठविलें. महाराजांच्या विद्येची व भगवत्परायणतेची कीर्ति श्रीमंतांच्या कानावर होतीच व संतसेवा आणि श्रीकृष्णभक्ति यांची आवडीही त्यांच्या ठिकाणीं वास करीत असल्यामुळें ह्यावर्षीचा श्रीकृष्णजन्माष्टमीचा उत्सव देवासास करण्याविषयीं त्यांनीं वरील पत्रांत मोठ्या प्रेमानें महाराजांस विनंती केली होती. या पत्राचें उत्तर महाराजांनीं प्रेम, सौजन्य व बोधपूर्ण अभंग वाणीनें श्रीमंतास पाठविलें तें येणेंप्रमाणें:—

अभंग १. कल्याणनिधान मंगळ मंगळ । स्वानंद सोज्वळ सत्यरूप ॥ १ ॥ निर्गुण सगुण जया म्हणे वेद । नामींरूपीं भेद न सांपडे ॥ २ ॥ जीवाचा सोयरा सुखाचा सांगाती । श्रुतीपदें गाती ध्याती मुनी ॥ ३ ॥ मायबाप गुरु स्वामी ज्ञानराज । कृपें भवत्काज त्यांचे नामें ॥ ४ ॥

२. इंदिरेनें मज दिधलें टाकूनी । श्रीकांत म्हणुनी मायबाप ॥ १ ॥ जन्माचा दरिद्री अखंड करंटा । वरी दृढ ताठा अल्पज्ञानें ॥ २ ॥ तुम्ही महाराज पूर्वी तपःशीळ । तेणें हें सोज्वळ राज्य प्राप्त ॥ ३ ॥ मेळ कैसा होय दीना भाग्यवंता । आळंदीच्या कांता गातां सौख्य ॥ ४ ॥

३. तान्हेपणा पासुनीयां मी आंधळा । नाहींच लाभला मायबाप ॥ १ ॥ नाहीं सद्गुरूची झाली आंगें सेवा । न पूजिलें देवा स्नेहभावें ॥ २ ॥ देहासक्ति-स्तव प्रमादही होती। उंचवर्णी हातीं घेत सेवा ॥ ३ ॥ ऐसें लाजिरवाणें परमार्थी जीणें । हित माझें जाणें ज्ञानराजा ॥ ४ ॥

४. यान संधी विग्रहांत जे कुशलें । तयांसी भूपाळें मान द्यावा ॥ १ ॥ सामदाम भेद दंडा अनुकूलें । तयांसी भूपाळें मान द्यावा ॥ २ ॥ आम्हां गरी-बांचें तेथ नाहीं काज । तुम्हीं महाराज भाग्यवंत ॥ ३ ॥ आळंदीवल्लभ चिंतावा आवडी । प्रेमाच्या कावडी वाहोनियां ॥ ४ ॥

५. माझी तंव स्थिती उनाड जन्माची । नेणें समर्थांची मैत्री करूं ॥ १ ॥

न कळे श्रीमंता कैसा द्यावा मान । रामराम कोण परी करूं ॥ २ ॥ उभें व्हावें कोठें कैसी कीजे स्तुती । न कळे निश्चीती मज कांहीं ॥ ३ ॥ कृपें तुम्ही पाठविलें आज्ञापत्र । परी त्या उत्तर काय देऊं ॥ ४ ॥ अत्यंत दरिद्री नेणें धनसुख । मागतसे भीक व्रतासाठीं ॥ ५ ॥ व्रतासाठीं देवें[1] बोलाविलें मातें । परी म्यां दोघांतें भाक दिली ॥ ६ ॥ म्हणोनियां माझा हरला उपाय । ज्ञानेश्वरमाय न क्षोभावी ॥ ७ ॥

६. प्राण गेलियाही असत्य भाषण । न कीजे भूषण सज्जना हें ॥ १ ॥ नाहीं माझी शक्ति थोर चमत्कारी । तुम्हां कोणेपरी रीझवूं मी ॥ २ ॥ कौमुदी सारिखें नेणें मी संस्कृत । तेथें तों पंडित असतील ॥ ३ ॥ त्यांचा मज धाक वाटे बहु मनीं । तेथें मी येऊनी काय करूं ॥ ४ ॥ माझी विद्या थोर आहे हें सांगूनी । तुम्हां नेणो कोणी फसविलें ॥ ५ ॥ ज्ञानेश्वरीविण मज नये कांहीं । ज्ञानराज आई जाणताहे ॥ ६ ॥

७. स्वप्न परमाणु आरंभ वादातें । पुसतां मी तेथें काय बोलूं ॥ १ ॥ पंचद्रव्यवाद दिधीतीकारांचा । पुसतां मी साचा काय बोलूं ॥ २ ॥ स्फोटवाद किंवा पदशक्तिवाद । बोलतां आनंद कोण तेथें ॥ ३ ॥ वादांत रंजन हाय पंडितांचें । विनोदें आमुचे हास्य मात्र ॥ ४ ॥ आळंदीवल्लभ दीनांचा सांगाती । तयांचे संगती मात्र इच्छा ॥ ५ ॥

८. शीलनाथस्वामी महाराज भेटी । घ्यावी ऐसें पोटीं होतें फार ॥ १ ॥ शीलनाथ स्वामी सोयरा सज्जन । तयांचे चरण आठवावे ॥ २ ॥ करावा जतन आपुला विश्वास । कदा आणिकांस स्मरूं नये ॥ ३ ॥ आळंदीश तेणें होय कृपावंत । करितातो संत सर्व दया ॥ ४ ॥

९. माझिया शरीरा लागलाहे रोग । सुदैवाचा भोग ईश्वरेच्छा ॥ १ ॥ तयामुळें जातां कोणाच्या घरास । होतो फार त्रास आणिकांसी ॥ २ ॥ म्हणोनियां देवें ठेविलें ज्या स्थिती । राहे तैशा रीति जेथें तेथें ॥ ३ ॥ आळंदीवल्लभ ज्ञाननाथस्वामी । विश्वअंतर्यामी सर्व जाणे ॥ ४ ॥

---

[1] जुन्या संस्कृत ग्रंथांत राजाला देव म्हटलें आहे.

१०. न होती हे माझे बोल गौरवाचे । अंतरींचे साचें सांगितलें ।। १ ।। मजहुनी माझे स्नेही विद्यावंत । मजपुढें ग्रंथ वाचिती जे ।। २ ।। गुरु श्रीनिवास मुळेभालेराव । नाना हरिभाऊ खाप्रेबापू ।। ३ ।। पंडितादि त्यांत बोलावुनी कोणी । फेडावी पारणी लोचनांची ।। ४ ।। व्यर्थ निजगर्वी मज पडूं द्यावें । ज्ञाननाथीं भावें वेड भरे ।। ५ ।।

११. तुमचिये गृहीं होतां माझा मान । तेणें माझें मन फोफावेल ।। १ ।। विसरेल मग क्षणीं ज्ञाननाथा । भय वाटे चित्ता फार ऐसें ।। २ ।। वंदूं नये माथां पायींची पादुका । मी तों प्रजा निका राव तुम्ही ।। ३ ।। एवढा समर्थें द्यावा आशिर्वाद । उपजावा बोध ज्ञानदेवीं ।। ४ ।।

१२. व्रत संपलिया क्वचिद्दैवापाठीं । शीलनाथ भेटी येईन मी ।। १ ।। तेव्हां मी घेईन देव दरूषण । आणो नारायण घडवोनी ।। २ ।। बोवडीये बोल ऐकुनी मराठी । न मानावी पोटीं खंती देवा ।। ३ ।। ज्ञाननाथें मज सांभाळावें आतां । पुरे झाली चिंता संसाराची ।। ४ ।।

१३. बोलतो तेवढा नाहीं मी विरक्त । कवित्व करीत मानासाठीं ।। १ ।। परी मज एक विश्वास बरवा । तुम्हांही धरावा तोचि चित्तीं ।। २ ।। नीतीनें संसार करावा बाहेरी । अखंड अंतरीं कृष्ण ध्यावा ।। ३ ।। हेंचि केलियानें माझें समाधान । व्रतही संपूर्ण केलें जाणा ।। ४ ।। सद्गुरुमुखानें जाणावें निर्गुण । भजावें सगुण आवडीनें ।। ५ ।। ज्ञानानें तोडावा उपाधीचा भास । ज्ञानगर्वनाश भक्तिबळें ।। ६ ।। वैराग्यानें कीजे दोहींचें रक्षण । नीतीनें शिक्षण प्रजालोक ।। ७ ।। परावीया नारी माउली समान । संतांपुढें मान वाकवावी ।। ८ ।। देवासस्वामीया आणिक यावीण । तेथेंही येऊन काय सांगूं ।। ९ ।।

हें पत्र देवासच्या महाराजांस पाठविल्यानंतर लवकरच श्रीकृष्ण जन्माष्टमी व्रताकरितां महाराज हरद्याकडे निघून गेले व नारायणराव पंडित यांस यावलीस पाठवून पादुका, देव व मंडळी यांसह मागाहून लवकर येण्यास सांगितलें. त्याप्रमाणें देव व मंडळी येऊन पोहचल्यानंतर प्राति-

वार्षिक पद्धतीप्रमाणें नवरात्रास आरंभ होऊन श्रीकृष्णजन्मोत्सव हरदा येथें सांग झाला.

उत्सवानंतर एके दिवशीं ( बुधवार ता० २७–८–१९१३ ) नित्य-क्रमाप्रमाणें महाराज सच्छास्त्रचर्चा करीत बसले असतांना हरदा येथील रेल्वे दवाखान्याचे डाक्तर रा० बळवंत शंकर नेने हे आपल्या एका स्नेह्या-बरोबर महाराजांच्या दर्शनास आले व महाराजांस आपल्या व्याधीची हकीकत कळवून त्यांनीं आपला दोन वर्षांचा अनुभवही सांगितला. तेव्हां त्यांच्या शद्वांवरून व्याधीसंभवाचा पूर्वेतिहास महाराजांनीं त्यांस सांगि-तला तो असाः—तुमचे वय हल्लीं ३७।३८ वर्षांचें असावें. तुमचा जन्म तुमच्या आईच्या ३० व्या किंवा ३२ व्या वर्षीं झाला असावा. तुमची आई फार रागीट स्वभावाची असावी. तिला निजते वेळीं दिवा नकोसा असावा. तुमचे वडील फार शांत स्वभावाचे असावे व तुमची आई त्यांच्यावर रागावली असतां ते शांतपणानें ऐकून घेत असावे. तुमचा रोग कफ अपस्मार हीनवात आहे. हा वरील कारणामुळें झालेला असून अडीच वर्षांपासून असावा. तुह्मांस गोड आवडत नाहीं. तिखटावर तुमचें प्रेम आहे. रोगाच्या फिट्स बहुतकरून तुम्हांस पहाटे येतात. याप्रमाणें सांगून महाराज म्हणाले नुसतें “ हो ” ला “ हो ” न म्हणतां मी सांगितलेल्या गोष्टी खऱ्या असतील तर कबूल करा नाहींतर नाहीं म्हणा. तेव्हां डाक्तर यांनीं वरील गोष्टी अक्षरशः खऱ्या असल्याचें कबूल करून हा सर्व प्रकार आपल्या सहीनें लिहून दिला. या पूर्वीं त्यांची व महाराजांची ओळखही नव्हती. असो.

सनातन धर्मनीतीच्या तत्वांवर होणारे आघात चुकविण्याकरितां वर्त-मान पत्रांत लेख लिहिण्याचा महाराजांस उपक्रम कसा करावा लागला याविषयीं मागें सांगितलें आहे. त्या क्रमास अनुसरून या सुमारास महा-राजांनीं “ यज्ञोपवित धारणाचा हक्क ” हा तिसरा लेख लिहून मुमुक्षु-पत्राकडे प्रसिद्धीकरितां पाठविला. तो ता० २८ आगष्ट १९१३ च्या

अंकांत छापून प्रसिद्ध झाला. त्याचा सारांश थोडक्यांत असाः—या पूर्वीचे दोन लेख नुकतेच यष्टींत ( सप्तमयष्टींत ) येऊन गेले आहेत. पूर्वींच्या दोन लेखांत वेदोक्त प्रकरणासंबंधीं बरेंच उद्घाटन केलें आहे व इतरांनीं वेदाचा अधिकार मागणें युक्तिदृष्ट्या बरोबर कसें नाहीं हें मी आपल्या मतें सिद्ध केलें आहे. आतां दुसरा मुद्दा या मुद्यामुळेंच उत्पन्न झालेला आहे. तो प्रत्येकाचा यज्ञोपविताचा अधिकार हा होय. सुतार, सोनार, शिंपी, रंगारी, न्हावी कहार वगैरे लोक यज्ञोपवीत घालीत असून घालण्याची खटपटही करीत आहेत. मीही त्यांपैकींच एक आहे. पण केवळ यज्ञोपवीतानें माझें समाधान होत नसून मला प्रश्न उत्पन्न होतात ते असेः—

१. आम्ही यज्ञोपवीत घालणाऱ्यांनीं स्वतः काय ब्राह्मण म्हणवून घ्यावयाचें, क्षत्रिय म्हणवून घ्यावयाचें किंवा वैश्य म्हणवून घ्यावयाचें ? २. वर्ण हे गुणकर्मानें मानावयाचे, संस्कारानें मानावयाचे, किंवा जन्मानें मानावयाचे ? ३. इतकेंही करून आम्ही जे द्विज होणार तें काय धर्माकरितां कीं द्वेषाकरितां ? ४. आज नाहीं तर उद्यांतरी चर्चारहित द्विजत्व आम्हांला मिळणें शक्य आहे काय ?

या चारही प्रश्नांची पुढें महाराजांनीं युक्तिदृष्ट्या क्रमशः समीक्षा करून वेदोक्तप्रकरणाप्रमाणें हें अन्य यज्ञोपवीत प्रकरणही कोणत्याही दृष्टीनें निष्फल मत्सर वाढविणारेंच होईल असें सिद्ध केलें आहे.

देवासच्या महाराजांचा व महाराजांचा जो पत्रव्यवहार उमरावतीहून झाला होता त्याचें उत्तर देवासच्या महाराजांकडून विद्युत्संदेशानें पुढीलप्रमाणें आलें:—

“ Your holiness most gracious and kind letter received with intense feelings of gratitude by the undersigned undeserving person. Please forgive delay in reply as busy with utsawa. May I again humbly request your holiness to grace this place

if your sacred functions and duties at Amraoti are finished. the utsawa here will last till Friday 29 th. inst here if possible and absolutely convenient to your holiness may I request you to come here straight from Amraoti so as to reach this place before the utsawa is over. please forgive trouble.

"TUKOJIRAO PUAR"

हा संदेश अर्थातच प्रथम उमरावतीस जाऊन नंतर हरदा येथें महाराजांस मिळाला व पांचचार दिवसांनींच देवासच्या महाराजांकडून रा० त्र्यंबकराव फडणवीस हे पत्र घेऊन हरद्यास येऊन पोहचले. या पत्रांतही देवाशास येण्याविषयीं आग्रहाची व प्रेमाची विनंती होती. त्याप्रमाणें आठ दिवसांत येण्याविषयीं आश्वासन लिहून महाराजांनीं पुन्हां पुढील अभंगबद्ध पत्रोत्तर बरोबर देऊन रा० नारायणराव पंडित यांस पूर्व व्यवस्था पाहण्याकरितां त्र्यंबकराव बरोबर देवाशास पाठविलें. तें पत्रोत्तर येणेंप्रमाणें:—

श्री ज्ञानेश्वर माउली समर्थ.हरदा ता. २१९।१३

श्रीमंत तुकोजीराव महाराज पवार यांना पाठविलेलें पत्र २ रें.

अभंग १. ज्ञानराज स्वामी सदा यशवंत । नित्य श्रुतिसंत गाती जया ॥१॥
कोटी विघ्नें ज्याच्या नामें हरताती । सर्व भूनपती तोचि एक ॥ २ ॥
वैष्णवांचा विष्णु शैवांचा शंकर । सच्छिष्या दातार गुरुराजा ॥ ३ ॥
आळंदीवल्लभ पायीं नमस्कार । करुनियां पत्र पाठवितें ॥ ४ ॥

२. इहलोक काय जीवितावधीचा । परलोक साचा श्रुतिसिद्ध ॥ १ ॥
स्वर्गमोक्ष दोन्ही तयाचेचि भाग । मिळती अव्यंग सज्जनातें ॥ २ ॥
एका सुख एका दुःख हे दिसती । म्हणोनी प्रतीति पूर्व कर्मा ॥ ३ ॥
एकची ईश्वर भिन्न भिन्न करी । कर्मावीण तरी विषम तो ॥ ४ ॥
प्रकृतीस्वभावें नियंता मुकुंद । भक्तांवरी शुद्ध दया त्याची ॥ ५ ॥
कर्मफळ देणें राजसस्वभाव । सात्विक स्वभाव दासकृपा ॥ ६ ॥
उपाधीविरोध उपहितीं नाहीं । दयान्याय दोहीं चालविता ॥ ७ ॥

आळंदीवल्लभ सुखाचा सांगाती । सर्व धरूं चित्तीं आवडीनें ॥ ८ ॥

३. अत्यंत विश्वास अत्यंतची युक्ति । दोन्ही व्यर्थ होती प्रसंगानें ॥ १ ॥
युक्तीनें सामान्य ओळखावें आधीं । विशेषाची सिद्धि विश्वासानें ॥ २ ॥
जन्मला जो तया पाहिजे जनक । सामान्य सम्यक युक्तिसिद्ध ॥ ३ ॥
पितयाचें नांव विश्वासेंचि फळे । म्हणोनी सोंवळें चित्त कीजे ॥ ४ ॥
सुखदुःख फळें कर्म अनुमानें । धर्माधर्म मनें आकळावे ॥ ५ ॥
बळियासी संधी साधितां उत्तम । सुरक्षावा धर्म आपुलाची ॥ ६ ॥
जया रोगीं त्याची औषधीचें काम । उंचनीच नियम त्यांत नाहीं ॥ ७ ॥
तैसा उंचनीच नाहीं धर्म कोणी । सर्व नारायणीं आवडते ॥ ८ ॥
परी ज्याचा त्यानें उचीत करावा । स्वामी ज्ञानदेवा आवडे तें ॥ ९ ॥

४. आरंभ नाहींच कोण्याही वस्तूसी । अवस्था विशेषीं मात्र भासे ॥ १ ॥
म्हणोनियां जन्म मृत्यु सर्वांसवें । मोक्ष विश्वीं जीवें मिथ्यादृष्टि ॥ २ ॥
ऐसें दृढ ज्ञान वृत्तीसंधीं ध्यान । मोक्ष तरी पूर्ण हातां चढे ॥ ३ ॥
वृत्तीव्युत्थानीं तों धर्मकाम अर्थ । तीन पुरुषार्थ सेवावेची ॥ ४ ॥
धर्माच्याचि पाठीं लागूं नये ऐसें । जेणें अर्थ नाशे समूळची ॥ ५ ॥
अर्थीही तेवढें घालूं नये मन । जेणें प्रजाजन कंटाळती ॥ ६ ॥
काम तो सेवावा शरीरापुरता । कामा हातीं चित्ता देऊं नये ॥ ७ ॥
देशकाळवशें धर्म तो अधर्म । अधर्म तो धर्म होऊं लागे ॥ ८ ॥
तथापि तयांत एक मुख्य बीज । शरण्य सहज ज्ञानराजा ॥ ९ ॥

५ समर्था भेटणें मज नाहीं ठावें । म्हणोनि न यावें होतें मनीं ॥ १ ॥
परी चारपांच आलीं पाचारणें । भेटीचा म्हणोनी विनिश्चय ॥ २ ॥
आहे ऐसी देवें ठेवितां प्रकृती । येईन निश्चिती आठदिनीं ॥ ३ ॥
उशीर झाल्याची असूं द्यावी क्षमा । तुम्हीं गुणोत्तमा महाराजा ॥ ४ ॥
सुहृद पाहाया पाठविले पुढें । तयासी रोकडे क्षेम कीजे ॥ ५ ॥
ज्ञानेश्वर माझा विश्वाचार्चा राव । आश्वासन देवो तुम्हां आम्हां ॥ ६ ॥

दूरस्थ संप्रदायिक मंडळीला पत्रद्वारानें अभ्यासक्रम सांगून त्यांच्या बुद्धि-

वर्धनाचा यत्न महाराजांचा सुरू होताच. त्याप्रमाणें या सुमारास महाराजांकडून एक पत्रोत्तर नागपुरास रा० वासुदेवराव मुळेमास्तर यांना गेलें आहे. यांतील अभ्यासाचा भाग व्यक्तिविषयक असल्यामुळें अर्थातच महाराजांच्या आज्ञेप्रमाणें तो प्रगट करणें योग्य नाहीं, परंतु साधकाची सद्बुद्धि जागविण्याकरितां सार्वजनिक कल्याणाचा एक नियम महाराजांनीं त्यांत सांगितला आहे तो येथें घेतों:—

" वेदकालापासून तों तहत आतांपर्यंतचे सर्व धार्मिक इतिहास वाचून पहा आणि आतांच्याही साधूंचीं वर्तनें मनांत आणून पहा. सर्वांनीं सर्वांना सारखेच चमत्कार कोणी दाखविले आहेत काय ? व सर्वांनीं सर्वांच्याच सारख्या इच्छा कोणी पूर्ण केल्या आहेत काय ? साधूच्या एखाद्या चमत्कारापासूनच जर कोणाला उपरती झाली असेल तर आतांही तशी स्थिती नसते काय ? कितीही विचार केला तरीही विचारानें भावना मृदुच राहते व तीव्र होते ती विश्वासानेंच होते. पण आपल्या विश्वासाला कितीतरी विघ्नें आहेत ? घरांतल्या पोराबाळांचा व बायकोचा त्रास, शरीराच्या आसक्तीचा त्रास, सावकाराच्या तगाद्याचा त्रास, वरच्या दडपशाहीचा त्रास व इतकेंही करून जर आपल्यांत थोडासा श्रद्धेचा ओलावा असलाच तर तो एखाद्याच्या भूत घालून देण्यानें व फुकट चर्चेनें नाहींसा होत असतो. त्याचें तें भूत घालून देणें व फुकट चर्चा करणें किती सत्य आहे याचा दांत खाऊन शोध करावा व मग श्रद्धा काढणें असल्यास काढावी व ठेवणें असल्यास ठेवावी. "

याच पत्रांत प्रस्तुतच्या देवासगमनाच्या धोरणासंबंधानें महाराज म्हणतातः—"दुसरें, देवासचे महाराज फारच पाठीमागें लागले असून त्यांचेकडून दोन मनुष्यें मला घेण्याकरितां काल येथें आले. त्यांचे बरोबरही दुसरें अभंगबद्ध पत्र दिलें आहे. कदाचित् अतिहठानें मी तेथें गेलोंच व जर मराठे वेदोक्त प्रकरण निघालें तर मी महाराजांच्या सणसणीत विरुद्ध बोलल्याशिवाय कांहीं रहाणार नाहीं. मग त्याचा परिणाम कसाही होवो. "

देवासगमनाची याप्रमाणें तयारी चालली आहे तों तिकडे उमरावतीस महाराजांचे मंडळींतील रा० लक्ष्मण सिताराम सराफ हे अत्यवस्थ असून महाराजांचे दर्शनाकरितां कंठीं प्राण धरून असल्याचा तार आला. या गृहस्थास सुमारे पांच महिन्यांपूर्वीं महाराजांनीं सुचाविलें होतें कीं तुला विषप्रयोग होणार आहे. सावध रहा. या इशारतीकडे त्यांनीं दुर्लक्ष केलें होतें. शेवटीं तोच प्रसंग ओढवला. बिमारींत यांची वांती उमरावती येथील डाक्तर भट यांनीं तपासून विषप्रयोग झाल्याचेंच सांगितलें होतें. अस्तु. तार पोंचतांच तेच दिवशीं महाराज मेलगाडीनें निघून उमरावतीस गेले व लक्ष्मणरावला भेट देऊन दोन दिवसांनीं परत आले. यानंतर लक्ष्मणरावला किंचित् आराम पडला परंतु पुढें प्रकृति जास्त बिघडून सुमारे दीड महिन्यांनीं त्यांचा अंत झाला.

ता० २८ आगष्ट १९१३ च्या मुमुक्षूच्या अंकांत एका गृहस्थानें (श्रीयुत श्रीकृष्ण व्यंकटेश शुक्ल) एक पत्र प्रसिद्ध करून त्यांत शांकरदिग्विजय विद्यारण्यकृत नसून भागवतचंपूकारांचा आहे असें शिवगंगामठाचे शंकराचार्य श्रीसुब्रह्मण्याभिनव सच्चिदानंदभारती यांचे म्हणणें दिलें होतें व डिंडिमकारांना व अद्वैत राज्यलक्ष्मीकारांना झुगारून देऊन आचार्यांचा असा अभिप्राय कां असावा ? अशी पृच्छा केली होती. या पत्राला उत्तर देण्याकरितां महाराजांनीं यावेळीं "शिवगंगामठाधिपति आचार्यचरणीं विनंती" हा लेख लिहून तो मुमुक्षूच्या ता० २५ सप्तंबर १९१३ च्या अंकांत प्रसिद्ध केला.

या लेखांत आधुनिक क्षेपकवादाची सोपपत्तिक व सविस्तर मीमांसा करून हल्लींच्या धर्माचार्यांच्या मनावर देखील या पाश्चात्य क्षेपकवादाचा पगडा बसत चालला आहे याविषयीं महाराजांनीं दुःख प्रदर्शित केलें आहे व यद्यपि मनुष्य हा जीवकोटींतील असल्यामुळें विकारवश होणें अपरिहार्य असलें तथापि खऱ्या धार्मिक मनुष्याला विकार उत्पन्न होऊनही धर्माचें प्रतिपादन त्याला विकाररहित व यथातथ्य करतां येणें कसें शक्य आहे याविषयीं सप्रमाण व सोदाहरण विवेचन करून "हल्लींचे

धर्माचार्य जीव असल्यामुळें त्यांना विकार होणें जरी संभवनीय असलें तरी उत्पन्न झालेल्या विकारांचा साक्षी होऊन व्युत्थानकाळीं धर्माचें प्रतिपादन यथार्थ करणें हेंच त्यांचें पाहिलें व खरें कर्तव्य आहे. " असें सुचाविलें आहे व नंतर शिवगंगा मठाधिपति आचार्यांच्या आक्षेपास उत्तरें देऊन " आचार्यांना इंग्रजी येवो किंवा न येवो परंतु कर्णोपकर्णीं पाश्चात्य क्षेपकवादाचा त्यांच्या मनावर संस्कार झाला आहे यांत संशय नाहीं. " असें श्रीयुत शुक्लांच्या प्रश्नास उत्तर दिलें आहे व असाच संस्कार जगन्नाथ येथील गोवर्धन मठाच्या शंकराचार्यांच्याही मनावर झाला होता याविषयीं चारपांच वर्षांच्या पूर्वीं त्यांची व आपली समक्ष भेट होऊन जो भाषणप्रसंग झाला त्याची हकीकत सांगून त्यांचें (गोवर्धनमठाच्या आचार्यांचे) म्हणणें महाराजांनीं प्रमाणार्थ दिलें आहे व त्यांच्या सरळपणाविषयीं आपली अत्यंत पूज्यबुद्धि व्यक्त केली आहे.

शेवटीं एकंदर वस्तुस्थिती लक्ष्यांत घेऊन मोठ्या समर्याद व विनीत शद्बांनीं शिवगंगामठाधिपति आचार्यांच्या चरणीं महाराजांनीं अशी विनंती केली आहे:--" अशा प्रकारचें प्रतिपादन धर्माचार्यांच्या मुखांतून निघालें म्हणजे मजसारख्या शूद्राला तर " ब्राह्मणोऽस्य मुखमासीत् " इत्यादि पुरुषसूक्तांतील मंत्र व " स्त्रीशूद्रद्विजबंधूनां त्रयी न श्रुतिगोचरा " इत्यादि पुराणांतील श्लोक सर्व मागून लुच्चा लोकांनीं घातले आहेत असें म्हणण्याला कांहींच प्रत्यवाय राहणार नाहीं. मी ब्राह्मणेतर जातींत जन्मलों असून माझ्या दुर्दैवानें लागलेल्या व्यसनामुळें कोणाशीं बोलतांना प्रसंगीं मला वेदाचें प्रमाण देण्याचें काम पडतें. परंतु मी आपल्या जातीपुढें आपण शूद्रांनीं वेद म्हणावे असें सांगत नाहीं. कारण जरी मी व्यसनामुळें वेद म्हणतों तरी मी पातक करीत असून त्याबद्दल मेल्यानंतर भगवान् सूर्यनंदन मला योग्य शासन करणार हें मी पूर्णपणें जाणून आहे. या व्यसनांतून सोडविण्याला मला कोणीही वैदिक ब्राह्मण भेटला नसून उलट धर्माचार्यही जर क्षेपकवादाचा अंगिकार करीत आहेत तर मी वेद जरी म्हणतो तरी हें मी पातक करीत आहे हा आपला समज सोडून देऊन

शूद्राला अधिकार नाहीं इत्यादि मंत्रांना क्षेपक समजून वेदाची प्रवृत्ति आपल्या जातींत करावी काय ? असें शुक्राप्रमाणें मीही आचार्यांचे चरणाजवळ विचारण्याचें धाडस करितों. कारण मी शांकरमताचाच अनुयायी आहे. प्रभूंनीं आपलें दीन लेंकरूं समजून मला उत्तर द्यावें. अमुक गोष्ट अमक्यांनीं केली कीं नाहीं ही गोष्ट कोणत्याही अनुमानिक साधनानें समजत नसून दिव्यदृष्टीनेंच कळत असते असा आर्ष इतिहासकारांचा समज आहे त्यावर जर क्षेपकवादानें आचार्यमातेचा विश्वास नसेल तर मजसारख्या अडाणी मुलानें तरी तो कसा ठेवावा ? समर्थ बालभाषेंतील गुणदोषाकडे पहात नाहींत हा माझा विश्वास आहे. " असो.

इकडे देवासाहून नारायणराव पंडित व त्र्यंबकराव फडणवीस हेही परत आले होते. मग सर्व मंडळीसह निघण्याची महाराजांची तयारी झाली.

" आपण सर्व पोरेंपोरें आहोंत. आपल्यांत प्रौढ मनुष्य एकही नाहीं. राजदर्शनास आपणास जावयाचें आहे. तेथली वागणुक कोणास माहित नाहीं. कोणी वयोवृद्ध मनुष्य आपल्याबरोबर असल्यास बरें. दादामुळे यांस तरी समागमे घ्या " अशा प्रकारची लौकिक लीला क्षणभर करून निघण्याचे वेळीं महाराज म्हणाले " मी सर्व शिकून आलों आहे. कोणी काळजी करूं नका " नंतर भाद्र० शु० १० बुधवारीं रात्रौ पुण्याहवाचन करून मंडळीसह महाराजांनीं पंजाब मेलनें हरद्याहून प्रयाण केलें. प्रवासांत व्यवस्था ठेवण्याकरितां त्र्यंबकराव फडणवीस हे बरोबर होतेच. "गेल्याबरोबर प्रथमच वेदोक्त प्रकरण निघणार नाहीं तर बरें होईल. " असें दोन तीन वेळ महाराज वाटेंत म्हणाले. गुरुवारीं सकाळीं दहा वाजतां इंदुर राजधानीस येऊन तेथून स्नेहशक्तिरथानें (मोटार) महाराज देवास मुक्कामीं पोहचलें. श्रीमंतानीं मोठ्या प्रेमातिशयानें स्वागतपूर्वक दर्शन घेतल्यावर मुद्दाम महाराजांकरितां योजना

केलेल्या वाड्यांत महाराजांची मूर्ति स्वस्थानीं विराजमान झाली. नंतर देवास संस्थानचे मोठ्या पातीचे दिवाणसाहेब श्रीयुत नारायणप्रसाद यांनीं वेदोक्त प्रकरणाचा उपक्रम काढलाच व गुणकर्म जातिवादाचा स्वीकार करून महाराजांस प्रश्न विचारूं लागले. महाराजांनीं नेहमींच्या श्रुतियुक्तिअनुभवप्रचूर कोटिक्रमानें त्यांच्या प्रश्नांचीं समाधानकारक उत्तरें देऊन जन्मजातीवादाचें उत्कृष्ठ समर्थन केलें व शेवटीं स्पष्टोक्तीनें सांगितलें कीं धर्माला अनुसरून जेवढें असेल तेवढेंच मी सांगेन. कोणाची मर्जी संभाळण्याकरितां धर्माच्या विरुद्ध कधींच बोलणार नाहीं. धर्माच्या बाबतींत क्षिप्रानदीचें तीर व राजाचा राजवाडा दोन्ही मला सारखेच आहेत. यानंतर आणखी कांहीं मंडळीबरोबर शास्त्रविषयक चर्चा वगैरे होऊन रात्रौ महाराजाचें स्नान, देवपूजा व ज्ञानेश्वरीचें निरूपण झालें. पुष्कळांना भक्ति योगाहून सोपी वाटते परंतु भक्तितत्व फार कठीण आहे. तें कळण्याला यमनियमादि अष्टांग योगच आरंभीं फार सुलभ उपाय आहे, अशा अभिप्रायाचें ज्ञानेश्वरीचें निरूपण होतें. नंतर गुरुवारची पालखी झाली. ते वेळीं नवीन अभंग वगैरे नेहमीं प्रमाणेंच झाले. दुसरे दिवशीं सकाळचे सुमारे दहा वाजतां द्वादशीनिमित्त काला वगैरे होऊन महाराजांचें भोजन झालें. काल्याचे वेळींही अभंग नवीन झाले ते असे:—

काला भाद्रपद शुद्ध १२ ता० १२–९–१३

१. सज्जनांनीं कैसें व्हावें । यथार्थ तेंचि वदावें ॥१॥
रावरंकीं समभाव । मानाची न कीजे हांव ॥२॥
धरूं नये केव्हां भीड । हरि प्रेमा कीजे दृढ ॥ ३ ॥
परधन परनारी । उपेक्षावे सर्वांपरी ॥ ४ ॥
स्वामी ज्ञानेश्वर माझा । त्राता त्रिभुवन राजा ॥५॥

२. इच्छाचारें महीं धुंडितां आवडी । घालूं नये उडी मानामागें ॥१॥ र वाहुनी करूं नये खोटें । सुखदुःख मोठें सहावे कीं ॥२॥ रावऋषी-

संग महाभारतींचा । अंतरीं तो साचा धरा दृढ ॥ ३ ॥ विषम विषयीं न देयावें चित्त । निश्चय यथार्थ सोडूं नये ॥ ४ ॥ असतां रक्षक आळंदी विलास । आणिकांची आस धरूं नये ॥५॥

३. वैराग्यावांचुनी सांगूं नये ज्ञान । शुद्ध फसवण दीनाची ते ॥ १ ॥ रागद्वेष ज्यांचे नाहींत निमाले । बोल वाया गेले सर्व कांहीं ॥ २ ॥ शरीरापुरतें अन्न आच्छादन । आणिक थुंकोन सर्व घाली ॥ ३ ॥ सुलभाजनक शब्द आणी ध्यानीं । न रहावें मौनी सापराधा ॥ ४ ॥ शिष्य वाढवोनी करूं नये सोंग । येणें रमारंग अंतरतो ॥५॥ आळंदीवल्लभ येवोनी अरण्यीं । घाली मुखीं पाणी दासाचीया ॥६॥

४. मानचि पाहतां जया वाटे प्रेम । अपमानी धर्म द्वेषभाव ॥ १ ॥ ऐसे गुरुशिष्य दोन्ही कुंभीपाकीं । होऊनियां शेखीं देव नाहीं ॥ २ ॥ म्हणोनियां मिळे तैसेंचि रहावें । न पेटावे हावे कशाच्याही ॥ ३ ॥ आळंदी वल्लभीं ठेवावा विश्वास । स्वर्गादिकीं आस सांडोनियां ॥४॥

५. धनमान दोन्ही प्रारब्धाचे हातीं । यत्नें रमापती मात्र भेटे ॥१॥ म्हणोनि संसारीं सदा व्हावें सम । व्रजवरीं प्रेम ठेवोनियां ॥ २ ॥ हर्षविषादातें तिळांजुळी देणें । षडरी दमणें युक्त सदा ॥ ३ ॥ आळंदीवल्लभ न उपेक्षी दीना । उच्च किंवा हीना सम तारी ॥ ४ ॥

महाराजांचें भोजन चालू असतांना देवास येथील विद्याखात्याचे मुख्य अधिकारी श्रीयुत गंगाधर शास्त्री एम्. ए. यांनीं शंका विचारली कीं साधु हे शांत असतात असें वर्णन आहे. परंतु केव्हां केव्हां त्यांचें ठिकाणीं क्रोधाविर्भाव दिसून येतो याचें कारण काय ? यावर महाराजांनीं एक श्रुती म्हटली व तिचें स्पष्टीकरण करून सांगितलें कीं सकाम लोकांनीं जवळ येऊं नये म्हणून साधूंनीं वरून मुद्दामच क्रोधाविर्भाव दाखवावा व

अंतरीं शांत असावें. खऱ्या मुमुक्षूचें यामुळें कांहींच नुकसान होत न
या विषयावर कांहीं वेळ चर्चा झाल्यावर पुन्हां दुपारीं भक्तिज्ञानविष
प्रश्नोत्तरें वगैरे झालीं. तिसरें दिवशीं योगविषयक चर्चा निघून तपो
योगाभ्यास व ईश्वरप्रणिधान या तिहींच्या समुच्चयानें योगसिद्धि मिळ
णारांना उत्तम फल कसें मिळतें, पूर्वजन्म सांगणें वगैरे धारणेच्या भू
केवरील गोष्टी असून ' ते समाधावुपसर्गा व्युत्थाने सिद्धयः ' या ये
सूत्राप्रमाणें समाधींत या सिद्धी कसें विघ्न करतात, भूतराक्षसादिकां
बाधा कोणाला होते, वगैरे विषयांवर निरूपण झालें. श्रीमंत सरकार ब
साहेब महाराज हे नेहमीं सान्निध राहून महाराजांचीं निरूपणें मो
आवडीनें श्रवण करीत. मोकाशी उपनावांचे एक योगी यावेळीं तेथें अ
होते. त्यांसही महाराजांच्या योगविषयक निरूपणांपासून फार आनंद हे
असे. चवथे दिवशीं प्रो० पाटणकर हे महाराजांच्या भेटीस येऊन वेद
अपौरुषेयत्व, क्षेपकवाद व ब्रह्मविद्या क्षत्रियांपासून ब्राह्मणांस मिळा
याविषयीं छांदोग्यवचन या तीन मुद्यांवर त्यांनीं पूर्वपक्ष केला. या तिन
मुद्यांवर सप्रमाण चर्चा करून महाराजांनीं वेदाचें अपौरुषेयत्व सिद्ध के
क्षेपक वादाचें खंडन केलें व ब्रह्मविद्या क्षत्रियांपासून आली याविषयीं
असें म्हणाले कीं ' इमं विवस्वते योगं ' या श्लोकांत सांगितलेली वि
ही ब्रह्मविद्या नसून पंचाग्नि विद्या आहे. म्हणजे हें संसारज्ञान आहे, ब्रह
ज्ञान नव्हे. ब्रह्मविद्या ब्राह्मणांपासूनच आलेली आहे.

---

१ या अभिप्रायाचा महाराजांचा पुढील अभंग पहाः—

एक आह्मांपाशीं एवढीच गोष्टी । व्हावें समदृष्टि. सर्वांभूतीं ॥ १ ॥ नार
जैसे कां वरती कठीण । अंतरी प्रमाण गोडरूप ॥ २ ॥ वानरें तयासी अव्हे
रूनि जाती । मानव सेविती गोड भाग ॥ ३ ॥ तैसा दुष्टजनीं साधु अव्हेरावा
सज्जनीं सेवावा प्रेमभावें ॥ ४ ॥ ऐसेंची वर्तन जेव्हां आंगीं बाणें । मग नाह
उणें त्रिभुवनीं ॥ ५ ॥ ज्ञानेश्वरकन्या नंदनंदनाचा । धरीतसे. साचा वाम
कर ॥ ६ ॥ गाथा १०७४

दुपारीं छोट्यापातीचे दिवाण सरदार माधवराव किबेसाहेब हे महाराजांच्या दर्शनास येऊन त्यांनींही कांहीं वेळ वेदाच्या अपौरुषेयत्वासंबंधानें महाराजांशीं भाषण केलें. याप्रमाणें चार दिवस सत्सहवासाच्या सुखसोहळ्याचा लाभ देऊन महाराजांनीं परत जाण्याची इच्छा दर्शविली.

तेच दिवशीं रात्रौ श्रीमंत सरकार साहेबांनीं महाराजांस आपल्या खासगी वाड्यांत नेऊन स्वहस्तानें पादप्रक्षालनास मृज्जलादिक देऊन परिचार कर्मानें स्वतःस पुनीत करून घेतलें व पहाटेचे सुमारें ५ वाजतां पुन्हां त्यांस परत बिऱ्हाडीं घेऊन आले. वाड्यांत जाते वेळीं ' आज मीच महाराजांची सर्व सेवा करून घेतो ' असें प्रेमळ शद्बांनीं म्हणून सेवेकरी मंडळीपैकीं एकासही त्यांनीं बरोबर घेतलें नव्हतें. पुढें वाड्यांत गेल्यानंतर श्रीमंतांनीं महाराजांचा अनुग्रह घेण्याची आपली उत्कट इच्छा दर्शविली. तेव्हां * * सोडा म्हणजे तुम्हांस अनुग्रह देऊं असें महाराज म्हणाले. याशिवाय श्रीमंतांचें व महाराजांचें आणखीही बोलणें झालें. तें खासगी स्वरूपाचें असल्यामुळें येथें देण्याची आवश्यकता नाहीं. राजवाड्यांतून परत आल्यानंतर महाराजांनीं सर्व मंडळीस जाण्याची तयारी करण्यास सांगितलें. श्रीमंतांनीं महाराजांस साडेतीन वस्त्रें, मंडळीस शेलापागोटीं व बायामंडळीस खण-लुगडीं वगैरे स्वहस्तें गौरवपूर्वक समर्पण केलीं व महाराजांची स्वारी स्नेहशक्तिरथारूढ होण्याचें वेळीं श्रीकृष्णमूर्तिसह त्यांचा व मंडळीचा फोटो घेवविला व पुनर्दर्शन देण्याविषयीं विनंती करून प्रेमपूर्वक निरोप दिला.

परत इंदुरास आल्यावर तेथें देवास सरकारच्या कोठींत ता० १५ ते १८ सप्तेंबर पर्यंत चार दिवस महाराजांचा मुक्काम झाला. परत आले तो दिवस चंद्रग्रहणाचा होता. हा बहुतेक वेदांतचर्चा, स्नान, पूजा, भोजन वगैरे नित्यक्रमांत गेला. दुसरें दिवशीं किबेसाहेबांच्या येथील व ने० ज० लायब्ररीमधील पुस्तकसंग्रह पाहणें, रुद्रयामल, विष्णुयामल, नारदपंचरात्रादि अनुपलब्ध ग्रंथाचा शोध विचारणें वगैरे नेहमींच्या संत्रयींच्या गोष्टी झाल्यानंतर रात्रौ सुमारें ७।८ वाजतां कांहीं विद्यार्थी मंडळी महारा-

जांच्या दर्शनास आली. त्यांनीं ब्रेनBrain व माइंडmind यांचा संबंध व Ego इगोविषयीं कांहीं प्रश्न विचारले. त्यांची महाराजांकडून विवेचन पूर्वक समर्पक उत्तरें मिळाली. नंतर महाराजांचें स्नान व पूजा होऊन " माझिया भक्ता । आणि संसाराची चिंता । काय समर्थाची कांता । कोरान्न मागे ॥ या ज्ञानेश्वरींतील ओवीवर नेहमींप्रमाणें महाराजांचें ओवी-बद्ध निरूपण झालें. त्यांत भक्तीचें फार सुंदर प्रतिपादन होतें. नंतर महाराजांचें भोजन, शतपावली वगैरे झाली. इतकें होतपर्यंत रात्रही दोन अडीच प्रहर झाला. पुढें पहाटेचे तीन चार वाजेपर्यंत एका गृहस्थाशीं महाराजांचें भाषण चाललें होतें. त्यांत उत्क्रांतिवादाचें खंडन व थिऑसफी-विषयक चर्चा होती.

याप्रमाणें चार दिवस इंदूर येथें वास्तव्य झाल्यावर ता० १८ सप्टेंबर रोजीं गुरुवारची पालखीची मिरवणुक काढून महाराजांची स्वारी इंदुराहून

---

१. या गुरुवारचे अभंगः—

१ पटु झाला सर्वापरी । तरी न भेटे मुरारी ॥ १ ॥
येथें पाहिजे वैराग्य । ज्ञान आणि भक्तिभाग्य ॥ २ ॥
रागद्वेषा विमुक्तता । याचें नांव विरक्तता ॥ ३ ॥
उपाधी वेगळा जीव । ब्रह्मज्ञान याचें नांव ॥ ४ ॥
नारायणाविण नेणे । याचें नांव भक्ति जाणें ॥ ५ ॥
स्वामी आळंदीवल्लभ । नोहे चंचळा सुलभ ॥ ६ ॥

२. आपुलें मरण देखिल्यावांचोनी । निर्भय हा मनीं जीव नोहे ॥ १ ॥
जंव नव्या नव्या वाढती वासना । तंव साधूपणा विटंबू कीं ॥ २ ॥
सद्गुरुवचन नाणितांनुभवा । शास्त्रसंगसेवा चाळवीतु ॥ ३ ॥
ज्ञानेश्वरपाय नमस्कारावीण । आघवाची शीण साधनांचा ॥ ४ ॥

३ देखता देखणें गेलें हारपोनी । एके दृष्टिपणीं उभारीतां ॥ १ ॥
अंशपूर्णभाग निमालेति चांग । दृष्ट्याचेंचि अंग दृश्यमीषें ॥ २ ॥

परत निघाली. पुढें खंडव्यास पोहचल्यावर नारायणराव पंडित व नानाजी कविमंडन या दोघांसह महाराज परभारे मुंबईकडे निघून गेले व बाकीची मंडळी व पुस्तकाच्या पेट्या वगैरे सामान हरद्यास परत पाठविलें.

यावेळीं महाराजांचें वास्तव्य इंदुरास असतांना एका मार्मिक गृहस्थानें त्यांच्या दर्शनभाषणाचा लाभ घेऊन पुढें त्यांच्या देवासच्या सफरीचा वृत्तांत मुमुक्षु पत्राच्या ता० १ जानेवारी १९१४ च्या अंकांत " ग्रंथांचा शोध " या सदराखालीं 'गुरुदासानुदास' या सहीनें छापून प्रसिद्ध केला आहे. त्यांत महाराजांच्या विद्येविषयीं व त्यांच्या धार्मिक मतव्याविषयीं ते असें म्हणतात:—" श्रीगुलाबराव महाराज हे जातीचे शूद्र असून बालपणापासून अंध आहेत, असें असतां त्यांची संस्कृतादि अनेक भाषांतील पारंगतता व वेदान्तादि विषयाचें गाढावगाहन पाहून इकडील लोकांस फारच आश्चर्य वाटलें.

ते वर्णाश्रमधर्मसेतूचे कट्टे रक्षक आहेत. त्यावर हल्ला करणाऱ्या आधुनिक वीरास ते चीत केल्यावांचून राहत नाहींत. वर्णाश्रमधर्मनिष्ठेमुळें संघशक्ति कमी झाली तरी चिंता नाहीं, परंतु केवळ संघशक्तीचे लोभानें सद्धर्मसेतूचा विघात होऊं नये, सद्धर्मनिष्ठ आर्यबंधु कमी होतां होतां मूठभर बीजभूत राहिले तरी तो इष्ट परिणाम समजला पाहिजे, संख्येच्या किंवा बाह्य वैभवाच्या लोभानें आपलें ब्रीद कधींही सोडूं नये असें त्यांचें ठाम मत आहे. कारण श्रौतधर्मावर त्यांचा पूर्ण विश्वास आहे. मोहप्रमादादि दोषरहित वैदिकऋषिमुनींनीं लावून दिलेला मार्गच अखेरीस कल्याणप्रद होईल असा त्यांचा दृढ विश्वास आहे. "

मुंबईस पोहचल्यानंतर महाराज प्रथम कांदेवाडींत अक्कलकोट मठामध्यें श्रीयुत विष्णु भालचंद्र पानवळकर यांचेकडेस उतरले होते. तेच दिवशीं त्यांची

---

उपाय अपाय साध्याचीया गावा । मुकले स्वनांवा मुळींहुनी ॥ ३ ॥
उरला पुरता ज्ञानेश्वरप्रेम । सर्वत्र सुगम निजदासा ॥ ५ ॥

व रा० लक्ष्मण रामचंद्र पांगारकर यांची पुस्तकाच्या दुकानावर अकस्मात भेट झाली. तेव्हां पांगारकरांनीं अत्यंत आग्रहपूर्वक महाराजांस सरदार गृहांत रहावयास नेलें. सरदार गृहाचे मालक रा० तात्यासाहेब साळवेकर यांसही महाराजांच्या आगमनानें फार संतोष वाटला. तेथें नित्य महाराजांचीं ज्ञानेश्वरींचीं निरूपणें वगैरे होऊं लागलीं. तीं ऐकण्यास श्रोते मंडळीची फार गर्दी होत असे.

वाई येथील प्रसिद्ध दीक्षित काशिनाथ वामन लेले शास्त्री हेही यावेळीं मुंबईसच होते. त्यांची व महाराजांची भेट सरदारगृहांत झाली. ते दिवशीं भाद्रपद वद्य १२ निमित्त काला होता. काल्याच्या वेळचे अभंग व गोपीगीतावरील महाराजांचीं निरूपणें वगैरे ऐकून लेलेशास्त्रीला फार आनंद वाटला व असें अपूर्व प्रवचन यापूर्वीं कधीं ऐकण्यांत आलें नाहीं, महाराजांची कीर्ति ऐकत होतों त्याहून विशेष पाहण्यांत आली, हे विदुराचे अवतार आहेत इत्यादि उद्गार त्यांचे मुखांतून निघाले. या प्रसंगीं वेदविहित कर्मांकडे स्वतः प्रवृत्ति ठेवून लोकांसही तेंच वळण लावण्याविषयीं पांगारकर व चवंडेबुवा यांस महाराजांनीं उपदेश केला.

याच वेळीं मुंबईस करवीर मठाचे शंकराचार्य (ब्रह्मनाळकर) यांचाही मुक्काम होता. त्यांनीं महाराजांच्या विद्येची कीर्ति ऐकली होतीच व हल्लीं ते येथेंच सरदार गृहांत उतरले आहेत असें कळतांच त्यांनीं आपलेकडले एक शास्त्री महाराजांकडे पाठवून भेटीची इच्छा प्रदर्शित केली. त्याप्रमाणें दुसरे दिवशीं महाराज त्यांच्या दर्शनास गेले. आचार्यांनीं महाराजांची फार प्रेमपूर्वक भेट घेतली. परस्पर संभाषण प्रसंगीं त्यांस महाराजांनीं शांकरभाष्यांतील दोन विरोधी स्थळें दाखवून मोठ्या विनयानें त्यांचा समन्वयविषयक प्रश्न विचारला. ते विरोध असेः—

" इतरेषांचानुपलब्धेः " ब्रह्मसूत्र अ० २ पाद १ या सूत्रावरील भाष्यांत आचार्यांनीं सांख्याच्या २४ तत्वांची उपलब्धि वेदांत नाहीं असें

म्हटलें आहे आणि "महाभूतान्यहंकारो बुद्धिरव्यक्तमेवच ......... सविकारमुदाहृतम्" या श्लोकावरील आचार्यांच्या गीताभाष्यांत वरील २४ तत्वांचा स्वीकार केलेला आहे. हा विरोध आहे. पुन्हां मांडुक्योपनिषद्भाष्यांत जगन्मिथ्यात्व सिद्ध केलें आहे व "वैधर्म्याच्च न स्वप्नादिवत्" या ब्रह्मसूत्रावरील शारीरभाष्यांत जगत् सत्य आहे असें म्हणून बौद्धमत खंडन केलें आहे. हाही विरोधच आहे.

या महाराजांच्या प्रश्नावर आचार्य कांहीं बोलले नाहींत. नंतर त्यांनीं महाराजांच्या विद्येचें अभिनंदन करून त्यांस बहुमानपूर्वक एक शालजोडी दिली. ती घेऊन परत येत असतांना महाराजांस गिरगांवांत वेद० शा० संपन्न लेलेशास्त्री यांची त्यांच्या ( शास्त्रीबोवांच्या ) दुकानांत भेट झाली. तेवेळीं त्यांस महाराज म्हणाले कीं "महापंचार्णवं घोरं यदि शूद्रोऽपि तीर्णवान् । तस्मै दानं प्रदातव्यं अप्रमेयं युधिष्ठिर ॥" या महाभारत वचनाप्रमाणें वैराग्यशील शूद्रालाही यद्यपि दान घेण्याचा अधिकार आहे तथापि माझी तितकी योग्यता नसल्यामुळें व मराठ्यांच्या अन्नानें करवीर आचार्यांची बुद्धि भ्रष्ट झाली तशी या शालजोडीनें माझीही होऊं नये म्हणून ती मी आपणांस देतों असें म्हणून महाराजांनीं शास्त्रीबुवांस ती शालजोडी देऊन टाकली.

यावेळीं महाराजांनीं सरदारगृहांतून "स्वजाति बांधवांचे चरणीं विनंती" व "धार्मिक व वैद्यक दृष्ट्या गोरक्षणाची आवश्यकता" हे दोन लेख प्रासिद्धी करितां पाठविले. पहिला लेख भाद्रपद वद्य १३ ता० २८।९।१३ रोजीं पाठविला. तो मुमुक्षु पत्राच्या ता० २।१०।१३ च्या अंकांत छापून प्रासिद्ध झाला.

यापूर्वी वेदोक्त प्रकरणांत आपल्या जातीचा आग्रहीपणा व कलहमूलकता दाखवून ब्राह्मणाशीं त्यांचा सलोखा करण्याच्या हेतूनें महाराजांनीं लिहिलेलीं दोन पत्रें व एक मुमुक्षूमधील लेख यांचा सारांश मागें दिला आहे. प्रस्तुतच्या लेखांत, आपण पाहिलेल्या कांहीं देशी संस्थानांत दिसून

आलेला आपल्या जातीचा व ब्राह्मणांचा बेबनाव मोडून त्यांचें सख्य जुळविण्याची महाराजांनीं खटपट केली आहे. देशी संस्थानांत मिळणारें अर्धवट शिक्षण, त्यामुळें विद्यार्थ्यांची होणारी ज्ञानलवदुर्विदग्ध स्थिती, व एखाद्या तत्वावर दृढ श्रद्धा ठेवण्याला किंवा पूर्ण निश्चय कळण्याला लागणाऱ्या तीव्र बुद्धीचा अभाव, अर्धशिक्षित मुलांना उच्च प्रतीचें शिक्षण देण्याची आवश्यकता, दुसऱ्या धर्मास इजा न देतां ज्याचा धर्म त्याला पाळूं देण्याचें ब्रिटिश सरकारचें स्तुत्य धोरण, ब्राह्मणांशीं सख्य केल्यानेंच ब्रिटिश राज्याला अधिक बळकटी आहे असा "हिवेल" साहेबांचा अभिप्राय, धर्म बाबतींत ब्रिटिश सरकारनें मोठ्या प्रमाणावर स्वीकारलेलें धोरण देशी संस्थानिकांनीं आपआपल्या संस्थानांत लहान प्रमाणांत स्वीकारल्यास त्यापासून होणारें आत्यंतिक हित, विद्येच्या दृष्टीनें, ब्राह्मणांनीं इतर वर्णांस दिलेल्या सवलती विसरून वेदाच्या नुसत्या अक्षरांविषयींच आग्रह धरण्याचा फोलपणा, इ० इ० गोष्टींचा मार्मिक व सयुक्तिक विचार करून पुढें महाराजांनीं आपल्या ज्ञातिबांधवांचे ठिकाणीं असलेला धर्मांचा क्षोलावा व स्वामी दयानंदापेक्षा अधिक विचारीपणा दाखवून दयानंदाच्या म्हणण्यांत परस्पर विरोध कोठें आहे तोही दाखविला आहे व शेवटीं देशी संस्थानिकादि सर्व स्वजाति बांधवापाशीं मोठ्या कळकळीच्या शब्दांनीं अशी विनंती केली आहेः—

" बापहो, आपसांत भांडूं नका. धर्मबाबतींत तरी ब्रिटिशसरकारच्याच धोरणाचें अनुकरण करा. अर्थ जर तुम्हांला शिकतां येतो तर अक्षरांविषयीं उगाच आग्रह करूं नका. ज्याचा त्याचा धर्मवेडेपणा ज्याच्या त्याच्याजवळ राहूं द्या. केवळ अक्षरें न पढविण्यानें तुमच्या बुद्धीच्या उन्नतीस अडथळा होत नाहीं. बिभीषणाला जसें रामापासून राज्य मिळवावयाचें होतें त्याप्रमाणें मला ब्राह्मणांपासून कांहीं मिळवावयाचें नाहीं. माझ्या व्रतादिकांस पैसे देणारे बहुधा ब्राह्मणेतरच असून उलट हर्दा, थूगांव आदि ठिकाणीं ब्राह्मणांच्या हातून थोडासा माझ्या विरुद्ध प्रयत्नही झाला होता; असे असतांही मला जे विचारानुकूल वाटतें तेंच लिहितों विकारानें

कांहींही लिहीत नाहीं. माझी विनंती मानिल्यास आपलें सर्वांचें हितच आहे. म्हणून गरीबाच्या वाणीचा अव्हेर करूं नका. निदान विचार तरी करा. श्रीआळंदीवल्लभ ज्ञानेश्वरमहाराज आपणां सर्वांस सुविचार व सुबुद्धि देवोत. ''

" धार्मिक व वैद्यकदृष्ट्या गोरक्षणाची आवश्यकता " हा महाराजांचा दुसरा लेख " गोवर्धनमाला " मासिक पुस्तकाच्या भाद्रपद महिन्याच्या ( शके १८३५ ) अंकांत प्रसिद्ध झाला. हाही लेख नेहमींप्रमाणेंच श्रुती, युक्ति व अनुभवप्रचूर असून म्लेच्छादि सर्व वर्णांस धार्मिक व वैद्यक दृष्टीनें गोरक्षण हें किती हितप्रद आहे हें अनेक प्रमाणें देऊन महाराजांनीं सिद्ध केलें आहे व शेवटीं पुढील शब्दांत लेखाचा उपसंहार केला आहे. " गाई व ब्राह्मण वैदिक धर्माचा मुख्य पाया आहे, तथापि प्रसंगविशेषीं कलींतील ब्राह्मण धर्म सोडतील असें म्हटलें आहे, परंतु गाईमधील धर्म निघून जाईल असें वाक्य कोठेंही नाहीं. म्हणून वेदोक्ताचा व्यर्थ हट्ट धरणाऱ्या लोकांचा ब्राह्मणांशीं थोडासा विरोध असला तरी गोरक्षणाकरितां त्यांनीं उत्तम झटलें पाहिजे. तात्पर्य, कोणीच धेनुजननीचा अव्हेर करूं नये अशी माझी गरीबाची सर्वांच्या चरणाजवळ विनंती आहे. तिचा आळंदीवल्लभकृपेनें सर्वच स्वीकार करोत. '' असो.

याप्रमाणें मुंबईस महाराजांचा मुक्काम १८ दिवस होता. नंतर आश्विन शुध्द ८ चे दिवशीं तेथून ते हरद्यास परत आले.

या अठरा दिवसांतील महाराजांच्या निरूपणादिकांस ह० म० प० पांगारकर यांनीं ' बैठे कीर्तन ' असें नांव देऊन त्या एकंदर प्रसंगाच्या बहारीचें वर्णन आपल्या मुमुक्षु पत्राच्या ता० २ आक्टोबर १९१३ च्या अंकांत " श्रीगुलाबराव महाराज " असा अग्रलेख लिहून फार सुंदर केलें आहे. त्यांत ते म्हणतात:—" त्यांची विद्वत्ता व साधुत्व दोन्हीही अपूर्व आहेत व बहुधा सर्व विषयांवर अस्खलित, प्रेमळ व निश्चयानें ते इतकें

सशास्त्र व सुंदर भाषण करतात कीं, ' तियें सिद्ध प्रज्ञेचेनि लाभें। मनाचि सारस्वतें दुभे । मग सकळ शास्त्रें स्वयंभे । निघती मुखें ' ( ज्ञानेश्वरी ६–४५४ ) ह्या ज्ञानोबारायांच्या उक्तीची आठवण पदोपदीं होतें. श्रुतिस्मृतिपुराणें, महाराष्ट्र, हिंदी व संस्कृत वाङमय, फारशी व आरबी भाषेंतील वाङ्मय, द्वैताद्वैतसिद्धांत, महंमदी धर्म, ख्रिस्तीधर्म, जैन व लिंगाईतधर्म, हिंदुस्थानांतील नानाविध पंथ, पाश्चात्य तत्वज्ञान, योगशास्त्र, सांख्यशास्त्र, ज्योतिष, वैद्यशास्त्र, मीमांसाशास्त्र, वेदांत इ० अनेक विषयांचें ते इतक्या सुलभ रीतीनें, सावतरण व सोदाहरण उत्कृष्ट प्रतिपादन करतात कीं, ह्या पुरुषाचें हें ज्ञान ह्या जन्मांत संपादिलेलें नसून प्राग्जन्माच्या अध्ययनाचें किंवा दैवीकृपेचें व उपासनेचें फळ आहे असें कोणासही वाटल्यावांचून रहात नाहीं. इतकेंही असून कर्म, ज्ञान व उपासना या तिहींचाही त्यांच्या भाषणांत व आचरणांत इतका उत्कृष्ट मिलाफ झालेला आहे कीं, त्यांना येथें एका मार्मिकानें म्हटल्याप्रमाणें ' विदुराचा अवतार ' म्हणावेंसें वाटतें. हिंदुधर्म यांच्यापासून शिकावा व यांच्या आचरणांत पहावा. वर्णाश्रम धर्म व जातिभेद पाळण्यांतच हिंदुराष्ट्राचें आत्यंतिक कल्याण आहे असा यांचा निश्चय आहे. हे संस्कृतांतही बोलतात. यांची वाणी अत्यंत मधुर असून स्पष्ट व खणखणीत आहे. यांचें बैठें कीर्तन व पुराण चाललें कीं श्रोत्यांच्या वृत्ती अगदीं तन्मय होतात. पुराणांत तात्कालिक स्फुर्तीनें शेंकडों ओव्या व अभंग हे रचत रचत म्हणतात. ज्ञान, भक्ति आणि आचार हे तिन्ही एकत्र क्वचित् दिसतात पण यांच्या ठायीं एकवटलेलें आहेत. यांची उपासना श्रीकृष्णाची असून श्रीज्ञानेश्वरांच्या ठिकाणीं यांचें मधुर प्रेम आहे. यांचें ज्ञान पाहिलें म्हणजे जन्मांतराचा सिद्धांत सहज मनावर ठसतो. '' इ० इ०. असें म्हणून शेवटीं भाद्रपद वद्य १२ चे दिवशीं काल्याचे वेळीं झालेले ७ अभंग दिले आहेत. त्यांतला शेवटला अभंग येथें घेतों:—वेळेवरी पाणी वर्षोत कां मेघ । धान्यपूर्ण सांग भूमि होवो ॥ १ ॥ सर्वत्र देशांत वाढो कां स्वधर्म । विषयाचा काम हारपोनि ॥ २ ॥ सर्वत्र ब्राह्मण असोत निर्भय ।

वेद बापमाय रक्षावया ॥ ३ ॥ सपुत्र सधन होवोत कां जन । मिळोनि भजन करावया ॥ ४ ॥ अनंत आयुष्य हो गाई गोपाळा । प्रगटो सावळा कृष्णनाथ ॥ ५ ॥ ज्ञानेश्वर स्वामी कारुण्याची खाणी । सत्य माझी वाणी करा ताता ॥ ६ ॥

हरद्यास आल्यावर महाराजांनीं कार्तिक शु॥ १ चे दिवशीं " जातिभेद विषयक संवाद " हा लेख मुमुक्षूंत छापण्याकरितां पाठविला. तो मुमुक्षूंत ता० ६ नोहेंबर १९१३ च्या अंकांत छापला आहे. या लेखांत खानपानासंबंधीं ब्राह्मणेतरांच्या कांहीं किरकोळ आक्षेपांस उत्तरें असून वर्णाश्रमपोषक इतर कांहीं बाबतींतही जिज्ञासु व धार्मिक यांच्या संवादरूपानें चर्चा केली आहे. त्यांतील निवडक वचनांचा व प्रश्नोत्तरांचा येथें संग्रह करणें इष्ट वाटतें:—

× × सर्व ऐहिक धंदे ब्राह्मणांनीं इतर जातींच्या हातीं दिले आहेत. केवळ तोंडाचाच धंदा आपल्याकडे घेतला आहे. प्रत्येक जातीनें एकी केली तर ब्राह्मणाला घर बांधून देण्याला सुतार लोहार देखील मिळणार नाहींत ही कल्पना त्यांचे मनांत आली नसेल असें म्हणतां येणार नाहीं. पण. त्यांनीं तडजोड़ केली नाहीं.

धंदे चोरून ठेविल्यानें जितकें आजच्या कालांत लोकांचें अडत आहे, तितकें धर्म चोरून ठेविल्यानें अडत नाहीं. पश्चिमेकडे राष्ट्रीय बाब व धर्माची बाब हे दोन निराळे मानले जातात त्याचेंही कारण हेंच आहे. याचा तूं चांगला विचार कर व व्यर्थ भांडणाचें मूळ मनांतून काढून टाक.

दुसऱ्या राष्ट्रांत जाऊन वसाहती करणें जसें राष्ट्राला घातक आहे त्याप्रमाणें धर्मांतर करणेंही धर्माला घातक आहे. तसेंच दुसऱ्या देशांतील लोक आपल्या देशांत येऊं देणें जसें राष्ट्राला घातक आहे तसें दुसऱ्या धर्मांतील लोक आपल्या धर्मांत घेणेंही घातक आहे. शिवाय धर्मांतर केल्यानें अमुक धर्म उच्च व अमुक धर्म नीच अशी भेदबुद्धि उत्पन्न होत असते. सर्व धर्म सारखेच परमेश्वराकडे जातात अशी समबुद्धि रहात नाहीं.

जिज्ञासु—हिंदु धर्मांत कांहीं अनीतीचे प्रकार फार आहेत म्हणतात. धार्मिक—तसे ते सर्वच धर्मांत आहेत. ×× धर्म केवळ नीतीवर अवलंबून नसून आगमावर अवलंबून आहे. जिज्ञासु—मग पतितपरावर्तनाविषयीं आपलें म्हणणें काय आहे ? धार्मिक—कर्ममार्गानें पतितपरावर्तन करण्याला मी अनुकूल नाहीं, पण भक्तिमार्गांत पतितपरावर्तनाविषयीं मी अनुकूल आहे. कारण आपली पूर्वीचीच भक्ति संस्कारानें दृढ होणारी असते. धर्मांतर केलेल्यांची मरतांना मानसिक स्थिती चांगली नसते हें म्याक्समुलरनीं दिलेल्या गोरेशास्त्रीच्या उदाहरणावरून तुला कळेल. ×× धर्म सर्वांच्या आंत असणारी मनोवृत्ति आहे. तिचें मूळ अंतःकरणाला अधिक चिकटलेलें असलें पाहिजे. पण बाह्य कुटुंबाच्या प्रेमाइतकीही तिला जो किंमत देत नाहीं तोच अनेक धर्मांतरें करितो. जिज्ञासु—मग सर्व धर्मांचें ऐक्य कसें ओळखावें ? धार्मिक—तें आचाराच्या द्वारानें ओळखावयाचें नाहीं तर विचाराच्या द्वारानें ओळखावें लागतें. ×× जिज्ञासु—सर्वांना जर आपआपल्या धर्मांप्रमाणें एकच फळ मिळतें तर ब्राह्मणांच्या माथीं एवढें कठीण धर्म कां लावून दिले ? व ते त्यांनीं तरी कां पाळावेत ? कोणता तरी एखादा सोपा धर्म पाळावा म्हणजे झालें.

धार्मिक—ही गोष्ट तूं ईश्वरास विचार. ×× मनुष्य व स्त्री सारख्याच दर्जाचे असून गर्भाचें दुःख बायकांनाच कां अधिक ? मला वाटतें तें त्यांच्या कर्माप्रमाणें आहे. जसें पाणी सर्व झाडांना साधारण कारण असून त्याचें त्याचें बीज असाधारण कारण आहे. ×× जितका जितका रोग जास्त तितका तितका त्याला वर्ज्य प्रतिबंध जास्त. तसें जितका जितका आपल्या कर्मानें जो खालीं उत्पन्न होतो तितके तितके त्याला जास्त प्रतिबंध असतात. तसाच जितका जो उंच उत्पन्न होतो तितकी त्याला जबाबदारी जास्त असते. सर्वच गोष्टी सर्वांना सुलभ नाहींत. मनुष्य उच्च आहे. त्याला आकाशांत उडण्याकरितां विमानादिकांचे श्रम करावे लागतात. पक्ष्यांना ते करावे लागत नाहींत. पण त्यांना बोलण्या वगैरेचे इतर प्रतिबंध आहेत. तसें उच्च ब्राह्मण वर्गाला कठीण धर्म सांगितला आहे. खालच्या वर्गाला तेवढा कठीण सांगितला नाहीं. तर

इतर वैदिक प्रतिबंध अधिक आहेत. मिळून बेरीज सारखीच. म्हणून कोणी कोणाबद्दल मत्सर करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. जिज्ञासु—मग भक्तीनें एकत्र झालेल्या सर्वांनीं सर्वांचे हातचें जेवावें काय? धार्मिक—छेः जेवणें हें भक्तीचें फळच नव्हे. भक्तीचें फळ एकादशी. × × जेवतांना चित्राहुती घालणें इत्यादि कर्मकांडाची जरूरी आहे. एवढ्याकरितां जेवणें यथाव्यवहारच झालें पाहिजे. धर्माचें ऐहिक प्रयोजन मनांत धरून धार्मिक व सामाजिक प्रश्नांचा मेळ घालण्याची तूं खटपट करूं नको. जिज्ञासु—महात्मे विश्वकुटुंबी असले पाहिजेत असें म्हणतात आणि आपले मनांत तर आपलेपणाचा संकोच फारच दिसतो? धार्मिक—विश्वकुटुंबी वर्तन म्हणजे ब्रह्मरूपानें विश्व हें एक आहे असें पहाणें होय. जगद्रूपानें तें एक आहे असें पहाणें नव्हे. × × जगद्रूपानें जर आपलेपणा वाढवावयाचा असेल तर जेवणाच्या ताटावरील माशा वारण्याचें कांहीं कारण नाहीं. डसणाऱ्या चिलटांकरितां मच्छरदाणी नको व प्लेग जंतूंच्या निवारणार्थ कमिशन बसविण्याचें कांहीं प्रयोजन नाहीं. तुझ्या बायकोवर व मुलावर प्रत्येक जण हक्क दाखवूं लागला तर तुला आवडेल काय? जिज्ञासु—अशानें तर उच्च मनोवृत्तींही नाहींशा होतील व आपली जाति सोडून दुसऱ्या जातीवर कोणीही दया करणार नाहीं?

धार्मिक—मनुष्यादिक जातिभेद सत्वगुणाच्या संकोचाकरितां नाहींत तर रजोगुणाच्या संकोचाकरितां आहेत. जेवणें, खाणें, लग्नकरणें इत्यादि विषयांना आळा बसावा म्हणूनच जातिभेद शास्त्र सांगतें. दया वगैरे सात्विक धर्म आहेत. ते कोणावरही करण्याकरितां जातिभेद अडथळा करीत नाहीं. × × आतां एखादी महारीण जर विधवा झाली तर तिला एखाद्या ब्राह्मणानें बायको करून घेणें या दयेला जातिभेद अडथळा करतो खरा. पण तेवढा अडथळा स्वतःची मुलगी विधवा झाली तरी तो करतो. जिज्ञासु—हिंदुधर्मापेक्षां इतर धर्मांचे लोक सृष्टींत फार आहेत. धार्मिक—पहिलें कारण कीं हिंदुधर्माकडून इतर धर्मांवर आपत्ती आल्या नाहींत. हिंदुधर्मावर सर्व बाजूंनीं आपत्ती आल्या असूनही त्याचे तेवीस कोटी लोक आज हयात आहेत. इतका आपत्कालीं टिकाव धरणें हें कांहीं थोडं नव्हे. जिज्ञासु—आम्हांला असें वाटतें कीं एखादे दिवशीं हिंदुधर्म

अगदीं नष्ट होईल. कारण त्याचीं योगशास्त्रासारखीं शास्त्रें फार कठीण आहेत व तीं थोडक्याच लोकांत रूढ होण्यासारखीं आहेत. धार्मिक—हिंदुधर्म अगदीं स्वाभाविक आहे. संसारिक सुख सगळ्यांनांच सारखें मिळत नाहीं, हा सृष्टिनियम आहे. त्यामुळें कंटाळून जाऊन विषयाचा परित्याग करणारे जे थोडके लोक निघतील त्यांच्याकरितांच योगशास्त्रासारखीं शास्त्रें हिंदुधर्मांत आहेत. सृष्टींतील दुःख बंद पडावयाचें नाहीं तोंपर्यंत वैराग्य बंद पडावयाचें नाहीं व जोंपर्यंत वैराग्य बंद पडावयाचें नाहीं तोंपर्यंत योगशास्त्रही बंद पडावयाचें नाहीं. आतां थोड्या माणसांजवळ तें राहील एवढें खरें पण तें थोड्याकरितांच आहे. सुखदुःखाच्या अनुमानानें कर्माचा नियम अबाधित आहे व जडाच्या हातून कार्य होत नसल्यामुळे चेतनसंबंधीं नियम अबाधित आहे. एवढ्याच करितां हिंदुधर्म अबाधित आहे. वत्सा, माझें स्पष्ट मत असे आहे कीं ज्यांनीं त्यांनीं आपल्या धर्माप्रमाणे वागूनच सिद्धि मिळवावी. परमेश्वर कोणाचाही पक्षपाती नसल्यामुळे तो त्यांतच राजी आहे. इ० इ०

असो. यापुढील पांचसहा महिनेपर्यंत हरदा येथेंच महाराज राहिले. नेहमींप्रमाणें ग्रंथलेखनाचें काम चालू होतेंच. प्रेमनिकुंज, संप्रदाय सुरतरु, व ' साधुबोध ' नांवाचा प्रश्नोत्तररूप ग्रंथ यांचें लेखन विशेष त्वरेनें चाललें होतें. " जांबूळाख्यान " म्हणून पौराणिक कथेवर साकया, दिंड्या वगैरे नानावृत्तांत एक नवीन आख्यान महाराजांनीं रचलें होतें. त्याचेंही वाचन, गायन वगैरे मधून मधून होत असे. महाभारतादि ग्रंथांचें वाचन, शास्त्रचर्चा वगैरे नेहमींचा क्रमही चालू होताच. या प्रसंगास श्रीयुत कृष्णराव नारायण रेंगे जहागिरदार हे नित्य महाराजांच्या सान्निध राहून त्यांची शास्त्रचर्चा वगैरे मोठ्या आवडीनें श्रवण करीत व नाना शंका वगैरे महाराजांस विचारून समाधान करून घेत. या त्यांच्या शंकासमाधानांमुळें इतर श्रोतेमंडळीलाही बरीच करमणूक होऊन काव्यशास्त्रविनोदांत त्यांचा काल जात असे.

असो. रा० रघुनाथराव काका केकरे हेही कधीं कधीं या चर्चेत येऊन

वसत. एके दिवशीं महाराज बंगळीवर बसून त्यांजबरोबर बोलतांना ज्योतिष शास्त्राचा विषय निघाला. त्यावेळीं ' पाराशरी होरा ' या ग्रंथा-संबंधानें महाराज म्हणाले कीं कलियुगांत हा ग्रंथ अत्यंत प्रमाण असून त्यांत विलक्षण गणित सांगितलें आहे. सूर्यादि ग्रहांचें गणितही त्यांत आहे. सूर्य किती काळानें थंड होईल व त्याजागीं दुसऱ्याच गोलाला सूर्यत्व येईल ह्याचें देखील गणित त्यांत आहे. प्रश्न करणाराची स्वरपरीक्षा, त्यावरून कुंडली काढणें, मैथुन काळीं स्त्रियेनें काय भक्षण केलें होतें, मातापिता यांचें वर्णन, त्यावरून त्या बालकाचें पूर्वकर्म वगैरे सगळें या पाराशरी होऱ्याच्या साह्यानें सांगतां येतें. याप्रमाणें विविध शास्त्रांतील नवी नवी माहिती महाराजांच्या तोंडून नित्य ऐकायला मिळत असे.

एके दिवशीं साताऱ्याचे कोणी घारपुरे मास्तर महाराजांचे भेटी-करितां मुद्दाम हरदा येथें आले व ३० अध्यायांचा एक स्वकृत ओवी-बद्ध ग्रंथही त्यांनीं बरोबर आणला होता. यापूर्वीं हा ग्रंथ घेऊन ते श्रीवासुदेवानंद सरस्वती यांजकडे गेले होते, पण त्यांनीं तो पाहण्याचें नाकारल्यामुळें ते इकडे आले असें त्यांच्या म्हणण्यावरून दिसलें. या ग्रंथाचा मधून मधून कांहीं भाग त्यांनीं महाराजांस वाचून दाखविला व पुनर्जन्म विषयक भाग वाचून दाखवितांना बराच वेळ चर्चा करून कांहीं प्रश्न वगैरे त्यांनीं विचारले. त्यांचीं उत्तरें देऊन कर्मांच्या समुच्चायक व व्यभिचायक ह्या दोन प्रकारांचें महाराजांनीं विवेचन केलें व पुढें साय-न्सचा संबंध निघाला असतां " Science of sciences " या पुस्तकाचें प्रमाण देऊन अलीकडे H 2 0 ही थिअरी मोडून नुसत्या H नेंच पाणी बनतें असें नवीन मत निघाल्याचें महाराजांनीं सांगितलें.

पुढें गोपीप्रिय हेमंतऋतूस आरंभ होऊन भगवद्विभूति मार्गशीर्ष महिना लागतांच शुद्ध तृतियेच्या दिवशीं रविवारीं कात्यायनीव्रतास आरंभ

बैठक म्हणजे ध्यान करणाऱ्या जीवाची बैठक कोणती ? "देवोभूत्वा देवं यजेत्" हें तत्व ध्यानांत ठेवून ध्यान कसें करावयाचें ?

४. मंत्राचे न्यास शरीराच्या अवयवाचे ठिकाणीं करावयाचे म्हणजे त्या क्रियेचा अर्थ काय ? मंत्ररूप देवता आहे म्हणजे काय ? पृथ्वी वगैरे तत्वांचे गंधफूल वगैरे उपचार ध्यानस्थ देवतेस करतात हें काय ? ध्यानकर्ता, ध्यान-विषय, ध्यानक्रिया या तिहींची संगति ध्यान करतांना कशी जमवावयाची ? हें मला कळत नाहीं, त्याची फोड कृपा करून करावी.

५. रोजचें कर्म कसें करावें ? म्हणजे करतांना मनाची बैठक व भावना कशी ठेवावी ? उदाहरणार्थ संध्या करण्यास सुरुवात केली तर केशवादि नामोच्चार केल्याबरोबर परमेश्वरानें हे अवतार घेऊन भक्तांचें रक्षण पूर्वीच्या काळीं केलेलें आहे, ही भावना जागरुक असली पाहिजे कीं नाहीं ? मार्जन करतांना अंतःशुद्धि व बहिः शुद्धि पाणी मंत्रून तव्द्वारा करीत आहों अशी कर्त्यांची भावना पाहिजे कीं नको ? याचप्रमाणें अर्घ्य उपस्थान व ब्रम्हयज्ञ वगैरे करतांना तशी भावना नसेल तर चित्तशुद्धि होण्यास कर्माचा उपयोग होईल कीं काय ?

६. नामस्मरण करतांना ( यांत मी वेदाध्ययन जप यांचाही समावेश करतों ) नामाचा जो उच्चार आपण करतों तिकडे आपले लक्ष्य ठेवावें असें ब्रह्मसिद्धांतमाला म्हणून रा. बाबा गर्दे यांनीं केलेल्या ग्रंथांत म्हटलेलें आहे. नामाचा उच्चार करतांना नामी याचें स्मरण ठेवलें पाहिजे. तर नामाच्या उच्चाराकडे लक्ष्य गुंतून राहिल्यास ध्यानाचा विषय जो नामी म्हणजे देव तिकडे लक्ष्य कसें ठेवावें ?

७. संचित, प्रारब्ध व क्रियमाण अशीं कर्में आहेत. या जन्मांत भोगून संपवून टाकण्याकरितां संचितांतून काढून ठेवलेलें जें कर्म तें प्रारब्ध, त्या कर्माच्या भोगांत क्रियमाण कर्मानें फरक होईल किंवा नाहीं ? होत नसेल तर मंत्र, वैद्यक व जोतीष वगैरे शास्त्रांनीं भोगपरिहारार्थ जे औषधी मंत्रतंत्रादि उपाय सांगितले आहेत त्यांचें वैय्यर्थ्य होतें. फरक होत असेल तर कोणत्या ठरीव गोष्टी बदलतात व कोणत्या बदलत नाहींत ?

होऊन यथाविधी कार्यक्रम सुरू झाला. व्रतसंबंधी पूजाअर्चा आटपल्यावर नेहमींचा महाराजांचा लेखन वाचनादि व्यासंग चालूच असे. मात्र ३० दिवसपर्यंत व्रतस्थ राहून स्थलांतर वगैरे करीत नसत. याप्रमाणें व्रत सुरू असतांना मुंबईचे प्रसिद्ध हायकोर्ट वकील रा० रा० महादेव वामन भट यांजकडून पूर्वी एक पत्र आलें. त्यांत डॉ० देशमुख यांचे घरीं व अलीकडे सरदार गृहांत असें दोन वेळ मुंबईस महाराजांचें आगमन होऊनही दोन्ही प्रसंगीं प्रत्यक्ष भेट घेण्याचा योग आळसामुळें आपल्या हातून जमून आला नाहीं असें लिहून नंतर पुढील दहा प्रश्नांचीं पाठविण्याची विनंती केली आहे. हे प्रश्न बहुतेक इतर धार्मिक गृहस्थांनाही उपकारक असल्यामुळें ते येथें घेतोः—

१. कर्मानें चित्तशुद्धि होते असें ठरलेलें आहे, तरी तीं कर्मे करतांना मनावर त्यांचा संस्कार किंवा व्यापार कसा घडून चित्तशुद्धि होते? चित्तशुद्धि म्हणजे संकल्प विकल्प नाहींसे होऊन चित्त स्थिर होणें असा मी समजतो. आपल्या समाजांत जुन्या पद्धतीनें त्रिकालसंध्या, पंचमहायज्ञ वगैरे रोजची नित्य व नैमित्तिक कर्में करणारे व तीं कर्मेंही श्रुतिस्मृतिप्रणीत मार्गानें करणारे भिक्षुक, शास्त्री, वेदांती, व गृहस्थ बरेच आहेत व ६०।७० वर्षेपर्यंत अशीं कर्में करीत राहिलेले दिसतात, पण त्यांच्या मनाचे संकल्पविकल्प जाऊन त्यांचें चित्त शुद्ध झाल्यासारखें त्यांच्या बाह्य वर्तनावरून तरी दिसत नाहीं. इतकेंच नाहीं तर रागलोभादि मनोविकारही तादृश कमी झाल्याचें दिसत नाहीं याचें कारण काय?

२. " मनसैव कृतं कर्म न शरीरं कृतं कृतं " (योगवा.) या न्यायानें नित्य कर्में करतांना ह्मणजे पूजाअर्चा, रुद्राभिषेक, जपादि कर्में करतांना मन पूज्य देवतेकडे एकाग्र करून त्या कृत्यांत गुंतवल्याखेरीज नुसता शद्बोच्चार करून कर्मांचा संस्कार मनावर अल्प तरी घडणें शक्य आहे कीं काय?

३. ध्यान करतांना 'हृदि विन्यस्य' ह्मणजे देवतेचें ध्यान हृदयामध्यें करावें असें सांगितलेलें आहे, मग हृदयांत देवाचें ध्यान केल्यावर आपली

बैठक म्हणजे ध्यान करणाऱ्या जीवाची बैठक कोणती ? "देवोभूत्वा देवं यजेत्" हें तत्व ध्यानांत ठेवून ध्यान कसें करावयाचें ?

४. मंत्राचे न्यास शरीराच्या अवयवाचे ठिकाणीं करावयाचे म्हणजे त्या क्रियेचा अर्थ काय ? मंत्ररूप देवता आहे म्हणजे काय ? पृथ्वी वगैरे तत्वांचे गंधफूल वगैरे उपचार ध्यानस्थ देवतेस करतात हें काय ? ध्यानकर्ता, ध्यान-विषय, ध्यानक्रिया या तिहींची संगति ध्यान करतांना कशी जमवावयाची ? हें मला कळत नाहीं, त्याची फोड कृपा करून करावी.

५. रोजचें कर्म कसें करावें ? म्हणजे करतांना मनाची बैठक व भावना कशी ठेवावी ? उदाहरणार्थ संध्या करण्यास सुरुवात केली तर केशवादि नामो-च्चार केल्याबरोबर परमेश्वरानें हे अवतार घेऊन भक्तांचें रक्षण पूर्वीच्या काळीं केलेलें आहे, ही भावना जागरुक असली पाहिजे कीं नाहीं ? मार्जन करतांना अंतःशुद्धि व बहिः शुद्धि पाणी मंत्रून तद्द्वारा करीत आहों अशी कर्त्याची भावना पाहिजे कीं नको ? याचप्रमाणें अर्घ्य उपस्थान व ब्रम्हयज्ञ वगैरे कर-तांना तशी भावना नसेल तर चित्तशुद्धि होण्यास कर्माचा उपयोग होईल कीं काय ?

६. नामस्मरण करतांना ( यांत मी वेदाध्ययन जप यांचाही समावेश करतो ) नामाचा जो उच्चार आपण करतों तिकडे आपले लक्ष्य ठेवावें असें ब्रह्मसिद्धांतमाला म्हणून रा. बाबा गर्दे यांनीं केलेल्या ग्रंथांत म्हटलेलें आहे. नामाचा उच्चार करतांना नामी याचें स्मरण ठेवलें पाहिजे. तर नामाच्या उच्चाराकडे लक्ष्य गुंतून राहिल्यास ध्यानाचा विषय जो नामी म्हणजे देव तिकडे लक्ष्य कसें ठेवावें ?

७. संचित, प्रारब्ध व क्रियमाण अशीं कर्में आहेत. या जन्मांत भोगून संपवून टाकण्याकरितां संचितांतून काढून ठेवलेलें जें कर्म तें प्रारब्ध, त्या कर्माच्या भोगांत क्रियमाण कर्मानें फरक होईल किंवा नाहीं ? होत नसेल तर मंत्र, वैद्यक व जोतीष वगैरे शास्त्रांनीं भोगपरिहारार्थ जे औषधी मंत्रतंत्रादि उपाय सांगितले आहेत त्यांचें वैय्यर्थ्य होतें. फरक होत असेल तर कोणत्या ठरीव गोष्टी बदलतात व कोणत्या बदलत नाहींत ?

८. मंत्राच्या जपाचा व्यापार प्रारब्ध बदलण्याचे कामीं कसा घडतो ? म्हणजे मी मंत्राचा जप केला म्हणजे जपाचीं अक्षरें बीजें वगैरेचा पुनरुच्चार वारंवार केल्यामुळें आकाशांत त्या ध्वनीचा कोणता परिणाम घडून मागील ठरीव गोष्टी बदलतात ? उदाहरणार्थ एखाद्या जीवास प्रारब्धभोग म्हणून ४० व्या वर्षीं प्लेगसारखा मोठा रोग होण्याचें नियतीनें ठरलेलें आहे. टाळतां येणारें प्रारब्ध व न टळणारें प्रारब्ध असे दोन भाग मानतात त्या समजुती-प्रमाणें हें प्रारब्ध त्या जीवाचे टळणाऱ्या प्रारब्धापैकीं आहे अशी आपण कल्पना करूं व तें टळण्याकरितां त्या जीवानें शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें मृत्युंजयाचा जप केला किंवा करविला तर जप करण्यामुळें मंत्राच्या बीजांच्या व इतर अक्षरांच्या पुनरुच्चारानें सृष्टींत असा कोणता व्यापार घडतो व त्यामुळें अशी कोणती अदृष्ट शक्ति निर्माण होते कीं त्या योगानें ह्या जीवाचीं प्लेगच्या रोगाचीं सर्व लक्षणें नाहींतशी होऊन त्यास तो व्यापार रोगमुक्त करतो ? थिऑसफीच्या कांहीं ग्रंथांत असा उल्लेख आहे कीं अंतरिक्षांत जीवांच्या कर्मांचा रेकार्ड असतो, म्हणजे त्याचें प्रारब्ध लिहिलेलें असतें तर तें कसें पुसलें जातें ? ध्वनिशास्त्राप्रमाणें Sound creates, Sound preserves and sound destroys असें ठरलेलें आहे, तर ध्वनीच्या योगानें वस्तु उत्पन्न कशा होतात व नष्ट कोणत्या व्यापारानें होतात ?

९. हल्लीं जुन्या वैद्यकास उतरती कळा लागून तें नष्टप्राय झाल्यासारखेंच आहे. कोट्यावधि रुपयांचीं विलायती औषधें येथें खपत आहेत व जुन्या मात्रा, रसायनें, भस्में, काढे, वगैरे सर्व औषधाचे प्रकार निरुपयोगी ठरल्यासारखे आहेत. वैद्यसंम्मलनें, सभा वगैरे मधून मधून भरतात व डाक्तराचे व वैद्याचे वादविवाद होतात; त्या वादाचे विषय पुष्कळ आहेत, पण महत्त्वाचा विषय म्हणजे आर्यवैद्यकाची वातपित्तकफ या त्रिधा प्रकृतीच्या पायावर रचलेली रोग-निदानाची पद्धत हा होय. वेदान्त शास्त्रांत पांचभौतिक शरीर असून अमुक भाग पार्थिव, अमुक तैजस असें ठरलेलें आहे. आपल्या सर्व शास्त्रांच्या मुख्य सिद्धांताची एकवाक्यता असल्यामुळें वातपित्तकफाची मीमांसा आपल्यासारख्या अधिकारी पुरुषांनीं लोकांपुढें मांडल्यास पुष्कळ डाक्तरांचे दुराग्रह नाहींसे होऊन

जुन्या पद्धतीचें पर्यालोचन करण्याची त्यांस बुद्धि होईल व आर्यवैद्यक सजीव होऊन महत्कार्य होईल; तरी या वातपित्तकफाच्या पद्धतीचें विवरण आपण करावें अशी विनंती आहे.

१०. एखादा मुमुक्षु पुरुष वर्णव्यवस्थेनुरूप श्रुतिस्मृतिप्रणीत धर्मकर्में करीत आहे तर त्याच कर्मानुष्ठानानें त्याच्या चित्ताचे संकल्प विकल्प नाहींतसे होऊन चित्त शुद्ध होऊन सद्गुरु त्यास भेटतील ? किंवा त्यानें गुरूच्या शोधार्थ गांवोगांवीं हिंडून गुरु शोधून काढले पाहिजेत ? सद्गुरुही सच्छिष्य शोधितच असतात व तसा शोधून काढून त्यास कृतार्थ करतात. वाळलेल्या गवतास काडी ओढून तें पेटविण्यासारखाच सद्गुरु उपदेशाचा प्रकार आहे असें वाचल्याचें स्मरतें म्हणजे शिष्याच्या मनाची पूर्ण तयारी झाल्यावर सद्गुरु लांब नाहींत, ते तात्काळ भेटतातच व त्याची तयारी होणें म्हणजे ओलें गवत वाळून जळण्यास तयार होण्यासारखेंच आहे व गुरूच्या एका शद्बानें शिष्याचे कार्य होतें असें म्हणतात तर यापैकीं खरें कोणतें ?

वरील प्रश्नांचीं उत्तरें महाराजांकडून गेलीं तीं:—

श्रीज्ञानेश्वरमाउली समर्थ.

हरदा ता. २–१२–१३.

रा० भटसाहेब वकील यांचे चरणीं साष्टांग दंडवत वि० वि० आपलें कृपापत्र ता. १ चें आजच मिळालें. मजकूर समजला. आपण माझी भेट घेतलीच पाहिजे होती अशा प्रकारचा मी अधिकारी असेन असें मला वाटत नाहीं. शिवाय मी शूद्र आहे. त्यामुळें माझ्या वाणीमध्यें अधिकार येणेंही शक्य नाहीं. तथापि आपण जे प्रश्न लिहिले आहेत त्यांचीं उत्तरें यथामति लिहून पाठवितों. आपणास पसंत पडतील तर पहावें.

१ ल्या प्रश्नाचें उत्तर.—कर्मांचा नियम प्रत्यक्षाने किंवा अनुमानानें निघता असें हिंदुशास्त्राचे मत नाहीं. कारण प्रत्यक्ष प्रमाण अत्यंत अल्प आहे. म्हणजे प्रत्यक्ष प्रमाणानें समजणारी गोष्ट तिन्ही काळीं असूं शकेल असा निश्चय सांगतां येत नाहीं. अनुमान प्रत्यक्षापेक्षां व्यापक आहे खरें. पण तेंही सामान्य गोष्टींचा

बोध करीत असतें. विशेष गोष्टीचा बोध करीत नाहीं. जसें फोनोग्राफ पाहिला म्हणजे कोण्यातरी माणसानें हा केला आहे येवढें ज्ञान अनुमान करून देतें. पण एडिसन् साहेबानींच तो केला आहे असें ज्ञान अनुमानानें होत नाहीं. तर तें केवळ शाद्बप्रमाणानेंच होऊं शकतें. कितीही अनुमानावर अवलंबून राहिलें तरीही कांहीं गोष्टी शाद्ब प्रमाणांतील घ्याव्याच लागतात. जसा आपला पिता कोण ? याविषयीं आपल्याजवळ तादृश प्रत्यक्ष प्रमाण कांहीं नसतें. बरें अनुमान प्रमाणाचा देखील येथें कांहीं उपयोग होतो असें म्हणावें तर तसेंही होत नाहीं. कारण सर्वांना बाप आहे म्हणून मलाही बाप असला पाहिजे इतकेंच कायतें अनुमान होऊं शकतें. तेव्हां आपलें पितृज्ञान आपल्याला अत्यंत शाद्बजन्य आहे असें म्हणणें भाग पडतें. जें जें अत्यंत शाद्बजन्य असतें तें तें अत्यंत अदृश्य असतें. कर्माचेही असे दोन परिणाम होतात. एक दृष्ट व. दुसरा अदृष्ट. अदृष्ट परिणामाचें फळ दुसऱ्या जन्मांत होतें. दृष्ट परिणामाचें फळ याच जन्मांत होतें. कर्मापासूनच आपण प्रश्न केला असल्यामुळें चार्वाकवाद आपल्याला पसंत नाहीं असें मी गृहीत करतों. कारण वरच्याँ पायरीपासून आरंभ करणारानें खालची पायरी उल्लंघिलीच असली पाहिजे असें अनुमान करणें साहजिक आहे. कर्मानें चित्तशुद्धि होतें असें ठरलेलें आहे असें आपल्या प्रश्नांत वाक्य आहे. तेव्हां अर्थातच चार्वाकाची पायरी आपण घेतलेली नाहीं. म्हणूनच मी दिलेल्या उत्तरावर चार्वाकाचे आक्षेप आपल्याला करतां येणार नाहींत. वादामध्यें पहिली पायरी चार्वाकाची आहे. पण ती आपण सोडली असल्यामुळें तेच संशय पुन्हां काढून पूर्वींच्या प्रश्नाच्या खालचे प्रश्न न करण्याविषयीं मी विनंती करितों. पूर्व जन्मांतील कर्म जर न मानलें तर विनाकारण एकाला सुख व एकाला दुःख देणाऱ्या परमेश्वराकडे विषमता येते. म्हणून अदृष्ट मानणें भाग आहे. आतां या अदृष्टाचा व जन्माचा अन्योन्याश्रय अनादि आहे असें आमच्या हिंदुशास्त्राचें मत आहे. मला वाटतें हें अनादि सांगणें कांहीं अलौकिक नाहीं. विचार केला तर कोणत्याच पदार्थाला आरंभ आहे असें दिसत नाहीं.कोणताही पदार्थ आपल्या पूर्वींच्या अवस्थेचें अवस्थांतर असतो. हें जडशास्त्रानेंही ठरल्यासारखेंच आहे.हाच नियम कर्मासही लागू आहे.

परंतु हें कर्म दोन प्रकारचें आहे. यमरूप आणि नियमरूप. अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य व अपरिग्रह या पांचास यम म्हणतात. स्नान, संध्या, देवतार्चन, जप इत्यादिकांस नियम म्हणतात. यम व नियम दोन्ही बरोबर केले असतां चित्तशुद्धि अवश्य होते. पण जे केवळ नियम करितात व यम करीत नाहींत त्यांना त्यापासून कांहीं फायदा होत नाहीं. आपण साठ साठ वर्षेंपर्यंत कर्म करणारांचें जें उदाहरण दिलें ते याच कोटींतील असावेत असें माझें मत आहे. मनुमध्यें असें स्पष्ट म्हटलें आहे. तो श्लोक येणेंप्रमाणें:—

" यमान् सेवेत सततं न नित्यं नियमान्बुधः ।
यमान्पतत्यकुर्वाणो नियमान्केवलान्भजन् ॥ "
मनुस्मृति अ० ४ श्लोक २०४.

भावार्थ—यमाचें नित्य सेवन करावें. नियमांचें ज्यावेळीं सांगितलें असेल त्यावेळींच सेवन करावें. म्हणजे संध्या प्रातःकाळीं व संध्याकाळींच करावी. परंतु अहिंसा व सत्य इत्यादिकांचें सेवन सतत करावें. जो यमांचें सेवन करीत नाहीं व केवळ नियमाचें पालन करितो, तो पतन पावतो असें म्हटलें आहे. तेव्हां साठ वर्षें काय, हजार वर्षें जरी यमावांचून नियमांचें सेवन केलें तरीही चित्त अशुद्धच राहणें साहजिक आहे. आपण संकल्प विकल्प नाहींसे होणें ही चित्तशुद्धीची व्याख्या केली आहे. पण ती थोडीशी व्यापक झाली आहे. हिंदुशास्त्रांत संकल्प विकल्प नाहींसे होणें हें उपासनेचें फळ सांगितलें आहे. कर्म, उपासना व ज्ञान या तिघांचीं तीन कार्यें वेदांतडिंडिमकारांनीं दाखविलीं आहेत. तीं येणेंप्रमाणें:—

कर्माणिचित्तशुद्ध्यर्थमैकाग्र्यार्थमुपासना ।
मोक्षार्थं ब्रह्मविज्ञानमिति वेदांतडिंडिमः ॥

भावार्थ—कर्मानें चित्तशुद्धि होते, उपासनेनें चित्त एकाग्र होतें, आणि ब्रह्मज्ञानानें मोक्ष होतो. असा वेदान्ताचा डिंडिम आहे.

आपण केलेल्या चित्तशुद्धीच्या लक्षणाचा एकाग्रतेंत अंतर्भाव होतो. म्हणून असद्वासना मात्र निवृत्त होणें याचेंच नांव चित्तशुद्धि आहे. चित्तशुद्धि झाली

तरी चांगल्या वासना हजारों मनांत येत राहतात. त्याला विक्षेप म्हणतात. त्याच्या निवृत्तीकरितां उपासनेची जरूर आहे. चित्तशुद्धि झाल्यावरही चांगल्या कामाकरितां कामक्रोध असले तर मला हरकत वाटत नाहीं. मुक्तेश्वरांनीं स्पष्ट म्हटलें आहे:—

ओवी—काम असावा ईश्वरभजनीं । क्रोध असावा इंद्रिय दमनीं । तीर्थ-प्रसादादि ग्रहणीं । लोभ अत्यंत असावा ॥

नियमाचा संस्कार अदृष्टरूपानें होत असून यमांचा दृष्टरूपानें मनावर संस्कार होतो. म्हणजे यमाची मनास संवय लागते व नियमापासून देवता या मार्गांतील विघ्नें दूर करितात. म्हणून या दोहींचाही अभ्यास समुच्चयानें केल्यासच कर्मापासून चित्तशुद्धि होते. हेंच आपल्या पहिल्या प्रश्नाचें उत्तर मला सुचलें तसें दिलें.

दुसऱ्या प्रश्नाचें उत्तर—माझ्या मतानें असें आहे कीं मनांत दोन वस्तु एकाकालीं धरतांच येत नाहींत. 'युगपत् ज्ञानानुत्पत्तिर्मनसोलिंगम्'। असें गौतमाचार्यांचें न्यायदर्शनांत सूत्र आहे. दोन ज्ञानें एकाकालीं न होणें हें मनाचें लक्षण आहे, असा त्याचा अर्थ आहे. पाश्चात्य सायकॉलजींतही 'अटेन्शन्' संबंधानें असेंच म्हटलें आहे. तेव्हां तोंडानें जे केवळ रुद्राचा जप करितात व मन दुसरीकडे लावतात त्यांचा तो जप सुटतच असला पाहिजे. मन जर कर्मांत गुंतलेलें असेल तर शद्बोच्चार पुरा होणें शक्यच नाहीं. आणि इतकेंही करून जर कोणी करीत असेल तर फोनोग्राफाप्रमाणें चित्तावांचून नुसत्या शद्बोच्चारानें कांहींच फायदा होत नाहीं असें माझें मत आहे. कारण तसें करणें म्हणजे यम सोडून नियम करणेंच होय. म्हणून या प्रश्नाचें उत्तर देखील प्रथम प्रश्नाच्या उत्तराचा शेषच आहे.

तिसऱ्या प्रश्नाचें उत्तरः—ध्यान ही योगांतील सातवी पायरी आहे. त्यामुळें ध्यान करणाऱ्याला हा प्रश्नच उत्पन्न होत नाहीं. कारण तेथपर्यंत गेलेला पुरुष प्रथमच प्रत्याहार व धारणा यांच्या योगानें सूक्ष्म देहावर आपला तैजसाभिमान स्थापन करीत असतो व विश्वाभिमानाचें त्यांत प्रविलापन करितो. त्यामुळें

हृदयाकाशांत ध्यान करणें त्याला सहज होतें. स्थूल देहाला जशी बैठकीची अपेक्षा आहे तशी सूक्ष्म देहाला नाहीं. कारण तो अपंचीकृत आहे. आतां प्राणायामामध्येंही ध्यान सांगितलें आहे खरें. परंतु वितर्क समाधी पूर्ण झाल्यानंतर सांगितलें आहे. नवशिक्याला सांगितलें नाहीं. नवशिक्याला ध्यानाचा उपदेश शरीराच्या बाहेर सांगितला आहे व या नवशिक्याच्या ध्यानाला मानसपूजा म्हणतात. तुकाराम महाराजांनींही आपल्या मानसपूजेंत " रत्नसिंहासन वर प्रभावळ । त्यावरी सोज्वळ वस्त्र मृदु ॥ १ ॥. लोड उशा मागें टेकाया बाजूला । त्यावरी बैसला स्वामी माझा ॥ " असें म्हटलें आहे. त्यांत हृदय कमळाचें नांव नाहीं. 'देवोभूत्वा देवं यजेत्' हें वाक्य ब्रह्मज्ञान झाल्यानंतर भक्ति करणारांविषयीं आहे, नवशिक्याविषयीं नाहीं. शिवाय या प्रश्नाचें उत्तर देण्याला सद्गुरुच समर्थ असतात. माझ्यासारख्या गरीबानें काय उत्तर द्यावें ?

चवथ्या प्रश्नाचें उत्तरः—मंत्राचे न्यास करणें म्हणजे त्या त्या देवतांना हाका मारून त्या त्या देवता आपल्या अवयवांवर बसवून ठेवून पिशाच्यादिकांना आपल्या शरीरांत शिरूं न देणें असा न्यासाचा अर्थ आहे. या न्यासाचें फळ अदृष्ट आहे. कारण हा न्यास नियमांत येतो. म्हणून याचें उत्तर पहिल्या प्रश्नाच्या उत्तरांत आलेंच आहे. मंत्ररूप देवता आहे म्हणजे तो मंत्र त्या देवतेचें नांव आहे. एखाद्यानें हाक मारली असतां जसा एखादा ओ देतो, त्याप्रमाणें तो मंत्र माझें नांव आहे असें ती देवता समजत असते. पत्रांत या गोष्टीचा इतकाच खुलासा मी करूं शकतो. मन हें अपंचीकृत आहे म्हणून. मनानें ध्यान केलेल्या देवतेस अपंचीकृत ज्या पृथिव्यादि पंचतन्मात्रा त्यांचे उपचार करणें योग्य आहे. कारण त्या भूतांचा ईश्वरामध्यें लय व्हावा व आपल्या मागचें संसार झेंगट सुटावें, असा त्या क्रियेचा अर्थ आहे. कारण पंचतन्मात्रा व मन हे जीवास चिकटल्यानेंच संसार लागलेला आहे. त्याचा ईश्वरांत लय झाला म्हणजे संसार नष्ट होतो असें हिंदु योगशास्त्राचें मत आहे. लय होणें म्हणजे अर्पण केलेल्या पदार्थांचें विस्मरण पडणें. इतकाच अर्थ योगशास्त्रांत घेतला आहे. या गोष्टीची फोड माझ्यानें झाली तितकी केली आहे. विशेष महात्म्यांना ठाऊक

असेल. ध्याता, ध्यान व ध्येय या तिहींची संगति कशी जमवावयाची हा प्रश्न योगशास्त्रानुसार ध्यान करणारास येतच नाहीं. नवशिक्यानें असें करावें कीं, ध्येय आपल्या पुढें सिंहासनावर धरावें. ध्यानकर्ता शरीरी असतोच. ध्येयाला एकसारखें मनापुढें आणणें याचें नांवच ध्यानक्रिया. तेव्हां तिची विशेष संगति कशी याची जरूर नाहीं. इतकेंच मला याविषयीं येथें लिहितां येतें. याप्रमाणें चवथ्या प्रश्नाचें उत्तर मला सुचलें तसें दिलें.

पांचव्या प्रश्नाचें उत्तर वर आल्यासारखेंच आहे. फक्त केशवादि नांवाचा अर्थ अवतारपर न घेतां नित्य मूर्तिपर घ्यावा. सर्व कर्मांत भावनेची अपेक्षा आहे हें मीमांसाशास्त्रांत शाब्दीभावना व अर्थीभावना इत्यादि सांगून स्पष्ट केलेंच आहे.

सहाव्या प्रश्नाचें उत्तरः—माझें मत असें आहे कीं वाचकाकडे व वाच्याकडे पृथक लक्ष्य ठेवण्याची गरज नाहीं.वाचकाचा स्वभावच असा आहे कीं त्याच्याकडे लक्ष्य लागलें कीं वाच्याकडे लागतेंच. वाच्यवाचकाच्या संबंधाचें मात्र ज्ञान करून घेतलें पाहिजे. पण वेदाध्ययन मात्र यांत येत नाहीं. कारण अध्ययन हें उपासनेंत येत नसून नियमाचें अंग आहे. आणि नामस्मरण हें उपासनेचें अंग आहे. म्हणून वेदाध्ययनाचें फळ निराळें आहे. मला सहावा प्रश्न जितक्या रीतीनें समजला तितक्या रीतीनें मी उत्तर लिहिलें.

सातव्या प्रश्नाचें उत्तरः—माझें मत असें आहे कीं जीव कर्म करतांना स्वतंत्र आहे व फळ भोगतांना परतंत्र आहे. "कृतप्रयत्नापेक्षस्तु विहितप्रतिषिद्धा वैय्यर्थ्यादिभ्यः" असें ब्रह्मसूत्र असून ज्याचा जसा प्रयत्न असेल तसेंच ईश्वर त्याच्याकडून करवितो असा त्याचा अर्थ आहे. या सूत्राच्या भाष्यांत आचार्य म्हणतात ईश्वर हा पाण्याप्रमाणें साधारण कारण आहे. आणि ज्याचा त्याचा यत्न बीजाप्रमाणें असाधारण कारण आहे. आंब्याच्या झाडालाही पाणी पाहिजे व निंबाच्या झाडालाही पाणी पाहिजे. म्हणून पाणी हें साधारण कारण होय. पण आंब्यानें गोड होणें व निंबानें कडू होणें हें त्याच्या त्याच्या बीजावर अवलंबून आहे. म्हणून बीजें हीं असाधारण कारणें होत. अनेक कार्यांचें

जें कारण त्याला साधारण म्हणतात. आणि एकाच कार्याचें जें कारण त्याला असाधारण म्हणतात.आतां प्रारब्धाची निवृत्ति यत्नानें होते असें माझें मत आहे. पण प्रारब्ध बलवान असलें तर यत्न लंगडा पडतो, तेव्हां प्रारब्ध कोणत्या प्रकारचें आहे हें पाहिलें पाहिजे. प्रारब्ध केवळ साधारण असेल तर औषधीसारख्या यत्नानेंच त्याचा जय होतो. प्रारब्ध जर दैविक असेल तर औषधीसारखा भौतिक प्रयत्न लंगडा पडतो. त्याला मंत्राची किंवा योगाची अपेक्षा लागते. योगानें अनेक शरीरें निर्माण करून आपलें कर्म एकदम भोगून टाकतां येते. शिवाय प्रारब्ध म्हणजे भोग होण्याची सुरवात होते तेव्हांच म्हणतात. बाकीचें कर्म संचितात असतें. समजा कीं तीन वर्षांनीं तुझाला कांहीं व्हावयाचें जाहे. तर आतां तें कर्म प्रारब्ध झालेलें नाहीं. सध्यां तें संचितांतच आहे, असें माझें मत आहे. प्रत्यक्ष भोग सुरू झाल्यास मग मात्र प्रारब्ध कर्म भोग दिल्यावांचून निवृत्त होत नाहीं.. झणूनच भुक्त दुःखाविषयीं निवृत्तीचा उपाय शास्त्रांत सांगितला नाहीं. आणि वर्तमान दुःख देखील भोगल्यावांचून निवृत्त होत नाहीं. आतां ज्वरावर औषध घेतलें तर आतांचा ज्वर निवृत्त होत नाहीं. तर पुढच्या क्षणीं येणारा ज्वर निवृत्त होतो. मलेरियाची आलेली पाळी क्विनीन दाबत नाहीं. तर येणाऱ्या पाळीचा निरोध करिते. "हेयंदुःखमनागतम्" असें पतंजलीचें योगशास्त्रांत सूत्र आहे. आणि पुढें येणाऱ्याच दुःखाच नाश होतो असा त्याचा अर्थ आहे. आतां एखाद्याला एवढ्या प्रयत्नाचें ज्ञान नसेल तर कसें करावें ? तर तो त्याचाच अपराध आहे असें मी झणतो. त्यांत दैवाचें कांहीं नाहीं. तें ज्ञान त्यानें मिळवून घ्यावें. समजा कीं तसें ज्ञान होण्यासारखी परिस्थिति नसली तर ज्या परिस्थितींत तो असेल त्या परिस्थित्यनुसार शास्त्रानें जो त्याला धर्म सांगितला असेल तो पाळावा. झणजे हळुहळु दुसऱ्या जन्मांत तरी फायदा होईल. मुंबईला पत्रानें बातमी येण्याला येथून एक दिवस लागतो.परंतु तारेनें बातमी एक मिनिटांत येते.त्यांप्रमाणें तीव्र प्रयत्न जो करतो तोच एका जन्मांत संचिताचा नाश करूं शकतो. साधारण मनुष्याला जन्म लागतात. पण कोणाच्याही शुभ यत्नाचा नाश होत नाहीं. "नहि कल्याणकृत्कश्चिद्दुर्गतिं तात गच्छति" असें भगवंताचें वाक्यही आहे. आतां जसें

पापाचा शुभ कर्म नाश करितें तसें पापही शुभ कर्मांचा नाश करण्यास समर्थ आहे अशी शंका योग्य होणार नाहीं. कारण पापाचा नाश करण्याकरितां प्रायश्चित्त म्हणून निराळें कर्म सांगितलें आहे. आतां शास्त्रावर जर विश्वास नसेल तर पुण्यपापावरही विश्वास असणें शक्य नाहीं. कारण पुण्यपापांची सिद्धि प्रत्यक्षानें किंवा अनुमानानें होतच नाहीं. हिंदु, बौद्ध व जैन या तीन धर्मांत कर्मवाद विशेष मानला आहे. पण तो आप्तवचनावरच अवलंबून आहे. हेंच आपल्या सातव्या प्रश्नाचें उत्तर मला सुचलें तसें दिलें. तथापि याविषयीं पुष्कळ ऊहापोहाची जरूरी आहे.

आठव्या प्रश्नाचें उत्तरः—हा प्रश्न थिऑसफीला अनुसरून आहे. पण थिऑसफीला अनुसरून मला उत्तर यावयाचें नाहीं. कारण तिकडे माझा विशेष व्यासंग नाहीं. या प्रश्नाचें माझ्या मतानें उत्तर असें आहे कीं वारंवार जपानें जपाची देवता प्रसन्न होऊन रोग करण्याचा आपला बेत रहित करिते. हें मंत्रशास्त्रानुसारें उत्तर झालें. योगशास्त्रानुसार याचें उत्तर असें आहे कीं मंत्राचा वारंवार उच्चार केल्यानें व भावना त्या मंत्रावर एकाग्र केल्यानें मनाची तीव्र शक्ति वाढते. आणि शरीर हें मनाच्या अत्यंत ताब्यांत असल्यामुळें रोगाचा प्रतिबंध होतो. योगशास्त्राचें मत असें आहे कीं मन तीव्र झाल्यास कोणत्याही वस्तूचें आकर्षण करितां येतें. ध्वनीचा परिणाम मनांत होतो असें व्याकरण शास्त्र व पातंजल शास्त्राचें मत आहे. आपल्याला थिऑसफीप्रमाणें उत्तर पाहिजे असल्यास माझा नाइलाज आहे.

नवव्या प्रश्नाचें उत्तरः—जुन्या वैद्यकाविषयीं मीं स्वतः खटपट करीतच आहे. त्याबद्दल " वैद्यवृंदावन " नांवाचा ग्रंथ मी लिहीत आहे. परंतु मी गरीब आहे. मजजवळ पैसा नाहीं. मी व्रतापुरत्या पैशाची मात्र भिक्षा मागत असतो. बाकी कोणास पैसा मागावयाचा नाहीं असा माझा निश्चय आहे. कारण पैसा देणाऱ्यानें इतक्या लौकर कार्य कां झालें नाहीं ? असें विचारलें तर मजजवळ देण्याला पुरावा नाहीं व तो गोळा करण्याकरितां खटपटही करण्याची माझी इच्छा नाहीं. शिवाय मी ब्राह्मणांच्या पक्षाचा असल्यामुळें माझी जाती जोरानें माझ्या विरुद्ध आहे, व मी शूद्र आहे एवढ्यावरच

कांहीं ब्राह्मणही माझ्या विरुद्ध आहेत. या दोन पेचांत मी सांपडल्यामुळें माझ्याहातून एखादे कार्य सुरळीत होईल असें मला वाटत नाहीं. "बोद्धारो-मत्सरग्रस्ताः प्रभव स्मयदूषिताः" हे भवभूतीचे उद्गार सर्वत्रच खरे होत आहेत. त्याला टक्कर देण्याची माझी छाती नाहीं.

दहाव्या प्रश्नाचें उत्तर—ज्या श्रुतिस्मृतींत वर्णाश्रम कर्में सांगितलीं आहेत त्याच श्रुतिस्मृतींत तीर्थाटण व सत्संगही सांगितला आहे. तेव्हां गांवोगांवीं सत्संगाकरितां फिरणें हें ज्या मुमुक्षूला अभिमान नाहीं त्याला योग्य वाटणें साहाजिक आहे. सद्गुरु सच्छिष्य शोधित असतात असें माझें मत नाहीं. कारण सर्व वेदांत-शास्त्रांत साधनचतुष्टयसंपन्नालाच गुरूकडे जाण्याचा अधिकार सांगितला आहे. गुरूनें शिष्याकडे जावें असें कोठेंही सांगितलें नाहीं. एखाद्याच्या दैवानें कदाचित् घरींच सत्पुरुष भेटत असतील पण तेवढ्यानें सत्संगाकरितां फिरणें सोडणें म्हणजे एकाला द्रव्याचा हांडा सांपडला म्हणून दुसऱ्यानें शेतांत जाणें सोडून देण्यासारखें आहे. आतां ज्याला आपल्याला साधु फसवितील असें वाटत असेल त्यांनीं पाहिजे असल्यास जाऊं नये. पण जो मुमुक्षु आहे त्याला फसविण्याला कोणीही समर्थ नाहीं असें माझें मत आहे. याविषयीं पुष्कळ ग्रंथांत मी लिहिलेलेंही आहे. स्वतः गुरु शोधण्याविषयीं तुकाराम महाराजांचे उद्गार काय आहेत ते येथें लिहितों:—

अभंग.

अग्नि हा पाचारी कोणासी साक्षेपें । हिंवें तोचि तापे जाऊनियां ॥ १ ॥
उदक म्हणे काय या हो मज प्यावें । तृषित तो धांवे सेवावया ॥ २ ॥
काय वस्त्र म्हणे या हो मज नेसा । आपुले स्वइच्छा जग वोढी ॥ ३ ॥
तुक्यास्वामी म्हणे काय मज स्मरा । आपुल्या उद्धारा लागुनियां ॥ ४ ॥

श्रुतीही असेंच म्हणतेः—" तद्विज्ञानार्थं सद्गुरुमेवाभिगच्छेत् समित्पाणिः श्रोत्रियं ब्रह्मनिष्ठम् । "

झालें. आपल्या प्रश्नांचीं उत्तरें माझ्या मतीला सुचलीं तशीं दिलीं. तीं रुचल्यास गोड करून घ्यावीं. आतां हे कोण्या ग्रंथांत आहेत असें मला ठाऊक

वरील नवव्या प्रश्नाचें उत्तर देतांना भवभूतीच्या वचनाचें स्मरण देऊन महाराजांनीं जे निराशाजनक उद्गार काढले आहेत तशा प्रकारचे उद्गार आणखीही पुष्कळ प्रसंगीं त्यांस काढावे लागले आहेत यावरून केवळ परोपकारैकपरायण अशा अत्यंत निःस्वार्थी महात्म्यासही व्यवहारांत कशा अडचणी येतात हें दिसून येतें व "अवजानंति मां मूढा मानुषीं तनुमाश्रितम्" या भगवद्वचनाचें व "पुण्य गेलें दोषावारी । अविद्येची चाले थोरी ॥" या तुकाराम महाराजांच्या उक्तीचें उत्तम समर्थन होतें.

महाराजांच्या शब्दपरिज्ञान विद्येच्यासंबंधानें मागें दोन गोष्टी आलेल्या आहेत; तशीच एक गोष्ट या वेळींही घडली. कोणी एक दीर्घ व्याधीनें पिडलेली बाई तिच्या पतीच्या अनुज्ञेनें औषधी उपचाराकरितां महाराजांजवळ येऊन राहिली होती व हल्लीं तिची प्रकृति सुधरत चालली होती. परंतु ती क्षीण असल्यामुळें घरांत फार हिंडण्या फिरण्याची व श्रम वगैरे करण्याची तिला महाराजांनीं बंदी केली होती. एके दिवशीं दुपारीं महाराजांचें कांहीं निरूपण चाललें असतांना ती बाई आंतल्या बाजूला अगदीं पाऊल न वाजवितां कवाडाच्या आड उभी राहून तें ऐकत होती. इतक्यांत तिच्या हातांतली बांगडी वाजली. त्याबरोबर महाराज एकदम म्हणाले ही गोपिका येथें कां आली ? हें ऐकून सर्वांस आश्चर्य वाटलें. ती गोपिकाच होती. हें पाहून ते वेळीं तेथें रा० रघुनाथराव काका होते ते म्हणाले बांगडीच्या आवाजावरून ही गोपिकाच आहे असें आपण कसें ओळखलें ? महाराजांनीं त्यासंबंधानें थोडी शास्त्रीयमीमांसा सांगून म्हणाले स्त्रियांच्या बांगड्याचा आवाज त्या बायांच्या आवाजासारखाच असतो असा नियम आहे. नवीन बांगड्या घातल्या म्हणजे प्रथम त्यांचा आवाज भिन्न असतो परंतु पुढें उत्तरोत्तर तो त्या स्त्रियांच्या आवाजासारखा होत जातो.

कात्यायनी व्रताची सांगतां दिसेंबर महिन्याच्या सुरुयांतच होत असल्यामुळें बहुतेक सर्व संप्रदायिक मंडळीला त्या प्रसंगास येण्यास सवड मिळत असे व ही मंडळी अष्टौप्रहर महाराजांजवळ जमून त्यांची अमृत-

नसल्यामुळें मी एकदमच लिहून पाठविलीं. प्रेमाची वृद्धि असावी. कळावें ही विनंती.

आपला अपरिचित्
गुलाबराव गोंदुजी मोहोड.
मोकदम माधान, हल्लीं मु० हरदा.

यानंतर पुन्हां वकील साहेबांकडून एक पत्र आलें. त्यांत वरील महाराजांच्या पत्रोत्तरांतील कांहीं गोष्टींचें विशेष स्पष्टीकरण व रोजच्या अभ्यासांतील कांहीं अडचणींवर उपाय वगैरे विचारले आहेत. याचेंही उत्तर महाराजांकडून गेलें आहे व त्यांत वकील साहेबांच्या सर्व शंकांचें निरसन असून अडचणींवर उपायही सुचविले आहेत. परंतु त्यांत वैय्यक्तिक अभ्यासाचा भाग विशेष असल्यामुळें येथें घेतां येत नाहीं. अभ्यासांतील अडचणींवर उपाय सुचवितांना महाराज म्हणतात:—

" रोजच्या कर्मांत ज्या आपल्याला अडचणी येतात त्या आपण मला विचारतों म्हणतां तथापि ब्राह्मणांपासूनच ब्राह्मणाला आलेली विद्या वीर्यवती होत असते असें श्रुतीस्मृतींचें म्हणणें आहे. तथापि मला जसें ठाऊक होतें तसें उत्तर दिलें. "

या पत्रोत्तरांत महाराजांनीं एक अत्यंत महत्वाची गोष्ट लिहिलेली आहे. तेवढी मात्र सार्वत्रिक हिताची असल्यामुळें येथें नमूद करतो:— " माझें तर मत असें आहे कीं, ब्राह्मणांना गायत्री जननीवांचून दुसऱ्या मंत्राकडे धांव घेणें कल्पतरु सोडून एरंडाजवळ भिक्षा मागण्यासारखें आहे. वेदोक्त मंत्राचीं योग्य पुरश्चरणें कलींत चतुर्गुण सांगितलीं आहेत. तींच ब्राह्मणाला हितावह आहेत. " असो.

वकील साहेबांच्या प्रश्नमालिकेंतील नवव्या प्रश्नांत सूचना केल्याप्रमाणें आर्यवैद्यकाच्या कफवातपित्त या त्रिदोषपद्धतीची मार्मिक व शास्त्रीय मीमांसा एका स्वतंत्र लेखांत करून तो लेख महाराजांनीं पुढें लवकरच केसरींत छापून प्रसिद्ध होण्याकरितां पाठविला परंतु तो तेथें छापला न जातां सुमारें एक महिन्यानें परत आला ! अस्तु.

वरील नवव्या प्रश्नाचें उत्तर देतांना भवभूतीच्या वचनाचें स्मरण देऊन महाराजांनीं जे निराशाजनक उद्गार काढले आहेत तशा प्रकारचे उद्गार आणखीही पुष्कळ प्रसंगीं त्यांस काढावे लागले आहेत यावरून केवळ परोपकारैकपरायण अशा अत्यंत निःस्वार्थी महात्म्यासही व्यवहारांत कशा अडचणी येतात हें दिसून येतें व "अवजानंति मां मूढा मानुषीं तनुमाश्रितम्" या भगवद्वचनाचें व "पुण्य गेलें दोषावारी। अविद्येची चाले थोरी॥" या तुकाराम महाराजांच्या उक्तीचें उत्तम समर्थन होतें.

महाराजांच्या शद्बपरिज्ञान विद्येच्यासंबंधानें मागें दोन गोष्टी आलेल्या आहेत; तशीच एक गोष्ट या वेळींही घडली. कोणी एक दीर्घ व्याधीनें पिडलेली बाई तिच्या पतीच्या अनुज्ञेनें औषधी उपचाराकरितां महाराजां-जवळ येऊन राहिली होती व हल्लीं तिची प्रकृति सुधरत चालली होती. परंतु ती क्षीण असल्यामुळें घरांत फार हिंडण्या फिरण्याची व श्रम वगैरे करण्याची तिला महाराजांनीं बंदी केली होती. एके दिवशीं दुपारीं महा-राजांचें कांहीं निरूपण चाललें असतांना ती बाई आंतल्या बाजूला अगदीं पाऊल न वाजवितां कवाडाच्या आड उभी राहून तें ऐकत होती. इत-क्यांत तिच्या हातांतली बांगडी वाजली. त्याबरोबर महाराज एकदम म्हणाले ही गोपिका येथें कां आली? हें ऐकून सर्वांस आश्चर्य वाटलें. ती गोपिकाच होती. हें पाहून ते वेळीं तेथें रा० रघुनाथराव काका होते ते म्हणाले बांगडीच्या आवाजावरून ही गोपिकाच आहे असें आपण कसें ओळखलें? महाराजांनीं त्यासंबंधानें थोडी शास्त्रीयमीमांसा सांगून म्हणाले स्त्रियांच्या बांगड्याचा आवाज त्या बायांच्या आवाजासारखाच असतो असा नियम आहे. नवीन बांगड्या घातल्या म्हणजे प्रथम त्यांचा आवाज भिन्न असतो परंतु पुढें उत्तरोत्तर तो त्या स्त्रियांच्या आवाजा-सारखा होत जातो.

कात्यायनी व्रताची सांगतां दिसेंबर महिन्याच्या सुरुयांतच होत अस-ल्यामुळें बहुतेक सर्व संप्रदायिक मंडळीला त्या प्रसंगास येण्यास सवड मिळत असे व ही मंडळी अष्टौप्रहर महाराजांजवळ जमून त्यांची अमृत-

तुल्य निरूपणें ऐकत व प्रश्नोत्तरें करून शंका समाधान करून घेत. याप्रमाणें या वेळींही मंडळी जमली असतां एकानें प्रश्न विचारला कीं, गुरुलोक शिष्यांपासून ज्ञान छपवून कां ठेवतात ? यावर महाराज म्हणाले उत्तम शिष्यापासून गुरु कधींच ज्ञान छपवून ठेवीत नाहींत. पुत्रापेक्षांही शिष्यालाच ते अधिक ज्ञान देतात. द्रोणाचार्यांनीं पुत्रापेक्षां अर्जुनालाच अधिक ज्ञान शिकाविलें. परंतु सामान्य शिष्यलोकही आपला पैसाअडका, शेतीवाडी, शरीर हीं गुरूपासून छपवून ठेवितात. म्हणून गुरुही आपली विद्या त्यांजपासून छपवून ठेवितात. वास्तविक एक शब्दही ज्यानें शिकविला त्याचे उपकार फेडले जात नाहींत, मग ज्यानें ज्ञान दिलें त्याला देहही देणें थोडें आहे. म्हणून गुरु वागतात तें योग्यच होय. " शठे शाठ्यं समाचरेत् "

ह्या वर्षी हुशंगाबाद येथील भडकमकर शास्त्री हे आपल्या विदुषी कन्येसह कात्यायनी व्रतोत्सवप्रसंगीं आले होते. सर्व मंडळीच्या आग्रहावरून दुसरे दिवशीं म्हणजे ता० १ जानेवारी १९१४ रोजीं कुमारी गोदावरीबाईचें " स्त्रीशिक्षण " या विषयावर व्याख्यान झालें. त्या प्रसंगीं अध्यक्षस्थान महाराजांनीं सुशोभित केलें होतें. दोघांच्याही भाषणांचा सारांश पुढें उमरावती येथें निघणाऱ्या नूतन प्रमोदसिंधूच्या ता० २६ जाने० व २ फेब्रुवारी १९१४ च्या अंकांत छापून प्रसिद्ध झाला आहे. तो येणेंप्रमाणें:—

वऱ्हाडांतील प्रसिद्ध विद्वान सत्पुरुष श्रीगुलाबरावमहाराज यांचा प्रतिवार्षिक कात्यायनी व्रताचा दहावा उत्सव नुकताच हरदा ( मध्यप्रांत ) येथें ता० ३०–१२–१९१३ मंगळवारीं सांग झाला. उत्सवाकारितां आलेल्या मंडळींत हुशंगाबाद येथील भडकमकरशास्त्री व त्यांची विद्याविभूषित कन्या कुमारी गोदावरीबाई हेही यंदा होते. उत्सवानंतर गुरुवारीं ता०१–१–१९१४ रोजीं सर्व मंडळींच्या आग्रहावरून गोदावरीबाईंनीं " स्त्रीशिक्षण " या विषयावर एक चटकदार व्याख्यान दिलें. त्या प्रसंगास सर्व मंडळींच्या विनंतीस मान देऊन श्रीगुलाबराव महाराज यांनीं अध्यक्ष स्थान स्वीकारलें होतें. महाराजांचें या प्रसं-

गींचें भाषण अध्यक्ष व श्रीकृष्णपत्नि या दोन्ही नात्यानें असून त्यांत स्त्रीशिक्षणावर त्यांचे विचार अगदीं प्रथमच प्रगट झाले असल्यामुळें " स्त्रियश्चैव विशेषेण स्त्रीजनस्य गतिः परा " या महाभारतांतील उक्तिप्रमाणें तें मोठें महत्वाचें आहे. या दोन्ही भाषणांतील सारांश असाः—

कुमारी गोदावरीबाई म्हणाल्याः—

स्त्रीशिक्षणापासून तोटा होतो अशा प्रकारचा समज आपल्या समाजांतून आतां बहुतेक नाहींसा होत चालला आहे ही संतोषाची गोष्ट आहे. शिक्षण दिल्यानें स्त्रिया अविनीत होतात असें समजणारी जी थोडी मंडळी हल्लीं आहे त्यांनीं हें लक्ष्यांत वागवावें कीं, विद्येपासून अविनय कधींच उत्पन्न व्हावयाचा नाहीं. उलट विद्येपासून विनयच उत्पन्न व्हावा असा तिचा स्वभाव आहे. जर शिक्षणापासून स्त्रिया अविनीत होतात अशी वस्तुस्थिति असेल तर तो दोष शिक्षणपद्धतीचा आहे, स्त्रियांच्या बुद्धीचा नव्हे. घोड्यासारख्या पशूंना शिक्षण देऊन आजकाल त्यांच्याकडून अनेक गोष्टी करवून घेतांना आपण पाहतों. या पश्वादिकांपेक्षां स्त्रियांची बुद्धि खचित कमी नाहीं. स्त्रिया लिहिणें वाचणें शिकून सगळा दिवस पुस्तकें वाचूं लागल्या तर घरगुती कामाकडे त्या दुर्लक्ष करतील अशी भीति बाळगण्याचें कांहीं कारण नाहीं. घरचीं कामें संभाळून फावल्या वेळांत त्यांना पुस्तकें वाचून ज्ञान मिळवितां येईल. शिक्षण न देऊन तरी स्त्रियांचा फुरसतीचा वेळ कोठें चांगल्या कामांत जातो ? दुसऱ्यांची निंदा, भांडण, तंटे इत्यादि गोष्टींतच त्यांचा पुष्कळ वेळ जातो. घरीं कथापुराणें ऐकून मन सुसंस्कृत करण्याची जुनी पद्धतीही आतां नाहींशीं होत चालली आहे. म्हणून त्यांना लिहिणें वाचणें शिकविल्यानें बुद्धीच्या विषयांत तरी त्यांना करमणूक होऊन शिवाय ज्ञानप्राप्तीही होईल. हल्लीं पुरुषांना नोकरीच्या मागें जावें लागत असल्यामुळें पूर्वीच्या प्रमाणें कुटुंब व्यवस्थाही राहणें अशक्य झालें आहे व कीर्तनपुराणांवर लोकांचा अनादर दिसून येत आहे. म्हणून पुस्तकें वाचून विद्या संपादन करणें हाच मार्ग स्त्रियांना मोकळा दिसत आहे व त्याला शिक्षणाची आवश्यकता आहे. आज आपल्या विस्कळित झालेल्या समाजाची घटना सुधारण्याकरितां स्त्रियांना शिक्षण देणें अगदीं अवश्य आहे. मुलांना बाप

शिक्षण देऊं शकतो. आईच कशाला सुशिक्षित असली पाहिजे? असें म्हणणें योग्य नाहीं. कारण मुलांचा लहानपणापासून आईशीं जितका निकट संबंध असतो तितका बापाशीं असत नाहीं. "यावन्न साक्षरा माता तावदज्ञाश्च बालकाः" असें एके ठिकाणीं म्हटलें आहे. सारांश, स्त्रियांना शिक्षण देऊन त्यांना योग्य रीतीनें सुसंस्कृत करण्याविषयीं पुरुषवर्गांनीं अनास्था करूं नये अशी माझी त्यांना विनंती आहे.

श्रीमहाराजांचें भाषणः—

महाराज म्हणाले, "मी मनानें स्त्री असून शरीरानें पुरुष आहे. म्हणून दोघांनाही आजचे प्रसंगीं कांहीं सांगतोंः—
आमची भगिनी कुमारी गोदावरीबाई यांनीं आजच्या प्रसंगीं जें भाषण केलें तें त्यांच्या वयाच्या व विद्येच्या मानाने स्पृहणीय झालें. त्यांत क्वचित् किरकोळ दोष असले तरी तिकडे लक्ष न देतां त्यांतील अर्थ ग्रहण करावा. कारण सर्व गुणसंपन्न असा एक परमेश्वरच आहे, इतरांचें ठिकाणीं अपूर्णता ही असणारच.

स्त्रीशिक्षणविषयीं आपल्या देशांत अझून बरीच अनास्था दिसून येतें ही गोष्ट खरी आहे. परंतु आपल्या देशांतील लोक स्त्रीशिक्षणाच्या विरुद्ध नुसते तोंडानेंच बोलून दाखवितात. हातीं सत्ता नसल्यामुळें विशेष कृतीनें ते कांहींच करूं शकत नाहींत. परंतु युरोपीय लोक स्त्रीशिक्षणाचा सशास्त्र नायनाट करण्याचा प्रयत्न करीत आहेत. डॉ. फोरेल साहेब आपल्या पुस्तकांत म्हणतात कीं, स्त्रियांच्या मेंदूचें वजन पुरुषांच्या मेंदूच्या वजनाहून कमी असतें. ह्या म्हणण्याच्या सत्यासत्यतेचा विचार करण्यापूर्वीं शिक्षणाचें यथार्थ स्वरूप काय आहे हें आपण पाहूं. वस्तुतः शिक्षणापासून जशी विद्या प्राप्त होते तसाच विनयही शिक्षणापासूनच प्राप्त होतो. शिक्षणांत दोन प्रकारच्या गोष्टी असतात. एक उपदेशानें येणाऱ्या गोष्टी, व दुसरे अनुकरणानें येणाऱ्या गोष्टी. यांपैकीं उपदेशानें येणारें ज्ञान हेंच खरें शिक्षण होय. "अज्ञातार्थज्ञापको विधिः" माहीत नसलेल्या गोष्टी सांगणें तें शिक्षण होय. अनुकरणानें येणाऱ्या गोष्टी शिकवाव्या लागत नाहींत. जसें मुलांना पाटीवर उगीच रेघा ओढणें, खोड्या करणें इत्यादि गोष्टी शिकाव्या लागत नाहींत, त्या अनुकरणानें येतात. अनुकरणानें येणारें ज्ञान हें

कांहीं शिक्षणाचें फळ नव्हे. परकीय स्त्रियांच्या सुशिक्षितपणाविषयीं इकडील पुष्कळ लोकांना नुसता भ्रम आहे. एका पाश्चात्य ग्रंथकारानें Man and Woman ह्या पुस्तकांत म्हटले आहे कीं, शिक्षणापासून आमच्या देशांतल्या स्त्रिया काय शिकल्या आहेत तर पोषाख घालणे. परंतु हे त्या अनुकरणानें शिकल्या, शिक्षणानें नव्हे. आतां पुरुषांपेक्षां स्त्रिया कमी दर्जाच्या आहेत असें जें पारकीय विद्वान ह्मणतात तें योग्य नाहीं. मेंदूचें वजन कमी असल्यामुळें स्त्रियांची बुद्धिशक्ति कमी आहे हें म्हणणें समींचीन् नाहीं. कारण मेंदूमधला Intellectual centre अझून शास्त्रीय शोधकांना सांपडला नाहीं. बाह्य पदार्थांचा मेंदूवर संस्कार होऊन आपल्यास त्या पदार्थाचें ज्ञान होतें असें पाश्चात्य सायन्सवादी म्हणतात. बाह्य पदार्थांचे ठसे प्रकाशाच्या किरणांच्या द्वारें मेंदूंत येऊन जो एक सांठा जमतो त्याचें मन बनतें, असें त्यांनीं मनाचें लक्षण केलें आहे. परंतु अनुकूल पदार्थापासून सुख होणें व प्रतिकूल पदार्थापासून दुःख होणे ह्या सुखदुःखाच्या संवेदनाही बाहेरूनच येतात काय? त्या बाहेरून येणे शक्यच नाहीं. स्त्रियांच्या मेंदूचें वजन कमी म्हणून त्यांची बुद्धिशक्ति कमी असें घेऊन चाललें म्हणजे त्यांचा आत्मा व मन निराळें न मानलें पाहिजे. हा पारकीय दृष्टीनें विचार झाला. आतां वेदान्तदृष्टीनें स्त्रिया बुद्धिमत्तेंत पुरुषांहून कमी ठरतात काय हें पाहूं.

पंचकर्मेंद्रियादि सतरा पदार्थ मिळून लिंग शरीर झालें आहे. स्त्रियांचें लिंग शरीर व पुरुषाचे लिंगशरीर सारखेंच आहे व स्त्रियांच्या आणि मनुष्यांच्या बुद्धींत चिदाभास समान आहे. असें वेदांतशास्त्राचें म्हणणें आहे. स्त्रियांच्या मेंदूचें वजन कमी आहे म्हणून त्यांना शिक्षण देऊं नये असें मानलें म्हणजे बाह्य पदार्थांवरच अवलंबून रहावें असें होईल व तसें झालें म्हणजे आत्मा व मन हें शरीराचेच भाग मानण्याची पाळी येऊन देहाला आत्मा मानावा अशी चार्वाक मताची संप्राप्ति होईल. याप्रमाणें चार्वाकमत पुष्ट होऊं लागलें असतां अंतर्गत वेदान्तज्ञानावर सहजच धाड येऊन स्त्रियांना मुक्तीचा मार्ग जो श्रुती मातेनें सांगितला आहे तो प्रतिबद्ध होईल. ही अनर्थावह शृंखला टाळण्याकरितां स्त्रियांना बुद्धिमत्तेंत पुरुषाच्या बरोबरीचेंच मानणें भाग पडतें. आतां

स्त्रिया जर पुरुषांच्या बरोबरीच्या आहेत तर त्यांनीं पतीच्या आज्ञेंत कां वागावें ? असा आक्षेप घेण्याचें कारण नाहीं. स्त्रियांनीं पतीची आज्ञा पाळावी हा जसा शास्त्रांत विधि आहे तसा पुत्रांनीं मातेची आज्ञा पाळावी असाही विधि शास्त्रांत सांगितला आहे. हा नीतिमार्ग समाजघटनेलाही अत्यंत हितावह आहे व तो मोडला तर सर्वत्र घोटाळा होईल व नीतिमत्ता दृढ ठेवण्याचा सरकारचा जो एवढा प्रयत्न आज चालू आहे त्यालाही आडकाठी होईल. स्त्रीनें जर पतीच्या आज्ञेंत वागूं नये तर पुत्रानें तरी मातेच्या आज्ञेंत कां वागावें ? मुलगा शिकून सवरून मोठा विद्वान झाला व तो जर म्हणूं लागला कीं, अशा अशिक्षित व वेडगळ समजुतीनें भरलेल्या आईच्या आज्ञेंत मी काय म्हणून वागावें ? उलट आईनेंच मी बाहेरून आलों असतां चटकन उभें राहून हातांत बांगड्या नसल्या तरी तशाच हातानें ‘ गुड मॉर्निंग ’ करून माझा आदर केला पाहिजे तर हें म्हणणें योग्य दिसेल काय ? अशा विचारांची परंपरा दैववशात सुरूं झाली तर मानापमानाचे तंटे न्यायासनापर्यंत निकालाकरितां जाऊं लागतील. सारांश, आज्ञापालनादि गोष्टी नीतिमत्तेच्या आहेत व त्या सर्वांना सारख्याच पाळल्या पाहिजेत. तेवढ्यावरून कोणाची बुद्धिमत्ता कमी जास्त ठरत नाहीं.

इतिहासावरूनही पाहिलें असतां स्त्रिया पुरुषापेक्षां बुद्धिमत्तेंत कमी ठरत नाहींत. गार्गी, सुलभा, मैत्रेयी इत्यादि स्त्रियांची नांवें प्रत्यही ब्राह्मणांच्या तर्पणांत येत आहेत, एवढी त्यांची योग्यता आहे. जनकाची अध्यात्म ज्ञानांत एवढी ख्याति असूनही सुलभा नांवाच्या योगिनीनें आपल्या बुद्धिमत्तेनें त्याला लाजविले होतें, याविषयीं महाभारतांत सुलभाजनक संवाद प्रसिद्ध आहे. जनकाच्या दृष्टीशीं आपली दृष्टि मिळवून तिनें त्याच्या शरीरांत त्या वेळीं प्रवेश केला होता. डोळ्यांशीं डोळा मिळवून दुसऱ्याच्या मनावर ताबा चालविण्याचा हा प्रकार ‘ मेस्मर ’ यानें शोधून काढला नसून आपल्या इकडे ही विद्या फार प्राचीन काळापासून पूर्णतेस गेलेली आहे. याप्रमाणें आपल्या देशांतील पौराणिक काळाच्या स्त्रिया बुद्धिमत्तेंत पुरुषाच्या बरोबरीच्या किंबहुना त्याच्याहून क्वचित अधिकही होत्या. युगमानाप्रमाणें त्यांच्या इतकें ब्रह्मचर्यादि गुण आज जरी

साध्य नसले तरी यथाशक्ति प्रयत्न करून होईल तितक्या गोष्टी साध्य करण्याला झटलें पाहिजे. याला पराशर स्मृतीचें वचन प्रमाण आहे तें असें:—

युगे युगे च ये धर्माः तेषु धर्मेषु ये द्विजाः ।
तेषां निंदा न कर्तव्या युगरूपा हि ब्राह्मणाः ॥

मात्र शिक्षणपद्धतींत तारतम्य असलें पाहिजे. तें एवढेंच कीं, अनुकरणानें येणाऱ्या ज्या गोष्टी आहेत त्यांना दाबण्याइतका खंबीरपणा ज्यांच्या मनाचा असेल त्यांनीं शाळेंत जाऊन शिक्षण घ्यावें व तो ज्यांचे ठिकाणीं नसेल त्यांनीं घरींच पति किंवा पिता यांजकडून शिक्षण घेऊन आपली उन्नति करून घ्यावी.

व्याख्यानानंतर प्रश्नोत्तर झालें तें:—

प्रश्नः—लिंग शरीर सर्वांचें सारखें आहे तर पश्वादिकांनाही शिक्षण देणें शक्य आहे काय ?

उत्तरः—लिंग शरीर मनुष्याचें व पश्वादिकांचें सारखें नाहीं, कारण त्यांत कांहीं इंद्रियांचा गोलकांशीं संयोग नसतो. मनुष्यांतही जे बहिरे व मुके असतात त्यांना शिक्षण देणें शक्य नाहीं, कारण त्यांचीही इंद्रियें तशींच असतात. अस्तु.

वर्णाश्रम धर्माविषयीं महाराजांचा सर्वसामान्य उपदेश असे. महाबळेश्वरचा एक ब्राह्मण काशीस जाण्याकरितां निघालेला वाटेंत हरदा येथें येऊन महाराजांस भेटला व म्हणाला मी रमल शिकलों आहे पण त्यांत डोकें चालत नाहीं याला काय उपाय करूं ? त्याला महाराजांनीं ब्राह्मणाचें मुख्य कर्तव्य वेद शिकणें, गायत्री पुरश्चरण करणें इ० आहे असें सुचविलें.

देवासच्या महाराजांचे धाकटे बंधु श्रीमंत जगदेवराव ऊर्फ भाऊसाहेब पवार यांजकडून महाराजांस हल्लीं एक पत्र आलें होतें. त्यांस महाराजांनीं वेदान्तविषयक पत्रें पाठविण्याचें कबूल केलें होतें म्हणून वरील पत्राचें उत्तर या वेळीं त्यांस महाराजांकडून गेलें. या पत्रांत प्रथम महाराजांनीं मराठे जातीला सध्यां इंग्लिश भाषा शिकण्यापेक्षां संस्कृत भाषा शिकण्याची जास्त

आवश्यकता आहे असें सुचवून नंतर खऱ्या भगवद्भक्ताची लोकांत वागणूक कशी असते याविषयीं मोठें मार्मिक विवेचन केलें आहे. खाण्यापिण्याच्या बाबतींत सावधपणा व बाकीच्या बाबतींत विदेहीपणा हें भगवद्भक्तांचें लक्षणच होऊं शकत नाहीं असें न्यायसूत्राधारें सिद्ध करून प्रेमसमाधी व व्युत्थान अशा भक्ताच्या दोन दशा वर्णन करतांना प्रेमसमाधींत भक्तांचा व्यवहार क्षीण होतो पण इतर वेळीं भगवद्भक्त लोकव्यवस्थेविषयीं किती सावध असतात याविषयीं "मऊ मेणाहुनी आम्ही विष्णुदास । कठीण वज्रास भेदूं ऐसे ॥" " ऊठ भडवीच्या जाय तूं येथूनी । आमुचे कीर्तनीं बैसूं नको ॥" ही तुकाराम महाराजांचीं वचनें व " वज्रादपि कठोराणि मृदूनि कुसुमादपि" हें भवभूतीचें वचन प्रमाण दिलें आहे. नंतर परमेश्वर निराकार असला तरी प्रथम साकारावर चित्त स्थिर करण्याची आवश्यकता सांगून गणित-शास्त्रानें परमेश्वराचें अस्तित्व सिद्ध केलें आहे. शेवटीं, हल्लीं लेखन चालू असलेला " संप्रदाय सुरतरु " तयार होत आला आहे व त्यांत प्रति-पादलेलीं माझीं अंतस्थ मतें उदात्त आहेत किंवा नाहींत हें वाचनांतीं कळून येईल असें लिहून पुढें महाराज ह्मणतात:—" याप्रमाणें मी आपली स्थिती लिहिली आहे तसा मी आपला उणेपणाही थोडासा लिहितो. कारण आपला उणेपणा न दाखवून केवळ भपकेपणा दाखविणें म्हणजे फसविणें होय असें माझें मत आहे. प्राचीन ऋषींनीं आपला उणेपणा देखील दाखविला आहे. मी जरी निस्पृह आहे तरी व्रतांकरितां व ग्रंथादिकांकरितां माझ्या मनांत केव्हां केव्हां पैशाच्या आशेचा अंकूर उत्पन्न होतो. तो कलंक आहे हें मला ठाऊक आहे व तो मी कमी करण्याची खटपटही जोरानें करीत आहे. " अस्तु.

इंग्रजी भाषा वैकृत असल्यामुळें ती मंत्ररहित कशी आहे व वैकृत भाषेनें वेदान्तश्रवण केलें असतां तिजपासून तत्वज्ञानाला प्रतिबंध कसा होतो याविषयीं एका गृहस्थाचा महाराजांशीं मागें पत्रव्यवहार झालेला आहे ( सप्तम यष्टि पृ० १०८ पहा ) व महाराजांकडून गेलेलें पत्रोत्तर त्या गृहस्थानें पुढें मुमुक्षूंत प्रसिद्धही केलेलें आहे. त्यावर पुन्हां शंका घेऊन

संस्थान फलटन जि० सातारा येथील एका गृहस्थांनीं मंत्रशास्त्रविषयंक व आणखी कांहीं इतर प्रश्न या सुमारास महाराजांस पत्रद्वारें विचारलें आहेत. ते प्रश्न असेः—

१. " आरबी, फारशी, इजिप्शियन, खाल्डीया, अखाडियन, चिनी, जपानी वगैरे भाषांत मत्रशास्त्र आहे व त्याबद्दल ग्रंथ आहेत. " अब्राक ३ ब्रा " " काबला " वगैरे ज्यूइश लोकांत मंत्रयंत्रशास्त्राचे प्रकार आहेत. सदरहू वेदबाह्य मतांत देखील मंत्रशास्त्र आहे. मग त्या भाषा वैकृत आहेत तर मंत्रमय कशा?" २. "महानुभाव भाषा व त्यांचें मंत्रशास्त्र व लिपी कशी आहे ? " ३. " नंदपुत्र कृष्ण व वसुदेवपुत्र कृष्ण एकच आहेत काय ? यमल तंत्रावरून भिन्न असल्याचा मोहमय वाद निघाला आहे. मोहनिवारणार्थ विनंति केली आहे.

वरील पत्राचें उत्तर महाराजांकडून माघ वद्य १४ ता० २३-२—१९१४ रोजीं गेलें. त्यांत नैगम आणि साबर असे मंत्राचे दोन प्रकार सांगून साबरमंत्र तत्वज्ञानाविषयीं अदृष्टोत्पादक नाहींत तर दृष्ट क्षुद्रफल देणारे आहेत, त्यांची भाषा नियत नसून बहुतेक साबरमत्र विकृत भाषेंत आपल्याकडील भूतडामरादि तंत्रांतही आहेत. आरबी वगैरे भाषेंत असे मंत्र आहेत ते साबरच आहेत इ० गोष्टींचा ऊहापोह केलेला आहे व साबरमंत्र हिंदुस्थानांतूनच अनेक देशांत गेले आहेत व चांडाल व द्वीपांतरवासी लोकांनीं साबरमंत्रांचा अभ्यास करावा, ब्राम्हणांनीं करूं नये असें मेरुतंत्राचें म्हणणें प्रमाण देऊन पुढें मेरुतंत्राचे बरेंच प्राचीनत्व सिद्ध केलें आहे व नंतर नैगममंत्राविषयीं थोडक्यांत माहिती सांगून पहिल्या प्रश्नाचें उत्तर दिलें आहे.

दुसऱ्या प्रश्नाचें उत्तर देतांना हिंदुस्थानांतील भिन्न भिन्न पंथांचें ऐक्य अढळ राखण्याविषयीं महाराजांची अत्यंत जपणूक दिसून येते. ते म्हणतातः—" मानभावांचीं तीन स्थळें व त्यावरील बंध मला येत आहेत हें खरें आहे. तथापि लोकांना उपदेश घेतल्यांवांचून कळवूं नये असा

त्यांचा निर्बंध असल्यामुळें लोकांपुढें त्या गोष्टी जाहीर करून एका समाजाला आपलें शत्रुत्व पतकरावयास लावण्यास मी तयार नाहीं म्हणून त्यांची लिपी व शास्त्र मला माहित आहे तरी उघडपणें सांगणार नाहीं. पण एवढें मी खास सांगतो कीं मानभावधर्म कोणाला कितीही संशययुक्त वाटत असला तरी तो थिऑसफीपेक्षां लाखपट चांगला आहे असें मी म्हणतों.

तिसऱ्या प्रश्नाला महाराजांनीं दिलेलें उत्तर उपासक दृष्टीनें अत्यंत उपकारक आहे. तें असें:—

" दोन कृष्णांबद्दल जो यामलतंत्रांत उल्लेख आहे तसा तो स्कंदपुराणांत व पद्मपुराणांतही आहे. आणि चैतन्यसंप्रदायांतील लघुभागवतामृत ग्रंथांतही आहे. कृष्ण जरी दोन आहेत तरी त्यांची मूल मूर्ति एकच आहे. शिवाय प्रत्येक गोपीला जर एक एक कृष्ण रासांत मिळाला होता तर या दोन कृष्णांतच काय आश्चर्य आहे? जितके उपासक तितकीं रूपें धरणें हें परमेश्वरशीलच होय. दोन कृष्ण असले तरी ते दोन ईश्वराचीं रूपें आहेत असें कांहीं म्हटलें नाहीं. तेव्हां एका ईश्वरानें कोटी कृष्ण रूपें धरिलीं तरी उपासकाला मोह पडण्याचें कांहीं कारण नाहीं. अशा रिकाम्या मोहानें लाभ कांहींच होत नसून साधारण उपासनेच्या अंत:करणाला मात्र प्रतिबंध होतो. "

हें चालू संवत्सर संपतां संपतां आणखी दोन लेख महाराजांनीं मुमुक्षु पत्रांत प्रसिद्धीकरितां पाठविले आहेत. त्यांतला एक "हिंदु व महंमदादि" हा असून तो मुमुक्षुकर्ते रा० लक्ष्मणराव पांगारकर यांच्या सूचनेवरून पाठविला आहे व तो मुमुक्षूच्या ता० ५ मार्च १९१४ च्या अंकांत प्रसिद्ध झाला आहे. प्रस्तुत लेखांत हिंदु व मुसलमान यांच्यांत धर्मसंबंधीं सख्य सर्वदांच आहे ही गोष्ट महाराजांनीं सप्रमाण सिद्ध केली आहे. प्रथम, द्वेष हा धार्मिक किंवा राजकीय असा दोन प्रकारचाच असूं शकतो व त्यांपैकीं धार्मिक द्वेषच परंपरागत टिकूं शकतो याविषयीं सांगून

नंतर महाराजांनीं मुसलमानांच्या व हिंदूंच्या धार्मिक इतिहासांतलीं प्रमाणें देऊन व शिवाजी व अवरंगजेबाच्या कालीं ऐतिहासिक लढा प्रत्यक्ष असतांही शेखमहंमदबाबासारखे मुसलमान महात्मे हिंदूशीं मिळूनच होते व माणिकप्रभु वगैरेंच्या स्थानीं अजूनही हिंदुमुसलमानांच्या पूजा होत असतात इ० उदाहरणें देऊन हिंदुमुसलमानांत धार्मिक द्वेष कधींच उत्पन्न झाला नाहीं व होणें शक्य नाहीं हें सिद्ध केलें आहे.

पुढें ख्रिस्तिधर्माचें व बौद्ध धर्माचेंही ऐक्य हिंदुधर्माशीं मूळचेंच कसें आहे तें सप्रमाण दाखविलें आहे व " विचारदृष्टीनें सर्व धर्म एक आहेत म्हणूनच सर्वांना गोडीगुलाबीनें वागतां येत असून अधिकारी पुरुषांच्या सोयीप्रमाणें आचार मात्र प्रत्येकांचे भिन्न आहेत; व ते तसेच राहूं देणें हेंच प्रत्येक समाजाला भूषणावह आहे. " असें हिंदुधर्माचें म्हणणें सांगून व हिंदुस्थानांत कोणाशींही धार्मिक द्वेष उत्पन्न होऊं नये अशी हिंदुसमाजाची मांडणी दाखवून हिंदुधर्माचें श्रेष्ठत्व सिद्ध केलें आहे व शेवटीं-युरोपखंडांत सध्यां धर्माची अवनति झाली आहे व तेथें धर्माची आवश्यकता भासूं लागली आहे हे सांगून युरोपला देखील शांतता कायम ठेवण्याकरितां कोणत्या तरी धर्माचा अवश्य आश्रय करावा लागेल असें भाकित केलें आहे.

दुसरा लेख " योग आणि विपर्यास " हा आहे व तो मुमुक्षूच्या ता० २६ मार्च १९१४ च्या अंकांत छापून प्रसिद्ध झाला आहे.

योगाचें अंतीम ध्येय मनाचा निरोध हें असून त्याला अभ्यास आणि वैराग्य ह्या दोन गोष्टींची अत्यंत जरूरी आहे हें जें योगशास्त्रप्रसिद्ध प्राचीन तत्व तिकडे लोकांचें दुर्लक्ष्य होऊन आपल्याकडील वामतंत्रांत रूढ असलेल्या हिप्नाटिझम्सारख्या क्षुल्लक चमत्काराच्या गोष्टी हल्लींच्या काळांत योगाच्या नांवाखालीं मोडूं लागल्यामुळें योगशास्त्राचा कसा

विपर्यास झाला आहे हें या लेखांत महाराजांनीं दाखविलें आहे. वर्णाश्रमकर्म केल्यावांचून किंवा साधनचतुष्टयसंपत्तिवांचून नुसते वेदान्ताचे ग्रंथ वाचून वेदान्ताचा व व्यवहाराचा मेळ घालूं पाहणाऱ्या आधुनिक वेदान्त्यांची व साधुवर्गाची स्थिती जशी यापूर्वी महाराजांनीं वर्णन केली आहे, तशीच, योगाच्या नांवाखालीं हिप्नाटिझमूचे क्षुल्लक चमत्कार दाखवून व योगाचे अनेक खेळ करून आविरक्त लोकही हल्लीं अधिकारीपणाचें बंड कसें माजवितात व त्यांच्या नादीं लागून भोळे लोक व मोठमोठे शिकलेले लोक देखील कसे फसले जातात ती स्थितीही या लेखांत महाराजांनीं वर्णन केलेली आहे व प्राचीनकाळीं हिंदुस्थानांत भरभराटींत असलेल्या योगशास्त्राला केवळ कोल्हाट्याच्या कसरतीच्या साम्यतेस आणून बसविणाऱ्या अशा आधुनिक भोंदू योगीवर्गाचे आक्षेप खोडून त्यांची परीक्षा पाहण्याकरितां कांहीं योगशास्त्राचे प्रश्न विचारून शेवटीं महाराजांनीं सर्वांस अशी विनंती केली आहेः—

" याप्रमाणें थोडेसे प्रश्न लिहिले आहेत. यांचें उत्तर कृपाकरून कोणी द्यावें. या थोड्याशा प्रश्नांचीं उत्तरें दिल्यास प्राणायाम, दृष्टियोग, व मुनिच्चित्त साक्षात्कार यांतील भयंकर अडचणीचे प्रश्न करीन. यांचें उत्तरच नाहीं असें मात्र कोणी समजूं नये. उत्तर खास आहे. योगीयांनीं खटपट करावी. आतां कोणी म्हणेल कीं, मोठे मोठे शब्द प्रश्नांत उगीच घातले आहेत, तर असें म्हणणाऱ्याकरितां माझे हे प्रश्नच नाहींत. ज्यांनीं योगशास्त्र वाचून त्याचा थोडा तरी अनुभव घेतला आहे. अशांनांच मी हे प्रश्न विचारीत आहे. एखादा टोपण योगी या प्रश्नांनीं जर भेडावून गेला तर शिकलेल्या लोकांनीं प्रश्न विचारून अशा गुरूला भेडावून सोडावें असें माझें मतच आहे. बरोबर न समजतां पुत्रानें आईबापांची सेवा सोडून व स्त्रियांनीं पतीची सेवा सोडून व्यर्थ बोवांच्या नादीं लागूं नये अशी माझी गरीबाची सर्वांस विनंति आहे आणि जे वैदिक मार्गावर अवलंबून असतील ते योगीच आहेत असें मीच समजतों. त्यांनीं उत्तर दिलें नाहीं,

तथापि त्यांचा अपमान करण्याकरितां हें प्रश्न नाहींत तर योगाचे अनेक खेळ करून दाखविणाऱ्या सर्वांकरितां आहेत[1]. " असो.

याप्रमाणें या "प्रमाथी" संवत्सरांतील वृत्तांत यथामति वर्णन केला. यापुढील "आनंद" संवत्सर हें या उमरावती प्रकरणाचें शेवटलें आहे. तेवढें झालें म्हणजे हें चालू उमरावती प्रकरण संपणार आहे. त्या "आनंद" संवत्सरांतील रम्य चरित्रकथेस आतां आरंभ करूं.

---

श्रीज्ञानेश्वर माउली समर्थ.

## शके १८३६ आनंदनाम संवत्सरे. इ० स० १९१४–१५.

—✻०✻—

श्रीपांडुरंग सद्गुरुनाथ महाराजांच्या कृपेनें उमरावती प्रकरणांतील अंतीम संवत्सराची चरित्रकथा आतां लेखन करितो. या संवत्सरांतील वृत्तांत खरोखरच संवत्सराचें आनंद हें नांव सार्थ करणारा आहे. कारण ज्या सद्गुरु-

---

वरील लेखाचा अभिप्राय महाराजांच्या पुढील अभंगांत थोडक्यांत समाविष्ट झाला आहे:—

लावोनियां डोळे झगमगरूपा । जपती अजपा श्वासामध्यें ॥ १ ॥
छेदन चालन दोहन जिव्हेचें । होती खेचरीचे अधिकारी ॥ २ ॥
जंव नाहीं वृत्ती निरोधिल्या पांच । तों न योग साच अवघे चाळे ॥ ३ ॥
अभ्यास वैराग्य एक वेळ जरी । घडले नाहीं तरी अवघे चाळे ॥ ४ ॥
पर वैराग्यानें वीट त्रिगुणांचा । नये जरी साचा अवघे चाळे ॥ ५ ॥
जिंकोनि जिंकोनि संयमें भूमिका । स्थिर जों न निका अवघे चाळे॥६॥
क्लेश कर्मपाक आणिक आशय । भिन्न देवराय तयाहूनि ॥ ७ ॥
तयाचें जरी न केलें प्रणिधान । तंव हें साधन अवघे चाळे ॥ ८ ॥
जंव नाहीं झाली ज्ञानेश्वरदया । तंव योगक्रिया राजयक्ष्मा ॥ ९ ॥

सेवेचे महिमान जगास श्रुति जननीनें "तद्विज्ञानार्थं सद्गुरुमेवाभिगच्छेत्" या मंत्रानें मुक्त कंठानें सांगितलें, "गुरुरित्याख्ययालोके विद्या साक्षाद्धि शांकरी" "आघवियांची दैवा । जन्मभूमि हे सेवा" असें सांगून जिच्या रसभरीत वर्णनांत श्रीज्ञानेश्वर महाराजांची वाणी प्रेमानें तल्लीन झाली, "सकळ देवांचाही देव । सद्गुरुनाथ एकला ॥" "तुका म्हणे सद्गुरुसेवा।सकळ देवां वरिष्ठ" "आधीं पूजा सद्गुरुनाथा ।चाले देवावरी सत्ता ॥" इ० आपल्या अभंग वाणीनें तुकाराम महाराजांनीं जिचे पोवाडे गावून "तुका म्हणे कैसे आंधळे हे जन । गेले विसरून खऱ्या देवा" यां वचनानें लोकांत जिचें पुनरुज्जीवन करण्याचा यत्न केला व याप्रमाणें श्रुतिसंतांनीं आखून दिलेला मार्ग सोज्वळ करण्याकरित आजपर्यंत महाराजांनीं कंठशोष करून जिच्या प्रीत्यर्थ आपलें शरीर झिजविलें, त्या सद्गुरुसेवेचें महत्व प्रत्यक्ष आलीकडील ऐतिह्य उदाहरणा व तेंही स्त्रीवर्गांतील उदाहरणानें दाखवून देण्याचा प्रसंग सहजासहजीं य संवत्सराच्या आरंभींच महाराजांस आला. हें उदाहरण म्हणजे तुकाराम महाराजांच्या शिष्या मातोश्री बहेणाबाई यांची कविताबाणी होय. य कवितांचें पुस्तक महाराजांकडे अभिप्रायार्थ आलें. तें वाचून त्यांच्य अंतःकरणांतील खऱ्याखुऱ्या प्रेमवृत्ति बाहेर उसळल्या व "खऱ्या वाणीच परिणाम" या नामनिर्देशानें मुमुक्षुवर्तमान पत्राच्या ता० २ एप्री १९१४ च्या अंकांत त्या लेखरूपानें प्रगट झाल्या. त्यांत महारा म्हणतातः—

स्त्रीशिक्षणाविषयीं आमच्या समाजांत अनेक प्रकारची ओरड चालली आहे परंतु स्वधर्मानें व खऱ्या भगवद्भक्तीनें शाळेंत न घेतांना शिक्षण जन्मोजन्म मिळतच असतें. माझ्या सुदैवानें न मागतां माझ्याकडे बहिणाबाईची कवित आली आहे.

बहिणाबाई ह्या तुकाराम महाराजांच्या शिष्यांपैकीं एक असून 'शिष्यादि च्छेत्पराजयं' एवढी कृपा महाराजांनीं त्यांच्यावर केली होती, हा अर्थवा प्रगट केल्यावांचून राहवत नाहीं. बहिणाबाईंच्या कवितेंत भक्तिज्ञानाचें उद्र

इतके स्पष्ट आहेत कीं, अद्वैतासिद्धीपर्यंत वेदांत पढणाऱ्याला ते डोलवून सोडतील यांत संशय नाहीं. बृहद्योगवासिष्ठाप्रमाणें त्यांचा दृष्टिसृष्टिवाद शुद्ध आहे. शांकरभाष्याप्रमाणें त्यांची कविता शास्त्रीय आहे. बहिणाबाईंचे १३ जन्म स्त्रियांचेच झाले त्यांत त्या कोण्या शाळेंत शिकावयास गेल्या नव्हत्या. बहिणाबाईंचे उद्गार इतके स्पष्ट आहेत कीं, माझ्या तर्कांचा अभिमान व वेदांताच्या शोधाचा अभिमान एकाच अभंगांत त्यांनीं घालवून मला लाज वाटावयास लावली! भागवताप्रमाणें हें पुस्तक गळ्यांत मंगलसूत्र करावें असें मला वाटूं लागलें. मायेचें अनिर्वाच्यत्व वेदांताच्या शास्त्रीय युक्त्यांनीं यांनीं सिद्ध केलें आहे. वेदरहित आत्मज्ञानी यांना खपत नसून वेदाचें रहस्य यांना कळलें आहे असें माझें मत झालें आहे. ब्रह्मज्ञानियाच्या निवृत्तिमार्गाला प्रारब्धाचा स्पर्श नाहीं, हें यांचें मत ऐकून तर ह्या वसिष्ठाचा अवतार आहेत काय अशी शंका येते, परंतु त्यांनीं आदल्या १३ जन्मांची हकीकत दिल्यामुळें ही शंका आंतल्या आंत दाबून ठेवावी लागते. नाहींतर निश्चय केला असता. यांचें वाक्य असत्य असेल ही शंका आणण्याकरितां जन्मल्या दिवसापासून आईच्या वाक्यावरील विश्वास काढून टाकण्याची संवय केली पाहिजे. बहिणाबाईंची कविता व त्यांचें चरित्र वाचून त्यांचें मागें जगांत आतां संतांचें कार्य उरलेलें नाहीं, ही एक कल्पना माझ्या मनाला शिवून गेली. ही मी नुसती स्तुति करून लिहीत नाहीं, तर तात स्मरून लिहीत आहें. पंचपादिका, विवरणप्रमेयसंग्रह इत्यादि ग्रंथांतील गूढ प्रमेयें या कवितांत अति स्पष्ट उतरलीं असून त्यांना स्वधर्माचें पाठबळ व भक्तीचा शिक्का मिळाला आहे. आणि असें होऊनही द्वैत किंवा विशिष्टाद्वैत इकडे कल गेला नाहीं, तर शुद्ध शांकरमतच प्रतिबिंबित झालें आहे.

छापखान्याची चूक सोडून दिली तर कवितेची भाषा वामन पंडिताइतकी तरी शुद्ध आहे. त्यांच्या सर्वच कविता चांगल्या आहेत, पण मला आवडलेल्या कांहीं कवितांचा मासला देतो.

१. प्रपंच असत्य कळों आला जया। विषय हे तया नावडती ॥ १ ॥
उदासीनापरी वर्ततो प्रपंचीं। आशा हे मनाची सांडोनियां ॥ २ ॥
मनाचा स्वभाव संकल्प विकल्प। होय साक्षिरूप तयांचाही ॥ ३ ॥

बुद्धीचा निश्चय अनुसंधानीं चित्त । अहंकारीं हेत अहंतेचा ॥ ४ ॥
सर्वेही मायीक व्यवहार जाणती । निश्चय अद्वैतीं ठेवोनियां ॥ ५ ॥
बहेणी म्हणे माया सत्य ना असत्य । श्रीगुरूनें तथ्य सांगितलें ॥ ६ ॥

सुरेश्वराचार्यांचें बृहदारण्यकावरील वार्तिक वाचून नंतर हा अभंग वाचून पहावा म्हणजे मख्खी कळेल.

२. असत्य हे माया म्हणों जाता दिसे । सत्य म्हणतां नसे ज्ञानदृष्टि ॥ १ ॥
ऐसा हा संदेह निवारी सद्गुरु । विवेक-निर्धारु करोनियां ॥ २ ॥
ब्रह्मा हरीहर मायेचेचि गुण । माया ब्रह्मीं जाण बोलों नये ॥ ३ ॥
माया कल्पनीत अकल्पीत ब्रह्म । न कळे यांचें वर्म कोणे परी ॥ ४ ॥
माया हे सावेव किंवा निरावेव । न कळे याचा ठाव कोणे परी ॥ ५ ॥
बहेणी म्हणे यांचें वर्म कळावया । वोळंगावे पाया सद्गुरूच्या ॥ ६ ॥
३. ब्रह्मापासूनिया झाली म्हणों माया । उपाधि हे तया केंवी घडे ॥ १ ॥
करावा निवाडा सद्गुरु वचन । भेद निरसून विकल्पाचा ॥ २ ॥
माया ब्रह्मीं नाहीं ऐसें म्हणों जरी । स्वतंत्रता तरी म्हणो नये ॥ ३ ॥
बहेणी म्हणे ऐसा संदेह मायेचा । निरसी जो साचा तोचि गुरु ॥ ४ ॥
४. ब्रह्म तों अद्वय श्रुतीचे संमतें । वेगळी माया ते म्हणों कैसी ॥ १ ॥
कोणासी पुसावें मायेचें ठिकाण । सद्गुरुवांचून सत्य जाणा ॥ २ ॥
सुवर्ण कांकण नाममात्र भिन्न । ज्ञानदृष्टीं जाण ओळखावें ॥ ३ ॥
तोय तरंग एक भेद नाममात्र । ऐक्य हें सर्वत्र ज्ञानदृष्टीं ॥ ४ ॥
सूतवस्त्र दोन्ही ऐक्यता सहजें । ज्ञानदृष्टीं वोजे पाहिलिया ॥ ५ ॥
बहेणी म्हणे ऐसा पाहतां विवेक । सहजचि ऐक्य मायाब्रह्मीं ॥ ६ ॥

श्रीमच्छंकराचार्यविरचित विवेकचूडामणींत आणि विद्यारण्यकृत पंचदशींत यापेक्षां अधिक मायाब्रह्माविषयीं शास्त्रीय विवरण काय सांपडतें अशी माझी संस्कृत वाचकांना कर जोडून विनंति आहे. हठयोगादि साधनें आत्मज्ञानाच्या दृष्टीनें तुच्छ असून मनोनिरोधाच्या दृष्टीनें योगाची थोडीशी जरूर आहे, हें तत्व शास्त्रीय तऱ्हेनें बहिणाबाईनें सांगितलें आहे तें पहा.

५. सांसारिक ज्ञानें तरती संसार । हा तुझा निर्धार जाय वाया ॥ १ ॥
यालागीं तूं मूळ आत्मज्ञान साधी । तोडोनी उपाधि अंतरींची ॥ २ ॥
स्वर्गासी जाशील तें जरी साधिलें । व्यर्थ तेणें गेलें पूर्व तुझें ॥ ३ ॥
ब्रह्मांडीं चढविला प्राणवायु जरी । व्यर्थ ते अवधारीं जाई लया ॥ ४ ॥
मंत्र-उपासनें साधिलीं दैवतें । श्रम तोचि तेथें फळा आला ॥ ५ ॥
बहेणी म्हणे शोध करी आत्मत्वाचा । मग तुज कैंचा जन्ममृत्यु ॥ ६ ॥
६. माझिया हा मनें घेतला उच्चाट । पहावें वैकुंठ पंढरी हे ॥ १ ॥
सांडोनियां सर्व काम धाम धंदा । वेधलें गोविंदा गोपिराजा ॥ २ ॥
अधरापासूनी भेदियेले चक्रें । इंद्रियें एकत्रें करूनिया ॥ ३ ॥
प्राणाचा निरोध करूनि पाहिलें । निश्चयें गाईलें नाम तुझें ॥ ४ ॥
तंव पुढें नाद गर्जताती नाना । तेथील धारणा ठाकियेली ॥ ५ ॥
सोहं शद्ब तोही अरुणाचि पाहे । लक्षीं लक्ष जाय मिळोनिया ॥ ६ ॥
सद्गदित कंठ दाटतांचि मन । करोनिया स्नान चंद्रभागा ॥ ७ ॥
बहेणी म्हणे देव विठ्ठल पाहिला । द्वैतभाव गेला हारपोनी ॥ ८ ॥

पहिल्या अभंगांत आत्मज्ञानाकरितां योग तुच्छ सांगून दुसऱ्या अभंगांत मनोनिरोधाकरितां योगाची अपेक्षा किती आहे हें सांगितलें आहे. आतां माझ्या अत्यंत आवडीचे कांहीं अभंग देतों:—

७. निवृत्तीसी नाहीं प्राक्तनाचें बळ । अनुभवी केवळ जाणती तें ॥ १ ॥
निर्धारीं आपुलें असत्य शरीर । मानुनी विचार सार घेती ॥ २ ॥
नाहीं दंड जैसा निस्पृहा रायाचा । तैसा प्राक्तनाचा निवृत्तीसी ॥ ३ ॥
बहेणी म्हणें पाहे प्राक्तन वरिष्ठ । प्रवृत्ति हे श्रेष्ठ मानी तया ॥ ४ ॥
८. शरीराचे माथां वर्ततें प्राक्तन । शरीर तें जाण प्रकृतीचें ॥ १ ॥
ज्ञानियांचें मत देह हाचि मिथ्या । प्राक्तनाची कथा तेथें कोण ॥ २ ॥
प्राक्तन भोगवी भोग तो शरीरीं । ज्ञानियां अंतरीं सुखरूप ॥ ३ ॥
बहेणी म्हणें देह प्राक्तन तोंवरी । विचार अंतरीं निश्चयाचा ॥ ४ ॥

हे अभंग नव्हेत तर ब्रह्मज्ञानीपणा गाजवून प्रारब्धाच्या नांवाखालीं अन-

न्वित कृत्यें करणाऱ्या साधु म्हणविणाऱ्यांच्या तोंडावर मारण्याकरितां पैज आहेत ब्रह्मज्ञानियाला प्रारब्धाचा स्पर्श नाहीं. बृहद्योगवासिष्ठासारखे कठ ग्रंथ वांचून नंतर या अभंगाकडे लक्ष द्यावें म्हणजे हें तत्व बहिणाबाईनें कि स्पष्ट केलें आहे हें कळून येईल. वामन पंडिताला सुद्धां इतकें स्पष्ट हें त करतां आलें नाहीं. आतां वेदाविषयीं त्यांचें म्हणणें पहा.

९. असावें स्वधर्मे जाणावें तें वर्म । जेणें कर्में ब्रह्म हातवसे ॥ १ ॥
तेव्हां तें आतुडे ब्रह्म सर्वगत । भूतीं भगवंत सर्व होय ॥ २ ॥
कर्म आणि ब्रह्म वेगळे न भासे । तया कर्म दिसे ब्रह्मरूप ॥ ३ ॥
बहेणी म्हणे ब्रह्म बळेंचि भावितां । कर्म अधःपाता घालील देखा ॥ ४ ॥
१०. वेदासी विरुद्ध म्हणे आत्मज्ञानी । पडला तो पतनीं रौरवाचे ॥ १ ॥
ऐसे ते चांडाळ न पडावे दृष्टीं । ज्याच्यानें हे कष्टी उभय कुळ ॥ २ ॥
वेदांसी विरुद्ध असतां सर्वथा । अनर्थ परमार्था हाचि एक ॥ ३ ॥
बहेणी म्हणे त्यांचें जळो आत्मज्ञान । त्यानें नारायण वैरी केला ॥ ४ ॥

पंडित श्रेष्ठांनो ! आचार्यपरंपरेंत वेदान्त श्रवणाविषयीं सांगितलेला नियम विधि या अभंगांत नाहीं काय ? आत्मज्ञान हें कांहीं डोळे दाबून झगझगी तेज पहाणें नव्हे तर तें गुरुसंतकृपेनें व श्रवणादि साधनानें उत्पन्न होतें अ स्पष्ट सांगतात:—

११. आत्मज्ञान डोळां दिसें ऐसें नाहीं । लक्षीं जैसे पाहीं कांहीं मना ॥१
बुद्धीचा उपरम होईल सर्वही । आत्मज्ञान ठायीं पडे तेव्हां ॥ २ ॥
आत्मज्ञान नव्हे सुवर्णाचा गोळा । चंद्रसूर्य मेळा सांपडेल ॥ ३ ॥
बहेणि म्हणे ज्ञान साधेल संगतीं । संतांचे निश्चितीं बुद्धियोगें ॥ ४ ॥

‘ संतांचे संगतीं शास्त्राचे आधारें ’ असें एका ठिकाणीं स्पष्ट म्हटलें आहे कांहीं अभंगांत तर उपनिषदांचें भाषांतर जशाचें तसेंच पण मार्मिक रीतीं उतरलें आहे. महाराष्ट्रांतील संतांना न्यायादिशास्त्रीयज्ञान नव्हतें असा आक्षे करणाऱ्यांनीं तें वाचून पहावें. मी विस्तारभयास्तव लिहीत नाहीं.

आतां भक्तिविषयीं आईसाहेबांचें काय म्हणणें आहे तें पहा:—

१२. भक्तिप्रेमसुख न कळे आणिका । पंडिता वाचकां वैदिकांसी ।। १ ।।
जीवन्मुक्त जरी झाला आत्मनिष्ठ । भक्ति प्रेमसुख दुर्लभ त्या ।। २ ।।
अभेदुनी भेद स्थापिला पैं अंगीं । वाढावया जगीं प्रेमसुख ।। ३ ।।
बहेणि म्हणे देव कृपा करिल कांहीं । तरीच हें ठायीं पडे वर्म ।। ४ ।।

"देव देऊळ परिवारू । कीजे कोरूनि डोंगरू । तैसा भक्तीचा व्यवहारू । कां न व्हावा ।। " या तातांच्या ओंवीचेच ह्या अभंगांत प्रतिबिंब पडलें आहे. गीतेच्या मधुसूदनी टीकेंतील ज्ञानोत्तर भक्ति हीच आहे. मी अशी शिफारस करितों कीं, बहिणाबाईचा कवितासंग्रह मुमुक्षुजनांनीं अवश्य वाचावा; कारण माझ्या ग्रंथांत या कवितेपेक्षां अधिक कांहींच नाहीं, किंबहुना पुष्कळ कवींच्या ग्रंथांत नाहीं. उगीच निंदा होईल म्हणून त्यांचीं नांवें देत बसत नाहीं. माझ्या ग्रंथापेक्षां पूर्वी महाराष्ट्र ग्रंथ चांगले झाले नाहींत. असें माझ्या ठिकाणीं पूज्य-बुद्धि ठेवणारे कांहीं लोक म्हणतात, त्यानांही हा कवितासंग्रह चांगलें खाद्य आहे. मला कोणी कांहीं प्रश्न विचारल्यास त्यांना हें पुस्तक वाचण्यास सांगण्याचाच मी नियम केला आहे.

यानंतर महाराजांनीं " वेदान्त व योग " हा दुसरा लेख मुमुक्षूकडे पाठविला. ( मुमुक्षु ता० ९ एप्रील १९१४ पहा. ) या लेखांत, वेदान्ताची व्यवहाराशीं जुळवणुक करण्याचा आलीकडील सुशिक्षित म्हणविणारांचा प्रयत्न आम्हां आर्यांच्या आनुवंशिक शीलाच्या विरुध्द असून हिंदुधर्मावर त्याचा किती अनिष्ट परिणाम होणार आहे, याविषयीं प्लेटो, साक्रेटिस, डेकार्टे, कांट वगैरेंचीं कांहीं उदाहरणें देऊन ऊहापोह केलेला आहे. तसेंच, हिंदुयोगशास्त्राच्या नांवाखालीं हिप्नाटिझम् पुढें ढकलणारे ' विपर्यस्त योगी ' " आचारप्रभवो धर्मः " या स्मृतीच्या विरुद्ध वागून हिंदुधर्माचा आचार बुडविण्यास कसे कारण होतात याचेंही थोडक्यांत वर्णन करून योगशास्त्राचें यथार्थ म्हणणें काय आहे तें सांगितलें आहे. असो.

ह्या वर्षी महाराजांचा प्रतिवार्षिक रामजन्मोत्सव हरदा येथलि रा०

रा० खंडेराव विनायक मजलीवाले यांचे येथें झाला. जन्मोत्सवप्रसंगं महाराजांनीं कीर्तन करून " गासीं तरी एक विठ्ठलचि गाई । नाहींतर टार्यी राहे उगा ॥ " हा तुकोबारायांचा अभंग विषय प्रतिपादनार्थ घेतल होता. कथाप्रसंगांत महाराजांनीं नामस्मरण, भगवत्प्रेम, वैराग्यपूर्वक सद्गुरुसेवन ह्या विषयांचें मुख्यतः प्रक्रियामय निरूपण करून, मनांत भगवंताचें ध्यान करतां करतां प्रत्यक्ष अवताररूपानें भगवं ताला प्रगट करण्याचा सगळ्यांनीं प्रयत्न करावा अशा प्रकारचा उप देश केला.

संत बहेणाबाईच्या अभंगांत "कर्म तेंचि ब्रह्म ब्रह्म तेंचि कर्म । ऐसें जिणें व जाणितलें ॥ " असें एक वचन आहे. त्या संबंधानें रा० रा० श्रीह केशव वाळिंबे यांनीं या सुमारास महाराजांस पत्र पाठवून अशी शंक विचारली कीं कर्म साहंकारी असून कर्तृतंत्र आहे. वस्तुतंत्र ब्रह्माचे ठिकाणीं कर्माची गति नाहीं. असें असून सदरहु अभंगांत कर्म व ब्र एकच आहे असें मातुश्री बहेणाबाई सांगतात हें कसें ? यावर महा राजांनीं पत्रोत्तर पाठवून वरील प्रश्नाचें समाधान केलें आहे. त्यांतल पुढील वचनें साधकाला फार मननार्ह आहेत:—" कर्म कर्तृतंत्र आ खरें. परंतु तेवढ्यानें तें मंदज्ञानाच्या विरोधी आहे. दृढ ज्ञानाच्य विरोधी नाहीं. कारण मंदज्ञानामध्यें ब्रह्मध्यानाची अपेक्षा आहे. कार न्यायदर्शनाधारें मन एकाच काळीं दोन वस्तूकडे लागत नाहीं. आत्म अकर्ता आहे व कर्म कर्तृबुद्धि घेतल्याशिवाय होत नाहीं. म्हणूनच मं बोधाचें रक्षण करण्याकरितां विधिपूर्वक सन्यासाची अपेक्षा आहे. आणि ज्यांना सन्यासाचा अधिकार नाहीं त्यांना वर्णाश्रमकर्मानें अपूर्व उत्पन्न होऊन येथें किंवा अन्य ठिकाणीं ब्रह्मज्ञान मिळतें. अपूर्व तीव्र उत्पन्न होईल तर येथेंच मिळतें. पण जनकाप्रमाणें ज्याचें दृढ ज्ञान आहे त्याच्या ज्ञानाच्या विरोधी कर्म नहीं. उलट कर्म न केल्यानेंच ब्रह्म ज्ञानी पुरुषाला आग्रह होणार आहे. जसें मी कर्म करीन हा अहं कार आहे तसें मी कर्म करणार नाहीं हा अहंकारच आहे. ब्रह्मज्ञानाचें

जोंपर्यंत जरूर आहे तोंपर्यंत मी कर्म करणार नाहीं हा अहंकार उत्पन्न होत नाहीं. कारण त्याचें मन तेव्हां दुसरीकडे गुंतलेलें असतें.

दुसरीकडे गुंतलेल्या मनाला एखादी वस्तु मी मुद्दाम सोडली असा अहंकार उत्पन्न होत नाहीं. पण साक्षात्कारी पुरुषाला निदिध्यासनाची अवश्यकता नसते त्यामुळें पूर्व संस्कारानें प्राप्त झालेल्या वर्णाश्रमधर्मांचा तो जर विरोध करील तर दुसरीकडे मन न गुंतल्यामुळें मी कर्म मुद्दाम सोडणार या अहंकारापासून अलिप्त राहतां येणार नाहीं. + + जे लोक ब्रह्मज्ञान झाल्यावर वर्णाश्रमधर्माला तुच्छ समजतात व निषिद्धकर्म आवडीनें करतात त्यांच्या शाब्दिक ज्ञानामुळें त्यांना देहाभिमान दृढ झाला आहे असें समजावें. अत्यंत अज्ञानी असेल तर आस्थेनें वर्णाश्रम करावें. मंदज्ञानी असेल तर वैराग्यपूर्वक संन्यासानें रहावें. आणि दृढज्ञानी असेल तर गुरुपरंपरारक्षणार्थ पूर्वसंस्कारानें घडून येणारें विहित स्वाभाविक कर्म केल्यानें हानि नाहीं. ही गोष्ट कर्माविषयीं आहे तशी उपासनेविषयींही आहे. मधुसूदनानें आपल्या गीतेच्या गूढार्थदीपिका नामक टीकेच्या उपोद्घातांत म्हटलें आहे कीं “ जीवन्मुक्तदशायांतु न भक्तेः फलकल्पना । अद्वेष्टृत्वादिवत्तेषां स्वभावो भजनं हरेः ॥ ” जीवन्मुक्तदशेमध्यें भक्तीच्या फलाची कल्पनाच नसते. अद्वेष्टृत्वादि गुण जसे स्वभावतःच असतात त्याप्रमाणें श्रीहरिगुणानुवाद गाणें हाही त्याचा स्वभावच होऊन रहातो. असो.

उमरावती जवळील यावली, तेथले रा० आकाजीबापू देशमुख व त्यांच्या येथें अनेक प्रसंगीं महाराजांचें झालेलें वास्तव्य यासंबंधानें मागें बराच वेळ उल्लेख येऊन गेलेला आहे. तेथले श्रीमान मारवाडी गृहस्थ सेठ अंबादास रामरख यांनाही अलीकडे महाराजांविषयीं विशेष पूज्यभाव वाटून त्यांच्या वार्षिक कात्यायनी व्रताला ते द्रव्यसहाय करूं लागले होते. परंतु या गृहस्थाला संतति मुळींच नसल्यामुळें त्यांची ती गुप्त मनोकामना ओळखून तुला संतति होईल असें महाराज बोलले होते व त्याप्रमाणें

नुकतीच कांहीं महिन्यापूर्वीं (कार्तिक शुद्ध ८, शके १८३५) पुत्र-संतति झाल्याचें वर्तमान त्यांनीं विद्युत्संदेश व पत्रद्वारा हरदा येथें महाराजांस कळविलें होतें व मुलाचा नामकरणादि विधि महाराजांच्याच हातानें व्हावा म्हणून त्यांस यावलीस येण्याविषयीं विनंति केली होती. या विनंतिप्रमाणें चैत्र शुद्ध १२ चे दिवशीं काला वगैरे झाल्यानंतर यावलीस जाण्याकरितां महाराजांनीं दुपारीं ४ चे गाडीनें हरद्याहून उमरावतीस प्रयाण केलें.

या सुमारास वेद० शा० सं० विष्णु वामन बापट शास्त्री यांनीं "आचार्य" नांवाचें पाक्षिक वर्तमानपत्र सुरू केलें होतें. त्यांतील एका लेखांत "संत" या शब्दावर कांहीं टीका आल्यावरून संत या शब्दाचा शास्त्रीबोवांचा विवक्षित अर्थ महाराजांनीं त्यांस पत्रद्वारें विचारला होता. त्याचें उत्तर बापटशास्त्रीकडून ता० ९।४।१९१४ रोजीं आलें. त्यांत ते म्हणतात "आपले मुमुक्षूंतील लेख मी वाचतो त्यांवरून आपणाविषयीं माझा पूज्यभाव झाला आहे. मी त्या परीक्षणलेखांत संत हा शब्द अवतरण चिन्हांत घातला आहे. त्यावरून आमचे महाराष्ट्र संत श्रीज्ञानेश्वरादि हा त्याचा अर्थ नसून कांहीं आधुनिक अर्ध्या हळकुंडानें पिंवळे होणारे संत विवक्षित आहेत. + + + श्रीज्ञानेश्वरादिकांनीं प्राचीन आचार्य व शास्त्रें यांचा अनादर केव्हांही केला नाहीं. पण आधुनिक करतात. या सर्वांना अनुलक्षून लिहिलें आहे.

पुढें श्रावण शुद्ध १२ चे दिवशीं बापटशास्त्री यांनीं मुद्दाम येऊन उमरावतीस महाराजांची भेट घेतली ते वेळीं महाराजांबरोबर त्यांची वेदान्त विषयावर कांहीं वेळ चर्चाही झाली. महाराजांनींही शास्त्रीबोवांचें फार प्रेमपूर्वक स्वागत केलें. अस्तु.

उमरावतीस आल्यावर तेथें एका जैनधर्मीय पंडिताबरोबर जैनधर्मासंबंधानें महाराजांचें भाषण झालें. तेव्हां वादाचा प्रसंग मात्र महाराजांनीं टाळला. वादाचा प्रसंग होतां होईल तों महाराज टाळत असत याचें

कारण कोणत्याही धर्मसमजुतींत मतभेद उत्पन्न करूं नये असें त्यांचें धोरण होतें.

याच वेळीं महाराजांचे पूर्वगुरु वलगांव येथील गोपालदास महाराज हेही उमरावतीस आले होते. त्यांची व महाराजांची भेट यावेळीं बारा-वर्षांनीं झाली. त्या प्रसंगाचें वर्णन मागें सिरसगांव प्रकरणांत आलें आहे. (पृ० ७४ पहा.)

या सुमारास "संत ओळखण्याचा उपाय" हा महाराजांचा लेख ता० २३–४–१४ च्या मुमुक्षूंत प्रसिद्ध झाला. जगांत संतांच्या नांवा-खालीं होत असलेली फसवेगिरी पाहून साशंक चित्तानें खऱ्या सद्गुरूचा शोध करित फिरणाऱ्या सामान्य मुमुक्षूंकरितां खऱ्या साधूची कसोटी या लेखांत महाराजांनीं सांगितली आहे व अलीकडील गुरूंनीं बिलकूल सोडून दिलेला हा जुना संप्रदायिक परिपाठ नव्या तऱ्हेनें निरूपण करितांना पुढील विषयांचें त्यांत प्रतिपादन केलेलें आहे:—उत्तमाधिकाऱ्याचें लक्षण व त्याला खऱ्या साधूची अवश्य भेट होते हा नियम. सामान्य मुमुक्षूंचें तीन वर्ग व त्यांपैकीं तिसऱ्याला खरा साधु ओळखण्याच्या उपायाची जरूरी. साधुपरीक्षेच्या तीन कसोट्या. दोहोंची अव्यवहार्यता व तिसरीचें सौलभ्य. गुरूंनीं व शिष्यांनीं परस्पर पहाण्याची कसोटी. चित्तशुद्धीला वर्णाश्रमपरंपरेची आवश्यकता. इ०

या लेखांतील पुढील गोष्टी धर्मजिज्ञासूंनीं नेहमीं लक्ष्यांत बाळगण्या-जोग्या आहेतः—ज्याचें सदाचरण व ब्रह्मज्ञान महशूर असेल त्याचा अपमान कोणत्याही रीतीनें करूं नये. शिष्यांनीं गुरूची कसोटी पहातांना गुरूंनीही शिष्याची कसोटी पहावी. येथें जे टिकतात तेंच धर्माचे आधार-स्तंभ होऊन रहतात. गुरु पहाण्याची कसोटी मात्र आमच्या हातीं असावी आणि गुरूंनीं मात्र शिष्याला कसून पाहूं नये असा ज्या लोकांचा समज असतो त्यांच्याकरितां कोणतीच कसोटी उपयोगांत पडत नाहीं. फसणें हें त्यांच्यापाठीं दैवानेंच लागलें आहे. वर्णाश्रमाची परंपरा जेव्हां

आपण होऊन साधु म्हणविणारे असुर मोडतात तेव्हां जगताचें कल्याण करण्याकरितां पुन्हां परमेश्वराला अवतार घेऊन तिचें स्थापन करावें लागतें व नंतर पुढें योग्य सोपानक्रम सुरू होतो. असो.

यानंतर उमरावतीहून महाराज यावलीस गेले. यावेळीं महाराजांस ताप येऊं लागला होता. यावलीस गेल्यावर चैत्र वद्य ९ रोजीं महाराजांनीं रा० अंबादास सेठ यांच्या मुलाचा नामकरणविधि करून "वाणीगुप्त" हें त्याचें नांव ठेविलें. अंबादास सेठ यांनीं महाराजांचा मंत्रोपदेशही याच दिवशीं घेतला. पुढें महाराजांचा ताप अधिक वाढून पांच-सात दिवसपर्यंत त्यांची प्रकृति बरीच अस्वस्थ होती. श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या पादुका व कांहीं मंडळी हरद्यासच राहिली होती. त्यांसही पत्र पाठवून यावलीस बोलाऊन घेतलें. पादुकांबरोबर श्रीयुत नारायणराव केकरे हेही महाराजांच्या दर्शनार्थ एकदोन दिवसांकरितां आले होते. पुढें महाराजांचा ताप कमी होऊन प्रकृति हळुहळु सुधरूं लागली. या सुमारास "वेदान्त व सायकिकल रिसर्च" या विषयावर निबंध लिहिण्याचा विचार करून महाराजांनीं त्याचें अवतरण लेखन केलें. साधुबोधादि ग्रंथांचें लेखन चालू होतेंच.

असा कार्यक्रम चालू असतांना या आनंदोत्सवप्रसंगीं वरील सेठ अंबादास यांच्या हातून दुर्दैवानें, महाराजांबरोबर आलेल्या कांहीं ब्राह्मणांचा अपराध घडून त्यांच्यावर महाराजांचा रोष झाला व "याचा हा मुलगा मरेल" हे शब्द त्यांच्या वाणींतून निघाले व त्याप्रमाणें एकाएकीं मुलाची प्रकृति बिघडून मुलगा मरण पावला. पुष्कळ वर्षांनीं लाभलेल्या पुत्रसंततीस अशा रीतीनें मुकल्यामुळें सेठजीस अर्थातच पुत्रशोक होऊन कृतकर्मांचा पश्चात्ताप झाला व त्यांनीं अनन्यभावानें महाराजांची क्षमा मागितली. तेव्हां "क्षणार्धमन्युर्भगवान्" ह्या आपल्या ब्रिदास अनुसरून महाराजांस त्या गृहस्थाची दया आली व अभय देऊन त्यांनीं त्याच्या शोकाचें परिमार्जन केलें. तेवेळीं महाराज त्यास म्हणाले, तूं मला व्रताकरितां पैसे देत असतोस म्हणून तुझ्या मुलाच्या नामकरणाकरितां मी

येथें आलों. मी केवळ धर्माचा दास आहे. परंतु तुझ्या चुकीचा परिणाम तुला भोगावा लागला याला माझा निरुपाय आहे. असें म्हणून महाराजांनीं नंतर त्याला परमार्थ तत्वाचा बोध केला व खरें हित वासनेचा त्याग करण्यांतच आहे हा सिद्धांत श्रीमद्भागवतांतील चित्रकेतूच्या दृष्टांतानें पटवून दिला व तूं आपली वर्तणुक सुधर म्हणजे तुला आणखी एक मुलगा लवकरच होईल असें आश्वासन दिलें. या आश्वासनाप्रमाणें पुढील वर्षीच सेठजीस पुन्हां पुत्रप्राप्ति झाली व तो मुलगा हल्लीं उत्तम स्थितींत आहे.

वरील सेठजीच्या उदाहरणांत महाराजांची निग्रहानुग्रहशक्ति पूर्ण दिसून येते व आपलें सुकृत केवळ दुसऱ्याला सुधरण्यांतच खर्च करावें असें जें महाराज कधीं कधीं म्हणत असत त्याची साक्ष त्यांच्या ह्या आचरणावरून उत्तम पटते.

वरील एकंदर घडलेल्या गोष्टीचा परिणाम ह्या प्रसंगीं महाराजांच्या दर्शनास यावली येथें मुद्दाम आलेल्या एका गृहस्थाच्या (श्रीयुत नारायण विष्णु खेर) मनावर विलक्षण घडला व तो त्यानें "अद्भुत चमत्कार" म्हणून पुढचे वर्षी मुमुक्षूच्या ता० १० जून १९१५ च्या अंकांत छापून प्रसिद्ध केला. त्यांत तो म्हणतो:—

"मी आजपर्यंत पुष्कळ साधुसंताचे चमत्कार वाचले व ऐकलेही, पण अलीकडे शास्त्रप्रमाणापेक्षां प्रत्यक्ष प्रमाणावरच आंग्लसंस्कारामुळें जास्त भरंवसा असल्यामुळें बसावा तसा विश्वास बसत नसे. पण माझ्या सुदैवानें आंग्लविद्यासंस्कारजनित अविश्वास समूळ नाहींसा होऊन ईश्वराचे जसे या जगांत चमत्कार दिसून येतात तसेच त्याच्या भक्तांचेही चमत्कार होतात असें माझें ठाम मत झालें. नुकतीच प्रत्यक्ष मी व माझ्यासारख्या प्रसंगीं असलेल्या पुष्कळ लोकांनीं पाहिलेली एक गोष्ट घडली ती अशी:—

आपल्या वर्तमानपत्रांतून ज्यांचे वेळोवेळीं तुकारामांचें प्रयाण वगैरे

विषयांवर लेख प्रसिद्ध झाले आहेत असे श्रीकृष्णभक्तिपरायण महानुभवी श्रीगुलाबराव महाराज यांचें दर्शन घ्यावें या इच्छेनें मी ता० ५ मे १९१४ रोजीं श्रींची स्वारी यावली मुक्कामीं आहे असें समजल्यावरून तेथें गेलों. श्रीमहाराजांना त्यावेळीं थोडा ताप येत होता. तेथें सेठ अंबादास रामरख नांवाचे एक मारवाडी साहूकार आहेत. हेच गृहस्थ श्रीमहाराजांना दरवर्षीं कात्यायनी व्रताला मदत करीत असतात. या गृहस्थाला श्रीमहाराजांच्या कृपेनें बऱ्याच कालानें एक मुलगा झाला होता व त्या मुलाच्या नामकरणादि संस्कारास श्रींची स्वारी आली होती. अशा शुभ प्रसंगीं कांहीं सद्विप्रांचा त्या गृहस्थाकडून छल व अपमान झाल्यामुळें विपरीत प्रसंग ओढवला. त्याचें अशा प्रकारचें मत्त वर्तन पाहून संतापानें श्रींच्या तोंडून पुढील उद्गार निघाले. "ज्याअर्थीं हा इतका प्रमत्त झाला आहे, त्या अर्थीं याचा मुलगा मरेल. आतां आपण येथें रहात नाहीं." "भक्ताही तेतुलीच दशा । तरी भक्तीचा सोसू कायसा" या ज्ञानेश्वरीच्या उक्तीची सत्यता दाखविण्याकरितांच कीं काय कोण जाणे, वचन निघाल्याप्रमाणें तेच दिवशीं संध्याकाळीं मुलाची तब्यत बिघडून मुलगा मरण पावला. तेव्हां अर्थातच "असतः श्रीमदांधस्य दारिद्र्यं परमांजनं" या न्यायानें पुत्रधन नाहींसें झाल्यामुळें बापडा फार दीन होऊन श्रीमहाराजांना शरण गेला. खरोखरच "मायबापाहूनि होऊं कृपावंत । करू घातपात शत्रुहूनि" ही तुकाराम महाराजांची उक्ति सत्य करुन दाखविण्यासाठीं लगेच सर्वांच्या समोर त्यांनीं प्रतिज्ञेवर सांगितलें "झालें तें झालें. शोक आवर. मी तुला आणखी एक मुलगा देतों. पण आपलें वर्तन सुधर." मला प्रत्यक्षप्रमाणोपजीव्याला तें कांहीं खरें वाटेना, तथापि मी तें लिहून ठेविलें व काय होतें तें पाहूं असें समजून उगा राहिलों. पुढें कात्यायनीव्रताचे वेळीं त्या गृहस्थाची बायको गरोदर आहे असें समजलें व आतां प्रत्यक्ष मुलगा झाला आहे."

यावलीहून वैशाख वद्य ४ थीचे दिवशीं महाराज उमरावतीस परत

आले. याच सुमारास त्यांचेकडे मुंबईहून एका गृहस्थाचें पत्र आलें. त्यांत त्या गृहस्थानें मन स्थिर होत नाहीं म्हणून राजयोगाचा अभ्यास करण्याची इच्छा दर्शविली आहे. या पत्राचें उत्तर महाराजांकडून गेलें तें योगाची इच्छा करणारांस फार उपकारक आहे म्हणून जसेंचें तसेंच येथें घेतों:—

साष्टांग दंडवत. वि० वि० आपलें कृपापत्र पावलें. वाचून आनंद झाला. आपण जसा प्रश्न विचारला अशा प्रकारचे प्रश्न मला अनेक लोकांनीं विचारले आहेत. कांहीं लोक योगाचा अभ्यास करण्याकरितां मजजवळ येऊन झाला नाहीं म्हणून निघूनही गेले आहेत. आपलाही प्रश्न त्याच कोटींतला असल्यामुळें यथामति उत्तर लिहितों. रुचेल तर ग्रहण करावें.

मन स्थिर होत नाहीं, एवढ्या सबबीवर राजयोगाचा अभ्यास करावा असें वाटणें साहजिक आहे. परंतु राजयोगांत तरी मन स्थिर स्वतः करावेंच लागतें. आपोआप होत नाहीं. आपल्या सारख्यांचा प्रश्न विचारण्याचा उद्देश असा असतो कीं, जसें कांहीं मन कोणी हातानें दाबून स्थिर करावें. पण तसें होत नसतें. आपल्यालाच तें हळुहळु करावें लागतें. माझ्या आतेच्या मुलाला चिलमेचें व्यसन होतें. म्हणून कोणी सांगितलें कीं, तूं तंबाखू खात जा. म्हणजे तुझी चिलीम सुटून जाईल. तेव्हां त्यानें तंबाखू खाणें सुरू केलें. परंतु चिलीम सोडण्याचा कांहीं यत्न केला नाहीं. त्यामुळें एका व्यसनाच्या ऐवजीं त्याला दोन व्यसनें जडलीं. तशीच गोष्ट क्रियेची आहे. मनाचा आपल्या हातानें हळुहळु निरोध केल्यावांचून एखादी शारीरिक क्रिया केल्यानें मनाचा निरोध होतो असें नाहीं. माझा एक स्नेही निंबदेव आहे. त्यानें षट्क्रिया केल्या. जीभ टाळूला लावली. परंतु तो मला म्हणाला अमृताच्या ऐवजीं टाळूंतून शेंबूडच माझ्या जिभेवर येतो. मनानें सत्रावीचें ध्यान केल्यावांचून अमृतस्राव होत नसतो. कितीही कसरत केली तरी मनाची एकाग्रता स्नायूंवर केल्याशिवाय फायदा होत नाहीं. असें सँडो स्वतः म्हणतो. तेव्हां आपल्या हातानें मनाचा मुळींच

निरोध न करितां कोणता तरी उपाय शोधणें हें योगशास्त्रसंमत नाहीं. बरें ज्याला आपल्यासारखाच प्रश्न करावयाचा आहे तो ब्रह्मदेवासारखा गुरु असला तरी त्याला अडवूं शकेल. गुरूनें प्रथम सांगितलें कीं बाळा सत्य बोल. म्हणजे तो म्हणेल माझें सत्यावरच मन बसत नाहीं. सत्याच्या ठिकाणीं मन स्थिर करण्याकरितांच मला एखादा योग सांगा. तेव्हां गुरूंनीं काय करावें बरें ? सत्य तर योगाच्या पहिल्या पायरींत यमांतच आहे. तेव्हां गुरूनें यमाच्या खालीं आणखी कोणता योग आणावा बरें ? एका बाईनें मला विचारलें होतें कीं माझें पतीच्या सेवेंत मन बसत नाहीं. तर कांहीं उपाय सांगा. तेव्हां दृढ श्रद्धा ठेव, इतकेंच मला लाचार होऊन सांगावें लागलें. एवढ्यानें तिनें ऐकलें म्हणून बरें झालें. समजा तिनें म्हटलें असतें कीं माझी श्रद्धा बसत नाहीं. तर यालाच कांहीं उपाय सांगा. तर मी काय केलें असतें बरें ? श्रद्धा कांहीं तुळसीची माळ नव्हे कीं हातानें घेऊन भसकन् तिच्या गळ्यांत टाकली असती. स्वतः होऊन जो मनाचा निरोध करण्यास तयार नाहीं, केवळ उपायावरच ज्याची भिस्त आहे त्याला योगापासून तरी काय उपयोग होणार ? म्हणूनच अभ्यास आणि वैराग्य या दोघांच्याही योगानें मनाचें ग्रहण करावें (निरोध करावा) असें भगवंतानें गीतेंत म्हटलें आहे. जेथें जेथें मन जातें, तेथून तेथून त्याला बलानें ओढून आणून आत्म्यावर स्थापन करावें असेंही भगवंतांनीं सहाव्या अध्यायांत "यतो यतो निश्चरति" या श्लोकांत म्हटलें आहे. तात्पर्य, राजयोगांत देखील मनानिरोधाकरितां स्वतःचा प्रयत्न पाहिजेच. ज्याच्याच्यानें प्रयत्न होत नाहीं, जें केवळ परतंत्र आहे, असें क्षिप्त आणि मूढ चित्त योगास अधिकारी नाहीं. तर ज्याला थोडा तरी स्थीरतेचा अनुभव आला आहे असें प्रयत्नवान् विक्षिप्त चित्तच योगास अधिकारी आहे. हा योगभाष्याचा सिद्धांत होय. माझा उपदेश ऐकण्याकरितां बैस. मला बसवतच नाहीं. तुम्हीं मला बसविलें पाहिजे. असें कोणी म्हणेल तर त्याला उपदेश तरी कसा करावा ? अशा सर्व-शास्त्रविरुद्धांना शिकविणारे भगवान् सूर्यनंदनच समर्थ आहेत. याविषयीं

गोष्ट लिहितो. एका पुरुषाची स्त्री त्याच्याशीं कांहीं बोलत नव्हती.
तो खिन्न होऊन घरांतील बायांजवळ त्यानें तिचें गाऱ्हाणें सांगि-
तेव्हां तिची मोठी जाऊ तिला म्हणाली, कांग तूं आपल्या पतीशीं
ण कां करीत नाहींस ? ती म्हणाली काय करूं ? मला त्यांच्याजवळ
ाचीच भीति वाटते. जाऊ म्हणाली तर मग तूं दुरून बोलत
ती म्हणाली मला बोलण्याचीच तर लाज वाटते. तेव्हां
म्हणाली, दुसऱ्याच्या हातून सांगून पाठवीत जा. ती म्हणाली
याला बाई असें सांगणें मला कसेसेंच वाटतें. जाऊ म्हणाली
मग तूंच खुणेनें त्यांना कळवीत जा. तेव्हां ही स्त्री म्हणाली
तर कठीण आहे. मोठी जाऊ म्हणाली तर मग मरूं दे त्यांना
ाल ! तेव्हां ती म्हणाली देवाची मर्जी ! ! अशा बिलकुलच प्रयत्नानें
खाणाही न करणाऱ्या मनुष्याच्या मनाचा राजयोग काय हातानें
य करील होय ? मनोनिरोधाचा प्रयत्नानें अभ्यास करणें, याचेंच
राजयोग आहे. प्राणसंयमन, संधिसाधन, पटलनिरास, त्रिपुटीपरिहार
ण समाधिसंजीवन इत्यादि गोष्टीकरितांच फक्त योगांत गुरूची
क्षा आहे. प्रयत्ना करितां नाहीं. कितीही वेळपर्यंत प्राणाचा निरोध
ला तरी मनाचा प्रत्याहार शेवटीं प्रयत्नानेंच करावा लागतो. नुसत्या
ायामानें मन थोडा वेळ मूर्छित होतें. पण इष्ट स्थलीं एकाग्र होत
ी. असा योगशास्त्राचा सिद्धांत आहे. आतां मस्तकावर हात ठेऊन
कोणाच्या मनाचा कोणी निरोध करीत असेल तर ती कला मी
गत नाहीं. " नाहीं देवापाशीं मोक्षाचें गाठोळें । आणोनी निराळें द्यावें
ीं ॥ " असें समर्थ श्रीतुकाराम महाराजांनीं म्हटलें आहे. गुरूपाशीं
ाचा गोळा नाहीं कीं जो सगळा आगोन देईल. तर गुरु सांगतील
पंथ शिष्यानें जबरीनें सर केला पाहिजे. कित्येक बुद्धीच्या विश्वासावर
ला मानीत नाहींत. त्यांचा देहाभिमान व नामरूप केवढाही विवेक
ला तरी सुटत नाहीं असा अनुभव आहे. जे केवळ गुरूवरच भरंवसा
रतात व प्रयत्न करीत नाहींत ते महंमदाच्या वकिलीनें पापांचें

बक्षीस मागणाऱ्या मुसलमानाप्रमाणें होत. त्यांचा आळस कधींच जात नाहीं. म्हणून गुरुप्रतीति, शास्त्रप्रतीति व आत्मानुभव या तिहींच्या साह्यानेंच मनुष्यानें चालावें. शास्त्रप्रत्यय म्हणजे शास्त्रांत सांगितलेला सामान्य मार्ग. गुरुप्रत्यय म्हणजे आपल्या अधिकारानुसार शास्त्रांतून गुरूनें आखून दिलेला मार्ग. आत्मप्रत्यय म्हणजे प्रयत्नानुसार आलेला निरोधाचा अनुभव व त्याचा पुन्हां गुरुशास्त्रांशीं पडलेला मेळ. अशाच अर्थाची एक स्मृतिही आहेः—

स्वयंप्रतीतिः स्वगुरुप्रतीतिः शास्त्रप्रतीतिर्मनसश्वरोधः । दिनदिने यस्य भवेत्सयोगो सर्वेषुकालेषु सुसंमतोऽभूत् ॥ —योगतत्वामृत.—

मागें लिहिल्याप्रमाणेंच या श्लोकाचा अर्थ आहे. मला सुचलें तसें आपल्या पत्राचें उत्तर लिहिलें. भाषेच्या न्यूनाधिक्याची क्षमा होईल अशी आशा आहे. पत्र वाचून प्रेमोत्तर लवकर पाठवितील. कळावें.

उमरावती.
१५।५।१४

आपला,
गुलाबराव गुंडोजी मोहोड.
मोकदम माधान. हल्लीं मुक्काम उमरावती.

यानंतर नागपुराहून रा० रा० गणपत खंडो भालेराव यांच्या मुलीच्या लग्नाची निमंत्रणपत्रिका आली होती म्हणून एक दिवसाकरितां महाराज नागपुरास जाऊन आले. पुढें पांचसात महिनेपर्यंत महाराजांचा मुक्काम उमरावती येथेंच होऊन त्यांचा ग्रंथलेखनादि नित्यक्रम तेथें चालू लागला.

ज्येष्ठ महिन्यांत महाराजांचीं ज्ञानेश्वरीचीं पुराणें चालू झालीं. ज्ञानेश्वरीच्या बाराव्या अध्यायाच्या आरंभीं " जयजय वो शुद्धे । उदारे प्रसिद्धे । अनवरत आनंदे । वर्षतीये ॥" इ० ज्या गुरुकृपामहात्म्याच्या ओंव्या आहेत त्यांतील भावार्थाचें स्पष्टीकरण महाराजांच्या रसाळ वाणीनें होऊं लागलें

व त्या प्रसादवाणींतून श्रुतीस्मृतीसम्मत प्रमाणें, समर्पक दृष्टांत, स्फूर्तिजन्य पदलालित्य, इ० स्वभावसिद्ध निघालेल्या गोष्टी प्रकृत विषय सुबोध करण्याला अधिक सहाय करूं लागल्या. विषयविवेचनक्रमांत लौकिक व अलौकिक रसोत्पत्ति, शास्त्रमूलक व वृत्तिमूलक अनौचित्य, वृत्तिमूलक विवेक व शब्दमूलक विवेक, संवादाचे उत्तमोत्तम प्रकार, श्रवणादि भक्तीचे प्रकार इत्यादि मुद्यांचें उद्घाटन नवीन नवीन प्रकारचें असून त्या सर्वांचें पर्यवसान सद्गुरुभक्तींत व माधुर्यप्रेमांत जेव्हां होत असे तेव्हां मार्मिक श्रोत्यांचीं अंतःकरणें तल्लीन होऊन जात असत. निरूपणप्रसंगीं वीणामृदगादि वाद्यांचा सुस्वर ध्वनीही महाराजांच्या गद्यपद्यान्वित नानाछंदोबद्ध वाणीशीं संलग्न होऊन विशेष बहार आणूं लागला. असा क्रम सुमारे पंधरा दिवसपर्यंत चालला होता. ह्या निरूपणांस गांवांतील कांहीं श्रोतेजनही लुब्ध होऊन श्रवणसुख घेऊं लागले होते. परंतु निरूपणांचा वेळ नियमित नव्हता. दुपारीं, संध्याकाळीं, रात्रीं, बेरात्रीं जेव्हां महाराजांची मर्जी लागेल तेव्हां निरूपणें होत असत. त्यामुळें ह्या महाराजांचा बोधामृतकाला दैवीं होता त्यासच मिळत असे. ह्या निरूपणांतून एक दोनच निवडक वेचे येथें घेतो.

"करवी उचित रत्नांचे आगर" ह्या चरणांतील 'औचित्य' गुणाचें महाराजांनीं जें विवरण केलें त्यांतील पुढील अभंगांत औचित्य गुणाचा प्रभाव वर्णन केला आहेः—अभंग—रस जन्मतांचि हारपती वृत्ती। न सुचे या चित्तीं एकावीण ॥ १ ॥ उचित वागतां जाती मनचाळे। वासनेचीं मुळें उपडोनी ॥ २ ॥ अर्थज्ञानाभ्यासीं उमटे चेतन। हृदयीं सगुण सुखम्य ॥ ३ ॥ त्रिपुटी मुकुंद झाल्या मग काय। निवटील माय व्यतिरेक ॥ ४ ॥ आळंदीजीवनें निवटील्या ताप। ब्रह्मरज्जूसर्प दिसे केवीं ॥ ५ ॥

अत्यंत निरभिमान झाल्यावांचून सद्गुरुवचनावर श्रद्धा बसत नाहीं हें पुढील अभंगांत महाराज सांगतातः—विश्वास तैं बैसे सद्गुरुवचनीं। होय अभिमानीं पारखा जैं ॥ १ ॥ बायलेच्या नेटें करी संतसंग। ज्याचा

मनोभंग क्षणोक्षणीं ॥ २ ॥ आपण भिकारी होवोनियां जावें । मग तें ठसावे ऐसें नाहीं ॥ ३ ॥ आळंदीवल्लभू सर्वत्र सुखाचा । तनूमनवाच । गातां भेटे ॥ ४ ॥

या सुमारास हरद्याहून रा० सुकलसेठ यांजकडून महाराजांकडे कांहीं वस्त्रें मुलीच्या लग्नाप्रीत्यर्थ अहेर म्हणून आलीं होतीं. तीं न घेतां, एक वेळ घेतलीं म्हणजे अशींच घेण्याची संवय लागते असें म्हणून महाराजांनीं दुसऱ्यांस तीं वाटून दिलीं.

नाना पंथाचे महंत, विद्वान, शास्त्री, पंडितादि जन महाराजांची कीर्ति ऐकून मधून मधून त्यांजकडे येतच होते. यावेळीं पंजाबचे एक महानुभाव पंथाचे महंत रा० रा० जैराम हरबाजी मेहरे यांजबरोबर महाराजांकडे आले होते. त्यांजबरोबर कांहीं वेळपर्यंत महानुभावधर्मासंबंधीं महाराजांचें भाषण झालें.

पुढें एके दिवशीं कोणी राजमहेंद्रीकर शेषाद्रिशास्त्री महाराजांचे भेटीस आले. त्यांनीं महाराजांस कांहीं शंका विचारल्या. यावेळीं महाराजांची प्रकृति तापानें बरीच क्षीण झालेली होती. तथापि, प्रथम त्यांच्या कांहीं प्रश्नांचीं उत्तरें मराठींत देऊन नंतर सुमारें दोन तासपर्यंत महाराजांनीं संस्कृतांत अस्खालित भाषण केलें व त्यांच्या सर्व शंकांचें समाधान केलें. शास्त्रीमहाराजही या भाषणानें अत्यंत संतोष पावून महाराजांविषयीं त्यांनीं स्तुतिपर उद्गार काढले. यावेळचीं कांहीं प्रश्नोत्तरें पुढीलप्रमाणें आहेत:—

प्रश्न—शुकाचार्यांना उपनयनसंस्कार झाला नव्हता, कारण "अनुपेतमपेतकृत्यं" असें त्यांच्याविषयीं भागवतांत म्हटलें आहे. मग त्यांस राजा परीक्षितानें 'ब्रह्मन्' असें कसें संबोधन दिलें? तसेंच, व्यासादि ऋषींचा जन्म शूद्रकुलांत होऊन त्यांस ब्रह्मत्व कसें आलें? उत्तर— शूद्रकुलांत यद्यपि त्यांचा जन्म होता तथापि तपोबलानें व योगसामर्थ्यानें त्यांच्या शूद्रदेहाचे परमाणु बदलून शुद्ध सात्त्विक असे परमाणु येतात व ब्रह्मत्व प्राप्त होतें. याविषयीं "जात्यंतर परिणामः प्रकृत्यापूरात्"

हें पातंजलसूत्र प्रमाण आहे. शुकाचार्याविषयींच्या शंकेचेंही उत्तर यांतच आहे.

प्रश्न—व्यासांनीं वेद चार केले असें म्हणतात ते नवीन केले काय ? उत्तर—नवीन केले नाहींत. एकाच वेदाचे चार विभाग केले. म्हणजे ऋगादि वेदांचे मंत्र एकच होते. ते निवडून ऋग्वेद, यजुर्वेद, इत्यादि संहिता व्यासांनीं पृथक पृथक केल्या. प्रश्न—ईश्वर पर्जन्यवत् साधारण कारण कसा ? उत्तर—उपादान कारण व निमित्त कारण दोन्ही ईश्वरच होईल तर सुखदुःख ईश्वरच देतो असें होईल. म्हणून ईश्वर पर्जन्यवत् साधारण कारण व कर्म असाधारण कारण मानावें. प्रश्न—जीव विवर्तपरिणाम कसा ? उत्तर—अधिष्ठानाहून पृथक नसल्यामुळें जीव विवर्तपरिणाम आहे.

( विवर्त=कारणनाश न होतां कार्य भासणें. जसें—कनककुंडल. विकार=कारणनाश होऊन कार्यच दिसणें जसें—दुधाचें दहीं )

चतुर्वर्ण व्यवस्थेविषयीं प्रश्न निघाला असतां महाराजांनीं स्वतःच उत्थाप्य शंका घेऊन समाधान केलें तें असें:—शंका—चार वर्ण पूर्वी नव्हते. कृतयुगांत एकच वर्ण होता. “आदौ कृतयुगे नृणां वर्णो हंस इति स्मृतः ।” तर मग वेदांत “ब्राह्मणोऽस्य मुखमासीत्” अशी चतुर्वर्णव्यवस्था कां सांगितली ? समाधान—वेदांत चतुर्वर्णव्यवस्था आहे यावरून वर्णव्यवस्था अनादि आहे. परंतु “आदौ कृतयुगे” म्हणजे कल्पारंभींच्या कृतयुगांत एक वर्ण असतो. पुढील उत्तरोत्तर कृतयुगांत चतुर्वर्णव्यवस्था राहून सर्व वर्ण आपआपल्या धर्मानें वागतात. नारदादि देवर्षि हे मानससृष्टि असल्यामुळें त्यांचे देह पांचभौतिक नाहींत. म्हणून त्यांच्यांत वर्णभेदही नाहीं. मानससृष्टींत रक्तमांसादि देहसादृश्य असलें तरी त्यांना पितृवीर्याचा व मातृरक्ताचा संपर्क नसतो.

वेदाध्ययनासंबंधानें प्रश्न निघाला असतां महाराज म्हणाले कीं, शूद्र ब्रह्मनिष्ठ असला तरी सामर्थ्यबलानें त्यानें वेदाचा उच्चार करूं नये. ज्ञान-

मार्ग व कर्ममार्ग स्वतंत्र आहे. शूद्राला पुराणवाङ्मयाचा अधिकार आहे.

प्रश्न—पुराणांत " सत्यंपरंधीमही " वगैरे श्रुतींचा उच्चार कसा केला ?

उत्तर—पदाचा किंवा पदव्युत्क्रमानें श्रुतीचा उच्चार करण्यास निषेध नाहीं. प्रणव, व्याहृति, मंत्र अशा क्रमानें गायत्रीचा उच्चार शूद्राला विहित नाहीं. पण पदें मागपुढें करून उच्चार करण्यास निषेध नाहीं.

धर्ममर्यादा स्थिर राखण्याकरितां संप्रदायशुद्ध ज्ञानाचें महत्व केवढें आहे, त्याच्या अभावीं धर्माच्या अंतःस्वरूपाला कसा त्रास पोंचतो व तो त्रास देण्याला आपला स्वतःचाच प्रमाद कसा कारण होतो ह्या संबंधाचे महाराजांचे विचार अधिक स्पष्ट प्रगट होण्याला यासुमारास एक कारण घडलें तें असें:—

धुळ्याच्या सत्कार्योत्तेजक सभेनें नुकताच छापून प्रसिद्ध केलेला ज्ञानेश्वर महाराजांचा योगवासिष्ठ म्हणून एक ग्रंथ यावेळीं महाराजांकडे अभिप्रायार्थ आला. याची एक एक प्रत मुमुक्षुकर्ते रा० रा० पांगारकर व पुण्याचे प्रसिद्ध हरि० भ० परायण विष्णुबोवा जोग यांजकडेही गेली होती. यांनीं ता० १६ जुलै १९१४ च्या मुमुक्षूंत आपआपले अभिप्राय प्रसिद्ध करून सदर ग्रंथ ज्ञानेश्वर महाराजांचा नव्हे असें ठरविलें. याच अंकांत महाराजांनींही आपला लेख प्रसिद्ध करून वरील योगवासिष्ठांत मानभावधर्मांचें मत कसें प्रतिपादिलें आहे तें पुराव्यानिशीं सिद्ध केलें आहे व वेद श्रुतिस्मृति पुराणसमन्वित वेदान्तयुक्तीस धरून हा ग्रंथ नाहीं म्हणून तो ज्ञानेश्वर महाराजांचा नव्हे व त्यांचा असला तरी तो आमच्या करितां नाहीं, असें आपलें मत दिलें आहे.

या लेखाच्या उपक्रमांत महाराजांनीं आपल्यावरील आजच्या धर्मसंकटाची सुंदर मीमांसा केली आहे व धर्माच्या अंतःस्वरूपास त्रास देऊन हें धर्मसंकट आम्हींच आपल्यावर ओढून कसें घेतलें हें स्पष्ट करण्याकरितां हल्लीं प्रत्येकास धर्मोपदेशक होण्याची सुटलेली हांव, संप्रदायशुद्ध ज्ञानाविषयीं त्यांस असलेली अनास्था व धर्मोपदेशाच्या मुख्य प्रयो-

जनाचा पडलेला विसर, धनमानाच्या लालचीनें कोणासही कोणत्याही ग्रंथांतून कांहींतरी नवीन माहिती सांगून उपदेश करण्याची या नव्या धर्मोपदेशक टोळीची प्रवृत्ति व त्यामुळ इतर धर्मास वेदधर्मात हात घालावयास मिळालेली सवड इ० वस्तुस्थितीचें वर्णन केलें आहे; व अशा दुस्थितींत मोठमोठ्या प्रसिद्ध पूर्वाचार्यांच्या नांवावर वेदान्तग्रंथांचे घोटाळे कसे होतात याचीं उदाहरणें देण्याकरितां तत्वसारायण, सिद्धांत-सूत्रें व शेवटीं धुळ्याचा योगवासिष्ठ या तीन ग्रथांची महाराजांनीं समीक्षा केली आहे.

तत्वसारायण हा संस्कृत ग्रंथ तेलंगी लिपींत छापला असून तो मद्रास लायब्ररींत उपलब्ध झाला आहे. या ग्रंथांत व्याससूत्रांचें विवरण वगैरे असून तो वसिष्ठांनीं केलेला आहे असें त्यांत म्हटलें आहे. या ग्रंथाला थियॉसफीचा गंध स्पष्ट येतो असें म्हणून व त्या ग्रंथांतीलच प्रमाणें देऊन महाराजांनीं आपलें म्हणणें सिद्ध केलें आहे.

व्यासांचीं सिद्धांतसूत्रें:—हीं निरंजनाच्या भाष्यासह आनंदाश्रमांत छापलीं असून महाराज त्याविषयीं म्हणतात कीं तीं सूत्रें कदाचित् बरोबर असलीं तरी अलीकडील मेंदूवाद व डार्विनच्या उत्क्रांति वादाचा दंश यांच्या मतांत दाखविला आहे. असें म्हणून निरंजन भाष्यांतलें वाक्य महाराजांनीं प्रमाणार्थ दिलें आहे.

धुळ्याचा योगवासिष्ठ—यांतील युगधर्मप्रकरण श्रुतिस्मृतिपुराणाशीं मिळत नसून मानभावांच्या युगधर्म प्रकरणाची बहुतेक प्रतिकृति त्यांत कशी वठली आहे हे महाराजांनीं सिद्ध केलें आहे व आम्हां वारकरी लोकांना स्तन्य देणारे जरी प्रत्यक्ष तात आहेत तरी वंशप्रचारक शंकराचार्य आहेत. उपनिषद् बीजपुरुष आणि वासिष्ठ अंकुरपुरुष आहेत. या चौकडीच्या अद्वैतांत कोठें भेद सांपडत नाहीं. मग या ओवीबद्ध वासिष्ठांतच तो कां यावा हें समजत नाहीं. + + + आम्हां आर्य वेदान्तियांचा समज असा आहे कीं, " श्रुतिस्मृति–पुराणाव्यतिरिक्त ज्ञानच कोणत्याही

धर्मांत नाहीं. " असें म्हणून संप्रदायवेदान्तदृष्टीनें व अभ्यासाच्या दृष्टीनेंही यांत पुष्कळ चुका आहेत असा आपला अभिप्राय दिला आहे.

योगवासिष्ठावर असा तिघांचाही प्रतिकूळ अभिप्राय वाचून ता० २११७ च्या केसरींत बा० ग० परांजपे नांवाच्या एका गृहस्थानें तिघांहिवर टीका केली; त्यांत महाराजांना उद्देशून त्यानें लिहिलें कीं, मानभावांत कोणी ज्ञानदेव झाला कीं नाहीं हें गुलाबरावला सिद्ध करणें प्राप्त आहे.

यावर महाराजांनीं ता० ६ आगष्ट १९१४ च्या मुमुक्षूंत 'योगवासिष्ठावर पुन्हां विचार' हा लेख लिहून उत्तर दिलें आहे. व त्यांत, "प्रत्यक्ष वेदान्तभेद सांपडला असतां अर्थापत्तिप्रमाणाचें अवलंबन करावें असें मला वाटलें नाहीं व वाटतही नाहीं + + (मूळ) योगवासिष्ठ अद्वैतवादाचा असून सांप्रदायिक शांकरमतांत समन्वय हाच पहिलेपासून परिशुद्धीचा मार्ग ठरत आला असल्यामुळें तद्विरुद्ध वचनाला राहण्याला समावेशच नाहीं असें मी स्पष्ट म्हणतो." इ० युक्ती देऊन व "अमुक नांवाचा मनुष्य झाला किंवा नाहीं हा वाद इतिहासाचा असून तो सतत संदिग्धच राहणार" असें म्हणून ऐतिह्यवादाची संदिग्धता दर्शविली आहे.

याच संबंधांत दुसरा एक टीकात्मक लेख मुमुक्षूचे एक प्रसिद्ध लेखक 'गोविंदसुत' यांनीं ता० ३०।७ च्या मुमुक्षूंत प्रसिद्ध केला. यांत त्यांनीं रा० पांगारकर, ह० भ० प० विष्णुबोवा जोग व श्रीगुलाबराव महाराज या "त्रैमूर्ति" संबंधानें—विशेषतः महाराजासंबंधानें—विद्वानाच्या शीलास न साजणारी भाषा वापरून त्यांच्या लेखावर आक्षेप घेतले आहेत. याचेंही उत्तर महाराजांनीं ता० ६ आगष्टच्याच मुमुक्षूंत "पुन्हां योगवासिष्ठ" या दुसऱ्या लेखांकांत दिलें आहे. त्यांत प्रथम, मानभावी ग्रंथकारांत ज्ञानदेव झाल्याचें ऐतिहासिक दृष्टीनें सिद्ध करण्याची संधी अकस्मात सांपडल्यामुळें केसरींतील लेखकाने मागितलेला ऐतिहासिक पुरावा देऊन नंतर गोविंदसुताच्या आक्षेपांस उत्तर दिलें आहे. गोविंदसुताच्या कडक भाषेविषयीं महाराजांनीं इतकेंच लिहिलें आहे कीं:—

" गोविंदसुत यांनीं ता० ३०-७-१४ च्या मुमुक्षूंत जें माझ्याविषयीं लिहिलें आहे तशी भाषा वापरण्याला मी तयार नाहीं. कारण येथें सामान्य संबंध नसून व्यक्तीचा संबंध आहे. परंतु गोविंदसुत यांना मी इतकेंच विनवून सांगतों कीं, नुसता विश्वास ठेवावयाला मी कोणास लावीत नाहीं व लावणारही नाहीं. हा काल चिकित्सेचा आहे हें मला ठाऊक आहे. गोविंदसुत म्हणतात कीं हा ग्रंथ मीं वरवर वाचला आहे. तर तसें मुळींच नाहीं. त्यांच्या जवळून जरी मी पुनः वाचून घेतला तरी मी आपलें बोलणें सिद्ध करण्यास तयार आहे. गोविंदसुताची भाषा कोठें कडक व कोठें नम्रतारूप आहे, तिचा अर्थ कसा होत असतो हें सर्व वाचकांस माहीतच आहे. मी यौक्तिकच (Argumentative) भाषा वापरणारा आहे. शिवाय माझ्याविषयीं मी दुसऱ्या कामाला बसलों असतांना गडबडीनें अभिप्राय दिला गेला इत्यादि जीं अनुमानें गोविंदसुतानें काढलीं आहेत त्यांवरही उलट बोलण्याची मला इच्छा नाहीं. कारण तीं पंचावयवरूप ठरवितांना सर्वच वाचकांना कठीण पडणार आहे. तेव्हां आपल्याच अनुमानाचें निरसन करीत बसण्यांत मला कांहीं हांशिल वाटत नाहीं. आतां गोविंदसुतांच्या भाषेचीं पुटें सोडून देऊन त्यांनीं लिहिलेल्या मुद्यांसंबंधींच मी लिहितों. " असें म्हणून या ग्रंथांत (धुळ्याच्या योगवासिष्ठांत) संप्रदायवेदान्तदृष्टीनें असलेल्या चुका व योगशास्त्रदृष्टीनें अभ्यासाच्या वगैरे चुका स्पष्ट दाखवून गोविंदसुतांच्या सर्व आक्षेपांचें महाराजांनीं निरसन केलें आहे. शेवटीं संप्रदायवेदान्त म्हणजे काय याविषयीं या लेखांत महाराज म्हणतातः—" संप्रदायवेदान्त म्हणजे वारकरी वेदान्त असा जो गोविंदसुतांनीं अर्थ केला आहे तो माझा नाहीं तर उपनिषदें, स्मृती, व पुराणांतील अद्वैत कांड, ब्रह्मसूत्रें व त्यावरील श्रीमत् शंकराचार्यांचीं भाष्यें, पंचपादिका आणि विवरणें इत्यादि क्रम हा होय. " अस्तु.

उमरावतीचे रा० रा० भाऊसाहेब डोळे यांचा व महाराजांचा फार जुना परिचय होता व महाराजही मधून मधून त्यांच्याकडे जात असत.

भाऊसाहेबांचा वैद्यशास्त्र हा आवडता विषय असल्यामुळें महाराजांजवळ त्यांनीं तोच विषय चर्चेला काढावा व महाराजांनींही पुष्कळ वेळपर्यंत त्या विषयावर चर्चा करून भाऊसाहेबांच्या शंकाचें समाधान करावें व भाषणाचा समारोप शेवटीं सांख्य वेदान्तपर करावा. या चर्चेत धार्मिक विषयही कधीं कधीं निघत असत. भाऊसाहेबही फावल्या वेळांत महाराजांकडे येऊन तेथील शास्त्रचर्चा व भजनपूजनादिनित्यक्रम यांचा लाभ घेत असत.

या क्रमाप्रमाणें याखेपेसही एके दिवशीं सकाळीं भाऊसाहेब येऊन महाराजांचें व त्यांचें संभाषण चाललें होतें. त्यांत पुनर्विवाहाचा प्रश्न निघाला. ते वेळीं महाराजांनीं कांहीं सामान्य धार्मिक तत्वें सांगितलीं. त्यांत पुढील गोष्टी होत्याः—

मनुष्याला चार बंधनें आहेत. धर्म, प्रेम, काम व दंड. मनुष्यानें विवाह करावा हें धर्मबंधन होय. पुनर्विवाह प्रेमबंधनानें होतो. चोरी केली असतां राजानें शिक्षा देणें हें दंडबंधन होय. हें एकेक बंधन उत्तरोत्तर नीच आहे. प्रेमबंधन आसुरी आहे.

मृज्जलानें शुद्धि करावी हें शास्त्रवचन आहे. दोन्ही वस्तू सुलभ असतांना हें शास्त्रवचन पाळण्याचा ज्याला आळस वाटतो त्याचें चित्त किती शुद्ध असेल तें वरूनच कळतें. बाह्य वेषावरूनच मनुष्याची परीक्षा करावी. आंतर गुण ईश्वरालाच कळतात व तशीं तो कर्मफळें देतो. " तानहं द्विषतः क्रूरान् संसारेषु नराधमान् । क्षिपाम्यजस्रमशुभानासुरीष्वेव योनिषु ॥ " तुकारामबोवांच्या विरुद्ध सन्यासी फिर्याद गेले. पुढें तुकाराम बोवांचें कीर्तन ऐकून सन्यासी त्यांच्या पायां पडले. ते वेळीं दादोजी कोंडदेव त्यांची धिंड काढीत होते. परंतु तुकाराम बोवा त्यांस म्हणाले " तुका म्हणे वेष न विटंबा सर्वथा । नाहीं पंढरीनाथा साहत हें " ॥

आलीकडे महाराजांची प्रकृति तापामुळें नीट रहात नसे. हें मागें सांगितलेंच आहे. भाऊसाहेब आले तेवेळीं महाराज तापामुळें निजूनच

होते. त्यासंबंधानें भाऊसाहेब म्हणाले तुम्हांला पैत्तिक दाह आहे ज्वर नाहीं. ज्वरानें मुखकांति बिघडली असती. त्यावर महाराज म्हणाले मला २० वर्षांपासून मलेरिया आहे. मुखकांति बिघडत नाहीं याचें कारण माझें मन अत्यंत बलवान आहे. तापांत स्नानें करणें, तीन तीन तास शौचास बसणें, हें कोण करूं शकतो ? माझें शरीर क्षीण झालें असतां फार तर प्राण क्षीण होतील. पण मन कधींच क्षीण व्हावयाचें नाहीं. वैद्यशास्त्रावर योगशास्त्राचें दडपण आहे. शौचाचें ( बाह्यशुद्धीचें ) फळ शास्त्रांत हेंच सांगितलें आहे कीं शरीर नकोसें वाटणें. माझे हात कमरेच्या खालीं धोतरास झोंपेंतही लागत नाहींत. हें पाहिजे तर तुम्ही मजजवळ राहून पाहरा ठेवून पहा.

पुढें लवकरच प्रतिवार्षिक श्रीकृष्ण जन्मोत्सवाचा समय प्राप्त झाला व ठरीव कार्यक्रमांप्रमाणें सर्व गोष्टी यथासांग झाल्या. जातकनिरूपण, काला वगैरे प्रसंग नेहमींप्रमाणेंच बहारीचे झाले. जातकनिरूपणांत लालन वात्सल्यादि भक्तांचें वर्णन, विवेक व ज्ञान यांतील फरक, सत्संगाचें महत्व, संतांचें मुख्य ध्येय, सकाम व निष्काम बुद्धीचें लक्षण, वृत्तींचा स्वभाव, भक्तिवृत्तींचें वैलक्ष्यण्य, माधुर्य भक्तीचें स्वरूप इत्यादि विषयांचें प्रतिपादन होतें. काल्याच्या पूर्वरंगांत पुढील विषयांचें मुख्यतः विवेचन होतें:—ईश्वर न्यायी असून दयाळु कसा ? वेदान्तानें भक्तीची सिद्धि, परमेश्वराचें दयाळुत्व, ज्ञानियाला सद्गुरूची आवश्यकता, ईश्वराचा पक्षपातीपणा, गुरूचा पक्षपातीपणा, गुरुवाक्यानुसारच उपासनेचा विधि, अनधिकारियालाही उपदेश करून अधिकारी करण्यांत देव आणि शास्त्र यांच्याहून गुरूची श्रेष्ठता, नियमादृष्ट उत्पन्न करण्यांत कर्मानुष्ठान, वेदान्त श्रवण व उपासना यांच्या सामर्थ्यांमधील तरतमभाव व सर्वांहून उपासनेचें महत्व, संप्रदायपरंपरेची आवश्यकता व महत्व, संप्रदायप्रवाह रक्षण करणें हीच भक्ति इ० इ०. या प्रसंगांत झालेल्या नवीन अभंगांतून फक्त दोनच अभंग येथें घेतो:—१. पतितही संत तारितील कळीं । कृपावलोकनीं आपुलिया ॥१॥ न मागतां माय पाजील कीं स्तन । तिसची म्हणून बाळचिंता ॥ २ ॥

परी बळें मुख मिटवितां बाळ । राहिजे स्नेहाळ ठायीं ठायीं ॥ ३ ॥ तवीं प्रसंगाचि आवडी दवडितां । स्तब्ध होणें संतां लागे तेव्हां ॥ ४ ॥ मौनें येऊ द्यावें सांगती तें चित्ता । पुढील तों चिंता ज्ञानराया ॥५॥

२. व्यष्टिचि हे जातां समष्टीच्या वाटे । तेणें वाक्य थाटे शास्त्रमय ॥१॥ यालागीं रक्षावा गुरुसंप्रदाय । श्रुतियुक्ति होय प्रत्ययही ॥ २ ॥ दुग्धाचें तें घृत प्रत्येक मंथनीं । टाकिल्या विरजणीं करणें लागे ॥ ३ ॥ आदिनाथापेक्षां माझा कळवळा । अधिक वेल्हाळा आळंदीशा ॥ ४ ॥

मागें महाराज देवाशास गेले होते तेव्हांपासून देवासच्या महाराजांस त्यांचा अधिक निदिध्यास लागला होता व पुन्हां एकवेळ त्यांचें दर्शन घडावें अशी त्यांस उत्कंठा लागली होती. महाराजही कात्यायन्यादि उत्सव प्रसंगीं त्यांस स्मरणपूर्वक निमंत्रण पत्रिका वगैरे पाठवीत असत. हल्लीं देवासच्या महाराजांनीं रा० बापूराव लेंगडे फोटोग्राफर यांस उमरावतीस पाठवून महाराजांकडील क्षेमकुशल विचारलें होतें व पुन्हां एकवेळ देवाशास येऊन दर्शन देण्याची इच्छा दर्शविली होती. परंतु प्रकृतीच्या कारणामुळें यावेळेस महाराज जाऊं शकले नाहींत. यावेळीं बापूरावास महाराजांनीं नित्यपठणार्थ ज्ञानेश्वरीचा प्रसाद दिला, मधुर धर्माचें तत्व निरूपण केलें व श्रौतश्रावक असें त्यांस अभिधान देऊन प्रेमपूर्वक निरोप दिला.

महाराजांच्या आजकालच्या कार्यक्रमांत प्रेमनिकुंज, सुरतरु, व साधुबोध या ग्रंथांचें लेखन मुख्यतः चालत असे. रा० रा० तात्या कविमंडन हे भजन कीर्तनादि समयीं तबला वाजवीत असत. त्यांजपासून महाराज आठ दिवसांत अत्यंत निर्दोष रीतीनें तबला वाजविण्यास शिकले. तें पाहून तात्यानें आश्चर्याचे उद्गार काढले.

आज पावेतों महाराजांच्या कवितांचा एकंदर संग्रह जो मंडळींनीं

लिहून ठेवला होता त्याची विषयवार निवड करण्याचें कामही यावेळीं महाराजांनीं हातीं घेतलें. या कामांत वाचनलेखनादि साह्य मुख्यतः महाराजांच्या नेहमींच्या सहवासांत रहणारे रा० रा० व्यंकटेश नारायण देश- पांडे वरूडकर यांचेंच पहिलेंपासून होतें.

दुसरें, या सुमारास संतलीलामृतांतील सखूचें आख्यान नवीन पद्य- प्रबंधांत होऊं लागलें होतें. महाराजांच्या हातांत कधीं नुसत्या चिपळ्या आहेत, कधीं चिपळया व एकतारा किंवा चिपळया व तंबुरी आहे, मुखां- तून साहजिक पद्यरचना निघत आहे, सन्निध पंडितजी सारखे शीघ्रगती लेखक तत्परतेनें तीं पद्यें लिहून घेत आहेत, जवळ व्यंकटराव विण्याचा तार छेडीत महाराजांची साथ करीत आहेत, क्वचित् व्यंकटराव नसले तरी रंगदेवतेची व्हाल मर्जी कायमच आहे; असा बहुतेक नेहमींचाच आख्यान निर्माणकालचा देखावा असे. कथासंकीर्तनकालीं महाराजांची वाणी तन्मय होऊन तिच्यांतून पद्यप्रवाह अव्याहत चालत असे. "मायबाप बाहिणभाऊ गुरुपति फणिशायी सकला। व्रजवल्लभ भजनाविण अवघ्या सुकला त्या विकला ॥" व "बाप विठोबा माय रखुमाई। भाऊ पुंडलिक बहीण भीमाई" हें या आख्यानाचें मुख्य ध्रुवपद व भजन ठरून गेलें होतें व यांची मधून मधून आवृत्ति होऊन तें संपूर्ण वातावरण भगवत्प्रेमानें भरून जात असे. याशिवाय भजनाचा वगैरे नित्य- क्रम होताच.

एखादे वेळीं समस्यापूर्तीचाही विनोद होत असे. एके दिवशीं महा- राजांनीं मिलिंदाला हाक मारून पुढील दोन समस्या त्याला दिल्याः— १.हरिवांचुनी कोण बरा म्हणवे.२. असूनीं असेंही कुणाला स्मरावें ? यांची पूर्ति त्यानें पुढील प्रमाणें केली:—

मदिरावृत्त— १. रामसदा सुखधाम न सेवुनि कामिनीकाननीं जो विचरे। वेदविहिताचरणा सोडुनी विषयाचरणमाजिं मरे॥ तो यमदंड प्रचंडाचि भोगिळ पात्र न होय हरी कणवे। घडिभर भजनें उद्धरि त्या हरीवांचुनि कोण बरा म्हणवे॥

भुजंगप्र०— २. हरीचिंतनें चित्त ने सद्गतीतें । असें सांगती ते मुनी ब्रह्मवेत्ते । विरक्तीविणें हें कसें होय ठावें । असूनी असेंही कुणाला स्मरावें ? ।। वरील तिसऱ्या चरणांत महाराजांनीं अशी दुरुस्ती केली:—विरक्तीविणें व्यर्थची कां मरावें ?

जवळच्या मंडळींस सुलभ रीतीनें बोलावतां येण्याकरितां यावेळीं महाराजांनीं एक नवीन घांट आणविली व आपण कोणास बोलावीत आहों हें प्रत्येकास समजण्याकरितां पुढील अभंगांत त्याचा नियम ठरविला:—

शूद्राची[1] ती एक ताईच्या त्या दोन । पंडिताच्या तीन चार नाना ॥१॥ मारोतीच्या पांच व्यंकटेश सहा । हरिभाऊला हा सात अंक ॥२॥ आठ रंगुबाई नव नारायण । नसतां यांतून दहा पाटे ॥ ३ ॥ यांत ज्याचें कार्य करील जो जेव्हां । तितुक्याचि तेव्हां होतु पाटे ॥४॥ पाटीमध्यें मात्रा एक अवसान । व्यवस्था ते आन पासेच्याची ॥ ५ ॥ जयाचिये पाटे या मार्जी नसती । सांगावे त्याप्रती पाटे बद्धे ॥ ६ ॥ मात्रानवसानीं कोणाचीही हाका । जाणोनीयां नीका यावें कोणी ॥ ७ ॥ नित्य माझ्यापाशीं रहावें पैं दोघीं । जातां कार्यालागीं लिहावें कीं ॥८॥ कोणी न भेटतां आळंदीवल्लभ । सर्वत्र सुलभ पाचाराया ॥९॥

पुढें विजया १० चा सण आला. या दिवशीं पालखीची मिरवणूक काढून भजन करीत शमीपूजनास जाण्याचा महाराजांचा नियम होता. परंतु प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें पालखी घेऊन लांब जाणें शक्य नव्हतें. म्हणून देवापुढें चिठ्ठी टाकून त्यांत निघाल्याप्रमाणें शमीपूजनाची व्यवस्था घराजवळच करून महाराजांनीं आपला कार्यक्रम पुरा केला. प्रसंगविशेषीं चिठ्ठी टाकून प्रश्नाचा निकाल करण्याचा जुना परिपाठ महाराजांनीं अलीकडेसच सुरू केला होता व ही प्राचीन रूढी सात्विक असून देवता-

---

१ शौच्याचे वेळेस माती पाणी वगैरे देण्याकरितां शूद्र जातीचा एक मनुष्य महाराज नेहमीं जवळ बाळगीत असत.

देशसूचक आहे असें त्यांचें म्हणणें होतें. पुढें याविषयीं गरुडपुराणांत आधारही सांपडला.

वरुडकर वेद० शा० सं० गडीभटजी शास्त्री उमरावती येथील वेद-शाळेचे अध्यापक हे आलीकडे मधून मधून महाराजांकडे येत असत. वेदान्ताचें कांहीं अध्ययन महाराजांजवळ करावें अशी त्यांची इच्छा होती व त्याप्रमाणें महाराजांनीं त्यांस पंचदशीचें निरूपण सुरू केलें.

संप्रदायशुद्ध ज्ञानमार्गापासून आपल्या समाजाला भ्रष्ट करून त्यांचा बुद्धिभ्रंश करण्याला पारकीय शिक्षणपद्धतीचीं जीं कित्येक राजस फळें कारण झालीं त्यांतलेंच एक ' विचारस्वातंत्र्य ' हें होय. या विचारस्वातं-त्र्यामुळें ' क्षेपकवादा ' सारख्या दोषांचा प्रभाव धर्माचार्यांपर्यंत कसा पोंहचला व या स्वतंत्र विचाररूपी दूषणालाच भूषण मानून आलीकडील नवशिक्षित धर्मोपदेशक मंडळी धर्माची कशी दुर्दशा करीत आहेत या-संबंधीं महाराजांचे विचार मागें दिलेच आहेत. जुन्या शास्त्रीलोकांवरही या विचारस्वातंत्र्याचा पगडा बसून श्रीज्ञानेश्वर महाराजांसारख्या ईश्वरी अवतारांस ते आपल्या पंक्तींत कसे खेंचू पाहतात याचें आणखी एक उदाहरण महाराजांनीं यावेळीं बाहेर आणलें. तें असें:—वेदशास्त्रसंपन्न बाळशास्त्री हुपरीकर यांनीं विद्यारण्य व ज्ञानेश्वर यांच्या वेदान्तावरील मताचें तात्पर्य " या आपल्या निबधांत म्हटलें आहे कीं ज्ञानेश्वर महाराज मायेचा अंगिकार करीत नाहींत म्हणून विद्यारण्य व शंकराचार्य यांच्या मताहून ज्ञानेश्वर महाराजांचें वेदान्तमत स्वतंत्र आहे.

यावर ता० १५ आक्टोबर १९१४ च्या मुमुक्षूंत महाराजांनीं " आ-चार्य व ज्ञानेश्वर " हा लेख लिहून त्यांत " मायेचा अंगिकार न करून नुसत्या स्फुरण पक्षाचाच तात अंगिकार करतात असें मानलें तर श्रीकांत-मताचे व वैमर्षण मताचे तात आहेत असें जबरदस्तीनें म्हणावें लागतें. आणि हीं दोन्ही मतें तर प्रत्यक्ष वेदविरुद्ध आहेत. जेथें तातांनीं अज्ञा-

नाचा अंगिकार केला नाहीं त्या ठिकाणीं तो शंकराचार्य व विद्यारण्यही करीत नाहींत असें विवरणादि पुराव्यानिशीं सिद्ध करण्यास मी तयार आहे. म्हणून शंकराचार्यमतांत व तातमतांत भेद नाहीं असें मी म्हणतो.'' असें आपलें म्हणणें प्रसिद्ध केलें.

आपल्या जातीच्या मराठे मंडळीबद्दल पाहिलेपासून महाराजांचा अतोनात प्रेम होता, त्यांच्यावर वेळोवेळीं त्यांनीं अनंत उपकार केले, संस्कृत भाषेचें शिक्षण देऊन त्यांस सुधारण्याची खटपट केली, ब्राह्मणद्वेषाच्या पातकापासून त्यांस निवृत्त करण्याकरितां लेख लिहून उपदेश केला वगैरे वृत्तांत मागें आलाच आहे. महाराजांच्या या सर्व प्रयत्नांचा इष्ट परिणाम तर झाला नाहींच परंतु त्यांच्या लेखांचा व त्यांनीं टाकलेल्या प्रश्नांचा नुसता कोणी विचारही केला नाहीं. परंतु उलट, महाराज ब्राह्मणांस अनुकूल आहेत अशा समजुतीनें ही मंडळी त्यांचें धर्मप्रसाराचें कार्यही हाणून पाडण्याच्या उद्योगास लागली व ''याला ब्राह्मणांनीं शिकवून ठेविलें आहे'' या आपल्या पूर्वप्रतिज्ञेचीच नवीन सुधारलेली आवृत्ति काढून महाराजांविषयीं नानाप्रकारचे गैरसमज लोकांत पसरूं लागली. त्याचा वेळींच प्रतिकार करणें अवश्य झाल्यामुळें ता० १९ नोव्हेंबर १९१४ च्या मुमुक्षूंत ''माझ्यासंबंधीं गैरसमजुती व त्यांचा प्रतिकार'' हा लेख महाराजांनीं प्रसिद्ध केला. तो जसाचा तसाच येथें देतो:—

रा० रा० मुमुक्षुकर्ते यांस:—

स्वतःची महती गाणें हें प्राचीन अर्वाचीन सज्जन मंडळींत वाईट गणलें गेलें आहे. 'परैः प्रोक्ता गुणा यस्य निर्गुणोऽपि गुणी भवेत् । इंद्रोऽपि लघुतां याति स्वयं प्रख्यापितैर्गुणैः ॥' असें एक सुभाषितही प्रसिद्ध आहे. परंतु अधर्माला प्रतिबंध करण्याकरितां स्वतःची महती देखील गावी असें वसिष्ठ म्हणतात. या वचनाचा आधार धरून एकतीस वर्षें न काढलेले उद्गार कांहीं परिस्थितीमुळें काढणें भाग पडत आहे. त्याबद्दल वैदिक संतमंडळीच्या चरणाजवळ मी क्षमा मागून घेतों. कांहीं ब्राह्मण व्यक्ति माझ्याविषयीं जरी हलकें मन करीत असल्या तरी त्यांनीं माझ्याविषयीं लोकांत फारसें वाईट मत फैलविलें

नाहीं. परंतु ब्राह्मण होण्याकरितां हपापलेले ब्राह्मणेतर माझ्याविषयीं गैर समजुती लोकांत उत्पन्न करीत आहेत. त्यांत सर्व मिळून एकत्र जेवावें असें म्हणणारे कांहीं वारकरीही आहेत. ह्या गैरसमजुती कसकशा फैलविल्या आहेत त्या क्रमानें देऊन त्यांचें यथामति उत्तर देतों.

पहिली गैरसमजूत—गुलाबराव महाराज देखील स्वतःला कागदपत्रीं क्षत्रिय लिहितात. प्रतिकार—आमच्या कांहीं मंडळीनें क्षत्रिय लिहिण्याचा प्रचार नवीन पाडला आहे. यापूर्वी आम्ही आपल्यास तिरोळे कुणबी लिहीत होतों. तें कांहीं असलें तरी स्वतःला मी क्षत्रिय लिहित नाहीं, शूद्र लिहितों. घटकाभर खोटी कल्पना करून मी द्विज आहे असें जरी घेऊन चाललों तरी अनंत कालापासून संस्कार विच्छिन्न झाल्यामुळें कलियुगाच्या शेवटीं होणाऱ्या मरु व देवापी या दोन महात्म्यांशिवाय मला क्षत्रियत्व देणें दुसऱ्याच्या हातीं नाहीं हें वैदिक धर्मावर विश्वास असल्यामुळें मला ठाऊक आहे. बरें वैदिक धर्मावर माझा विश्वासच नसला तर मग मला द्विजत्वच कशाला हवें आहे ? काय इतर लोकांना कलाकौशल्य साधतां येत नाहीं ? दुसरी गैरसमजूत—ब्राह्मण स्वतः ग्रंथ करितात व त्यांवर गुलाबराव महाराजांचें नांव घालतात. ब्राह्मणांनीं गुलाबरावांस मुद्दाम पुढें केलें आहे. प्रतिकार—ही गोष्ट अत्यंत खोटी आहे. या गोष्टीचे प्रत्यंतर दाखविण्याकरितां मी केव्हाही मोठ्या समाजांत ग्रंथ रचण्यास तयार आहे. शिवाय मजजवळ असलेल्या मंडळीलाही माझे सर्व ग्रंथ सध्यां समजत नाहींत शिवाय मी स्वतः ग्रंथ रचतो कीं नाहीं हे प्रत्यक्ष येऊन वाटेल त्याने पहावे. नाहींतर पुढे गुलाबराव आमच्या जातीचेच होते, त्यांना पुढे करून ब्राह्मणांनीं कांहींतरी ग्रंथ रचलेत असा कुत्सित वाद गुप्तपणें लोकांनीं सुरू करण्याचा संभव आहे. तिसरी गैरसमजूत—गुलाबरावाला मंडळी ग्रंथ वाचून दाखवितात व नंतर इकडचे तिकडचे ते लिहितात. प्रतिकार—या म्हणण्यावर प्रश्न असा आहे कीं मी जे ग्रंथ लिहितो ते समजून लिहितो कीं न समजून लिहितो ? पहिल्या पक्षीं चित्सुखीसारखे ग्रंथ समजाऊन देणारा मजजवळ कोण आहे याचा शोध अवश्य करावा. अथवा चित्सुखीसारख्या ग्रंथांतील अक्षरें वाचून त्यांतील प्रमेयें तरी या मंडळींतील कोणी लिहून दाखवावीं. उमरावतीस

येण्यापूर्वी हे ग्रंथ मजजवळ नव्हते हे सर्व मंडळीस ठाऊकच आहे. मागाहून उमरावतीस येऊन मला १०--११ वर्षे झालीं. त्यापूर्वी संस्कृत व्याकरण शिकलेल्या वाचकांशीं माझा संबंधच पडला नाहीं. आणि उमरावतीस येऊन जरी हे ग्रंथ मी मागविले तरी त्यांचा समजदार वाचक मला कोणीच मिळाला नाहीं. या माझ्या म्हणण्याची सत्यता पाहण्याकरितां कोणाही जवळ कोणीही शोध करावा याबद्दल मी सरसकट परवानगी देतो. या चित्सुखीसारख्या ग्रंथांचे उतारे माझ्या ग्रंथांत समीक्षापूर्वक आले आहेत. अनार्य भाषेंतील ग्रंथ मात्र मी दुसऱ्याकडून वाचून घेतों हें खरें आहे. वेदान्त ग्रंथही मीं दुसऱ्याकडून अलीकडे वाचून घेतों पण त्यांचें पूर्वप्रमाण मीच सांगत असतों.यावरून मी कोणी अलौकिक आहे असे भासविण्याचा माझा प्रयत्न नाहीं. तर ही वस्तुस्थिती खरी आहे कीं नाहीं हे माझ्या जातिबांधवानें येऊन पहावे. चवथी गैरसमजूत—गुलाबराव महाराज शौचाच्या वेळेस ग्रंथ वाचतात. त्यांनीं कांहींतरी यक्षिणीसाधन केले म्हणूनच त्यांना इतका शौचाला वेळ लागतो. प्रतिकार—चार वर्षांपूर्वी मला शौच्यास इतका वेळ लागत नसे. हे सर्व मंडळीस ठाऊक आहे. पुण्याकडील मंडळीशीं देखील माझा पहिला परिचय झाला तेव्हां इतका वेळ लागत नव्हता. हा वेळ मला रोगामुळें लागतो. शिवाय शौचेच्या वेळीं जप करून प्रसन्न होणाऱ्या देवता वेदान्तज्ञान सांगूं शकतात असें उपलब्ध तंत्रवाक्यानें जर हे आक्षेपक सिद्ध करतील तर बरें होईल. कारण अशा क्षुद्र देवतांचीं साधनें तंत्रांतच असावयाचीं. शौचेला फार वेळ लागतो म्हणून करमणुकीकरतां मी आडून दुसऱ्यानें वाचलेले ग्रंथ ऐकतों हें खरें आहे. परंतु ते ग्रंथ, शौच्याला पाणी घेऊन गेलेंच पाहिजे असा नियम जी भाषा सांगत नाहीं त्या भाषेचेच असतात. आतां शौचाचा रोग असल्यामुळें एनिमा ( Ænima ) घेण्याकरितां पाणी मागण्यासाठीं मला कधीं कधीं तोंडानें हांका मारणें भाग पडतें. माझा हा रोग कोणी बसवून देईल तर हें पाप मी पुढें करणार नाहीं हें शपथ घेऊन सांगतों. पांचवी गैरसमजूत—गुलाबराव महाराज ब्रह्मचर्याला पुष्टि देत नाहींत.

प्रतिकार—ही गोष्ट अत्यंत खोटी आहे. माझें मत यासंबंधीं इतकेंच आहे

कीं हिमालयावर सतत समाधि लावून बसल्याशिवाय अधुकल्यामधुकल्या खाऊन रामराम जपणाऱ्या माझ्यासारख्याला कडक ब्रह्मचर्य साधत नाहीं, मग तें झांकून नेण्याकरितां भलते प्रयत्न करण्यापेक्षां विवाह करणेंच उत्तम असें मी स्पष्ट ह्मणतों. ह्मातारा, रोगी, मध्यम प्रकृति, आणि एकाही दिवसापुरतें खावथास नाहीं असा दरिद्री हे चौघे वर्ज्य करून बाकी राहिलेल्या सर्वांनीं विवाहच करावा असें मी स्पष्ट लिहून ठेवलें आहे. ब्रह्मचर्य पाळावयाचेंच असेल तर दोघांनीं मिळून पाळावें. पण विवाहावांचून राहूं नये. साधु होऊन उपव्याप करणें मला पसंत नाहीं. आतां ब्रह्मचर्याच्या दोन परीक्षा. पहिली बाह्य आहे ती अशी—गण्यरज्जु कंठापासून स्तनापर्यंत घेऊन नंतर मस्तकावर धरावा. त्या रज्जूंत बालकाच्या मस्तकाप्रमाणें मस्तक आलें म्हणजे ब्रह्मचर्य आहे असें समजावें. पण या परीक्षेला अपवाद असण्याचा संभव आहे. दुसरी परीक्षा अशी कीं, साधुपुरुषाला एक दिवसभर खुर्चीसारख्या उच्च आसनावर बसलेलें ठेवून अन्नपाणी न देतां त्याचे स्वर पहावें. स्वर तिथीवार व घटकेप्रमाणें बरोबर पालटत गेले पाहिजेत. आणि ज्या स्वरांत जें तत्व: चालतें तें त्या त्या वेळीं त्याच स्वरांत बरोबर चाललें पाहिजे म्हणजे ब्रह्मचर्य आहे असें समजावें. तत्व पाहणें तें योग येत असेल तर आपल्या तत्वाशीं मिळवून पाहावें आणि योग येत नसेल तर काशाचा आरसा समोर धरून पहावें म्हणजे रंगाचीं प्रतिबिंबें स्पष्ट कळतात. तसेंच त्याचें वजन पाण्यावर कागद टाकून पहावें. कातणीचें घर मिळाल्यास चांगलें पाहतां येतें. पुन्हां मी प्रबळ निग्रह करीत असलों तरीही मला मानसिक विकार कधीं कधीं उत्पन्न होतात हें दौर्बल्य माझ्यामध्यें आहे. म्हणूनही मी आपल्या ग्रंथांत असें लिहिलें. योगाभ्यासाहून निराळ्या वेळीं माझें हें क्षणिक मानसिक दौर्बल्य दूर करण्याचा यत्न जर कोणी सांगेल तर मी त्याला ताताप्रमाणें समजून त्याच्या म्हणण्यानें आपल्या ग्रंथांतून हा भाग काढून टाकीन.

६ वी गैरसमजूत—बोवा शूद्र म्हणवितात तर बोवाच्या मुलाला मुलगी मिळणार नाहीं.

प्रतिकार—मिळणार नाहीं तर माझ्या वंशाचें जसें व्हावयाचें असेल तसें

होईल. परिस्थितीनें बलेंकरून मला अधर्मांत ओढून नेलें तरी मी तोंडानें दुसऱ्याला धर्म सुचवून मरेन हा माझा निश्चय आहे.

हा लेख कृपाकरून लवकर छापावा. याची सर्व जबाबदारी मजवर आहे.

आपला.

ता० १।११।१४ गुलाबराव गोंडुजी मोहोड मुकदम माधान हल्लीं मुक्काम उमरावती.

महाराजांवर निरंतर श्रद्धाप्रेम ठेवून वागणारी जी थोडी मंडळी त्यांच्याजवळ होती त्यांच्या अधिकारानुरूप महाराज त्यांस कधीं कधीं शास्त्रविषयक प्रश्न विचारून विचार करावयास लावीत व स्वतःच्या बुद्धीचा उपयोग करून प्रश्नाचें उत्तर ज्याचें त्यानेंच शोधून काढावें अशी त्यांस फार इच्छा असे. असा एक प्रश्न या वेळीं महाराजांनीं रा० नारायणराव पंडित यांस विचारला होता. तो असाः—"अस्वर्ग्यं लोकविद्विष्टं धर्म्यमप्याचरेन्नतु ।" हें मनुवचन आहे. यांत सांगितल्याप्रमाणें अस्वर्ग्य व लोकाविद्विष्ट असें धर्म्याचरण कसें असू शकतें ? कदाचित् लोकविद्विष्ट धर्म्याचरण असणें संभवेल पण अस्वर्ग्य असें धर्म्याचरण कसें असू शकतें ? कारण 'स्वर्गकामोयजेत्' अशा प्रकारच्या श्रुती आहेत व सर्व धर्माचरणाचें फल वेदांत स्वर्गप्राप्ति सांगितलें आहे. मग अस्वर्ग्य असें धर्म्याचरण कसें संभवते ? या प्रश्नाचा पंडितजींनीं पुष्कळ विचार करून मग एके दिवशीं जेवणाचें वेळीं मिलिंदाजवळ त्यांनीं तो प्रश्न चर्चेला काढला. मिलिंद अकलेचा खंदकच पडला. त्यानें त्या प्रश्नावर मनसोक्त चर्चा करून पाहिली. शेवटीं एके दिवशीं महाराजांनींच पंडितला पुन्हां त्या प्रश्नाचें स्मरण दिलें. मिलिंद ते वेळीं जवळच होता. त्यानें लडिवाळपणानें महाराजांबरोबरही त्या प्रश्नावर बरीच चर्चा केली. महाराजांनींही अंशतः त्याच्या म्हणण्याचा स्वीकार केला. परंतु शास्त्रीयरीत्या हें कांहीं अगदींच बरोबर उत्तर नाहीं असें ते म्हणाले. शेवटीं त्यांनींच मग

त्या प्रश्नाचें उत्तर सांगितलें. ते म्हणाले कीं हें वचन पूर्तकर्माविषयीं आहे. उदा० विहीर खणणें हें पूर्तकर्म आहे. तें धर्म्य आहे. धर्म्य म्हणजे वेदानें सांगितलेलें. परंतु चोरांच्या वाटेवर एकानें विहीर खणली व ही चोरवाट आहे हें त्याला ठाऊक आहे. हें कर्म लोकविद्विष्ट होईल व त्या पाण्यानें चोरांची तृषा हरण होऊन ते लोकांना उपद्रव देतील. म्हणून त्या विहीर खणणारास स्वर्ग मिळणार नाहीं. अशा रीतीनें तें कर्म अस्वर्ग्य व लोकविद्विष्ट असून धर्म्य होऊं शकेल. दुसरें उदाहरण. खरें बोलणाऱ्या एका तपस्व्यानें कसायास गाईचा पत्ता सांगितला व कसायानें त्या गाईस मारिलें, त्यामुळें त्या तपस्व्याला दोष घडला. हें प्रसिद्धच आहे. यावरून वेदांत सांगितलेल्या गोष्टी करण्यांत तारतम्य पाहिजे. तें सत्संगानेंच कळतें. " धर्मस्य तत्वं निहितं गुहायाम्. "

अलीकडे आणखी एक नवीन व्यासंग महाराजांनीं सुरू केला होता व तो गायन शिकणें हा होय. उमरावती येथील प्रसिद्ध गवई रा० रा० नामदेवबोवा यांस कांहीं दरमाहा मुकरर करून त्यांजपासून रोज तास दोन तास महाराज गायन शिकत असत. याला एक कारण घडलें तें असें कीं या सुमारास मुंबई येथील श्रीयुत भातखंडे यांचा संगीत शास्त्रावर " हिंदुस्थानी संगीत पद्धति " नांवाचा ग्रंथ दोन भागांत प्रसिद्ध झाला होता व त्यासंबंधानें केसरी वर्तमानपत्रांत कांहीं पत्रव्यवहार चालला होता. हे दोन्ही भाग महाराजांनीं बोलावून वाचले व त्यांतील कांहीं विधानांसंबंधानें भातखंडे यांजबरोबर पत्रव्यवहार करून त्यांस कांहीं प्रश्न विचारले आहेत. एका पत्रांत महाराज म्हणतातः—

आपली पद्धती मी दोन तीन वेळ वाचली आहे व पुनः आतां वाचीत आहे. पत्रांत आपण अंधश्रद्धा सोडली पाहिजे असें म्हटलें आहे तें मला मान्य आहे. पण जशी आपल्याइकडे श्रुति मोजण्याची अडचण आहे, तशीच तिकडे नादकल्लोळ ( Vibrations ) मोजण्याचीही अडचण भासत चालली आहे. जयदेवांनीं आपल्या ' मणिप्रकाशिकेंत ' " कंदबगोलकन्यायेन शब्दोत्पत्त्यंगिकारेपि नियत गुरुस्थानमपेक्षत एव । अन्यथा अनियतकंपनात् विषम नादोत्पत्तिः।

नच संख्यानियत्यैव तन्नैम्यत्यम् षडजादिस्थान अंशसंभवात् इति चिंत्यम् । " या शंकेचा खुलासा आपल्या इकडील ग्रंथांत फारसा झालेला दिसत नाहीं. तसा तो पाश्चात्य ग्रंथांतून तरी व्हावा म्हणून पुष्कळ पुस्तकें वाचलीं. मणिप्रकाशिक ग्रंथ आपण पाहिलाच असेल. कारण आपण पुष्कळशा पुस्तकांचा शोध केला आहे [असें पद्धतीवरून दिसतें. मणिप्रकाशिकेंचें सध्यां शब्दप्रकरणच मजजवळ आहे. त्याचीं आणखी प्रकरणें आपणांस ठाऊक आहेत काय? पाश्चात्य नादकल्लोळां (Vibrations) संबंधीं Scientific American मध्यें आलेलें Tindall टिंडालचे उद्गार मला स्मरतात. त्यांत तो म्हणतो Photo वगैरे वरून जरी आपल्याला (Vibrations) कल्लोळ मोजतां यतात असें आज वाटत असलें तरी ही बाब दिवसानुदिवस कठीण होत जात आहे. कारण ( Atomic theory ) अणूपपत्तीमध्यें अणू केवढा असावा हा नियम ठरलेला नाहीं. रासायनिक मिश्रण ( chemical mixture ) करतांना पहिले भाग तीन ३ असले तर त्याचा एकजीव होऊन एका भागाची जागा सुटून दोन भागाचीच जागा व्यापतो. म्हणून परमाणूंचा आकार नियत घेतला पाहिजे असें आपल्या बुद्धीस वाटतें. पण केवढाही लहान आकार घेतला तरी त्याचे तुकडे झालेच पाहिजेत हा जो मनांत संशय येतो त्याला उत्तर ( Atomic Theory ) अॅटामिकथियरीमध्यें सांपडत नाहीं. पुन्हां अणूचा आकार नियत मानला तर घनत्वाचा ( Density ) प्रश्न येऊन पडतो. कारण परमाणु अधिक जवळ येणें एवढें जर घनत्वाचें लक्षण केलें तर जितके परमाणु एका पदार्थांत अधिक असतील तितकें त्याचें गुरुत्व अधिक असा सहजच नियम निघतो. पण तसें मानलें तर ( Hydrogen )हैड्रोजनच्या अपेक्षेनें Oxygen (ऑक्सिजन) च्या एका परमाणूचें वजन १६ पट कसें? या प्रश्नाचा समाधानकारक निकाल लागत नाहीं. बरें, पदार्थाला स्वतंत्र वजन आहे असें मानलें तर मोठ्या पदार्थीनें लहान पदार्थास ओढणें हा गुरुत्वाकर्षणाचा नियम बराच ढिला पडतो व त्यामुळें matter आणि force हे दोन पदार्थ गृहीत धरले म्हणणे पुढें आम्हांस श्रद्धा ठेवण्याचें काम पडतच नाहीं असा बाणा बाळगणाऱ्या आम्हांला

खालीं मान घालणें भाग पडतें. कारण या गुरुत्वनियमाच्या घोटाळ्यावरून कांहीं नियमावर देखील आम्हांला श्रद्धाच ठेवावी लागते. ही अणूपपत्तीची गोष्ट झाली.

आतां वैद्युदुपपत्ति ( electron theory ) कडे पाहिलें तर त्याच्या योगानें प्रकाशाचा प्रश्न जरी सुटल्यासारखा वाटत आहे तरी त्याची कठीणता जितकीची तितकीच कायम आहे. कारण electrons हे सर्व पदार्थांत सजातीय आहेत त्याचप्रमाणें कंपन होण्याला विरलपणा अवश्य आहे. घनपणांत तें होत नाहीं. जितका घनपणा अधिक तितकें कंपन कमी. पुनः कंपन म्हणजे एका परमाणूचें दुसऱ्या परमाणूस धक्का देणें होय. शून्य जागेंत कांहीं कंपन होत नाहीं. म्हणूनच नुसत्या आकाशांतून ( Space ) प्रकाश किंवा कांहीं जाऊं शकत नाहीं असें आपण म्हणतों. आणि याचमुळें प्रकाशासाठीं आपण ईथरचें कंपन मानतों. पण एका परमाणूनें दुसऱ्या परमाणूंस धक्का देतांना मधल्या Space मधून तें कंपन जातें असें म्हणतां येत नाहीं काय? तसें मानलें तर ईथर All pervading कसें? बरें, सर्व ईथरचे परमाणू एक होतात असें म्हटलें तर त्यांत कंपन संभवणार कसें? ईथरच्या विभागांचा जर नियत आकार मानला नाहीं तर नादाचे किंवा प्रकाशाचे अमुक इतकेच Vibrations होतात हा नियम कसा घालतां येईल? Tindall च्या दोन चार वाक्यांचा भावार्थ मला विस्तृत करून सांगतां आला तसा लिहिला आहे; आपल्याइकडे परमाणूला नियत आकार न मानल्यास सर्षपमेरूची तुल्यतापत्ति होते असें न्यायशास्त्रांत म्हटलें आहे. आणि शेवटीं पौर्वात्य नैय्यायिकांनीं किंवा पाश्चात्य Scientist लोकांनीं कितीही विचार केला तरी ही बाब अधिकाधिक श्रद्धेचीच होत गेली असें मला वाटतें. बरें, वाद्याच्या षड्जादिकांचें Vibrations नियमित लिहून ठेवले आहेत खरे, पण तेवढ्यानें वाद्यांतील ऋषभाला जर आपण षड्ज कल्पिला तर त्याचेही तितकेच Vibrations होतील कीं काय? तसें झाल्यास ध्वनिभेद दृष्टीस कां पडतो? आणि तसा ध्वनिभेद दिसण्यांत कांहीं नुकसान नाहीं असें मानलें तर ही आपत्ति प्रकाशावरही येणार नाहीं काय? तेव्हां आपल्याकडच्या श्रुति

मोजण्याची जी अडचण पडते तशीच कांहींअंशीं पाश्चात्य पद्धतींतही पडते असें मला वाटतें. म्हणजे मणिप्रकाशिकेंतील शंकेचा खुलासा तिकडेही चांगला होत नाहीं.

रागानें पाळणा हालणें वगैरे कविकल्पना आहे असें आपण पद्धतींत म्हटलें आहे तें मलाही मान्य आहे. परंतु Theosophical मासिक पुस्तकांत गाण्यानें आग लागल्याची उदाहरणें दिलीं आहेत तीं खरीं मानावीं कीं नाहीं? शिवाय गाण्यानें व वाद्यध्वनि श्रवणानें रोग दूर होतात अशा प्रकारचा तिकडील डाक्तरांचा शोध आहे व जर्मनींत क्षय न होण्याचें कारण गायनवादनाचा विशेष प्रचार हें आहे असें दिलें आहे, याविषयीं बालबोध नांवाच्या मासिक पुस्तकांत नुकतेंच प्रसिद्ध झालें आहे. आपल्या मारुतसंहितेंतही गाण्यानें रोग दूर करण्याचा विधि सांगितला आहे. तो ग्रंथ आपण पाहिला असेलच. त्यांत व यांत कांहीं साम्य आहे काय? तें अन्यथा असेल काय? मार्गी संगीतांत अदृष्टजनक समय-महत्व मानीत होते पण तें देशी संगीतांतही मानलें पाहिजे. त्याला शारीरशास्त्रीय ( Physiologically ) किंवा मानसशास्त्रीय ( Psychologically ) पुरावा मिळूं शकतो असें J. C. Bose यांच्या कांहीं प्रयोगांवरून ठरूं शकत नाहीं काय? आपणही पद्धतींत समय-महत्व मानलें आहे. आपल्या लेखांतील मनाचा मोकळेपणा पाहून स्वराच्या या अडचणीं संबंधांत खुलासा करण्याविषयीं विनंति करीत आहे. पत्रांत माझे उद्गार अमळ कडक झाले असल्यास त्याची मी क्षमा मागतो. कारण पुष्कळ पंडितांना मी हे प्रश्न विचारले व त्यांनीं माझ्या प्रश्नाची उडवाउडवीच केली. तसें आपण करणार नाहीं अशी आशा आहे कारण आपणाला सुशिक्षितांची आवडी आहे. माझ्या आणखी पुष्कळ शंका आहेत. कांहीं रागमिश्रणें कशीं करावीं याबद्दलही आहेत व कांहीं रागाच्या रंजकत्वाविषयीं Psychologically किंवा Physiologically पुरावा कोणता व तो केवळ material आहे किंवा Immaterial psychological आहे याहीविषयीं बऱ्याच शंका आहेत. परंतु घाईनें पत्र लिहिल्यामुळें आणि मी आंधळा असून मजजवळ चांगला इंग्रजी लेखक कोणी नसल्यामुळें इंग्रजीचें मराठी भाषांतर

लेखकाला सांगतांना त्रास बराच पडला. आणि पत्राचा विस्तार बराच झाल्यास आपला अमोल वेळही घेतला जाईल असें वाटून पत्र एवढेंच पुरें केलें आहे. औमापत्य ग्रंथ कोठें मिळतो आपणास ठाऊक आहे काय? कृपाकरून उत्तर लवकर पाठविल्यास उपकार होतील. रत्नाकराच्या ग्राममूर्च्छनेंविषयीं बऱ्याच शंका आहेत. त्यांचा अझून खुलासा झाला नाहीं. पद्धतींत आपणाला एका पंडितानें पुष्कळ द्रव्य मागितलें होतें असें लिहिलें आहे. तर त्यांचें नांव कळवाल काय? कारण वर्गणी करून तितकी रकम जमवून देऊन तो खुलासा करून घेण्याची माझी इच्छा आहे.

या पत्राचें श्रीयुत भातखंडे यांजकडून जें उत्तर आलें त्यांतलि मुख्य मुद्दे असे:—

आपण वर्णिलेला ( मणिप्रकाशिका ) जयदेवाचा ग्रंथ मी पाहिलेला नाहीं. नादशास्त्रावर देशी व पाश्चिमात्य ग्रंथ आपण बरेच वाचले आहेत व Chemsitry व physics शास्त्रांच्या आधारानें आपण निरनिराळ्या पंडितांशीं चर्चा करून समाधान न झाल्यामुळें निराश झालां आहां हें ऐकून फारसें नवल वाटलें नाहीं. मी स्वतः त्या शास्त्रांत निपुण नसल्यामुळें त्या दिशेनें चर्चा पद्धतींत करण्याचें मी सोडून दिलें आहे. त्या विषयावर एखादा सुबोध निबंध लिहून आपण मजकडे पाठविल्यास पद्धतीच्या पुढल्या भागांत आपल्या नांवानें दाखल करण्यास मला हरकत दिसत नाहीं. एक Appendix रूपानें घालतां येईल. पद्धतींत फक्त आज हिंदुस्थानी संगीत ( राग ) कसें आहे, तें माझ्या शिक्षणाप्रमाणें व अनुभवाप्रमाणें मी लिहिण्याचें योजिलें आहे. + + हल्लींच्या उपलब्ध संस्कृत ग्रंथांत आपल्या प्रत्यक्ष संगीताला उपयोगी असा कोणता ग्रंथ आपल्या वाचण्यांत आला तेंही मला कळविल्यास मी तो मिळविण्याचा प्रयत्न करीन. रत्नाकराचा अभ्यास आपण केला असल्यास त्यांतील रागासंबंधीं कांहीं माहिती मला आपण लिहून पाठविल्यास तीही मी आदरानें स्वीकारीन. आपले प्राचीन ग्रंथ जितके समंजस व सुबोध व प्रत्यक्ष उपयोगी होतील तितके ते करण्याकडे माझा सारा प्रयत्न राहील हें निराळें लिहीत नाहीं. नुसतें प्राचीन वैभवाचे गुणानुवादांत आतां आपल्या समाजाला कौतुक वाटणार नाहीं असें आपलेंही मत

असेलच. हा काल असा आहे कीं ज्याला जें व जितकें ज्ञान उपयोगी झालें असेल तें त्यानें प्रामाणिकपणें लिहून ठेवावें. मला वाटतें या संगीतासारख्या प्रत्यक्षोपजीवी विषयांत एकमेकाशीं शुष्क चर्चा करण्यांत विशेषसा अर्थ दिसत नाहीं. Time, space, Ether, Atomic theory, physiology psychology, electricity यांच्या theories वाचून, समजून त्यांचा प्रत्यक्ष उपयोग आपल्या संस्कृत ग्रंथांच्या वाक्यांनीं उत्तम करून दाखविणारे समाजांत मोठा मान पावतील हें कोणीही म्हणेल पण तसे लोक आपले येथें अजून उत्पन्न होऊं लागले नाहींत असा माझा समज आहे.

आपण आपल्या २२ श्रुती कायम केल्या असल्यास त्या कोणत्या ग्रंथांच्या आधारानें करूं शकलां व त्यांच्या योगानें कोणत्या प्राचीन ग्रंथरागांचीं स्वरूपें समंजस झालीं अशी माहिती मला पद्धतींत दाखल करण्यास उपयोगी होईल. पद्धतींत ज्या ग्रंथांचें उतारे मी केले आहेत त्याहून निराळे ग्रंथ जे आपण मिळवून वाचले असतील त्यांचीं नांवेंही मला कळविल्यास मी आभार मानीन. पद्धतींत Vibrations संबंधीं कांहीं म्हटलें आहे त्याचें कारण इतकेंच आहे कीं, आजकाल पाश्चिमात्य लोकांचे कांहीं सिद्धांत आपल्या संस्कृत ग्रंथांवर लादण्याचें प्रयत्न करण्यांत आलेले मला दिसले. + + + तसे सिद्धांत संस्कृत ग्रंथांवर उगीच लादूं नये व नवीन योजनेला नवीन म्हणण्यास हरकत नाहीं इतकेंच सुचविलें आहे. + +.

माझी विनंती आपणास इतकीच आहे कीं, मोठाल्या गहन विषयांत मला व्यर्थ प्रश्न वगैरे न विचारतां, तसल्या बाबतींवर आपले स्वतःचे विचार आपण स्वतंत्र जाहीर केल्यास अथवा ते जाहीर करण्यास मला परवानगी दिल्यास आपण संगीताची योग्य सेवा केल्यासारखें होईल. + + रत्नाकराच्या ग्राम-मूर्च्छनांवर Mr. Clements I. C. S. यांनीं इंग्रजींत ग्रंथ लिहिला आहे. तो आपण एकदां पाहून जावें. इ० इ०

हिंदुस्थानी संगीत पद्धति वाचतांना महाराजांना त्यांत लौकिक व बौद्ध अनुभवाचेंच बहुतेक प्राधान्य दिसून येऊन आपल्या प्राचीन ऋषीमुनी-

विषयीं पुष्कळ अनावश्यक व अश्रद्धामूलक टीका केलेली दिसून आली. तिचें खंडण करणें इष्ट वाटल्यामुळें महाराजांनीं नामदेवबोवा जवळून उत्तर हिंदुस्थानांत प्रचलित असलेल्या गायनपद्धतीची प्रथम माहिती करून घेतली व आपल्याकडील आर्यसंगीतपद्धतीशीं तिचा कसा मेळ आहे याविषयीं विचार करून ' संगीतदर्पण ' नांवाचा ओवीबद्ध ग्रंथ लिहिण्यास आरंभ केला. परंतु तो पुरा झाला नाहीं. आपल्या " चातुर्यचंद्रोदय " ग्रंथांतही महाराजांनीं या विषयावर कांहीं विचार प्रगट केले आहेत. ते संगीतशास्त्रज्ञांस विशेष चिंत्य आहेत. त्यांतले कांहीं येथें उतरून घेतों:—" आमच्या संगीताला नांवें ठेवणारे आम्हीच असून आमचे ऋषी आम्हांलाच श्रेष्ठ वाटत नाहींत. दुर्दैव आमचें. × × मार्गी संगीतांत स्वाभाविक रक्ति असून देशी संगीतांतील रक्ति कृत्रिम आहे. आणि नुसत्या गणितजन्य खड्या स्वरांत रक्तिच नाहीं असें माझें मत आहे. शिवाय कृत्रिम पाकाचा इष्टानिष्ट शरीरावर व मनावर परिणाम होतो तसा तो स्वरसमुदायाचाही झालाच पाहिजे. म्हणूनच गाण्यानें रोग दूर होतात, मुलाला झोंप येते, गाण्यानें जरा लवकर येत नाहीं हें आमच्या वायुपुराणांत सांगितलें आहे. आणि जर्मनींत गाण्यानें क्षय होत नाहीं व गाण्यानेंच रोग दूर होतात हे पाश्चात्य पंडितही कबूल करूं लागले आहेत. European संगीतापेक्षां हिंदुसंगीतच स्वाभाविक आहे असें पाश्चात्य पंडित ह्मणतात. हा लेखही एका मासिक पुस्तकांत आला होता. यांतील बरेचसे लेख मी उतरून घेतले आहेत."—चातुर्यचंद्रोदय पृ० २२७—

आलीकडे पुराणांवर लोकांचा विश्वास कुंठित झाल्यासारखा कां दिसतो या संबंधानेंही वरील ग्रंथांत महाराज म्हणतात कीं:—जे श्रद्धाळु आहेत त्यांचा विश्वास कुंठित झाला नाहीं. किंवा जे आमच्याकडच्या शास्त्राचे विचारी आहेत त्यांचाही झाला नाहीं. परंतु मध्यमवर्गाचा मात्र, पूर्वी पाश्चात्यांना आमचीं पुराणें खरीं वाटत नव्हतीं म्हणूनच कुंठित झाला आहे. आतां जडशास्त्रामध्यें विमानादिकांच्या कलांनीं आणि मानसशास्त्रामध्यें टेलिपथी आदिक शोधांनीं पाश्चात्यांचा विश्वास आमच्या पुराणांवर

बसत आहे. परंतु आमचा मध्यमवर्ग इकडे व तिकडे .दोन्हीकडे उद्योग करण्याला असमर्थ असल्यामुळें आळसानें अविश्वासीच रहात आहे. हें दुर्दैवच होय. अस्तु.—चातुर्यचंद्रोदय पृ० २३२—

वेद० शा० सं० वामनशास्त्री किंजवडेकर हे या सुमारास नुकतेच उमरावतीस येऊन शांकरभाष्यावर प्रवचन सांगू लागले होते. महाराजांची कीर्ति ऐकून एके दिवशीं ते त्यांजकडे आले. श्रृंगेरी मठाचे शंकराचार्य श्रीशिवाभिनवविद्यानृसिंहभारती स्वामीमहाराज यांजजवळ आपण शास्त्राध्ययन केलें आहे असें ते म्हणाले. महाराजांबरोबर प्रथम थोडावेळ त्यांची कांहीं सामान्य शास्त्रविषयक चर्चा झाल्यावर महाराजांनीं त्यांस जैनपंडितांचा शंकराचार्यांवर असलेला पूर्वपक्ष सांगून त्याचा खंडणविषयक प्रश्न विचारला तो येणेप्रमाणें:—

जैनमताचें खंडण करण्याकरितां आचार्यांनीं "नैकास्मिन्नसंभवात्" (अध्याय २ पाद २ सू० ३३) या सूत्रांत त्या मताचें प्रथम निरूपण केलें आहे. या भाष्यावर आनंदगिरी, भामती, रत्नप्रभा, ब्रह्मविद्याभरण या प्रसिद्ध टीका सर्वांस माहित आहेत. भामतीची अमलानंदांनीं केलेली एक कल्पतरु नांवाची टीका आहे. त्या सर्व भाष्यावरील टीकेंत जैनमताचें निरूपण करतांना जीवाचे तीन प्रकार सांगितले आहेत. नित्यमुक्त, मुक्त आणि बद्ध. त्यांत अर्हत नित्यमुक्त. जे जैनधर्माचें साधन करुन मुक्त झालेत ते मुक्त व इतर ते बद्ध. पुनः सर्व जैनांचा सिध्दांत हा आहे कीं ईश्वर मानावयाचा नाहीं. कारण एक ईश्वर मानला म्हणजे सप्तभंगीनयाला व जैनांच्या मुक्तीला अडचण येते. ती अशी—एक ईश्वर आहे तर अनेकान्त पदार्थ उत्पन्न करूं शकणार नाहीं व दुसरी जैनांची मुक्ति म्हणजे कर्मांचा क्षय झाल्यावर वरवर अलोकाकाशांत फिरत रहाणें किंवा सिध्दशिलेवर रहाणें. पण नित्यमुक्त जर कोणी मानला तर ईश्वर माणण्यासारखेंच आहे. म्हणून माझ्या अवलोकनांत आलेल्या जैन ग्रंथांत दोनच प्रकारचे जीव सांपडतात. जसें—"संसारिणो मुक्ताश्च" तत्वार्थसूत्र अ० २ सूत्र १० "जीवा द्विविधाः संसारिणो मुक्ताश्च" नयचक्र-

सार. जीव दोनच प्रकारचे आहेत. संसारी आणि मुक्त. पहिल्यापासून मुक्त असा कोणीही जीव नाहीं. तर साधनांनीं मुक्त होऊन एकदां अर्हत होतो. आणि दुसरे त्याच्या उपदेशानें अर्हत होऊन मुक्त होतात व सिद्ध होतात. तेव्हां या पक्षांत नित्यसिद्ध जीव कोणीच नसल्यामुळें ईश्वर मानण्याची गरज मुळींच रहात नाहीं. अशा दोन प्रकारच्या जीवांचें निरूपण सर्व जैन ग्रंथांत सांपडते. विद्यारण्य स्वामींनें आपल्या सर्वदर्शन संग्रहांत जैनमताचें जें निरूपण केलें आहे त्यांत देखील वरील ग्रंथांप्रमाणें दोन प्रकारचे जीव सांगितले आहेत. तेव्हां जीवाचा तिसरा प्रकार आला कोठून ? आनंदगिरी प्रभृतीला आमचें मत समजलें नव्हतें असें जैनानें सहज म्हणणें संभवनीय आहे. माझ्या पाहण्यांत आलेले जैन ग्रंथ येणेंप्रमाणें आहेत:— उमास्वामींचे तत्वार्थसूत्र, समंतभद्रकृत गंधहस्ती महाभाष्य, देवागम-स्तोत्र, श्वेतांबराचे कर्मग्रंथ, पण्णवनासूत्त, श्वेतांबराचे दुसरे तत्वार्थाधिगम भाष्य, समंतभद्रकृत आप्तमीमांसा, वसुनंदीकृत देवागमवृत्ति, न्यायाव-तार, नयचक्रसार, प्रकरण रत्नाकर, प्रमेयकमलमार्तंड, समवायांग सूत्त, कुंदकुंदाचार्यकृत समयसार, इत्यादि प्राचीन ग्रंथ, व जैनतत्वादर्श, तत्व-निर्णयप्रासाद, सम्यग्ज्ञानदीपिका, ( क्षुल्लकजीकृत ) हे अर्वाचीन ग्रंथ माझ्या प्रत्यक्ष पाहण्यांत आले आहेत. हेमचंद्राचार्यानें एक जैनांचें योगशास्त्र लिहिलें आहे. त्यांत परमात्मा म्हणून एक दिला आहे. पण तो परमात्मा म्हणजे साधनानें मुक्त झालेला जीवच असल्यामुळें नित्यमुक्त नव्हे. वर दिलेल्या यादींतील सर्व जैन ग्रंथांत व आपल्याकडील विद्यारण्य-स्वामींनीं निरूपण केलेल्या जैनदर्शनांत दोनच प्रकारचे जीव जैनांना मान्य आहेत असें स्पष्ट दिसतें. तेव्हां आनंदगिरी प्रभृतींनीं वर दिलेले तीन प्रकारचे जीव जैनांना मान्य आहेत असें कसें म्हटलें असावें ? भामतीवर कल्पतरु नांवाची टीका आहे. त्यांतही हें स्पष्ट केलें नाहीं. ही जीवांविषयींची गोष्ट झाली. पुनः अशीच गोष्ट सप्तभंगीनयाविषयीं झाली आहे. स्वचतुष्टयाच्या अपेक्षेनें सप्तभंगनय समजून शंकराचार्यांनीं जें जैनमताचें खंडन केलें आहे तें बरोबर नाहीं. असें तत्वनिर्णय प्रासाद-

कारानें म्हटलें आहे. तो म्हणतोः—" अहो तुम्हांला आणि तुमच्या आचार्यांना आम्हां जैनांचें मत समजलेंच नाहीं. कारण स्वरूपादि चतुष्टयाच्या अपेक्षेनें आम्ही वस्तु सत् मानित असतो. आणि पररूपादि चतुष्टयाच्या अपेक्षेनें असत् मानित असतो. म्हणजे घट हा घटाच्या रूपानें आहे तसाच तो जेव्हां आहे तेव्हां आहे. म्हणजे आतां घट आहे. आणि येथें आहे म्हणजे या भूतलावर आहे. भूतल हें त्याचें क्षेत्र होय. भाव म्हणजे सामर्थ्य. पाणी वगैरे घटांत ठेवतां येते. इत्यादि सामर्थ्यानें घट आहे. आणि पटादि चतुष्टयानें तो नाहीं. असें न मानलें तर एकरूप होतील. " आणि असेंच वर यादी दिलेल्या सर्व ग्रंथांत दिलें आहे. तेव्हां आपल्या आचार्यांवरील हे वरील आक्षेप कसे खोडतां येतील ? या महाराजांच्या प्रश्नावर वामन शास्त्री कांहीं बोलले नाहींत. या सर्व आक्षेपांचें खंडन महाराजांनीं आपल्या संप्रदाय सुरतरूंत उत्तम व सविस्तर केलें आहे.

पुढें कात्यायनी व्रतमहोत्सवाचा समय प्राप्त झाला. त्याकरितां लाखपुरी हें स्थल निश्चित ठरून उमरावतीहून महाराज तेथें गेले व मार्गशीर्ष शुध्द १२ स व्रतारंभ करून पौष शुध्द १२ स मंगळवारीं व्रताची सांगता केली. उत्सवाकरितां प्रतिवार्षिक क्रमाप्रमाणें सांप्रदायिक व इतर मंडळी जमली होती. महाराजांचीं ज्ञानेश्वरीवरील निरूपणें, शास्त्रचर्चा, मंडळीच्या शंकासमाधानविषयक चर्चा वगैरे गोष्टी नेहमींप्रमाणेंच उत्सवांत चालू होत्या. पौष शुध्द ४ थीचे रात्रीं पयोष्णीच्या वाळवंटांतील तंबूत ज्ञानेश्वरीवर महाराजांचें निरूपण झालें. निरूपणाची मूळ ओवी "अगा स्वधर्म हा आपुला। जरी कां कठीण जाहला। तरी तोचि अनुष्ठिला। भला देखे॥ " ही होती. विषयप्रतिपादन मुख्यतः जीव हा कर्तृकालीं स्वतंत्र आहे व ईश्वर अनुमंता आहे. म्हणून इंद्रियसंयमन करणें जीवाच्याच इच्छेवर अवलंबून आहे, त्याप्रमाणें जीवानें इंद्रियरोध करून स्वधर्मच पाळण्याची आवड धरावी, अशा धोरणाचें होतें.

रा० रा० निळकंठ शास्त्री धर्माधिकारी मूळतापीकर हे महाराजांच्या

मंडळींतले असून वर्षातून कांहीं महिने महाराजांच्या सहवासाला येऊन रहात असत. अर्थात कात्यायनी उत्सवाला प्रतिवर्षी येण्याचा यांचा नियम होताच. अलीकडे कांहीं वर्षांपूर्वी यांची पत्नि निवर्तल्यापासून यांना तप करण्याची प्रबल इच्छा होऊन कडक नियमाचरणानें हे अयाचित वृत्तीचा अवलंब करून राहिलें होते व मध्यंतरीं श्रीवासुदेवानंदस्वामी महाराजांकडेही जाऊन आले होते. महाराजांच्या सहवासांत यांना पहिले पासून वेदान्तचर्चा वगैरे श्रवण करण्याची आवडी होतीच व श्रवणकालीं आपल्या शंका वगैरे महाराजांस विचारून चर्चा करण्याचा त्यांचा परिपाठ होता.

या उत्सवप्रसंगांत एके दिवशीं स्वधर्माचरणासंबंधानें महाराजांचें निरूपण चाललें असतांना निळकंठ धर्माधिकारी यांचें उदाहरण देऊन महाराज म्हणाले कीं त्याचा बाप जीवंत आहे तोंपर्यंत तपादिकांनीं त्याला कांहींच फळ व्हावयाचें नाहीं. पित्याचे ठिकाणीं ईश्वर नाहीं असें समजून तो तपाला प्रवृत्त झाला आहे. असो.

व्रतसमाप्तीचे दिवशीं वेदोक्त होम करण्याचा दरवर्षाचा परिपाठ होता. परंतु ह्या वर्षी महाराज म्हणाले कीं मी वेदोक्त होम आजपर्यंत करूं दिला ही चुकी केली. धर्माचें सूक्ष्म स्वरूप लोकांस समजत नाहीं, धर्म मला बरोबर समजतो. धर्माकरितां—सूक्ष्म धर्माकरितां—कांहीं गोष्टी मला सहन कराव्या लागतात. वरणी देऊन वेदोक्त करविणें हा उत्सर्ग धर्मविरुद्ध आहे. ब्राह्मणांस द्रव्य देऊन करविणें हा धर्मविरुद्ध होत नाहीं. म्हणून ह्यावर्षी दुप्पट जप करवावा. होम करूं नये. पुढल्या वर्षी पुराणोक्त होम करूं. ह्याप्रमाणें होमाची वाटाघाट होऊन शेवटीं दुसरें दिवशीं पुराणोक्त होम करण्यांत आला.

होम वगैरे आटपल्यावर रात्रौ नित्यक्रमाप्रमाणें तंबूंत मंडळी जमली. तेवेळीं रा० गणपत खंडो भालेराव व गोपाळ लक्ष्मण पाध्ये यांनीं महाराजांस कांहीं शंका विचारल्या व त्यावर नेहमींप्रमाणें महाराजांचें बहारीचें

निरूपण झालें. दुसरे दिवशीं द्वादशी होती. या दिवशीं होमाची पूर्णाहुती, अवभृथस्नान, द्वादशीचा काला वगैरे कार्यक्रम आटपून नंतर ब्राह्मणभोजन झालें. काल्याचे वेळीं जे नवीन चार अभंग झाले त्यांत पूर्वरात्रींच्या निरूपणाचा सारांश थोडक्यांत गोवला आहे. ते अभंग पुढीलप्रमाणें आहेत:—

१. वृत्ति अनुकारें फावल्या चैतन्य । होउनी अनन्य ठाव राहे ॥ १ ॥ मागें ब्रह्मानंद पुढें भक्तिरस । नाहीं अवकाश तुरंबाया ॥ २ ॥ अनुराग ब्रह्मीं आपुला प्रत्यय । तनुसह होय चिदानंद ॥ ३ ॥ आळंदी-वल्लभें दाखविल्या पंथें । नेणताही येथें पावे साच ॥ ४ ॥

२. अनादि मायेचा सहज अध्यास । लोभभय त्यास अनुकारी ॥ १ ॥ अध्यासांतर्भावें अध्यासाच्या कोटी । उठताती पोटीं चिदन्वयें ॥ २ ॥ सहज अध्यास अधिकारी ठेवा । वर्णाश्रमभावा शास्त्रसिद्धि ॥ ३ ॥ लोभभय पुढें पतनाचें मूळ । यासाठीं उज्वळ कर्म कीजे ॥ ४ ॥ सहजा ध्यासानें सांगे श्रुतीमाता । आपल्या उचीता सांभाळावें ॥ ५ ॥ आणि-काचें कर्म ओढतांना बळें । लोभ तो आदळे उगा आंगीं ॥ ६ ॥ ज्ञाने-श्वरस्वामी उचिताचा दाता । आणिका समर्था तळीं पाडी ॥ ७ ॥

३. सहज अशक्ता लेंकुराची माय । घेतसे कडिये उचलोनी ॥ १ ॥ बळें आळसीया थापडेनें हाणी । होईल म्हणोनी पुढेंही हा ॥ २ ॥ सहजा-ध्यासाचा अधिकार श्रुती । स्वल्पधर्में प्राप्ति सिद्धि दावी ॥ ३ ॥ आन-धर्मी श्रम नाहीं आश्वासन । इह अभिमान पर नरक ॥ ४ ॥ अविद्या अशक्ता ईश्वर सांभाळी । रागासक्ता जाळी स्तंभाग्नीनें ॥ ५ ॥ आळंदी-वल्लभ उघड्या मनाचा । न करी पणाचा परित्यागू ॥ ६ ॥

४. निर्गुण सगुण दोन्हीही अकळ । एका ज्ञानबळ ध्यानीं एका ॥ १ ॥ ज्ञानमय साक्षी आपुले अंतरीं । सगुण बाहेरी अभिव्यक्त ॥ २ ॥ मायबाप गुरु वनितांचा पती । चार अभिव्यक्ति सगुणाच्या ॥ ३ ॥ चौघांच्या हृदयीं साहजिक दया । नलगे उपाया करणें बहू ॥ ४ ॥ अल्प-

पुत्रश्रमें मायबापकृपा । उमटतां सोपा तपोमार्गू ॥ ५ ॥ आणिक देवता सांग घाल्यावीण । स्नेहाभावीं शीण उगा देती ॥ ६ ॥ अल्पश्रम सेवा प्रियेची पाहोनी । नुचंबळे मनीं ऐसा कोण ॥ ७ ॥ सर्व ब्रह्म मग शिष्य कां श्रमावा । सद्गुरु स्वभावा कृपा येणें ॥ ८ ॥ होईल तो धर्म साधे येणे माने । उल्हासें सन्मानें पूजिलीया ॥ ९ ॥ ज्ञानेश्वर स्वामी नाहीं पक्षपाती । एका दुजे पंथीं पाठवाया ॥ १० ॥

अभंगाची गाथा. अभंग ९२४, १०४२, १०४३, २९६ पहा.

या उत्सवांतील विशेष संस्मरणीय गोष्ट म्हणजे प्रसिद्ध वेदान्तपारगंत व परमार्थमर्मज्ञ सत्पुरुष खंडो कृष्ण ऊर्फ प्रसिद्ध बाबा गर्दे यांचें महाराजांच्या दर्शनार्थ आगमन हें होय. यांच्या आगमनानें उत्सवार्थ जमलेल्या प्रेमळ सज्जनमंडळास चार दिवस एका विद्वान, निर्मत्सर व गुणज्ञ रसिकाच्या सहवासाचा अलभ्य लाभ मिळाला. एके दिवशीं भोजनप्रसंगीं बाबांनीं एक नवीन प्रसंगोचित् आर्या रचून म्हटली ती अशी:—

श्रीमद्गुलाबवासें झाली काशीच धन्य लाखपुरी । हेमंतऋतुमाजीं चंद्रोदयिं शोभते जशी खपुरी ॥ १ ॥

या आर्येंत महाराजांचें शिवत्व ध्वनित करून "ज्ञानं महेश्वरादिच्छेत्" हें वचन जनांत सार्थ करून दाखविण्याकरितां बाबांनीं उत्सवाचा एकंदर कार्यक्रम आटपल्यावर दुसरे दिवशीं सकाळीं पंचदशीमधील "खादित्य-दीपिते कुड्ये दर्पणादित्य दीप्तिवत् । कूटस्थ भासितो देहो धीस्थ जीवेन भास्यते ॥" हा कूटस्थदीप प्रकरणाचा पहिला श्लोक काढला व लोक-कल्याणार्थ महाराजांस पृच्छा केली कीं, "धीस्थ जीवेन भास्यते" यांतील कूटस्थ व जीव हे दोघेही देहास प्रकाशित करतात याचा अनुभव काय? यावर महाराज म्हणाले कीं, सर्व व्यवहार करीत असतांनाही आपला जो सर्वसामान्य मीपणा राहतो तेंच कूटस्थाचें स्वरूप होय. हें मार्मिक उत्तर ऐकून बाबांस फार संतोष वाटला. पुन्हां, रात्रीच्या वेळीं

त्यांनीं वेदान्तांतील दृष्टिसृष्टिविषयक प्रश्न महाराजांनवळ काढून संवाद-सुखाचा अनुभव घेतला. याप्रसंगीं बाबांच्या सहवासांत दृष्टिसृष्टिवाद, मधुराद्वैत, ज्ञानियाला सत्संगतीची अपेक्षा इत्यादि विषयांवर महाराजांचें प्रतिपादन नेहमींप्रमाणें सर्व श्रुतिसंतसम्मत व युक्ति व अनुभवप्रचूर असें होतें. याप्रमाणें हीं सुश्राव्य व चटकदार निरूपणें, काल्याचे व गुरुवारच्या पालखीचे अभंग व एकतारीवर "ज्ञानराज माउली" च्या संपुटींत झालेलें "म्हणोनि अर्जुना पाहीं । प्रवेशावया माझ्या ठायीं । उपायांची नाहीं । वाणी येथ" ॥ या ज्ञानेश्वरीच्या ओवीवरील महाराजांचें ओवीबद्ध रसाळ निरूपण हीं श्रवण करून बाबांची मनोवृत्ति अत्यंत प्रसन्न व महाराजांचे ठिकाणीं प्रेमसंलग्न झाली. जातेवेळीं बाबागर्दे यांनीं महाराजांच्या पायांस स्पर्श करून नमस्कार केला. तेव्हां महाराज मोठे कळवळून त्यांस म्हणाले, अहो, मी शूद्र आहेना! मला आपण नमस्कार करून पापांत पाडता काय? तेवेळीं बाबांच्या नेत्रांतून खळकन् प्रेमाश्रु आले व सद्गदीत कंठानें ते ह्मणाले महाराज! आतां ही आपली माया मला मोहांत न पाडो. तें ऐकून महाराजांचेंही चित्त प्रेमवश झालें. असो.

ब्रह्मज्ञानी पुरुषाची स्तुति करणारे जन त्याचें पुण्य घेतात व निंदा करणारे जन पाप घेतात अशा अर्थाची एक श्रुति मागें गेली आहे. त्या वर्णनाप्रमाणें परस्परविरोधी स्वभावांचें अपूर्व सम्मेलन या कात्यायनी-प्रसंगांत पहावयास मिळालें. एकीकडे बाबागर्द्यांसारखे सत्पुरुष मुद्दाम लांबून येऊन महाराजांची स्तुति करण्यास तत्पर झाले होते तर दुसरीकडे लाखपुरींतच अलीकडे अगदीं पुरोभागी येऊन रहात असलेले एक गृहस्थ प्रत्यक्ष मंबाजीबोवांची कृति करून "खे भूतिं यस्त्यजेत्प्राज्ञो मूर्ध्नितस्यैव सा पतेत्" या वचनाप्रमाणें आपली मत्सरबुद्धि उघड करून दाखवीत होते. त्यांनीं आसपासच्या दर्यापूर वगैरे गावांत फिरून महाराजांविषयीं व त्यांच्या सहवासांतील मंडळीविषयीं नाना प्रकारच्या निराधार गैरसमजुती फैलविण्याची खटपट सुरू केली. शेवटीं त्यांनीं महाराजांची परीक्षा पाहण्याकरितां माघ काव्यांतील दोन कूट श्लोक त्यांच्याकडे पाठविले ते असे—

जजौजोजा जिजिज्जाजी तन्ततोतितताततुत् ।
भाभो भोभा भिभूभाभू रारारिरादिरीररः ।। १ ।।
दारीदर दरिद्रोरि दारूदारोद्रि दूरदः ।
दूरादरीद्रो ददरद्रोदोरुद्दारुरादरी ।। २ ।।

यावर महाराजांनीं त्यांस इतकाच उलट निरोप पाठविला कीं, तुम्हांस माझ्या विद्येची परीक्षा पहावयाची असेल तर असे कूट श्लोक पाठविण्यापेक्षां तुम्ही आम्ही एका मोठ्या शहरांत जाऊं व तेथें विद्वान लोकांची सभा भरवूं. त्या सभेंत तुम्हांस काय विचारणें असेल तें विचारा. अस्तु.

कात्यायनी उत्सवानंतर सुमारे एक महिनाभर महाराजांनीं आसपासच्या दर्यापूर, अळसपूर, कुन्हा वगैरे गावांत प्रवास केला व माघ वद्यांत महाशिवरात्रीच्या उत्सवाकरितां उमरावतीस परत आले.

दर्यापूरचे डा० काशिनाथ अण्णा धर्माधिकारी यांच्या येथेंही या प्रवासांत महाराजांचा मुक्काम झाला होता. काशिनाथ अण्णास सत्संगतीची आवडी असून मयूर काव्यांचें परिशीलन विशेषतः ते फुरसतीच्या वेळांत करीत असतात. कवित्वशक्तीही त्यांस अनुकूल आहे. तिचा उपयोग या वेळीं त्यांनीं महाराजांच्या स्तवनार्थ करून १८ सुंदर आर्यांचें एक सुपत्र महाराजांकडे पाठविलें. त्यांतल्या कांहीं आर्या येथें घेतोः—

श्री अलकावतिपतिपद भावें भज नित्य परम सुखद मना ।
हेंचि खरें बा भेषज दुर्धर संसार-विषय-विषदमना ।। ५ ।।
सद्गुरु गुलाबराया जाया भवभयलया तुम्हां नमन ।
युष्मत्पद पूजावें वाटे वाहोनी सुमसमान मन ।। ६ ।।
सत्संगति गंगेचें अवगाहन गमतसे महापर्व ।
तनुवाक्कायमनाचे निववी तापत्रयक्षणीं सर्व ।। ७ ।।
मत्पूर्वपुण्ययोगें तुमचे पदकमल लागतां सदना ।
सहजचि मजला लाधे मंगलमय पर्व तें कुमतिकदना ।। ८ ।।
बहु गौरवास्पद गमे मज तुमचें चर्मचक्षुहीनत्व ।

स्पष्टचि सिद्ध करी हो या योगानें पुनर्जननतत्व ॥ ९ ॥
धन्यचि तुमची व्रजपतिपदकमलीं प्रेमलक्षणा भक्ती ।
यदमृतमयरसपानें व्रजवनिता तुच्छ मानिती मुक्ती ॥ १० ॥
श्रीज्ञानेशवरदकर सत्याचि तुमच्या शिरीं सदा विलसे ।
चरित अलौकिक ऐसें याविण कोणी गमे न दाविलसे ॥ ११ ॥
अनुभवयुक्ति श्रुतियुत वाणी तुमची अमोघ सन्महित ।
श्रवणीं सादर ऐकुनि साधति निज कितिक सुजन जन्महित ॥ १२ ॥
इ० इ०

शेवटल्या आर्येत अशी विनंती आहे:—
विस्तर असो दयाब्धे निजमलमति शुद्धतर करायातें ।
हा काशिनाथ विनवी कीं प्रेमें आप्तजन करा यातें ॥

वरील एका आर्येत दर्शविलेलें पुनर्जननतत्व पुनर्जन्म न मानणाऱ्यास चिंत्य आहे.

या पत्राचें उत्तर महाराजांकडून १८ च पद्यांत गेलेलें आहे. त्यांतूनही कांहीं श्लोक येथें घेतो:—

श्री ज्ञानराजगुरुच्या पदपंकजातें । मी वंदिते स्मरति हो सदपंकजातें ॥ पावावयास यदुवल्लभ पादचर्या । साष्टांग वंदन तुम्हांसहि विप्रवर्या ॥ १ ॥ × × ही काव्यशक्ति तुमची रुचिरा नवाजी । पाहोनि कोण न म्हणे शिखि हा नवाजी ॥ जी सूक्तिमाजि भरिते यमकासमान । तीं आवडे गिरिवरा चमकासमान ॥ ३ ॥ जो साधुदेव विषयीं नरमाधिकारी । तो काय होइल पदा परमाधिकारी । यालागिं सांडुनि भवा रघुराज गावे । नोहे असें तरि उगे मग कां जगावें ॥ ४ ॥ गोविंदमाधव अशीं सुपदें वदावीं । येणेंचि मोक्षपथ सत्कृपदें वदावीं ॥ नामाविणें न कलिकीर्तन आन कांहीं । आसक्ति साधनचर्यी चढवूं नकाही ॥ ५ ॥ जो हंस देहिं फिरतो सकला जनांच्या । त्यालाचि देउनि करीं अपुल्या मनाच्या ॥ नामास ठेवुनि तदा द्वयसंनिधानें । सोहं स्वरूप करुनी मिळवा निधानें ॥ ६ ॥ हेंही नव्हे परि हरी नयनांत जावा । तें आधि इंद्रियचर्यी नय ना त्यजावा ॥ तो श्यामसुंदर तनू भजकां कृपाळ । भेटे सुदान सुजनां

करुणानृपाळ ॥ ७ ॥ कर्मे करोनि अति आग्रह तो नसावा । कर्मे त्यजोनि न घडो विषयीं विसावा । कर्मे समर्पण म्हणोनिच माधवातें । केल्या झडे मळ जसा घनबाध वातें ॥ ८ ॥ शृंगार जो तनुवरी करि चारुगात्री । तो आरशांत दिसतो प्रतिबिंबगात्रीं । बिंबेश्वराप्रति तसा नवमान होतो । देतांचि जीव यदुनाथ समान होतो ॥ ९ ॥ वैराग्य हें न उपजे जरि इंद्रियातें । सोडी न तों षड्रिपुदुर्र तंद्रियांतें ॥ यासाठीं दोष विषयीं बरवे पहावें । ठेवोनि चित्त चरणीं हरिच्या रहावें ॥ १० ॥ × × योगेंहि जाय जरि चित्त असें लयाला । प्रारब्ध कर्म फिरवी पुढती तयाला ॥ श्रीकृष्ण भक्तिच बळें त्रिगुणास वारी । वैराग्यही पर मिळे मग या प्रकारीं ॥ १५ ॥ मागेंचि जे विवरिली अपरा विरक्ति । ती तोडितें विषयिंची रसभावशक्ति । आणीक बोलिलि पुनः ही परा विरक्ती । ती ज्ञान देउनि पुनः उरवीत भक्ती ॥ १६ ॥ एवंच भक्ति तरु भक्तिच बीज याचें । प्रेमोत्थरक्तफल भक्तिच योग्य साचें । आळंदिपीठपति नाम सुधारसाला । जे सेविती नच तया विपदा विशाला ॥ १७ ॥ श्रीज्ञानदेव करुणार्णव नित्य गावा । जावोंनये किमपि हो कृतिमिथ्य गावा ॥ एवं वसंततिलका करुनी रसाच्या ॥ पूजार्थ अर्पु गुरुपाउल सारसाच्या ॥ १८ ॥

श्रीमहाराजांचा निरोप घेतल्यापासून सत्पुरुष बाबागर्दे यांच्या अंतःकरणांत त्यांच्या विषयीं जो अनुराग उत्तरोत्तर वृद्धिंगत होत होता तो बाहेर व्यक्त केल्यावांचून त्यांच्यानें राहवलें नाहीं. म्हणून एक प्रेमळ छंदोबद्ध पत्र त्यांनीं महाराजांकडे पाठविलें. महाराजांकडूनही त्याचें पद्यमय पत्रोत्तर गेलें. हा परस्पर पत्रव्यवहार " विद्वानेव विजानाति विद्वज्जनपरिश्रमम् " या न्यायानें मोठा मार्मिक, चमत्कृतिजनक, व भक्तितत्वबोधक असल्यामुळें येथें घेतल्यावांचून राहवत नाहीं. तेवढा घेऊन हें आनंद संवत्सर पूर्ण करूं. बाबागर्दे यांजकडून महाराजांस आलेलें पहिलें पत्रः—

पद—चाल—भला जन्म हा तुला लाधला.

गुलाबराया तुला बघाया इच्छा होती मनीं । होय ती पूर्ण तुझ्या दर्शनीं ॥ ध्रु० ॥ कीर्ति ऐकुनी मूर्ति रेखिली हृदयीं तव म्यां जशी । हुबेहुब दिसली नयनां तशी ॥ धन्य माय ती अशी विभूती जन्मे जीच्या

कुशीं । विरळा भूवरि रत्नें अशीं ॥ चाल ॥ मम बहुत जन्मकृत पुण्योदय जाहला । त्यामुळेंचि हें तव दर्शन झालें मला । ज्ञानेश्वर मम तात असा जो दर्शविशी भाषणीं । वाटे सत्याचि मज तो ध्वनी ॥गुलाबराया० ॥१॥ तात म्हणसि तूं अळंदिनाथा तेवीं जो श्रीपती । मानिसी त्यातें माझा पती । हेंहि वावगें दिसे न मजला पाहतां गोपीमती । जडल्या भगवंतीं ज्या अती । चाल । पडे विसर कदाचित स्वामीचा सेवका । अंकुरही होइल सख्यभक्तिचा सुका । परी क्षणहि पतिविरह न साहे पतिव्रता कामिनी । नचही प्रीति व्यभिचारिणी ॥ गुलाबराया० ॥ २ ॥ ग्रंथविमर्शन सज्जनदर्शन छंद हाचि लागला । बहुता दिवसांपासुनि मला । अक्कलकोटस्वामीप्रभृती जो जो यति ऐकिला । तो तो साक्षेपें देखिला । चाल । कुणि बसे मुक्यापरि खुळ्यावाणि बडबडे । कुणि शैशवलीला दावी लोकांपुढें । अशा विभूती वंद्य होति जरि लोकपापवारणीं । न मिळे मोक्ष तयांपासुनी ॥ गुलाबराया० ॥ ३ ॥

अंध म्हणाति मतिमंद तुला जे अंध तेचि तत्वतां । नसती ज्ञानचक्षु ज्यां स्वतां । मुनी जागतो तींत असे जी निशाचि सर्वांभुतां । असें हरि सांगे कुंतीसुता । चाल । निष्णात असे जो शाब्दीं परिं तो गुरू । उद्धवासि ऐसें वदे भक्तसुरतरू । अशा लक्षणें युक्त दिसे जो त्याच्या पदवंदनीं । व्हावें तत्पर साधकजनीं ॥ गुलाब० ॥ ४ ॥ सर्व शास्त्रिं तव विचित्र पाहुनि शिक्षणरहिता गती । गमसी केवळ शंकरयती । प्राकृत कविता तुझी स्मरविमज खाचित अळंदीपती । बापा तव गुण वानूं किती ॥ ॥ चाल ॥ बा कृपा असावी तव ह्या दीनावरी । मज करी नुपेक्षा भक्त अडाणी जरी । द्यावी मज शेवटची जागा भक्तिसुधाभोजनीं । प्रार्थी कृष्णसूनुवंदुनी ॥ गुलाबराया ० ॥ ५ ॥ चरणरज.—बाबा गर्दे.

या पत्रांत बाबांनीं "शिक्षणरहितागती" व "शंकरयती" या शब्दांत महाराजांचें अवतारत्व ध्वनित केलें आहे. या पत्राचें महाराजांकडून प्रत्युत्तर गेलें तें:—

श्लोक शिखरिणी.

नमस्ते आचार्य स्वपद पदवी प्रेमवरद । नमस्ते सर्वात्मन् मुरहरसुर स्वर्गपुरद । नमस्ते योऽरातिश्रियमभिनता याप्यघवते । नमस्तेऽलंदीश स्वजनसुखकर्त्रे भगवते ॥१॥नमो बाबाजीच्या शुभविभवदा पादकमला। पर-अर्थी श्रौती तनुमतिरती यत्सु विमला । विनंती कीं मातें प्रभुलिखित तें आज मिळलें । पहातां देवांचें अतिमजवरी प्रेम कळलें ॥ २ ॥ स्वबाळातें वानी जननि जन तें उत्तम ह्मणे । अभिप्रायें याची स्तुतिपद असें मी गणि मनें । उगा या वांचोनि मजेपदभवा गौरव कसा । पदींच्या जूतीचा पदिंच दिसतो उत्तम ठसा ॥ ३ ॥ स्तुती आत्म्याचीही तरि सहज सौख्यीं उभयता । स्तुती देहाची तें मजसि उमटे फार भयता ॥ तनू आधींची हे जडमलिन निंद्या सदाहिता । वरी शूद्राचीया कुळिं उपजली वेदरहिता ॥ ४ ॥ स्वधर्मे विप्राची मज चरणसेवा न घडली । परंतु दुर्दैवें विपरित कृती मात्र जडली । अशा नीचा मातें निज समजुनी लाड करिता । नव्हे आश्चर्याचें सरल सुजनीं प्रेम पुरता ॥ ५ ॥ अभावें नेत्राच्या बहुत करुनी अस्रसलिला । द्विजा देणें लागे हृदायिं अति हें जाचत मला । वृथा वेदान्ताचें मिष करुनि मी वैभव धरी । अशा माझी कैसी करिल करुणा कोण उदरीं ॥ ६ ॥ असो या शोकातें वदुनि पुढती काय करणें । भवत्पादांभोजा नमुनि बरवें मौन धरणें । व्रजेशप्रेमाचा मधुरतर वाहो हृदि झरा । अशा आशिर्वादा वदुनि मजला पावन करा ॥ ७ ॥ परब्रह्मज्ञानें जग निखिल हें बाधित गमे । तथापि प्रारब्धें पुढति विषयीं अंतर रमे । तयातें जिंकाया विषय अरपावे हरिपदीं । अहंता ही आटे भजन करितां बोलति सुधी ॥८॥ दिव्यापासोनीयां समजरि दिवा अन्य उजळे । तरी आधील्याचें प्रथमपण हें कैंच न गळे । कृपे तेवीं ज्याच्या चितिमति वळे त्या न भजुनी । कृतघ्न ज्ञानी तो भववश सदा चित्तसम-जुनी ॥ ९ ॥ अहो स्वप्नीं मिथ्या जननि आपुली ही जरि दिसे । तदाही

---

१ शूद्रास. २ जूती हा शब्द वैदिकसंस्कृतांत आहे म्हणून घातला आहे.

सत्पुत्रीं परम पूज्यत्वार्ति उमसे । तसा मिथ्या विश्वीं मधुरमय भेटे गुरु हरी । उपेक्षा तें त्याची पशुविण दुजा कोणि न करी ॥ १० ॥ कळे संधी तेव्हां सुजन हृदयीं खेळत चितीं । उठे वृत्ती तेव्हां विषय अवघे चाल करिती । निराकारी संधी सगुण चरणीं वृत्ति जडतां । भवाब्धी आटे हा श्रम बहु निरोधीं न पडतां ॥ ११ ॥ जशी स्वप्नीं मिथ्या युवति तरि कामार्त डुलवी । तसा ज्ञानी रागी तरि मग तया भ्रांति भुलवी यशोदा-बाळाच्या चरणकमळावांचुनि कदा । अनंतोपायांनीं तुटति न महागर्भ विपदा ॥ १२ ॥ हिरण्या जाणे त्या नग बघुनियां तोष उपजे । हिरण्या नेणे तो बघुनि भुलतो चित्तलहि जें । तसा ब्रह्मज्ञानी सगुण—भजनें सौख्य मिळवी । विना ज्ञानें ध्याता जयविजयसा चित्त चळवी ॥ १३ ॥ पिता तूं माता तूं बहिण सुत तूं या शतपदीं । बळें अध्यासाच्या सकळ जन होती नत पदीं । तया आचार्यांचें वचन निवटी त्वं म्हणवुनी । परब्रह्मा-हंता तदपि मनुजाची नच उणी ॥ १४ ॥ गुरूक्ति त्वं बोधें परम सुख शिष्याप्रति मिळे । तदा त्वं पूज्यत्वें उलट जें त्याची मति वळे ऋणातें वाचेच्या तहिं मुकुनि घे भक्तिपदवी । स्वयें वाचे साधु हरि वदुनि आनास वदवी ॥ १५ ॥ गुणाच्या दृष्टीतें जरि निरखितां सांख्यविषयें । तदा मायाबिंबीं यदुपति मिळे सत्वनिचयें । स्थिति ज्ञाना सत्वाविण नच असें तात वदले । तदा कैसी भक्ति त्यजातल समोपाधिमबले ॥ १६ ॥ समा-पाधी झाले तरि वरपणा ये हरिपदा । शुची सत्वादीतो म्हणुनि यजिती सज्जन सदा । अदंभादी साधूगुण सहज ज्या रीति उरती । तशी ब्रह्म-ज्ञाच्या मनिं उमटते माधवरती ॥ १७ ॥ श्रमें लाहे बोधा न भजुनि मनीं जो हरहरी । विरागाद्यभ्यासीं पडरिच्चय त्याची मति हरी । अहंकर्तृ-त्वेंची श्रमुनि सुखसंघी न कळवी । हरिप्रेमाकृष्ट प्रतिपद परानंद मिळवी ॥ १८ ॥ परज्ञानें ज्यांचे चिदचिदाखिल ग्रंथि सुटले । मुनी तेहि प्रेमें व्रजवर चरित्रीं विनटले । कुठें थारेनातो गुरुशुकमुखा भक्ति वदला । उपेक्षूनी देवा किमपि न फिटे वेदबदला ॥ १९ ॥ विदेही साधूतो हरि-गुणसुधा अंतरिं भरी । अनादि साधूंच्या कृति न कधिंही दूषित करी ।

जना वाटे वेडा परि अधिकृताचा भव हरी। गुरुत्वाच्या इच्छेविण गुरुपणा ज्याप्रति वरी ॥ २० ॥ विदेही होवोनी बहुत तनु सोंगास करिती । दुराचारालागीं चळकटपणें चित्ति धरिती। श्रुतीतें नेणोनी विषयफळ जें भोगिति कुडें । यमाजीच्या दंडें मरुनि मग त्यां दुर्गति घडे ॥ २१ ॥ अरागद्वेषत्वें शिशुसम जरी पंडित वसे । यथेच्छा विण्मूत्रादिकरण परी त्या प्रति नसे । असें सूत्रीं भाष्यीं म्हणाति मुनि आचार्यहि सवे । वृथा चाळे तस्मात् शठ करिति तें उत्तम नव्हे ॥ २२ ॥ पिशाचादी वृत्ती न दिसति कुठें वेदगादिता । परी ढोंगी मूर्खा बहुत गमते त्यांत मुदिता । विनाज्ञानाभ्यासें सकल करणीं संसृति फळे । नदंभें कोणाचें करुनि तपही चित्त उजळे ॥ २३ ॥ चमत्कारेच्छूच्या निजमनिं उगा काम उजळे। चमत्कारेच्छूची यवनमुखल्याळें तनु मळे । चमत्कारेच्छू तो निगमरहिता धर्म समजे । ह्मणोनि मातें हा रुचति तुमच्या वृत्तिसम जे ॥ २४ ॥ स्वधर्माचारानें हृदयशुचिता जैं प्रगटते । उपास्तीनें तेव्हां सहजचि अचांचल्य घटते । परब्रह्मज्ञानें निखिलहि अविद्या मळ झडे । मुकुंदाच्या प्रेमें अभिभवहि दैवाप्रति घडे ॥ २५ ॥ समाधींवांचोनी सहज सुख बुद्धाहि न मिळे। हरिप्रेमासक्ता सुखमयाचि उत्थानहि फळे । समाधीव्युत्थानें जरि विदितवेद्यास नसती। तरी जीवन्मुक्तीपद निरखितां अंगिं दिसती ॥२६॥ यदप्यावृत्त्यंशा वचनगत सन्दोष हरितो। चिदाभासत्वानेंतदपि मतिविक्षेप उरतो । अहंब्रह्मज्ञानी चरमपद तें चित्तिं धरुनी । चिदाभासाहंता हरिति हरि सेवाचि करुनी ॥ २७ ॥ पितामाताबंधुपतिसुत सुमित्रादि भलतें । रमानाथीं नातें जुळवुनि मिळे भक्तिबळ तें। कृतज्ञशा त्यांची हरिस भजणें पूर्विल प्रथा। जनातें ताराया स्फुरति ह्मणुनी मापतिकथा ॥ २८ ॥ रसा याथच्छक्ती रचुनि भरलीही शिखरिणी । तुम्हां प्रीती पावो मधुररुचि जेवीं शिखरिणी। तुझ्या चित्तीं बाळे अतितर वसो ईश्वररती। अशा आशिर्वादें मज मिळवुनी द्या व्रजपती ॥ २९॥ पदीं पोल्हारांचा रुणझुण असा नाद उठतो। करींच्या चक्रानें हृदयरिपुचा बंध तुटतो । जना ताराया

जो अवतरुनि आलंदित वसे । तया स्वामीपाया नमुनि लिखिता आर्ते असे ॥ ३० ॥

यानंतर पुन्हां बाबांकडून दुसरें पत्र आलें तें:—

श्रीहरिगुरुभक्तिपरायण गुलाबराव महाराज यांचे चरणसेवेसी:—

प्रसाद तुह्मि धाडिला सदय होवुनि जो मला । धुळ्यांत असतांचि तो सुखमयीं मला पावला । गिरा मधुर तुमची मधुर त्यांतही छंद तो । जया शिखरिणी कवी म्हणाति फारची शोभतो ॥ १ ॥ प्रसन्न तुमची गिरा सुरनदी–प्रवाहापरी । कवित्वरचना किती सरल जी मनाला हरी ! प्रगल्भ उपदेश गार्भित सुनम्रवाणी अशी । करी श्रवण जो रुझे त्वरित भक्ति तन्मानसीं ॥ २ ॥ द्विजावरि बहू दिसे सहज भक्ति जी त्वन्मनीं । दिसे न तसि भूवरी क्वचितही इदानींतनीं । तसा द्विजहि आढळे जगिं न योग्य जो भक्तिला । म्हणोनि न गमे अहो नवल त्यांत कांहीं मला ॥ ३ ॥ जिथें सुदृढ (वा प्रखर—पाठांतर) बोध ठाव न तिथें असे भक्तिला । असाचि बहुधा जगीं नियम दीसतो दृष्टिला । परंतु तुमच्या प्रभो हृदयिं भक्ति जैसी दिसे । तसा सुदृढ बोधही नवल जाहलें हें कसें ॥ ४ विराग तव देखुनी मम मनीं तुका आठवे । स्वबोध दीधला तुला मज गमे अळंदीभवें । तुझ्या बघुनि भक्तिला झुरति मत्सरें गोपिका । शिरीं धरिन मी अशा पदभवाचिया पादुका ॥ ५ ॥

चरणरज—बाबागर्दे. मु० मुंबई.

शेवटीं या पत्राचें महाराजांकडून गेलेलें उत्तर:—

श्लोक—पृथिवी.

प्रणम्य जगदीश्वरं हृदयशुद्धिकौधीवरं (निखिललोक हृद्धीवरं—पाठांतर) अलंदिमणिमद्वयं भवभयाब्धि नौधीवरं । यदीयचरणाश्रितस्सकलकिल्बिषैर्मुच्यते । तदीय करुणालवाल्लिखितमेतदत्रोच्यते ॥ १ ॥ पदास मिळवावया बिसकुमार बाबाजिच्या । पदांबुजनना नमो सुसुकुमार बाबाजिच्या । सुपत्र तुमचें प्रभो मजसि आज हो पावलें । कवित्व सुरपादपा भराणिवृत्त जें

फावलें ।।२।। तुझ्या हृदयिं गोपिवत्प्रभुरती भवद्बोलणें। जरि स्तव तथापि हा वर म्हणोनि म्यां डोलणें। परंतु विधिच्या वरें दनुजलेंकुरें मातलीं। तसा न मज गर्व हो अटहि पाहिजे घातली ॥ ३ ॥ विनिंदि मजलाचि जो सहज तुष्टतो काळजी। परि स्तवित जो मला बहु तदीय हो काळजी ॥ विनिंदक जना ममावगुण सांपडे नेटुनी। परि स्तवितया भल्या सगुण दावुं मी कोटुनी ॥ ४ ॥ सुमाय रिझते सुताप्रतिच घालुनी भूषणें। भवत्कृत सुतस्तवें गुरु तसे तुम्ही तोषणें ॥ गुणीं रसिं विहीन मी ललित मात्र कोंडावरी। उनाड निज लेंकुरा स्तवुं नयेचि तोंडावरी ॥ ५ ॥ असो घडु भवद्वरें हृदयचित्खतारावली। वृथा श्रुतिपथाविणा नयनविल्खतारावली। न घालि हरिच्या गळां करुनि नाम हारावली। उगे श्रम तदीय ते पडुनि नाम हारावली ॥ ६ ॥ रमापपद आसुवें भिजावि ब्रह्मसारागिरी। अशास मग पाहिले मनिं कशास कारागिरी। जपें न न तपेंहि जो अणुहि गर्विता फावतो। न योग करितां कळे भजकपाठिं तो धांवतो ॥ ७ ॥ जसा पवन मंत्र हा उलट हंस सोहं ध्वनी। तसा सम न जीव हा शिवचि होय सोहंध्वनी। अहंपण परंतु तें उभय ठायिंचें ना जिरे। म्हणोनि यदुवल्लभस्मरण सर्वदां साजिरें ॥ ८ ॥ हरिग्रहणयोग्य तें जंव निजात्मसंबोधनीं। मग श्रम उगेचि कां करितसा अहंरोधनीं। खरें तदपि जागणें अधिक नीजणें सांडुनी। न संधित अहं पहा मतिविशेषता मांडुनी ॥ ९ ॥ परंतु चपळा मना किमपि भाव हा नाकळे। तरंग उठतां कसा जलधि थांवसा नाकळे। मनस्थित म्हणोनियां करिति योगि ज्या कारणें। सवृत्तिकहि तारितो मधुर नाम हाकारणें ॥ १० ॥ न वृत्ति उठती कशा सलिल बुन्दुदाचे परी। अशाच वदल्या बहू अवधुतादि सद्वैखरी। खरे परि जलालयीं लहरि दों निमित्तीं घटे। शुभा शशिज आदिमा पवनजा दुजी संघटे ॥ ११ ॥ समुद्र पवनें चढे प्रबल जैं तुफानावरी। महाकुशल तेधवां तरणिया नफा नावरी। शशांकजनिता शुभा लहरि सागरीं ऊठती। तदा भयविवर्जिते सहज तारुही सूटती ॥ १२ ॥ अशा हृदयवृत्तिही द्विविध सत्वजा कामजा। शुभा प्रथम दूसऱ्या अशुभ घेतिना सामजा। स्वभावजाचि आदिमा म्हणुनि

भक्तियोगीं सुखें । सहाय करिती हरिस्मरण चालतांना मुखें ॥ १३ ॥ तरंग पवनोत्थ ते पवनरोधनें नासती । तशा विषयवासना पवनरोधनें नास-ती । हरिस्मरण मात्र हें उभय कार्य सारें करी । हिरण्य परि घेति हे सुजन आर्य झारेकरी ॥ १४ ॥ सकाम करितां श्रम प्रणवमंत्र पारायणीं । तदा न उदये दया हृदयसिद्ध नारायणीं । सुरालय सुरालयीं स्वसुख शेवटीं अल्प-ना । म्हणोनि हरि चिंतिजे त्यजुनि पोटिं संकल्पना ॥ १५ ॥ विराग न नरा बरा जगतिं रोग[3] जेणें घडे । उपासन न मान्य तें चरण–सारंगें ऊधडे । रुचे न चितिचातुरीं विषय वासना तर्पणें । म्हणोनि तनुमानसा दनुजनाशना अर्पणें॥१६॥न वागृणविमोचना स्वगुरुरूप शर्वापदा । नमी शठतया कशा चुकति बोधगर्वापदा । न रंग हृदया जया चढत कृष्णसंकीर्तनीं । दिनेशकुमरा गृहीं पडत तो महाकर्तनीं ॥ १७ ॥ कुणी यदुपभक्तितें म्हणाति योग्य कां आयका । परद्विपमर्षी हिनें विवश होति हा नायका । मिळेल मग देशही रिपु पडोनियां खालते । अशाऽशुचिकुलोद्भवा समयि मांसही चालतें ॥ १८ ॥ बहु व्रजप भक्तही म्हणवितात आम्हांमधें । स्वमान मिळवावया त्याजिति सिद्धसामामदें । त्यजूनि बहु शास्त्र ते महि-वरादि आवेशिती । परंतु शतमूर्ख हे बत उगे द्विजां द्वेषिती ॥ १९ ॥ पराशरज बोलिले भजनयोग ज्या लाभला । द्विपड्गुण बरा-मराहुनि कुजाति तोही भला । न विप्रसम देवता पुढति वाक्य हें फावलें । म्हणूनि उभयान्वयें भजनसाम्य हो पावलें ॥ २० ॥ समत्व भजनीं असो विषमता असो भोजनीं । समत्व हरिकूजनीं विषमता क्रतू-पूजनीं । अपक्व समदानही विषम कांचनार्पणीं । समत्व चितिदर्पणीं विषमता बरी तर्पणीं ॥ २१ ॥ स्वभक्त्यभिमतिस्तव द्विजविधान नासूं नये । द्विजेंहि परि कर्मठें हरिजनांस हांसूं नये । दरिद्रचि भलें कुणा कधिंहि तोंड वासूं नये । अधर्म करुनी गळां रविजरज्जु फासूं नये ॥२२॥ न शूद्र निगमें तरे प्रणवकोटि संकल्पुनी । न विप्रहि तरे वृथा यदुपनाम हें

---

१ न + असती = रहात नाहींत. २ क्रोध. ३ वैदिकाचार.—ब्रह्मसूत्र अ० ३ पाद १.

ल्पुनी । पुराण हरिभक्तिदे श्रवणयोग्य शूद्रांजनां । स्वभक्तिरधिं मीनता हरिच देत मुद्रा जनां ॥ २३ ॥ बळें द्विजचि होउनी निगम जो वृथा सांवडी । विरक्ति न तया परी यमचि भाक्षितो आवडी । स्वकीय अणु सोडुनी परधनार्थ जो धांवतो । वदान्य असला तरी सहज चोरता पावतो ॥ २४ ॥ गुरुद्विजपदांबुजीं मम अखंड वाढो रती । स्वधर्म परिपालनीं निजमना जडो आरती । न स्वप्नगत भोग्यही जननिजेविं पुत्रांदिकां । अधर्म न बरा तसा पठित वेदसूत्रादिकां ॥ २५ ॥ स्वदैववशसन्मुनी बहुत धर्म हो सांडिती । परंतु फळ भोगितां मग न दीनता मांडिती । व्रजेश परवायका हरि म्हणोनि तद्वायका । बळें हरिति भिल्ल हे चरित भारतीं आयका ॥ २६ ॥ पढोनि निगमांतही उगिच धर्म जो वारिता । न पाप चिति मी असें म्हणुनि त्यास संहारिता । श्रुति स्फुट कळे असा असल आततायी तरी । तयास वधितां म्हणे स्मृति न दोप ये अंतरीं ॥ २७ ॥ स्वजीव जरि ईश्वरा रचित दृष्टिसृष्ट्यन्वयें । तथापि न तदिच्छया भलतिशीच सृष्ट्यन्वयें । स्वयें अबुध होउनी हरिस देत सर्वज्ञता । स्वपाद हणि त्या अशा कवण दे अपूर्वज्ञता ॥ २८ ॥ कदापि न शके रचूं उलट ईश्वरा जीव हा । वृथाचि मग गर्व कां वचनमात्र निर्भव हा । वडील यदुवल्लभा समजुनी मनीं जो भजे । तयाप्रतिच शोभते निगमवित्त निस्तोभ जें ॥ २९ ॥ उपास्तिसम भक्ति ते म्हणति तुच्छता वासना । उपास्ति परि अज्ञ घे रुचत भक्ति निर्वासना । उपास्ति निज यत्नजा कृतिसमुचिताभावना । गुणश्रवण ज्या घडे सहज भक्तिनिर्भावना ॥ ३० ॥ म्हणे तनु नहे विभू सगुण माधवाची अणू । तयास कळली नसे चिति पढोनि वेदां अणू । पुरीतातिंत भासते जगनभादि सारे जरी । खसाम्य विभुता तदा हरिविषीं नव्हे साजिरी ॥ ३१ ॥ न मध्य न महत्यणू सकल शब्दलक्ष्या चिती । तथापि सुगमा गमे पदविबोधपक्षा चिती । विरुद्ध न तदा कदा सगुण माधवाची तनू । दिसे कनकभूषणीं वपुगुणी तसा चेतनू ॥ ३२ ॥ सुवृत्ति असतां तळीं अगुण जो भला आठवी । स्ववृत्ति उठतांक्षणीं सगुण अंतरीं साठवी । स्वयें अगुण होउनी

सगुण चिंतितो सादरें । तदीय चरणांबुजीं भ्रमर चित्त हो आदरें ॥ ३३ ॥ तुम्हां विनविते प्रभो चरण मस्तकीं घेउनी । यथावचनरूपहें पृथिवीदान हो देउनी । प्रसन्न करुं इच्छिते वर गुरो मला पाठवा । अखंड अवतार हा मम मनीं वसो आठवा ॥ ३४ ॥ अलंदिपति सद्गुरुस्मरणदीप जैं पाजळे । तदा चितिविशेषता कळुनि भास हा पां जळे । विशेष चिति-सौरसें निखिल हारपे दर्पतो । नमोनि शतदां तया लिखित पाउलीं अर्पतो ॥ ३५ ॥

अस्तु. याप्रमाणें श्रीमहाराजांच्या चरित्राचें हें आनंदसंवत्सर व उमरावती प्रकरणही येथें समाप्त झालें. महाराजांनीं बालपणापासून स्वतःच्या शारीरसुखाकडे लक्ष्य न देतां, संसारांतील सुखदुःखांविषयीं समचित्तत्व ठेवून केवळ परोपकारार्थ—धर्मप्रसारार्थ—आपला देह झिज-विला, मंत्र, औषधी, मनोबल यांच्या प्रभावानें संबंधीं जनांची शारीर-पीडा निवारण केली, सदाचार शिक्षणानें त्यांचे मानस दोष घालविले व भगवद्भजनानें त्यांस प्रेमदान देऊन त्यांची सद्वासना जागृत केली इ० गोष्टी माधान व सिरसगांव प्रकरणांत मागें वर्णन झाल्या आहेत. त्यांवरून महाराजांचा जन्मसिद्ध गुरुत्वाधिकार दिसून येतो व संतांचें जीवितसर्वस्व केवळ परोपकारार्थच कसें असतें याची उत्तम साक्ष पटते. हीच त्यांची आधिकारिक दैवी कला पुढें अधिकाधिक प्रगट होत जाऊन सामान्य जनांत वर्णाश्रमधर्माचें बीजारोपण, जिज्ञासुजनांस ज्ञानोपदेश, ज्ञानीजनांस हरिगुरुभक्तीचा उपदेश व भक्तीच्या अधिकाऱ्यांस भगवत्प्रेमकलेचें शिक्षण कसें मिळत गेलें व ज्याच्या त्याच्या अधिकारानुरूप मधुराद्वैताचा सर्व-सामान्य मार्ग जनांस महाराजांनीं कसा सुलभ करून दिला हें या उमरा-वती प्रकरणांत नुकतेंच दिसून आलें आहे. सारांश, माधान, सिरसगांव व उमरावती हीं तीन प्रकरणें म्हणजे महाराजांच्या दयारूप अनुग्रहकथांचें विविध प्रकारें दिग्दर्शन असून त्यांच्या परमार्थशिक्षणाचीं तीं ऐतिह्य-प्रमाणें होत असें म्हणणें विशेष शोभेल. या एकंदर कथावर्णनांत महा-राजांचें जें अत्यंत मनोवेधक अंतरंग चरित्र व जी संप्रदायपरंपरेची मुख्य

ा सर्वत्र अनुगत झालेली आहे त्यांचें विशेष स्पष्टीकरण होणें
माहे. तें त्यांच्याच कृपेनें सुहृत्प्राप्ति, अलोक प्रकरणादि आगामी
मालिकेंत यथामति करूं.

इतिः ॐतत्सत् श्रीमत्सद्गुरु ज्ञानेश्वर महाराजार्पणमस्तु.

उमरावती प्रकरण समाप्त.

---



## श्रीमहाराजांचें स्तुतिस्तोत्र व आरती.

पद. ( अद्वयानंदशौरी गोविंद गोपचारी ॥ या चालीवर. )

आळंदिराजतनया व्रजराजवीरजाया ॥ ध्रु० ॥

कारुण्यरम्यमूर्ति घननीळ दिव्यकांति । सौभाग्यतिलक जगतीं वाढवी भक्ति प्रीति । मस्तकीं कुरळपंक्ति श्रुतिभृंग रुंजताती । प्रत्यक्ष कृष्णमूर्ति प्रगटली गोपिरीती ॥ आळंदिराजतनया० ॥ १ ॥ श्रुतिसंतमार्ग उजळी वेदान्त भक्तिसाठीं । नास्तीक तर्कवादा नाशिले सहजगोठी । बोधुनी ज्ञानगोष्टी खांडिली शत्रुथाटी । कळवळा बहुत पोटीं पाहुनी दीन दृष्टीं ॥ आळंदिराज० ॥ २ ॥ चित्सुधावाक्यरत्नें वाक्सूत्रीं ओवुनीयां । श्रुतियुक्ति स्वानुभूती सुमनांत गुंफोनियां । भक्तीची माळ केली अर्पिली गुरुपायां। बहु दानशूर जगिं यां श्रीकृष्णप्रेम द्याया ॥ आळंदिराजतनया० ॥ ३ ॥ रंगुनी आत्मरंगीं रंगली नामरंगीं । रंगणीं नाचताहे अतिदिव्य रासरंगीं । रंगनाथ प्रभुसंगीं रंगली चित्तभृंगी । स्मरतांचि अंतरंगीं उद्धरी कुजनसंगीं ॥ आळंदिराज० ॥ ४ ॥ नतजनां बुद्धिदात्री लावुनी शीलशिक्षा । जशी धेनु वत्सपाठीं धांवुनी करी रक्षा । सानन्य दीन होतां करि दान प्रेमदीक्षा । कनवाळु माय माझी रक्षीत मिलिंदाक्षा ॥ आळंदिराजतनया व्रजराजवीर जाया ॥५॥

---

### स्तोत्र ( बाबाजीमहाराजकृत. )

गर्भी मी बहुदुःख सोसुनिहि ते जन्मासि आलों जहीं । मोहामाजिं भुलोनियां विसरलों त्वद्दत्तमंत्रासही । सेवोनी विषयां सुखें

रमतसे सांडोनि त्वद्भावना । श्रीज्ञानेश्वर लालिते तवपदीं भावें करी वंदना ॥ १ ॥ त्यागोनी वडिलांस नित्य रतलों श्रीपुत्रवित्ता-मधें । जाणीलें नच कीं अनर्थ कथिला भोगीं तयाच्या बुधें । मानीलें सकळांस तुच्छ पुजिलें नाहीं कधीं सज्जना ॥ श्रीज्ञानेश्वर लालिते० ॥ २ ॥ जन्मोनी रमणीय ब्राह्मणकुळीं वेदां न अभ्यासिलें । वेदोक्ता संकळा क्रिया समजुनी धर्मा न संपादिलें । श्रेष्ठांही उपदेशितां करि-तसे त्यांच्या सवें वल्गना । श्रीज्ञानेश्वरलालिते तदपदीं० ॥ ३ ॥ तारुण्यापगमें वरीलचि जरा कंटाळती सर्वही । कीं अंतीं यमयातना म्हणुनियां उद्वेग नोहे कहीं । झालें क्षीण शरीर हें परि तशी नोहे कदा वासना । श्रीज्ञानेश्वरलालिते० ॥ ४ ॥ दैवें पाय तुझे दिसोनि मजला नाहीं कधीं पूजिलें । नाहीं प्रेमभरें विनीतवचनें तोषा तुम्हां दीधलें । आतां कोण गती कळे न पुढती होईल माझ्या मना । श्रीज्ञानेश्वरलालिते० ॥ ५ ॥ भोगावें याच देहीं फलाहि परि तयाचें मियां मायबापा । राहो वाचे तुझें बा सतत शुभ असें नाम जें वारि तापा । होवो मद् हार्दशुद्धी जळुनि सकलही पातकें त्वद्वियोगें । श्रीपांडुरंगनाथा तवपदनुति वांचून ना कांहीं मागे ॥ ६ ॥

## आरती.

जयदेव जयदेव पांडुरंगनाथा । आरती ओवाळीतां हरली भव-चिंता ॥ जयदेव जयदेव० ॥ धृ० ॥ अनंत काळाची जीवशिवा तुटी । वारूनी उपाधी करविशी भेटी ॥ १ ॥ भक्तिप्रेमपीसें साकारा आला । साच केलें एकाकी न रमते या बोला ॥ २ ॥ भावें वंदितो मी सुकुमार पायां । ज्ञानेश्वरकन्ये निवारावी माया ॥ जयदेव० ॥३॥

---

श्रीज्ञानेश्वर माउली.

## प्रस्तुत ( चरित्राच्या ) पूर्वखंडाला सक्रिय सहाय करणाऱ्या मंडळीचीं नावें:—

रा० रा० रघुनाथराव वामन केकरे हरदा. ३००

,, ,, " क्ष " उमरावती. १००

,, ,, दिनकर वामन गोखले. बी. ए. एल्. एल्. बी. प्लीडर. खंडवा. ६०

,, ,, काशिनाथराव आठवले. बी. ए. मुनसफ. बांदा. ६०

,, ,, दाजीसाहेब देवईकर. वकील. चांदा. ( दरमहा ५ रु. प्रमाणें ) ६०

,, ,, निळकंठ बळवंत भवाळकर. बी. ए. एल्. एल्. बी. प्लीडर. नागपूर. ( दरमहा ५ रु. प्रमाणें. ) ६०

,, ,, गोपाळराव केकरे. एक्साइज इन्स्पेक्टर. सोहागपूर. ... ४०

,, ,, केशव गणपतराव खापरे. तहसिलदार. सोहागपूर. ३६

,, ,, दामोदरराव केकरे. रायपूर. ३६

,, ,, विठ्ठलराव केकरे. बी. ए. एल्. एल्. बी. प्लीडर. मंडला. ३६

सर गंगाधरराव माधव चिटणीस. नागपूर. २५

सेठ लक्ष्मीनारायण. हरदा. २५

रा० रा० काशिनाथराव धर्माधिकारी. एल्. एम्. एण्ड एस. दर्यापूर. वऱ्हाड. २५

,, ,, शंकर जयराम सोमवंशी. सब ओव्हरसीयर. पिंपळनेर. जि० खानदेश. २५

रमतसे ,, ,, पुंडरीकराव जोशी. सबजज्ज. खंडवा. २५

करी ,, शांताराम गणेश रेगे. जहागिरदार.
अजनास, होळकर स्टेट. २५

,, ,, विश्वनाथराव क्षीरसागर. तहसिलदार. हिंगणघाट. २१

,, ,, हरिभाऊ केवळे. उमरावती. १५

,, ,, गोविंद बळीराम किडे. कारंजा. १५

,, ,, हरिभाऊ अडोणी. वणी. १५

,, ,, आत्माराम वामन मुळे. इंदूर. १२

,, ,, रामनारायण. नागपूर. १२

,, ,, खंडेराव मजलीवाले. हरदा. १२

,, ,, यशवंत सीताराम कानविंदे. नागपूर. १२

,, ,, विनायकराव बाबाजी अयाचित. रायपूर. १२

,, ,, नारायण गणेश केकरे. मालगुजार. छिंदगांव. १२

,, ,, आनंदराव केकरे पाटील. पटाजन. जि. नेमाड. १२

,, ,, नारायणराव वाडेगांवकर. रायपूर. ११

रा० रा० पुरुषोत्तमराव देशमुख. देऊरवाडा. वऱ्हाड. १०

,, ,, वामनराव लोहारकर. सीताबर्डी. नागपूर. १०

,, ,, लक्ष्मणराव केकरे. सावली. जि. चांदा. १०

,, ,, त्र्यंबकराव देहनकर. बी. ए. एल्. एल्. बी.
प्लीडर. बिलासपूर. १०

,, ,, व्यंकटेश गोविंद डाऊ. बी. ए. नागपूर. १०

,, ,, कल्याण गंगाधर देशपांडे. उमरावती. ६

,, ,, दामोदरपंत आकोटकर. चांदा. ५

,, ,, दामोदरपंत मेहरीकर. बारासिवनी. जि. बालाघाट. ५

वेद. दामोदर बाळकृष्ण जोशी. मोरशी. वऱ्हाड. ५

गं० राधाबाई कोम उद्धवराव मांढरे. पुणें ५

याशिवाय ज्या सद्गृहस्थांनीं वर्गणी देण्याचें कबूल केलें आहे त्यांजकडून वर्गणी येतांच त्यांचीं नांवें छापून वरील यादींत समाविष्ट केलीं जातील.

# श्रीगुलाबराव महाराजकृत ग्रंथ.

## विक्रीस तयार.

———※०※———

श्रीगुलाबरावमहाराजकृत ग्रंथ **सूक्तिरत्नावली** नांवानें आजपर्यंत दहा भागांत छापून प्रसिद्ध झाले आहेत. प्रत्येक भागाला ' यष्टि ' असें नांव आहे. त्यांचा तपशील असा:—

**१. प्रथम यष्टिः**—किं. रु. १. यांत आलेले ग्रंथः—भक्तिपदतीर्थामृत, निगमान्तपथसंदीपक, चौसष्टी, पत्रें १ ते ११, श्रीमद्भगवद्गीतासंगति, निदिध्यासनप्रकाश, कान्तकान्तावाक्यपुष्पम् ( संस्कृत ), सूचनाप्रकरण.

**२. द्वितीय यष्टि पूर्वार्धः**—किं. रु. १. यांत आलेले ग्रंथः—कृष्णपंचपदी, सद्वैजयंती, बाराखडी, चित्तोपदेश, त्रिकांडसार, तुंबडी, चिरंजीवपदाभ्यास, शांतिसुधाकर, सोपानसिद्धि, नित्यतीर्थ, मणिमंजूषा, प्रियपाहुणेर, अलौकिक प्रवास, अमोघनिरूपण, स्त्रीगीत, अपराधक्षमापनस्तोत्र.

**३. द्वि. यष्टि उत्तरार्धः**—किं रु. १॥. यांत आलेले ग्रंथः—गुरुपंचपदी, पत्रें १ ते २०, ध्यानयोगदिवाकर, भगवद्भक्तिसौरभ, प्रीतिनर्तन, गोविंदानंदसुधा ( संस्कृत ); श्रीज्ञानेश्वरमातृपितृभावनाष्टक, सूचनाप्रकरण.

**४. तृतीय यष्टिः**—प्रियलीलामहोत्सव. किं. २॥. रु. ही श्रीमद्भागवताच्या प्रथमस्कंधावर गद्यपद्यात्मक टीका आहे.

**५. चतुर्थ यष्टिः**—स्त्रीगीतसंग्रह. १२ आणे. लहान मुली व स्त्रिया यांना फार उपयोगी.

**६. पंचम यष्टिः**—अलौकिक व्याख्यानमाला. किं. १ रु. यांत अलोकशास्त्रासंबंधानें-मनाच्या अत्यंत शुद्ध व सूक्ष्मस्थितीसंबंधानें—सयुक्तिक, सप्रमाण, सोपपत्तिक व तात्विक विवेचन फार सुंदर व नवीन तऱ्हेवें असून शेवटल्या " अमरत्वशोध " व्याख्यानांत पारकीय तत्वज्ञानाचा तुलनात्मक विचार केलेला आहे.

७. षष्ठम यष्टिः—स्वमंतव्यांससिद्धांतप्रकार ८ आ० यांत मधुराद्वैत-भक्तीचें प्रतिपादन प्रश्नोत्तररूपानें हिंदी भाषेंत केलें आहे.

८. सप्तम यष्टिः—उपदेशामृत [ पत्रें १ ते ३७ ] १॥. रु.

९. अष्टम यष्टिः—साधुबोध. आबालवृद्धांस उपयोगी. किं. १ रु. यांत धार्मिक, नैतिक, सामाजिक, कौटुंबिक, पारकीय व आर्यशास्त्रांसंबंधी विविध-विषयक प्रश्नोत्तरें गद्यरूपानें आलीं आहेत.

१०. नवम यष्टिः—[ पूर्वार्ध. ] अभंगांची गाथा किं. २॥. रु.

११. नवम यष्टिः—[ उत्तरार्ध ] पदाची गाथा किं. २॥. रु.

१२. दशम यष्टिः—प्रेमनिकुंज. किं. १॥. रु. यांत महाराजांच्या मधुराद्वैतभक्तीचें शास्त्रीय, सोपपत्तिक, व बहारीचें विवेचन आहे.

**सूचना—महाराजांचें चरित्र. पूर्वखंड किं. रु. ३ व सुहृत्प्राप्ति प्रकरण किं. रु. १ हे दोन्ही एकदम मागविणारास** ३॥. रुपयांस मिळून शिवाय वरील १२ पुस्तकांपैकीं कोणतेंही एक पुस्तक पाऊणपट किंमतीस मिळेल. ट. ख. निराळा पडेल. चरित्राबरोबर वरील १२ ही पुस्तकें एकदम मागविल्यास पाऊणपट किंमतीस मिळून टपाल खर्च पडणार नाहीं. पुस्तकें खालील पत्त्यावर मागवावीं:—

१. त्रिपुरवार. श्रीज्ञानेश्वरमंदीर, दहीसात उमरावती.
२. रा. गोपाळ लक्ष्मण पाध्ये महाल, नागपूर सिटी.
३. रा. नारायणराव केकरे बी. ए. एल्. एल्. बी. प्लीडर
हरदा, सी. पी.